धर्मवीर

# डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे यांचें चरित्र

भाग पहिला

लेखक
साहित्याचार्य महामहोपाध्याय
बाळशास्त्री हरदास

काल प्रकाशन, पुणें

धर्मवीर

# डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे यांचें चरित्र

भाग पहिला 

लेखक
साहित्याचार्य महामहोपाध्याय
बाळशास्त्री हरदास

काळ प्रकाशन, पुणें

# आत्मनिवेदन

मध्यप्रांताच्या राजकीय जीवनाचे आद्य शिल्पकार, हिंदूंच्या सैनिकीकरणाच्या महामंत्राचे आद्य प्रवर्तक व समर्थ हिंदुराष्ट्राच्या निर्मितीसाठी सर्वस्वाचा होम करून अविरत प्रयत्नशील असणारे महान् कर्मयोगी कै. धर्मवीर डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे यांच्या चरित्रग्रंथाचा हा प्रथम खंड पूर्ण करताना मला अतिशय समाधान वाटत आहे. हिंदूंच्या समर्थ व तेजस्वी पुनरुत्थानाची आवश्यकता ज्याला ज्याला म्हणून मनोमन पटलेली आहे त्या कोणालाही डॉ. मुंजे यांच्या सत्त्वधीर व्यक्तिमत्त्वाची आठवण झाल्याविना राहणार नाही. उंच व गोलाकृति काळी टोपी, रुबाबदार शुभ्रवर्ण दाढी, सतेज मुखमंडल, गुडघ्यापर्यंत लांब असणारा बादशाही झग्यासारखा बंद गळ्याचा रेशमी कोट, जरीकाठी धोतर, विस्तीर्ण भालप्रदेशावरील ठसठशीत गंधाचा शुभ्र टिळा व राजदंडासारखी दिसणारी हातातील जाडजूड वेताची काठी या थाटातील डॉ. मुंजे यांची मूर्ति ज्यांनी ज्यांनी पाहिलेली आहे त्यांच्या त्यांच्या मनावर तिने आपला अविस्मरणीय ठसा उमटविलेला आहे. त्यांचे मित्र तर तो ठसा विसरूच शकत नाहीत. पण मुंजे यांचें शत्रुत्व हें स्वतःचें जीवितकार्य मानणारे व त्यासाठी न पटणारीं तत्त्वें स्वीकारून न पटणाऱ्या नेतृत्वाचे बौद्धिक दास होण्याइतकें स्वतःचें अधःपतन करून घेणारे त्यांचे शत्रुही स्वतःच्या हृत्पटलावरील तो ठसा मिटवू शकलेले नाहीत इतका तो अविस्मरणीय आहे.

दि. १६ एप्रिल १९३१-ला गोलमेज परिषदेत प. पू. धर्मवीर डॉ. बा. शि. मुंजे यांनी केलेल्या महान् कार्यास्तव संघस्थानावर त्यांचा प्रकट सत्कार करताना राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे संस्थापक कै. प. पू. डॉ. केशवराव हेडगेवार म्हणाले की, " नागपुरात जे जे म्हणून राजकीय चळवळीत भाग घेणारे लहान मोठे लोक आहेत, त्या सर्वांनी डॉ. मुंजे यांच्या पायाशी बसून राजकारणाचे धडे घेतले आहेत. सवंग लोकप्रियतेच्या मागे लागून लोकमताच्या प्रवाहाबरोबर वहात जाणें हें सोपें आहे; परंतु स्वतःच्या सदसद्विवेक बुद्धीला जर सर्वसाधारण लोकमत पटलें नाही, तर लोकमतप्रवाहाच्या विरुद्ध उभें राहून छातीठोकपणे आपलें मत लोकांसमोर मांडणें हेंच खऱ्या पुढाऱ्याचें काम आहे. प्रवाहाबरोबर वहात जाणें हें पुढारीपणाचें लक्षण नसून माघारीपणाचें

लक्षण आहे. परिस्थिति आपल्या मताप्रमाणे निर्माण करून, लोकमत आपल्या मताकडे खेचून घेण्याचा जो प्रयत्न करतो, तोच खरा पुढारी होय. पुढारीपण लोकमतानुवर्तित्वात नसून लोकनियंत्रणात आहे. प्रसंगी लोकमताविरुद्ध जाण्यासही न कचरणें याचेंच नांव सत्यनिष्ठा; आणि या कसास लावून पाहिलें तर डॉ. मुंजे यांच्यासारखा सत्यनिष्ठ माणूस साऱ्या नागपूर प्रांतात दुसरा नाही."

प. पू. डॉ. हेडगेवार हे लहानपणापासून डॉ. मुंजे यांच्या परिसरात होते. डॉ. मुंजे यांचें त्यांच्यावर अपत्यनिर्विशेष प्रेम होतें. माणसाची अचूक परीक्षा करण्यात अतुलनीय असलेल्या डॉ. हेडगेवारांनी डॉ. मुंजे यांचें हें जें वर्णन व मूल्यमापन केलेलें आहे तें अत्युक्ति व न्यूनोक्ति या दोषांपासून अलिप्त असें यथार्थ मानावयास प्रत्यवाय असू नये.

कै. धर्मवीर डॉ. मुंजे यांच्या पन्नास वर्षांच्या राजकीय जीवनाचा इतिहास म्हणजे कै. डॉ. हेडगेवार यांनी गौरविलेल्या सत्यनिष्ठेसाठी केलेल्या संघर्षाचा दीप्तिमान् इतिहास होय. या इतिहासात डॉ. मुंजे कधी लोकप्रियतेच्या मखमली हिरवळीवरून चालताना दिसतात तर कधी लोकक्षोभाच्या निखाऱ्यांनी भरलेल्या खाईतून पदयात्रा करताना आढळतात; कधी त्यांच्या जयगर्जितांनी आसमंत निनादित झालेलें दिसून येतें तर कधी त्यांच्यावर झालेल्या अपशब्दांच्या व शिव्याशापांच्या वृष्टीने वातावरण धुंद झालेलें दिसतें; कधी ते सन्मानाच्या शिखरावर आरूढ झालेले दिसतात तर कधी अपमानाच्या व विटंबनेच्या गर्तेत पडताना दृष्टोत्पत्तीस येतात. पण सन्मान व अवमान, सुख व दुःख निन्दा व स्तुति यांच्या आघातांनी मुंजे यांची सत्यनिष्ठा व ध्येयनिष्ठा कधीही अंशतः सुद्धा कंपित झालेली नाही हा त्यांच्या उदात्त व्यक्तिमत्त्वाचा असाधारण गुणविशेष होय. सर्व प्रकारच्या त्यागात कीर्तीचा त्याग अत्यंत दुष्कर आहे. सर्व एषणांना जिंकता येतें; पण लोकेषणेला जिंकणें अशक्यप्राय असतें. कै. धर्मवीर डॉ. मुंजे यांनी ध्येयनिष्ठेसाठी व सत्यासाठी लोकक्षोभाच्या अग्नीत आपल्या कीर्तीचेंही हवन केलें व लोकेषणेला तुच्छ लेखलें आहे. स्थितप्रज्ञाच्या धीरोदात्ततेने भारतीय राजकारणाच्या व्यासपीठावर ते शेवटपर्यंत झुंजत राहिले. सांस्कृतिक दृष्टीने अत्यंत हीन पातळीवरून त्यांच्या राजकीय प्रतिस्पर्ध्यांनी त्यांच्यावर ज्या स्वरूपाचे दारुण आघात केले त्या स्वरूपाचे आघात दुसऱ्या कुणावरही झाले असते तर सामान्यतः तो खचला असता. पण हिमाचला-

प्रमाणे सारे आघात पचवून मुंजे ताठ उभे राहिले. सह्याद्रीच्या कड्याचा कणखरपणा त्यांच्या प्रत्येक पदन्यासात प्रत्ययास येत असे.

मुंजे यांनी आजीवन केलेल्या या संघर्षात व्यक्तिनिष्ठ भाव-भावनांचा कधीही स्पर्श होऊ दिलेला नाही. महात्मा गांधींच्या राजकीय तत्त्वज्ञानाचे ते महान् विरोधक होते. पण महात्मा गांधी या व्यक्ती-विषयी त्यांची कोणतीही द्वेषमूलक विपरीत भावना कधीच नव्हती. त्यामुळे गांधीजींचे व त्यांचे वैयक्तिक स्नेहसंबंध शेवटपर्यंत सौहार्दपूर्ण होते. शेवटपर्यंत गांधीजींचा व त्यांचा पत्रव्यवहार होता. १९४२-च्या आंदोलनाच्या कारावासातून सुटका होताच गांधीजींनी ज्या आपल्या स्नेह्यांना विचारविनिमयासाठी पत्रें पाठविलीं त्यात डॉ. मुंजे होते एवढें उल्लेखिलें म्हणजे पुरे. त्यांच्या हृदयाच्या श्रीमंतीचें व दिलदार-पणाचें सगळ्यांत महत्त्वाचें उदाहरण डॉ. खरे यांच्या संबंधातील आहे. निवडणुकीचा फड जिंकण्याच्या क्षुद्रतम स्वार्थासाठी डॉ. खरे यांनी ज्या पातळीवर उतरून मुंजे यांच्यावर चिखलफेक केली ती सार्वजनिक जीवनातील सभ्यतेच्या संकेतांच्या दृष्टीने केवळ अक्षम्य होय. पण गांधीजींनी खरे यांच्यावर आघात करताच मुंजे खऱ्यांच्या पाठीशी येऊन उभे राहिले. इतकेंच नव्हे तर अलवार प्रकरणातील खरे यांच्या कार्याची मुक्तकंठाने प्रशंसाही त्यांनी केली.

सहृदयता, निर्मत्सरीपणा व हृदयाची श्रीमंती अथवा दिलदार-पणा या विलोभनीय गुणविशेषांसमवेतच तत्त्वनिष्ठेसंबंधात सह्याद्रीचा टणकपणा, अकुतोभय वृत्ति व धैर्य हे डॉ. मुंजे यांच्या व्यक्तिमत्त्वाचे अविभाज्य घटक होते. लोकमान्य टिळक हे मुंजे यांचें सर्वांत मोठें निष्ठास्थान होते. पण त्यांच्या स्वतंत्र प्रज्ञेला जें योग्य दिसलें तें त्यांनी टिळकांच्याही तोंडावर सांगावयास कधी कमी केलें नाही. लखनौ करार ही टिळकांची चूक आहे असें ते शेवटपर्यंत म्हणत असत. परिणामतः जेथे टिळकांचें धोरण बरोबर आहे हें त्यांना पटलें तेथे मोकळ्या मनाने आपली चूक मान्य करतानाही त्यांना कधी संकोच वाटला नाही. त्यांचें उन्नत आणि ताठ मस्तक तत्त्वाशिवाय कोणाहीसमोर कधी नमलें नाही. स्वातंत्र्यवीर सावरकरांनी हिंदुमहासभेत प्रवेश करून हिंदुत्व-निष्ठ राजकारणाची धुरा आपल्या स्कंधावर घेतल्यानंतर त्यांचें नागपूरच्या प्रचंड सभेत स्वागत करताना डॉ. मुंजे यांनी काढलेले पुढील उद्गार ध्यानात ठेवण्यासारखे आहेत. "मला पुष्कळ लोकांनी सावर-करांना हिंदुमहासभेत येण्याची विनंती करावी असें म्हटलें. मी त्यांना

सांगितलें की, मी अशी विनंती कोणालाही करणार नाही. सावरकर बुद्धिमान् आहेत. ते स्वत: आपण काय करावें तें ठरवू शकतात. ते जर हिंदुमहासभेत आले तर येथील सर्वांत अधिक मानाचें स्थान त्यांना देऊन मी त्यांच्यासमोर विनम्र होईन. ते जर हिंदुत्वनिष्ठ राजकारणाच्या विरोधी उभे राहिले तर मी, ते कितीही मोठे असले तरी, त्यांना विरोध करीन. आज ते आपण होऊन हिंदुत्वाची धुरा वाहण्यास पुढे आले आहेत. मी त्यांचें नम्रपणे स्वागत करतो."

सत्यसिद्धान्ताचा अंती विजय होत असतो हें खरें असलें तरी सत्यसिद्धान्ताचा पुरस्कार करणाऱ्या प्रत्येक योद्धयाला अथवा द्रष्टयाला तो विजय पाहण्याचें सौभाग्य प्राप्त होतेंच असें मात्र नाही. एखादा शिवाजी तो विजय पाहण्याइतका सद्भाग्यशाली ठरतो, तर अनेक महाराणा प्रताप अथवा गुरु गोविंदसिंह सत्यसिद्धान्ताच्या प्रतिष्ठापनेसाठी झुंजत असता यशाची पताका न पाहताच जीवनाचें विरामचिन्ह उमटवितात. पार्थिव जीवनाच्या इतिश्रीनंतरही त्यांच्या सिद्धान्तांचा शेवटी विजय होतो. त्यानेच ते विजयी ठरतात. ज्या सत्यसिद्धान्तांच्या पुरस्कारासाठी धर्मवीर डॉ. मुंजे हे कर्तव्याच्या रणात झुंजत राहिले त्या सिद्धान्तांचा विजय त्यांना प्रत्यक्ष पाहता आला नाही तरी आज त्यांचे सर्व सिद्धान्त विजयी ठरलेले आहेत व राष्ट्र त्या सिद्धान्तांवर हळूहळू पण निश्चितपणे येत आहे. हिंदूंच्या सैनिकीकरणाचे व सामर्थ्याच्या उपासनेचे आद्य प्रवर्तक म्हणून वर्तमान भारताच्या इतिहासात डॉ. मुंजे यांचाच निर्देश करावा लागेल. चीनच्या भारतावरील आक्रमणानंतर आपल्या कुंभकर्णी मोहनिद्रेतून जागे झालेल्या भारताच्या राज्यसूत्रधारांनी सैनिकीकरणाच्या व शस्त्रास्त्रांच्या संबंधात राष्ट्र स्वयंपूर्ण करण्याच्या दिशेने जें पाऊल उचललें आहे तें गांधीजींच्या तत्त्वप्रणालीच्या संपूर्ण पराभवाचें व डॉ. मुंजे यांच्या विचारप्रणालीच्या विजयाचेंच द्योतक नाही काय?

ज्या प्रतिसहकारवादी व्यवहार्य राजनीतीचा मुंजे यांनी पुरस्कार केला तिचाच अवलंब राजकीय जीवनाच्या उत्तरार्धात स्वत: गाधीजींना करावा लागला हें कशाचें द्योतक आहे? भारतीय राष्ट्र म्हणजे हिंदु राष्ट्र असून हिंदूंचा उत्कर्ष म्हणजेच भारतीय राष्ट्राचा उत्कर्ष व हिंदूंचा अपकर्ष म्हणजेच भारतीय राष्ट्राचा अपकर्ष ह्या कै. मुंजे यांनी पुरस्कारिलेल्या तत्त्वप्रणालीचा अंगीकार आजच्या राज्यकर्त्यांना करण्यावाचून चीन व पाकस्तान या भारताच्या स्वाभाविक शत्रूंना यशस्वी

रीतीने तोंड देता येणार नाही ही वस्तुस्थिति आहे. मुंजे यांना पार्थिव शरीराने विजय पाहता आला नसला तरी ज्या अपार्थिव सिद्धान्तांचे ते प्रतिनिधि होते त्यांच्या विजयाचा आजचा काळ आहे, व हा काळच हें सिद्ध करतो की, धर्मवीर डॉ. मुंजे यांचें त्यागमय जीवन संपूर्णपणे सफल झालेलें आहे. उद्याचें समर्थ, अजेय व विश्वविजयी हिंदुराष्ट्र आपल्या गतकालीन द्रष्टयाचें स्मरण करताना ज्यांना प्रणामाचे अर्घ्य देईल त्यांत पहिल्या तीन चार नांवांत मुंजे यांचें नांव असेल यात शंका नाही.

भारतीय राष्ट्राच्या या सत्त्वधीर सुपुत्राचें चरित्र यापूर्वीच लिहिलें जाणें अवश्य होतें. इंग्रजांकित भारताच्या स्वातंत्र्यप्रयत्नांचा व राष्ट्रनिर्मितीच्या प्रयत्नांचा यथार्थ इतिहास लिहिताना डॉ. मुंजे यांच्या राजकीय व सार्वजनिक जीवनाचा परामर्श घेणें अनिवार्य ठरावें अशी वस्तुस्थिति आहे. भारताचे त्रिखंडकीर्ति नेते पं. जवाहरलाल नेहरू यांचें परिचयपत्र बाळगणाऱ्या ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीच्या एका प्राध्यापकाने नुकताच आमच्याशी पत्रव्यवहार करून डॉ. मुंजे यांचे कागदपत्र पाहण्याची इच्छा प्रदर्शित केली होती. वर्तमान भारताचा इतिहास समजावयास मुंजे यांच्या जीवनाचें व कागदपत्रांचें निरीक्षण आवश्यक आहे असें आढळून आल्यामुळे मी हें पत्र लिहीत आहे असें त्याने लिहिलें होतें. वर्तमान भारताच्या राजकीय इतिहासाच्या अध्ययनाच्या दृष्टीने इतकें महत्त्वपूर्ण असलेलें हें चरित्र लिहावयास आवश्यक तीं साधनेंही मला उपलब्ध होतीं, व सद्भाग्याने तीं मला कै. डॉ. मुंजे यांच्याच कृपेने उपलब्ध झालीं होतीं.

कै. डॉ. मुंजे यांनी प्रवर्तित केलेल्या राजकीय चळवळीत मी तन्मयतेने बारा तेरा वर्षें प्रत्यक्ष भाग घेतलेला आहे. जीवनाचीं दहा वर्षें तरी मी प्रत्यक्ष त्यांच्या निकट सहवासात घालविलीं आहेत व सार्वजनिक जीवनाचे धडे त्यांच्या चरणांशी बसून घेतले आहेत. बिहार येथील दंगलीसारख्या प्रसंगी त्यांच्या बरोबर दौरे करण्याचेंही सद्भाग्य मला लाभलेलें आहे. त्यामुळे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा अभ्यास करण्याची संधि मला पुरेशी लाभली. डॉक्टरसाहेब हयात असतानाच त्यांचें चरित्र लिहिण्याची इच्छा मला झाली व मी त्यांना त्यांचे कागदपत्र पाहण्याची अनुज्ञा मागितली. त्यांनी ती औदार्याने दिली. डॉ. मुंजे यांनी इंग्रजीत सन १९०४-पर्यंतच्या आपल्या लहानपणापासूनच्या आठवणी लिहिलेल्या आहेत. त्यांची टंकलिखित प्रत त्यांनी मला दिली. मी त्यांच्या काही आठवणी त्यांच्या ज्येष्ठ भगिनी कै. गं. भा. दादीबाई लाखे यांच्या

जवळून मिळविल्या. त्यांचा जुना पत्रव्यवहार स्वतः डॉ. मुंजे यांनीच मला दिला होता. उर्वरित कागदपत्रांचा प्रचंड संग्रह डॉ. मुंजे यांचे चिरंजीव बादलराव मुंजे यांनी मला दिला. डॉ. मुंजे यांची दैनंदिनी लिहिण्याविषयी ख्याति होती; पण सन १९४०-पर्यंतची त्यांची एकही दैनंदिनी मला मिळू शकली नाही. पण पत्रव्यवहाराच्या अस्सल पुराव्याचें भरपूर साहित्य चरित्रलेखनाला पुरेसें होतें. तरीही आजवर मला तें लिहिणें शक्य झालें नाही.

मी स्वतः सार्वजनिक कामांच्या व्यापात व सतत चालणाऱ्या दौऱ्यांत इतका व्यापृत होतो व आहे की एका स्थानी बसून चरित्रलेखन करणें कठीण होऊन बसलें. इतर जे अनेक ग्रंथ मी लिहिले ते माझ्या घाईगर्दीच्या प्रवासातही लिहिण्यासारखे होते व प्रवासातच ते लिहिलेही. पण या चरित्राचें तसें नव्हतें. प्रवासात पत्रव्यवहाराच्या फाइली कशा व किती बाळगणार? आधी मुंजे यांचा प्रचंड पत्रव्यवहार सनवारीने लावण्यातच पुष्कळ दिवस गेले. शेवटी तर मुंजे यांच्या चरित्राचें कार्य माझ्या हातून होणार नाही अशा कल्पनेने माझे पुष्कळ मित्र निराश झाले. वाढत्या व्यापामुळे हें चरित्रलेखन आणखीही लांबलें असतें. पण इतर सारे व्याप बाजूला सारून गेल्या सहा महिन्यांत केवळ या कामालाच मी जें वाहून घेतलें त्याचें खरें श्रेय राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे अखिल भारतीय प्रचारप्रमुख मा. उमाकान्त केशव उपाख्य बाबासाहेब आपटे यांना आहे. मा. बाबासाहेब आपटे यांनी कधी प्रेमळ शब्दांनी गोंजारून तर अनेक वेळा जिव्हारी लागणाऱ्या कठोर शब्दांचे कशाघात करून हें काम माझ्याकडून करवून घेतलें आहे. त्यांच्या प्रेरणेचें ऋण मी विसरू शकणें शक्य नाही.

कै. डॉ. मुंजे यांच्या चरित्राचा हा प्रथम खंड अथवा पूर्वार्ध असून या पूर्वार्धात सन १९२०-पर्यंतचा ( नागपूर कॉँग्रेस ) इतिहास आलेला आहे. डॉ. मुंजे यांच्या चरित्राचे टिळकयुगकालीन व टिळकयुगोत्तर असे दोन भाग पडतात. त्यांपैकी पहिल्या भागाचा संपूर्ण इतिहास या ग्रंथात असून मध्यप्रांताच्या राजकीय जीवनाचे शिल्पकार या नात्याने डॉ. मुंजे यांचें दर्शन या भागात होतें. यापुढचा भाग डॉ. मुंजे यांनी गांधी-युगाशी केलेल्या आजीवन संघर्षाच्या व हिंदुत्वाच्या आघाडीवरून त्यांनी केलेल्या बहुविध आन्दोलनांच्या इतिहासाचा आहे. तो येत्या वर्षात लिहून पूर्ण करण्याचा संकल्प आहे.

लोकमान्य टिळकांच्या अणे, मुंजे व केळकर या शिष्यत्रयींपैकी आज लोकनायक बापूजी अणे सद्भाग्याने आहेत. मुंजे यांच्या चरित्राला

त्यांनीच प्रस्तावना लिहावी असा मी आग्रह धरला. वार्धक्यातील थकलेल्या अवस्थेत व लोकसभेचें कामकाज आणि अनेक सार्वजनिक कार्यें यांची भोवताली गर्दी असतानाही डॉक्टर मुंजे यांच्यावरील प्रेमाने प्रेरित होऊन बापूजींनी या ग्रंथाला प्रस्तावना लिहिली याबद्दल मी त्यांचा अत्यंत कृतज्ञ आहे.

राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे सरसंघचालक परमपूजनीय श्री. गोळवलकर गुरुजी यांच्या मागे एरवीच राष्ट्रकार्याचा एवढा प्रचंड व्याप असतो की त्यांचा वेळ घेण्याचा संकोच वाटावा. या वेळी तर राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या शिक्षावर्गाच्या निमित्ताने त्यांचा संपूर्ण भारतात परिश्रमपूर्ण संचार चालू असलेला, अशा स्थितीत मी या ग्रंथाला त्यांनी पुरस्कार लिहावा अशी विनंती केली. हिंदुराष्ट्राच्या निर्मितीसाठी जीवनाचें हवन करणाऱ्या धर्मवीर डॉ. मुंजे यांच्या चरित्राला हिंदुराष्ट्रनिर्मितीच्या महत्कार्याचे कर्णधार असलेल्या प. पू. श्री गुरुजींचाच पुरस्कार असावा अशी माझी उत्कट इच्छा होती. क्षणाचीही सवड नसताना श्री गुरुजींनी माझा हट्ट पुरविला याबद्दल माझ्या मनांत ज्या भावना आहेत त्यांना शब्दरूप देणें कठीण आहे. मी त्यांचा अत्यंत कृतज्ञ आहे.

श्री. बादलराव मुंजे यांनी आपल्या महनीय पित्याच्या चरित्राची साधनें पुरविलीं नसतीं तर मला हा ग्रंथ लिहिताच आला नसता. त्यांनी दाखविलेल्या सौजन्यपूर्ण ममत्वाबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

डॉ. मुंजे यांचे वैयक्तिक कार्यवाह श्री. दत्तात्रेय रेखडे व डॉक्टरांचे पुतणे श्री. मुकुंदराव मुंजे आणि विजयराव मुंजे यांनी डॉ. साहेबांची छायाचित्रें पुरविल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. डॉ. साहेबांच्या पत्नीचें छायाचित्र तर केवळ दत्तात्रय रेखडे यांच्यामुळेच मिळू शकलें.

नागपूरच्या दैनिक महाराष्ट्राचे भूतपूर्व संपादक श्री. बाळासाहेब ढवळे यांच्या सौजन्यामुळे महाराष्ट्राच्या फायलींचा उपयोग मला करता आला व केसरीचे माननीय संपादक श्री. जयंतराव टिळक यांनी केसरीच्या जुन्या फायली आणि केसरीचें ग्रंथालय यांचा उपयोग करू दिला याबद्दल मी त्या दोघांचाही ऋणी आहे. विशेषत: मा. जयंतराव टिळक यांनी तर केसरीच्या फायलीतील मला आवश्यक तो भाग लेखनिकांकडून लिहवून देऊन या कार्याविषयीचें विशेष ममत्व प्रकट केलें आहे.

सर्वांत मोठें ऋण मा. शंकर रामचंद्र उपाख्य मामाराव दाते यांचें आहे. मुंजे चरित्राची केवळ गोष्ट मी त्यांच्याजवळ काढताच

त्यांनी त्याच्या मुद्रण व प्रकाशनाचें सर्व दायित्व स्वीकारलें. श्री. दाते हे डॉ. मुंजे गोलमेज परिषदेला इंग्लंडमध्ये गेले असता त्यांचे तेथे कार्यवाह होते. त्यांनी मनावर घेतलें म्हणूनच हा ग्रंथ इतक्या लवकर प्रकाशात येऊ शकला. त्यांच्या या उपकृतीबद्दल ' मदङ्गे जीर्णतां यातु ' यावाचून माझ्या मनातील भावना व्यक्त करावयास दुसरे शब्द नाहीत.

माझी पत्नी सौ. वीणा हिने परिश्रमपूर्वक लेखनसाहाय्य केलें म्हणून ग्रंथाचें हस्तलिखित इतक्या शीघ्रगतीने पूर्ण झालें. माझ्या प्रत्येक ग्रंथासंबंधात मिळणाऱ्या या आपुलकीच्या सहकार्याचा प्रकट निर्देश करणें तिला आवडणारें नसलें तरी मी तो करतो.

डॉ. मुंजे यांचा हा चरित्रग्रंथ गेल्या साठ वर्षांतील भारतीय राजकारणाचा इतिहास लिहावयाच्या भूमिकेवरून मी लिहीत आहे. चरित्राचा हा प्रथम खंड ' ज्याचें त्याला निवेदन ' या नात्याने डॉक्टर साहेबांच्या पुण्यस्मृतीला समर्पण करून मी तूर्त वाचकांची रजा घेतो.

सर्कल ७ महाल,
श्रीदक्षिणामूर्ति मंदिर, नागपूर.
दि. २८ मे, १९६६

**बाळशास्त्री हरदास**
महामहोपाध्याय
साहित्याचार्य



धर्मवीर डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे

# लोकनायक मा. श्री. उपाख्य बापूजी अणे यांची प्रस्तावना

कै. वा. डॉ. बा. शि. मुंजे यांचें चरित्र महामहोपाध्याय, साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास या नामांकित विद्वानाने लिहावयाला घेतलें असून त्याचा पहिला भाग या ग्रंथाच्या रूपाने त्यांनी पुरा केला आहे. डॉ. मुंजे हे चरित्रनायक आणि म. म. बाळशास्त्री हरदास हे चरित्रलेखक हा योग कविकुलगुरु श्रीकालिदास याने 'रत्नं समागच्छतु काञ्चनेन' म्हणून ज्या मनोहर योगाचा निर्देश रघुवंशात केला आहे त्यासारखाच अत्यंत उचित व अभीप्सित असा आहे.

या पहिल्या भागात बाळशास्त्रींनी कुलवृत्तान्तापासून १९२०-च्या नागपूर काँग्रेसपर्यंतची हकीकत वीस प्रकरणांतून व जवळजवळ ३८४ पृष्ठांतून मोठ्या मार्मिकतेने व सहृदयतेने लिहिलेली आहे व चरित्राचा पहिला भाग समाप्त केला आहे. या ग्रंथाच्या शेवटी त्यांनी जे विचार प्रदर्शित केले आहेत ते येथे देणें अप्रस्तुत होणार नाही. उलट, बाळशास्त्रींची डॉ. मुंजे यांच्या विषयीची श्रद्धा व निरनिराळ्या प्रसंगानिमित्त त्यांनी डॉ. मुंजे यांच्या समर्थनार्थ जें विवेचन केलेलें आढळतें तें यथार्थतेने कळण्यास त्यामुळे मदतच होईल असें मला वाटतें. "कै. डॉ. मुंजे यांच्या सार्वजनिक जीवनाचे दोन भाग पडतात. एक सन १९००-पासून तो १९२०-पर्यंतचा टिळक युगाचा व दुसरा १९२१ ते त्यांच्या निधनापर्यंतचा. आम्ही त्यांच्या चरित्राचा हा प्रथम खंड येथेच समाप्त करतो. यानंतरचा, महाराणा प्रतापाप्रमाणे सर्वस्वाचा होम करून हिंदुत्वाच्या आघाडीवर त्यांनी जी आजीवन अखंड झुंज दिली तिचें यथार्थ वर्णन करणारा त्यांच्या जीवनाचा रोमहर्षक विभाग हा दुसऱ्या खंडात वर्णन करण्यात येईल."

त्याचप्रमाणे डॉ. मुंजे यांच्या राष्ट्रीय सैनिकीकरणासंबंधीच्या जिव्हाळ्याचा निर्देश करून बाळशास्त्रींनी, त्यासंबंधी केलेल्या चळवळीचा व प्रयत्नांचा व तदनुषंगाने भारतीय राजकारणाचाही, अस्सल कागदपत्रांच्या पुराव्यासह इतिहास या चरित्राच्या दुसऱ्या खंडातच देण्याचें आश्वासन देऊन तूर्त वाचकांचा निरोप घेतला आहे.

वरील अवतरणावरून बाळशास्त्रींचा डॉ. मुंजे यांच्या चरित्राकडे पाहण्याचा व तें चित्रित करण्याचा दृष्टिकोन स्पष्ट होत आहे. याच दृष्टीने त्यांनी मला लिहिलेल्या खाजगी पत्रात एका महत्त्वाच्या बाबीचा उल्लेख आला आहे त्याचाही येथे निर्देश करण्याची मी बाळशास्त्रींची नम्रतेने परवानगी मागतो. प्रस्तुत पहिल्या भागाला भारतीय क्रांतिकारकांचे मुकुटमणि कै. स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर यांच्याकडून प्रस्तावनालेखनाचें आश्वासन त्यांनी मिळविलें होतें. परंतु त्यांच्या निधनामुळे ती गोष्ट आता अशक्य झाली आहे. शास्त्रीबुवा त्यांच्या या मृत्यूस उद्देशूनच लिहितात, "हा हन्त हन्त नलिनीं गज उज्जहार" असें म्हणून दैवाला बोल लावण्याची पाळी आली आहे. माझ्या सारख्याने लिहिलेली प्रस्तावना वाचकांच्या हातांत देणें म्हणजे दुधाची तहान ताकावरच भागवून घ्या असेंच सांगण्यासारखें आहे.

धर्मवीर डॉ. मुंजे यांच्यासारख्या एका झुंजार सेनानायकाचें चरित्र, क्रांतिकारकांच्या कथामृतापुढे ज्यांना इतर सर्व रस फिके वाटतात त्या प्रतिभासंपन्न साहित्याचार्यांसारखा चरित्रलेखक व ज्या स्वातंत्र्यवीराने आपल्या वयास १६-वें वर्ष लागण्यापूर्वीच अभिनव भारतासारखी क्रांतिकारकांची संस्था स्थापन करून त्रिखंडात भारतीय उपप्लवी क्रांतीचा उपक्रम झाल्याचा दुंदुभिनाद ऐकविला त्यांच्या-सारख्या लोकोत्तर विभूतीची प्रस्तावनालेखक म्हणून योजना हा त्रिवेणी संगम मराठी साहित्यांतर्गत या ग्रंथास अत्यंत पावनतीर्थाचें अधिष्ठान प्राप्त करून देण्यास निःसंशय समर्थ होता. परंतु विधिघटना अनाकलनीय असते. ह्यामुळे पुष्कळदा मनोरथ पूर्ण न होताच ढासळायला लागतात. शास्त्रीबोवांप्रमाणेच अखिल महाराष्ट्रीय रसिकांच्या मुखां-तून स्वातंत्र्यवीरांच्या स्वर्गवासामुळे "हा हन्त हन्त नलिनीं गज उज्जहार" हे निराशेचे उद्‌गार निघाल्याशिवाय राहणार नाहीत.

प्रस्तावनालेखकापुढे खरी अडचण आहे ती काही सामान्य स्वरूपाची नाही. मी जें अवतरण या ग्रंथाच्या शेवटच्या परिच्छेदातून उद्‌धृत केलें आहे त्यावरून वाचकांस हें सहज कळून चुकलें असेल की या भागात सन १९२०-पर्यंतचें आलेलें डॉ. मुंजे यांचें चरित्रही त्या-नंतरच्या त्यांच्या चरित्राची बाळशास्त्री हे नांदी समजतात. त्यामुळे ग्रंथकर्त्याचें चरित्रनायकासंबंधीचें संपूर्ण, साधार व चिकित्सक मूल्य-मापन हाती आल्याविना प्रस्तावनालेखकाने आपले विचार व्यक्त करणें शक्य आहे काय ? व तसें करणें योग्य आहे काय ? निदान प्रस्तावनालेखक म्हणून तरी त्याचेवरील जबाबदारी पार पाडण्याच्या

मार्गात ही एक मोठी अडचण आहे असें मी समजतो. या अडचणीतून बाहेर पडण्याचा मार्ग मला दिसतो तो असा. प्रस्तावना लेखकाने ज्या ग्रंथास प्रस्तावना लिहावयाची आहे त्यात आलेल्या विषयाला अनुलक्षूनच आपल्या प्रस्तावनेत त्याला जें लिहिणें इष्ट वाटेल तें लिहावें. त्यात अनुल्लेखित विषयांची चर्चा ही कायद्यात ज्याला आबिटर डिक्टा म्हणतात त्या स्वरूपाची समजण्यात येते. न्यायाधीशाने आपल्या निवाड्यात त्याच्यापुढे असलेल्या खटल्याच्या निर्णयास अनावश्यक अशा मुद्द्यावर आपले विचार व्यक्त केले तर ते अप्रस्तुत व अनावश्यक समजून निवाड्यातील निर्णीत मताची योग्यता त्यांना देण्यात येत नाही. तें वैयक्तिक मत समजलें जातें व जवळजवळ उपेक्षिलेंही जातें. म्हणून मी प्रस्तावनेत डॉ. मुंजे यांनी नागपुरात येऊन वास्तव्य केल्यापासून १९२०-च्या राष्ट्रीयसभेचें नागपूर येथील अधिवेशन संपेपर्यंतच्या कार्याचें वैशिष्टय काय हेंच थोडक्यात सांगण्याचा प्रयत्न करतो.

डॉ. मुंजे यांचें चरित्र लिहिण्यासाठी बाळशास्त्रींनी विविध सामग्री जमवून तिचा कसोशीने व मार्मिकपणे अभ्यास करून प्रस्तुत चरित्रलेखनात तिचा उपयोग करून घेतला आहे. त्यांत डॉ. मुंजे यांच्या अप्रकाशित आत्मचरित्राचा उल्लेख काही ठिकाणी आला आहे. किंबहुना या खंडातील प्रकरण दुसरें व चौथें त्यांनी वरील आत्मचरित्राच्या आधारे लिहिलें आहे. मध्यप्रदेशातील मध्यमवर्गीय कुटुम्बातील सामाजिक, आर्थिक व धार्मिक स्थिति; आणि डॉ. मुंजे यांच्या मनावर बालपणी कोणते संस्कार झाले व ते अखेरपर्यंत कसे दृढमूल होते याची कल्पना मुंजे यांच्या आत्मचरित्राच्या आधारे लिहिलेल्या या दोन प्रकरणांवरून येते. मुंजे यांचें घराणें नागपूरकर भोसल्यांच्या नोकरींत होतें; इतकेंच नव्हे तर भोसल्यांनी आपल्या पराक्रमाने छत्तीसगड, ओरिसा व प्रत्यक्ष बंगालवर स्वाऱ्या करून बंगालचा सुभेदार अलिवर्दीखान याची सत्ता प्राय: संपुष्टात आणण्यासाठी ज्या लष्करी मोहिमा केल्या त्यांत भाग घेणाऱ्या शूर, साहसी, जवानमर्द व युयुत्सु महाराष्ट्रीयांमध्ये तें गणलें जात होतें. डॉ. मुंजे यांच्या ठिकाणी, भारतात लष्करी पेशा करण्याची सवलत सर्व नागरिकांस कशी मिळेल यासंबंधाने विशेष तळमळ असल्याचा प्रत्यय, त्यांनी सार्वजनिक जीवनात प्रवेश केल्यानंतर, जेव्हा प्रथमत: तसें कार्य करण्यासंबंधी संधि त्यांना मिळाली त्या वेळी भारतवर्षातील राजकीय चळवळीत भाग घेणाऱ्या सर्व देशबांधवांना आला. महात्मा गांधींच्या अहिंसाप्रधान कार्यक्रमावर जरी त्यांनी निवडणूक लढविली होती तरी मध्यप्रदेशातील कौन्सिलात आपला

काँग्रेस पक्ष बहुमताने येऊन मंत्रिपदावर स्थिर होताच त्यांनी नागपूर येथील कायदे कौन्सिलात, प्रांतभर रायफल क्लब्स काढण्यासंबंधाचें बिल आणून तें मंजूर करून घेतलें व ती योजना यशस्वी करण्याच्या उद्योगास ते मोठ्या उत्साहाने लागले. राष्ट्राचें सामर्थ्य हें त्याचें सैन्य, नाविक दल व वायुदल यांच्यात असलेल्या सामर्थ्यावरच मुख्यतः अवलंबून असतें हा त्यांच्या राजकीय तत्त्वज्ञानाचा प्राणभूत सिद्धान्त होता. या सिद्धान्ताविषयीचें त्यांचें प्रेम त्यांच्यात आनुवंशिक संस्काराने निर्माण झालें होतें. पुढे त्यांनी जो अभ्यास केला आणि जागतिक स्थितीचें व इतिहासाचें जें समीक्षण केलें त्यांनी हा सिद्धान्त अधिकच परिपुष्ट झाला होता. त्यांच्या ठिकाणी नागपूरकर भोसले घराण्याविषयी जो आदर व अभिमान होता तो त्या घराण्यातील शौर्याच्या, साहसाच्या आणि विजिगीषु परंपरेच्या इतिहासामुळे निर्माण झाला होता.

त्याचप्रमाणे दुसरीही एक गोष्ट वाचकांच्या डोळ्यांत भरण्यासारखी त्यांच्यात होती. ती गोष्ट म्हणजे त्यांचा धर्माभिमान होय. डॉ. मुंजे यांनी आपणांस दारूसारख्या व्यसनी पेयापासून अलिप्त ठेवलें; पण आहारासंबंधात प्रचलित हिंदुधर्मात निदान ब्राह्मणांपुरते जे सर्वमान्य निर्बंध मानले जातात त्यांची त्यांनी केवळ गोमांसाचा अपवाद सोडून, फारशी तमा बाळगली नव्हती. तथापि त्यांचा हिंदुधर्माभिमान अत्यंत जाज्वल्य होता, व लोकांच्या ठिकाणी तो अभिमान ज्या प्रमाणात असावयाला पाहिजे असें त्यांना वाटत होतें त्या प्रमाणात तो नाही याबद्दल त्यांना नुसता खेदच वाटत नव्हता, तर प्रसंगविशेषी संतापही येत होता. हें धर्माभिमानाचें बाळकडू त्यांना त्यांचे पूज्य वडील व मातोश्री यांजकडूनच प्रथमतः कसें मिळालें याचें चरित्रलेखकाने मोठे चटकदार पण तथ्य असें वर्णन केलें आहे. मातोश्रीला तिच्या सोवळ्यात उपयोगी पडण्याकरिता पाणी आणून देण्यापूर्वी डॉ. मुंजे यांना ती माउली प्रथम एक घागरभर थंड पाण्याने सचैल स्नान घालून कसें सोवळें करी व या दिव्यातून डॉ. मुंजे 'मातृदेवो भव' या शिक्षेतील आज्ञेची पूर्तता करण्याकरिता रोज कसे बिनतक्रार आनंदाने जात याचें बाळशास्त्रींनी लिहिलेलें वर्णन वाचताना मनापुढे प्रश्न येतो की वाचकाने कोणाची प्रशंसा करावी ? आपल्या सोवळ्याविषयी दक्षता बाळगणाऱ्या मातोश्रींची, की जें आपलें श्रद्धास्थान आहे त्याच्या समाधानार्थ वाटेल ते क्लेश आनंदाने सहन करणाऱ्या आज्ञाधारक पुत्राची ? मला तर कविकुलगुरु कालिदासाने अशाच एका अद्भुत प्रसंगास उद्देशून जे उद्गार काढले आहेत त्यांचेंच या वेळी स्मरण होतें.

जनस्य साकेतनिवासिनस्तौ
द्वावप्यभूतामभिनंद्यसत्त्वौ ॥

असा आपला निर्णय देऊन वरतन्तुशिष्य कौत्स व मृण्मय पात्रांतून आह्निक करणारा पराक्रमी दिग्विजयी रघू या दोघांविषयी तुल्य आदर व्यक्त केला आहे. मीही धन्य ती माता! व धन्य ते सुपुत्र! या प्रशंसामय उद्‌गारांनी या मुख्य कथेतील उपकथेचा येथे उपसंहार करतो.

काँग्रेसमध्ये स्थान राहिलें नाही म्हणून डॉ. मुंजे हिंदुमहासभेच्या कार्यास लागले असे अनुदार उद्‌गार त्यांच्या संबंधाने काढणारे काही महाभाग राष्ट्रीय सभेच्या गोटात कधी कधी दृष्टीस पडत असत. मला वाटतें आता तशी मंडळी फारशी उरलेली नसावी. धर्माभिमान हा डॉ. मुंजे यांचा स्थायीभाव होता. सामान्य लोक त्यांना धार्मिक समजतही नसत; पण त्यामुळे त्यांच्या कल्पनेप्रमाणे त्यांनी ठरविलेल्या आपल्या धर्मसेवेत त्यांनी केव्हाच न्यूनता येऊ दिली नाही. त्यांच्या या कठोर व्रतपरिपालनाची यथार्थ मीमांसा त्यांचें संपूर्ण चरित्र लोकांच्या हातांत पडल्यावरच करणें योग्य होईल असें मला वाटतें. हा पहिला खंड जर नीट वाचला व समजून घेतला तरच डॉ. मुंजे यांच्या चरित्रातील उत्तरार्धाचा १९२०-पर्यंतच्या पूर्वार्धातील चरित्राशी अन्वय लावता येईल. नाही तर हे दोन चरित्रखंड एकाच प्रभावी व्यक्तीच्या चरित्राची अभेद्य अंगें आहेत हें समजणें देखील कठीण जाईल.

डॉ. मुंजे यांनी इंग्रजीच्या अभ्यासाबरोबरच संस्कृतचाही अभ्यास चांगला करून त्यात प्रावीण्य मिळविलें होतें आणि त्याबद्दल त्यांचे संस्कृतचे हिस्लॉप कॉलेजमधील प्राध्यापक सदाशिव जयराम देहाडराय यांनी त्यांची आपल्या विद्यार्थ्यांसमोर अनेकवार प्रशंसा केली होती असा उल्लेख ग्रंथकर्त्याने डॉ. मुंजे यांच्या विद्यार्थिदशेच्या वर्णनात केलेला आहे, त्यालाही फार महत्त्व आहे. डॉ. मुंजे यांनी संस्कृतभाषासाहित्य व व्याकरण यांचें सशास्त्र अध्ययन करण्यासाठी नागपुरातील वैयाकरण-केसरी महामहोपाध्याय भट्टजीशास्त्री घाटे, त्याचप्रमाणे महामहोपाध्याय कृष्णशास्त्री घुले व श्रीनिवासशास्त्री हरदास यांच्यासारख्या सर्वमान्य पंडितांचें अन्तेवासित्वही केलें होतें ही बाळशास्त्रींची माहिती लक्षात घेतली म्हणजे त्यांचा वैदिकधर्म अथवा सनातन धर्माविषयीचा अभिमान हा उथळ स्वरूपाचा नसून धार्मिक वाङ्मयाच्या खोल व तौलनिक अभ्यासाच्या भट्टीत तावून सुलाखून निघालेला होता. ती केवळ आनुवंशिक भावना नव्हती तर यथार्थज्ञान मिळविण्याच्या प्रयत्नात उत्पन्न झालेल्या डोळस श्रद्धेचा तो परिपाक होय असेंच कोण्याही विचारवंतास कबूल

करावें लागेल. डॉ. मुंजे हे भावनेने वाहून जाणारे नव्हते तर विचारांती योग्य ठरलेल्या मार्गावर आपल्या ध्येयसिद्धीसाठी धैर्याने, निश्चयाने व निर्भयतेने पण सावधान राहून पावलें टाकीत प्रयत्नशील असलेले थोर कार्यकर्ते पुढारी होते. प्रत्यक्ष राजकारणात प्रवेश करण्यापूर्वी नागपूरच्या वास्तव्यात त्यांनी सामाजिक सुधारणेसंबंधी एक निबंध इंग्रजीत लिहून तो नागपूरच्या सामाजिक सुधारणापक्षाचे अध्वर्यु असलेले वामनराव कोल्हटकर यांस दाखविला. त्यामुळे वामनरावजी कोल्हटकर हे फार संतापले. कारण त्यात डॉ. मुंजे यांनी सुधारक लोक ज्या सामाजिक सुधारणे-संबंधाने सारखा आक्रोश करीत असत व ज्याच्यापुढे तुलनेने ते राज-कीय सुधारणांस गौणत्व देऊन त्याविषयी प्रायः उदासीन असत, इतकेंच नाही, तर त्यासंबंधी प्रयत्नाचा वेग वाढविण्यास सदैव प्रतिकूल असत, त्या सुधारणांचें वैयर्थ्य दाखविण्याचा प्रयत्न केला होता. वामनराव कोल्हटकरांनी तशा प्रकारचा निबंध लिहिल्याबद्दल डॉ. मुंजे यांची निर्भर्त्सना केली होती व हा निबंध मुळीच छापून प्रसिद्ध करू नये अशी त्यांना ताकीदही दिली होती असें ग्रंथकर्त्याने म्हटलें आहे. याचा अर्थ हा की, डॉ. मुंजे हे आपल्या संस्कृतिविषयक प्रश्नांचा स्वतंत्र विचार करणारे प्रथमपासूनच होते. आधुनिक विचार व तर्कप्रणालीस पटेल अशा तऱ्हेने वैदिक धर्मशास्त्रांचा इतिहास लिहिला जावा म्हणून त्यांनी त्यांच्या वडिलांच्या संचितद्रव्याचा व्यय करण्याचा निश्चय करून बराच काळ उद्योग चालविला होता. त्यावरूनही अधिकारी व तज्ज्ञ पुरुषांकडून धर्मासंबंधी काही अधिकृत लिखाण व्हावें, सुधारणेच्या नांवाखाली इंग्रजी राज्यात जी बेबंदशाही सुरू आहे ती नष्ट होऊन धर्मव्यवस्था काला-नुरूप सुधारली जाऊन स्थिरपद व्हावी व परधर्मीयांच्या आक्रमणापासून स्वतःचें संरक्षण करण्यास ती संपूर्णपणे समर्थ असावी ही विचारसरणी त्यांच्यासमोर सतत होती हें स्पष्ट होण्यास हरकत नाही.

कीर्तनसंप्रदाय व हरिदास या संस्थेला प्रस्तुत कालात अधिक उपयुक्त कसें करता येईल याचा विचार करण्याकरिता डॉ. मुंजे यांनी भरविलेल्या कीर्तनसंमेलन वगैरेंचाही उद्देश हाच होता. आमच्या हजारो वर्षांपासून चालत आलेल्या, स्वस्त व बिनखर्चाच्या धार्मिक शिक्षणसंस्थांस नष्ट न होऊ देता अधिक कार्यक्षम करण्याची चिंता जे वाहत असतात त्यांनाच हे उद्योग सुचतात. सांस्कृतिक परंपरेत काही भाग त्याज्य असला तरी पुष्कळसा भाग सतत संग्राह्य असा आहे असें ज्यांस वाटतें तेच राष्ट्राची पूर्वपरंपरा अजिबात विछिन्न न होऊ देता अभ्युन्नति करू शकतात. त्याकरिता राष्ट्रात एक विशेष तऱ्हेचें नेतृत्व

अवश्य असतें. डॉ. मुंजे हे अशा नेतृत्वाचा शोध करणारे राजकारणी पुरुष होते. त्यांना लोकमान्य टिळकांत वरील प्रकारच्या नेतृत्वाची प्रतिभा जितक्या स्पष्टपणे व प्रभावीपणे दृष्टीस पडली तितकी ती दुसऱ्या कोणत्याही तत्कालीन हिन्दी पुढाऱ्यांत दृष्टीस पडली नाही. मुंजे यांनी जेव्हा राजकारणात प्रत्यक्ष प्रवेश केला त्यापूर्वीच स्वामी विवेकानंद हे ब्रह्मीभूत झाले होते. बोअर युद्ध संपल्यानंतर मुंबईस येऊन तेथे आपल्या सुखी जीवनास आरंभ करतेवेळी त्यांच्या दृष्टीस राजकीय क्षितिजावर ज्या व्यक्ति त्या काळी चमकत असलेल्या दिसल्या त्यांत त्यांना केसरीकर्ते लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचें व्यक्तिमत्त्व हें विशेष आकर्षक व प्रभावी वाटलें व तेव्हापासून ते त्यांच्याकडे राजकीय गुरु या नात्यानें पूज्य भावनेने पाहू लागले. म्हणून नागपुरास येऊन ते आपल्या व्यवसायास लागले तरी लोकमान्य टिळकांच्या राजकीय जीवनाकडे अधिक आपुलकीनेच पाहू लागले.

त्या वेळेच्या नागपूर शहरात व मध्यप्रदेशातील जिल्ह्यांत जी मंडळी राजकीय पुढारी म्हणून समजण्यात येत होती त्यांतील वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व वजनदार म्हणून समजले जाणारे पुरुष हे बहुतेक ज्यांना लोक नेमस्त म्हणून संबोधीत त्या पक्षात मोडणारे होते. चरित्रलेखकाने डॉ. मुंजे यांच्या राजकारण-प्रवेशापूर्वीचें नागपूर या प्रकरणात यासंबंधी जें सविस्तर विवेचन केलेलें आहे तें पुष्कळ अंशी बरोबर आहे. त्यांनी त्या काळी नागपुरात दोन पक्ष असल्याचें मान्य केलें आहे. एक पक्ष नेमस्तांचा. त्यांत सर्व वतनदार आणि सरकारच्या मर्जीनुसार राजकारण करणाऱ्या घरंदाज जमीनदार अशाच लोकांची गर्दी होती. दुसरा पक्ष होता तो सनातन धर्माभिमानी लोकांचा होता. त्यातील काही व्यक्तींविषयी लोकांच्या अंतःकरणात आदर व पूज्यबुद्धि होती. पण ती ते केवळ सुशिक्षित व आंग्लविद्याविभूषित असूनही जुन्या परंपरागत धार्मिक रूढि व रीतिरिवाज यांचें पालन करीत असल्यामुळे होती. या दोन्ही पक्षांच्या राजकीय क्षेत्रातील कार्यप्रणालीत तत्त्वतः फारसा फरक नव्हता. परंतु बाळ गंगाधर टिळक यांच्याविषयी व केसरी पत्राच्या द्वारा त्यांच्याकडून ज्या मतांचा प्रचार करण्यात येई त्यांविषयी आदर वाटणारा तरुणांचा फार मोठा वर्ग नागपूर शहरातही १८९७-च्या पूर्वीच निर्माण झाला होता व याची जाणीव ज्यांच्या हातात मध्यप्रदेशातील तत्कालीन काँग्रेसी राजकारणाचीं सूत्रें होतीं त्यांना व्हावयास लागली होती. याचें मी एक ठळक उदाहरण देतो म्हणजे माझें म्हणणें वाचकांस बरोबर कळेल. मी नागपुरात १८९५-च्या जूनमध्ये आलो व

त्या वेळेच्या नील सिटी हायस्कूलमध्ये मी माझें नांव विद्यार्थी म्हणून नोंदविलें. या वर्षी काँग्रेसचें अधिवेशन हें पुण्यास भरावयाचें होतें व पुढे तें डिसेंबरात पूर्वी ठरल्याप्रमाणे भरलेंही. या वर्षी असा एक वादाचा प्रश्न उत्पन्न झाला की, राष्ट्रीय सभेच्या मंडपात सामाजिक सुधारणा-परिषदेचें अधिवेशन भरवावें किंवा नाही. पुण्याच्या स्वागतकमेटीतर्फे अशीं पत्रें हिंदुस्थानातील निरनिराळ्या प्रांतिक काँग्रेस कमेटयांकडे गेलीं व त्यांनी या प्रश्नावर मध्यप्रदेश काँग्रेस कमेटीचें मत मागविलें. केसरीचे संपादक टिळक यांचेकडूनही अशाच अर्थाचें पत्र नागपूर येथील काँग्रेस कमेटीकडे आलें होतें व त्यात टिळकांनी सामाजिक परिषदेच्या बैठकीस राष्ट्रीय सभेचा मंडप देण्यात येऊ नये असें मत नागपूर कमेटीने द्यावें अशी अपेक्षा केली होती. या पत्रावर विचार करण्याकरिता कमेटीने नागपूरच्या जनतेची जाहीर सभा बोलावली. ती सभा नागपूर येथील मॅक्डोनल्ड टाऊन हॉल या इमारतीत भरली होती. सभा दोन दिवस संध्या-काळी २-३ तास चालली होती. सभेला गावातील सनातनी पुढारी, बरेच तरुण विद्यार्थी व शिवाजी उत्सव, गणेश उत्सव आदि करणारे लोकही उपस्थित होते. त्यांतील कित्येकांनी टिळकांच्या मताचें भाषण करून समर्थनही केलें. या मंडळींचें नेतृत्व त्या सभेमध्ये तरी कै. नीळकंठराव ऊर्फ दादासाहेब उधोजी हे करीत होते. त्या वेळी सभेत प्रो. भगीरथप्रसाद हे सांगत होते की विद्यार्थी असतील त्यांनी मतें देऊ नयेत. पण त्या प्रचंड समुदायातून विद्यार्थ्यांना वेगळें काढता येणें शक्य होईना. त्यामुळे सभेत नागरिकांच्या मतांचा निर्णय करता येत नाही अशा अर्थाची कुरकूर सभेचे चालक करीत होते. मी या दोन्ही सभांस हजर होतो. मला वाटतें अखेरीस अध्यक्षाने मतें न मोजताच पास नापास असा काहीतरी ठोकळ अंदाज सांगून सभेचें काम आटोपलें. त्याबद्दल तेथे बराच वेळ सामान्य लोक व सभाचालक यांच्यांत बाचाबाचीही झाली. १८९५ साली सार्वजनिक गणपतिउत्सव बर्डी वगैरे १५-२० स्थळी झाले. त्यांत भाग घेणारे विद्यार्थी व तरुण लोक स्वतःस टिळ-कांचे अनुयायी म्हणवीत असत. ही १८९५ मधली स्थिति.

१८९७-मध्ये टिळकांवर खटला होऊन त्यांना दोन वर्षांची सजा झाल्यानंतर तर मध्यप्रदेशातील निदान मराठीभाषी जिल्ह्यांत तरी लोकमत टिळकांचे विचारास अधिक अनुकूल झालें होतें. म्हणूनच सर-कारला दडपशाहीचें अवलंबनही करावें लागलें. टिळकांचे अनुयायी संख्येने वाढले; पण ते विखुरलेले असे राहिले. त्यांचें अधिकृत नेतृत्व आपणांकडे घेऊन त्यांना संघटित करण्याचा प्रकट प्रयत्न यशस्वी रीतीने

डॉ. मुंजे यांनी वऱ्हाडातील चार जिल्हे सोडून कसा केला ह्याची स्फूर्तिदायक हकीकत ग्रंथकर्त्यानें दिलेली आहे. डॉ. मुंजे हे पुढे आले व त्यांनी हें कठीण, जोखमीचें पण अत्यंत आवश्यक कर्तव्य मोठ्या निश्चयाने पण जुन्या पिढीतील लोकांचीं मनें सहसा न दुखू देता कसें केलें हें वाचकांस या ग्रंथात पहावयास मिळेल.

नागपूरचें राष्ट्रीय मंडळ हें फार थोड्या अवधीत इतकें प्रभावशाली झालें की, त्यांनी थोड्या काळात जुनाट नेमस्त पुढाऱ्यांच्या हृदयांत दहशत निर्माण केली; पण त्यात विशेष कौतुकाची किंबहुना आश्चर्याची गोष्ट ही की, हा सारा नेमस्त पक्ष उद्ध्वस्त करण्याचा उद्योग अव्याहत सुरू असता डॉ. मुंजे यांच्या नागपुरातील व यच्चयावत् मध्यप्रदेशातील वजनदार व वतनदार बनलेल्या पुढाऱ्यांशी पूर्वापार असलेल्या स्नेहसंबंधात काही न्यूनता आली नाही. याच्या उलट, पुण्याकडे असलेल्या उद्योगात असलेल्या दोन्ही दळांच्या कार्यकर्त्यांमधील गैरसमज वाढता-वाढता इतका विकोपास गेला की ते एकमेकांस शत्रु लेखू लागले व त्याप्रमाणे ते वृत्तपत्रांतून बोलूनही दाखवीत.

१९०४ साली डॉ. मुंजे हे प्रथमतः मुंबई येथे भरलेल्या अधिवेशनास हजर राहिले असें चरित्रकार लिहितात. मीही याच अधिवेशनात प्रथमतः राष्ट्रीय सभेचें दर्शन घेतलें. तें अधिवेशन भरण्यापूर्वी यवतमाळ येथील हरिकिशोर पत्रात माझे कैलासवासी मित्र पृथ्वीगीर हरिगीर यांच्या म्हणण्यावरून मी दोन लेख लिहिले होते.

१९०४-च्या आक्टोबरमध्ये मी नागपूर सोडून, अमरावती येथील काशीबाई प्रायव्हेट हायस्कूल या संस्थेत इंग्रजी भाषेचा शिक्षक म्हणून माझी नेमणूक झाल्यामुळे तेथे रहावयास गेलो. मी अमरावतीस १९०७-अखेरपर्यंत होतो. त्यानंतर मी बी.एल्.ची परीक्षा पास झाल्यावर वकिलीची सनद काढून यवतमाळ येथे व्यवसाय करण्याकरिता गेलो. अमरावतीस खाजगी हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून आल्यावर मी तेथील राजकीय चळवळीचे वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध नेते श्रीमंत दादासाहेब खापर्डे यांच्या नेतृत्वाखाली जी तरुण मंडळी निरनिराळ्या चळवळी करीत त्यांत भाग घेत होतो. राष्ट्रीय सभेच्या १९०४ साली मुंबई येथे भरलेल्या अधिवेशनास जाण्याची प्रेरणाही मला त्यांचेकडून सहजगत्या मिळाली होती. अमरावतीला माझ्या घनिष्ठ परिचयाचे दोन मित्र होते. एक कै. भाऊसाहेब दुराणी व दुसरे बाबासाहेब पाळेकर. हे दोघेही १९०४ साली बी.एल्.ची परीक्षा पास होऊन आपल्या व्यवसायास लागले होते. माझा व वीर वामनराव जोशी यांचा परिचय मी

अमरावतीस आल्यानंतरच झाला. ज्या हरिकिशोर पत्रात मी काँग्रेसच्या कार्यावर दोन लेख लिहिले होते त्या पत्राचे संपादक पृथ्वीगीर हरिगीर यांच्याशी माझा पत्रव्यवहारही मी अमरावतीस येऊन राहिल्यानंतरच सुरू झाला होता. पण त्यांना मी किंवा मला त्यांनी मुंबईला राष्ट्रीय सभेच्या मंडपाबाहेर ते हरिकिशोरचे अंक वाटीत असताना दृष्टीस पडे-पर्यंत पाहिलें नव्हतें. माझ्याबरोबर माझे मित्र भाऊसाहेब दुराणी हे होते. त्यांनी माझी ओळख पृथ्वीगीर ऊर्फ पापासाहेबांशी प्रथमतः करून दिली. ते जे अंक प्रतिनिधि व प्रेक्षक यांत वाटीत होते त्या अंकांत मी लिहिलेले काँग्रेसवरील लेख प्रसिद्ध झाले होते व त्यांतील विचार काँग्रे-सला आलेल्या प्रतिनिधींच्या व प्रेक्षकांच्या अवलोकनात यावे म्हणून ते स्वतः मराठीभाषी प्रेक्षकांस ते वाचण्याकरिता देत होते. त्या लेखांवर माझें नांव नव्हतें. त्या पत्रातील अग्रलेख म्हणूनच ते छापले गेले होते. परंतु त्यांतील मुख्य विचारसरणी ही लो. टिळकांच्या तत्त्वांवरच अधि-ष्ठित होती. तसा त्या लेखांत स्पष्ट उल्लेखही होता. म्हणूनच पापा-साहेब हे स्वतः ते लेख राष्ट्रीय सभेच्या मंडळींच्या नजरेस आणण्याची खटपट करीत होते. बाळशास्त्री हरदास यांनी 'डॉ. मुंज्यांचे पूर्वीचें नागपूर' या प्रकरणात जें प्रतिपादन केलें आहे त्याचा आशय असा निघतो की, वऱ्हाडात राजकारणात टिळकांच्या मताला एक दादासाहेब खापर्डे यांचाच तेवढा आधार होता; बाकीचे काँग्रेसवाले हे सर्व नेमस्त पक्षाच्या मागे जाणारेच असत. प्रांतिक काँग्रेस कमिट्यांचे पदाधिकारी हे बहुतेक ठिकाणी सर्वमान्य नेमस्तच होते. पण काही ठिकाणी नेमस्तांच्या हातून या कमिट्यांचा कारभार निघून तो टिळकांचे म्हणविणाऱ्यांच्या हातांत जावयास लागला होता. यवतमाळ जिल्हा काँग्रेस कमिटीची पूर्वीची घडी कायम राहिली नव्हती. वऱ्हाडच्या चार जिल्ह्यांतून दादासाहेबांच्या नेतृत्वाखाली, केसरीतून प्रसिद्ध होणाऱ्या टिळकांच्या जहाल मताचा प्रचार मुख्यतः ज्या चार-पांच तरुणांच्या उत्साही व त्यागी कर्तबगारीने होत होता त्यांत डॉ. बाबासाहेब परांजपे, वीर वामनराव जोशी, शामराव देशपांडे महागावकर. व पन्नालालजी व्यास यांच्या नांवांचा निर्देश मी प्रामुख्याने करू इच्छितो. त्याचप्रमाणे खास अमरावतीत भाऊसाहेब दुराणी वगैरे मंडळी, हायस्कुलांतील विद्यार्थी व गावातील सुखवस्तू तरुण यांचीं मनें टिळकपक्षाकडे आकृष्ट करण्याकरिता अनेक तऱ्हेचे प्रसंग निर्माण करीत. नागपुरात जेव्हा डॉ. मुंजे यांनी टिळकपक्षाची छाप नागपूरच्या जनतेवर व तेथील सार्वजनिक कार्यकर्त्यांवर पाडण्या-करिता सुरवात केली व तीत थोडक्या काळात अपूर्व यश संपादन केलें

त्याच्या अगोदर वऱ्हाडातील चार जिल्ह्यांत तें काम झालें होतें. वऱ्हाडातीत मवाळ पक्षाचे जे पुढारी समजले जात होते. त्यांना या गोष्टीची जाणीव होती.

मुंबईच्या अधिवेशनात टिळक, लाला लजपतराय, दादासाहेब खापर्डे यांचा विशेष भर राष्ट्रीय सभा ही जनमताची एकमेव प्रतिनिधि व राजकारणी संस्था असल्यामुळे ती सजीव व कार्यक्षम असावी यावर होता. तिच्या अस्तित्वाची जाणीव फक्त नाताळच्या सुट्टीतील तीन चार दिवसच तिच्या पुरस्कर्त्यांस होते व त्या काळात काही हालचाल केल्यावर ती जी कुंभकर्णाप्रमाणे पुन्हा झोपी जाते ती पुढल्या डिसेंबरात उत्तरायण लागल्याची घंटा वाजल्यानंतर जागी होते, या स्थितीत पालट झाल्याशिवाय भारताच्या राजकीय हक्कांच्या मागणीत जिवंतपणा आहे याचा प्रत्यय हिंदुस्थान सरकारलाच नव्हे तर इंग्लंडमधील ब्रिटिश सत्ता व ती सत्ता ज्यांच्या अनुमतीवर चालते ते ब्रिटिश प्रजाजन (मतदार) यांनाही यायला पाहिजे. मुंबईच्या अधिवेशनात या दृष्टीने राष्ट्रीय सभेच्या कार्यपद्धतीत काही इष्ट बदल व्हावा म्हणून चर्चा झाली; पण त्यातून फलनिष्पत्ति काहीच झाली नाही. राष्ट्रीय सभेचे कार्यचक्र बारा महिने सूर्याच्या रथाप्रमाणे सारखें फिरत कसें ठेवता येईल हा विचार लोकमान्य टिळकांच्या मनात सारखा घोळत असे. म्हणून ते निदान मंजूर झालेल्या ठरावांची अंमलबजावणी करण्यासाठी एक कार्यकारिणी सभा तरी नेमा अशी सूचना करीत. पण एकदा हें उंटाचें पिल्लू आत शिरलें म्हणजे त्याला बाहेर घालवावयाचें तर घराचे दरवाजे काढावे लागतील व बाजूच्या भिंती पाडाव्या लागतील याचें फेरोजशहा मेथांना मोठें संकट वाटे व त्या पुरुषास नाखूष करून काँग्रेस चालविणें इतर नेमस्तांना अशक्य वाटे. यापुढील काँग्रेसचें १९०५-चें अधिवेशन बनारस येथे नामदार गोखले यांच्या अध्यक्षतेखाली भरलें. त्याच्या अगोदर बंगालची फाळणी जाहीर झाल्यामुळे वंगभंगाचें प्रचंड आंदोलन बंगालमध्ये सुरू झालें. त्या आंदोलनात सर्व बंगाल एक झाला. नेमस्त व जहाल हे भेद तर मिटलेच; पण क्रांतिकारी व शांतिकारी हेही भेद फार पुसट होऊ लागले. डॉ. मुंजे यांनी नागपूर विभाग व हिंदी मध्यप्रदेश यांमध्ये नवचैतन्य भरण्याकरिता आणि लोकांना टिळकांच्या क्रियाशील मार्गावर आणण्याकरता जे प्रयत्न केले त्यांत प्रांतिक परिषदेचीं अधिवेशनें भरविण्याचा उपक्रम केला. असें पहिलें अधिवेशन नागपूर येथे दादासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखाली भरविण्यात आलें. हें अधिवेशन भरविण्याचा विचार नागपूर

येथील मंडळींनी केला असून त्या परिषदेचें अध्यक्षस्थान श्रीमंत दादासाहेब खापर्डे यांनी मंडित करावें अशी येथील सर्व कार्यकर्त्यांची इच्छा आहे; तरी ही गोष्ट घडवून येण्यासाठी जें काही करता येण्यासारखें असेल तें अवश्य करावें. आमच्या आमंत्रणास ते मान देतील असें आपणांकडून कळताच आम्ही स्वागत कमिटीतर्फे योग्य निमंत्रण पाठविण्याची व्यवस्था करू अशा अर्थाचें एक पत्र माधवराव पाध्ये वकील यांनी माझ्या नांवावर पाठविलें. नागपुरात मी लॉ क्लासमध्ये अभ्यास करीत होतो त्या वेळी एखादा दुसरा लेख लिहून देशसेवकमध्ये छापण्याकरिता पाठवीत असे. त्यामुळे व लॉ कॉलेजमध्ये असताना मॉरिस कॉलेज डिबेटिंग क्लबचा कार्यवाह म्हणून मी काम करीत असे. त्यामुळे कॉलेजच्या विद्यार्थ्यांशी जास्त संबंध ठेवू इच्छिणारे जे सार्वजनिक कार्यकर्ते व वृत्तपत्रसंपादक वगैरे असत त्यांच्याशी मला पुष्कळदा भेटण्याचा योग येत असे. १९०१ साली कलकत्ता काँग्रेसहून परत येताना टिळक नागपुरास उतरले. त्या वेळी विद्यार्थी मंडळीतर्फे लो. टिळकांना आपण आग्रह करून आमचें आमंत्रण स्वीकारण्याची विनंती करावी हें मी माधवराव पाध्ये यांस नम्रपणेपण अगत्याने सांगितलें होतें व तें काम त्या वेळी त्यांच्याच खटपटीमुळे यशस्वीही झालें होतें. यामुळेच त्यांनी मला वरील पत्र लिहिलें होतें. मी तें पत्र घेऊन यशवंत गोविंद देशपांडे, आसनारे व भाऊसाहेब दुराणी यांच्या समवेत दादासाहेब खापर्डे यांच्याकडे गेलो व त्यांना पत्र दाखविलें. त्यापूर्वी त्यांना अनौपचारिक अशी आणखी काही पत्रें आलीं होतीं असें दिसलें. त्यांनी कोणत्या तारखा सोयीच्या होतील वगैरेंचा विचार करून असें आश्वासन दिलें की, नागपूरकर मित्रमंडळींची जी इच्छा असेल तिला मी जरूर मान देईन. पहिली कॉन्फरन्स नागपूरलाच भरविण्यात आली. तिला मध्यप्रदेश व विदर्भातील बरेच प्रतिनिधि आले होते. कोणत्याही एका पक्षाची म्हणून ती भरविण्यात आली नव्हती. या परिषदांचा प्रांतातील लोकांत राजकीय हक्कांसंबंधीचें चैतन्य निर्माण करण्याच्या कामी फार उपयोग झाला. त्याचप्रमाणे हिंदी मराठी असे क्षुद्र वादही असल्या भव्य संमेलनात दृष्टीस पडणाऱ्या ऐक्यामुळें आपोआप थंडे होत व आपण सर्व भारतीय एक असल्याच्या भावनेचे बीजारोपण व्यवस्थित होऊन ती योग्य प्रकारे वाढीसही लागत असे. दोन्हीही पक्षांत कटुता उत्पन्न न होऊ देता १९०६-पर्यंत डॉ. मुंजे यांना राष्ट्रीय मंडळाची स्थापनेपासून मोठ्या कुशलतेने जोपासना करता आली व त्या संघटनेला बलिष्ठ करून लोकमताचा विश्वास संपादन करता आला.

१९०५ साली वंगभंगाचे चळवळीमुळे राष्ट्रीय सभेतसुद्धा बहिष्कारासारख्या उपायाला मान्यता द्यावी लागली. नामदार गोखलें यांनी आपल्या भाषणात असें सांगितलें की " हिंदुस्थानच्या जनतेला तेच हक्क हवे आहेत की जे हक्क इंग्लंडमध्ये इंग्लंडच्या नागरिकांना असल्या-बद्दल गर्व वाटतो. " लाला लजपतराय यांच्या मध्यस्थीमुळे व टिळकांच्या नेहमीच्या पद्धतीस अनुसरून शेंडी तुटो की पारंबी तुटो असा प्रसंग येईपर्यंत ताणून धरून शेवटी एखादें दुसरें प्रगतीचें पाऊल टाकायला प्रतिपक्षी तयार आहे असें दिसताच समेटाने शेवट गोड करून बखेडा मिटवावा या पद्धतीचें त्यांनी अवलंबन केलें आणि बनारस येथील अधिवेशनावर यशस्वितेचा छाप मारून ते बाहेर पडले. नंतर १९०६ साली जे ठराव झाले त्यांतून टिळकपक्षाच्या कार्यक्रमास तत्त्वशुद्ध पाठिंबा मिळाल्यामुळे, सर्व देशभर स्वराज्याकरिता, केवळ बंगालची फाळणी रद्द व्हावी म्हणून नव्हे, आन्दोलन करण्याचें महाद्वारच सताड खुलें झालें होतें. त्यामुळे मेथा वगैरे मनातल्या मनात जळफळतच होते. १९०७-मध्ये राष्ट्रीय सभेचें अधिवेशन नागपूर येथेच भरविण्याचें ठरवून हें संस्मरणीय अधिवेशन समाप्त झालें.

१९०७-मध्ये नागपुरातील लोकमत राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान टिळकांस देणार अशीं चिन्हें दिसू लागल्याबरोबर मेथा वगैरे नेमस्ता-ग्रणींनी जीं कारस्थानें करून राष्ट्रीय सभेचें अधिवेशन नागपूरहून सुरतला नेलें त्याची साद्यंत हकीकत चरित्रलेखकाने दिली आहे. ती वाचून पाहता असें दिसून येईल की, समेट करण्याची पराकाष्ठा टिळकांनी व त्यांच्या अनुयायांनी केली. नागपूरहून राष्ट्रीय सभेचें अधिवेशन हलवून तें दुसऱ्या ठिकाणी नेण्यात नागपूर शहराची अब्रू जाते ती वाचवावी म्हणून डॉ. मुंजे व अळेकर यांनी तुम्ही नागपुरास बिनशर्त अधिवेशन भरवा, आपली स्वागत कमिटी नेमा व अधिवेशना-करता लागणाऱ्या खर्चाचा बोजाही आम्ही तुमच्यावर टाकणार नाही, याचा विसार म्हणून दहा हजार रुपयांच्या नोटा वाच्छा यांच्या स्वाधीन केल्या. परंतु फेरोजशहा मेथा यांनी आपला हट्ट सोडला नाही. एकदा या टिळकपक्षीयांचें नाक कोठे तरी ठेचलेंच पाहिजे तें आता सुरतेसच उरकून घेऊ अशा दुराग्रहातच ते राहिले. त्याच दुराग्रहाने सुरतेस बखेडा होऊन काँग्रेस जी जायबंद झाली ती १९१६-पर्यंत कशी तरी कन्व्हेन्शन हें नांव देऊन टिकविण्यात आली. ज्या टिळकपक्षास काँग्रेस-मध्ये येण्यास मज्जाव केला तो पक्ष जेव्हा पुन्हा टिळकांसह परत १९१६-मध्ये काँग्रेसमध्ये आला तेव्हाच तिच्यात पुन्हा चैतन्याचा संचार

झाला व होमरूलच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काची मागणी करण्यास ती सिद्ध झाली.

१९१५ ते १९२०-पर्यंतच्या राष्ट्रीय सभेत निर्माण झालेल्या उत्साहाला लोकमान्य टिळकांच्या निधनानंतर महात्मा गांधी यांनी आपल्या अहिंसात्मक असहकार योगाचे तंत्राचा प्रयोग करून निराळ्या दिशेने कार्यप्रवृत्त केलें.

१९०८ ते १९१४ या अवधीत लोकमान्य टिळक मंडालेत तुरुंगात असताना डॉ. मुंजे यांनी सुरतेच्या फुटीनंतर जी काँग्रेस कन्टिन्युएशन कमिटी नेमली होती तिची विशेष पर्वा न करता निराळी काँग्रेस भरविण्याचा उद्योग करून पाहिला. पण त्याला नागपूर सोडून इतरत्रचे टिळकपक्षीय अनुकूल नव्हते. शेवटी सरकारच्या कठोर हस्तक्षेपामुळे तोही व्यूह ढासळला.

पुढच्या काळात डॉ. मुंजे काँग्रेसच्या काम करण्याच्या पद्धतीसच इतके विटले होते की, काही झालें तरी ती जुनी काँग्रेस नकोच; आपण दुसरें काहीतरी नवीन निर्माण करू व तद्वारा आपले राष्ट्राभ्युदयाचे उद्योग चालू ठेवू असेंच त्यांना वाटे. यामुळेच ते शेवटच्या काळात हिंदुमहासभेच्याच कार्यात रंगले.

मी ही प्रस्तावना संपविण्यापूर्वी येवढेंच म्हणतो की, मध्यप्रदेशात डॉ. मुंजे हा एकच पुढारी असा निघाला की, ज्याने राजकारणात पडल्यानंतर चोवीस तास त्याच कामास दिले. स्वतःच्या प्रपंचाचे कामासाठी वेळच ठेवला नव्हता. त्यांनी जवळजवळ आपलें सर्वस्वच सार्वजनिक कार्यास समर्पण केलें व कार्य करीत असता मनास योग्य वाटेल त्या दिशेने ते चालले. निंदास्तुतीची पर्वा केली नाही. त्यांच्या संबंधात लक्षात ठेवण्यासारखी आणखी एक असामान्य गोष्ट आहे. ती ही की, त्यांची पुष्कळांनी अनन्वित निंदा करून त्यांना दुखविलें. पण डॉ. मुंजे यांच्या मुखातून कोणत्याही अशा व्यक्तीसंबंधाने सार्वजनिक भाषणातून तर नाहीच, पण निव्वळ खाजगी बैठकीतूनसुद्धा चुकूनदेखील अपशब्द निघाला नाही. हा त्यांचा वाक्संयम मोठा वाखाणण्यासारखा आहे. ही त्यांची तपस्या "तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित्" अशा कोटीतल्या योग्याला शोभण्यासारखी होती. त्यांच्या संगतीत माझ्या आयुष्याचा जो काळ गेला तो माझ्या जीवनात सार्वजनिक कार्याविषयी काहीतरी आंतरिक तळमळ उत्पन्न करणारा होता. डॉ. मुंजे यांच्यापासून हजारो तरुणांना देशकार्य करण्याची प्रेरणा मिळाली आहे. मुंजे यांनी समकालीन तरुण पिढीवर उपकारांचें फार मोठें ओझें करून

ठेवलें आहे. मी ही प्रस्तावना लिहीत असताना माझ्यासमोर नागपूर येथे झालेल्या सोमयागाकरिता निधि गोळा करीत फिरणाऱ्या डॉक्टरांचें चित्र आहे. त्या वेळी मी त्यांचे बरोबर या कामासाठी फिरत असे. एका मोठ्या श्रौत यज्ञाचे कार्यासाठी आपलें शरीर झिजत आहे याबद्दल त्यांना फार धन्यता वाटे. त्यांचें सबंध आयुष्य कित्येक वर्षेपर्यंत चाललेलें एक मोठें यज्ञसत्रच होतें, व त्या यज्ञाचे तेच अध्वर्यु होते. अशा एका खऱ्या निष्काम बुद्धीने कार्य करणाऱ्या याज्ञिकाचें जीवन म्हणजे त्रिसुपर्णात वर्णन केलेलें अजरामर्य अग्निहोत्रच होय. डॉ. मुंजे यांच्यासारखे असेच अनेक अग्निहोत्री निर्माण होवोत आणि त्यांच्या पुण्यकर्मरूपी पुष्पाचा परिमल सर्व विश्वात दरवळून भूतमात्रास सुखदायक होवो ही प्रार्थना करून मी कै. डॉ. मुंजे यांच्या तेजस्वी व पुण्यवान् आत्म्यास माझी श्रद्धांजलि अर्पण करतो.

दि. २१ जून १९६६<br>वेस्ट हायकोर्ट रोड,<br>नागपूर

माधव श्रीहरि अणे

# प. पू. सरसंघचालक श्री. माधवरावजी गोळवलकर यांचा पुरस्कार

कै. धर्मवीर डॉ. मुंजे यांना इहलोक सोडून इतकीं वर्षें झाल्यावर त्यांचें चरित्र आता कोठे छापलें जाऊन लोकांसमोर येत आहे. ग्रंथ-कर्त्यांनी या उशिराचीं कारणें स्वतःच सांगितलीं आहेत. अपरिहार्य असा हा विलंब झाला आहे. या ग्रंथाचे मुद्रितावरून वाचन करण्याचा सुयोग मला लाभला. ज्या कालखंडात डॉ. मुंजे जन्मले, वाढले व सार्वजनीन तसेंच राजकीय जीवनाची त्यांनी घडण केली, तो कसा होता याची कल्पना करणारे थोडेच उरले आहेत. त्या कालखंडातील जनमनाची अवस्था, परकीय राज्यशासनाचे प्रबल पाश, नेतृत्व करणाऱ्यांची राज-मान्यता व लोकमान्यता यांमधली दोलायमान व अनेकदा केविलवाणी व कधी कधी क्षुद्र दासभावपूर्ण उक्ति व कृति, नंतर राजमान्यतेवर मात करून लोकमान्यतेची जनमनावर वाढती प्रभावी पकड, तिचा परिणाम म्हणून जनतेची परकीय सत्तेशी शस्त्राचारापासून तो असहकारापर्यंत कशाही प्रकारच्या साधनांनी प्रत्यक्ष संघर्ष करण्याइतपत कणखर होत चाललेली प्रवृत्ति, या सर्व स्थित्यंतरांचें ज्ञान झाल्याविना डॉ. मुंजे यांच्या चरित्राचें मर्म ध्यानात येऊ शकणार नाही. डॉ. मुंजे हे ज्यांना आपले राजकीय गुरु मानीत होते त्या लोकमान्य टिळकांचा कालखंड प्रस्तुत ग्रंथात आला आहे. भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासाचा हा महत्त्वाचा भाग या चरित्रवर्णनाच्या मिषाने मर्मग्राही कुशलतेने येथे वर्णिलेला आहे. त्यात डॉ. मुंजे यांचा वाटा फार मोठा असल्यानें व जुन्या मध्यप्रदेशात प्रखर राष्ट्रीय आंदोलनाचे ते मूळ प्रवर्तक अस-ल्याने त्यांच्या चरित्रवर्णनाच्या ओघात या कालखंडाचा विवेचनपूर्ण इतिहास दिला जाणें अनिवार्यच होतें. वाचकांना यातून त्या काळच्या परिस्थितीचें ज्ञान होऊन डॉ. मुंजे यांच्यासारख्या प्रखर देशभक्ताच्या जीवनाचा विकास ध्यानी येईल. राष्ट्रसेवेकरिता स्वार्थावर तिलांजलि

देऊन, सुखदुःख, मान-अपमान आदींची अवहेलना करून, ध्येयदृष्टीने कधी कणखरपणा, तर कधी नमतें घेणें अशा लवचिकपणाने कार्य सिद्ध करण्यास्तव लागणारा मनाचा व बुद्धीचा जिवंतपणा कसा असतो याची जाणीव डॉ. मुंजे यांच्या जीवनविकासाच्या क्रमात वाचकांना होईल व स्वतःचें जीवन राष्ट्रहितार्थ घडविण्यास प्रेरणा व मार्गदर्शन प्राप्त होईल यात संशय नाही. डॉ. मुंजे यांच्या कर्तृत्वाचा व त्यांच्या धैर्यशाली जीवनाचा खरा भाग पुढे यावयाचाच आहे. त्यानंतरच त्यांच्या अनेकविध गुणांची खरी ओळख पटू शकेल व त्यानंतरच या ग्रंथाचें खरें मूल्यमापन करणें शक्य होईल.

ग्रंथकारांनी मला या ग्रंथाला पुरस्कार लिहिण्याचा आग्रह केला तो कां हें मला कळत नाही. माझी तशी योग्यता नाही. त्यातून मुद्रितें वाचणें व हें थोडेसें लिहिणें याकरिता आवश्यक वेळ व उसंत या ग्रीष्मकाळात राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या देशभर चालू असलेंल्या शिक्षणवर्गात जाऊन येण्याच्या दोन महिन्यांच्या अविराम प्रवासक्रमात मला प्राप्त होणें दुरापास्त आहे याची त्यांना जाणीव असूनही त्यांनी हा आग्रह केला. त्याला एक कारण असें असू शकतें की, कै. डॉ. मुंजे यांचे धाकटे बंधु कै. भाऊसाहेब मुंजे व माझे कै. तीर्थरूप यांचा बालवयांत जवळचा संबंध होता व त्याच दृष्टीने डॉ. मुंजे यांचा माझ्यावर लोभ होता. दुसरें म्हणजे ज्या राष्ट्रीय स्वयंसेवक संघाची अल्पस्वल्प सेवा करण्याचें भाग्य मला लाभलें आहे त्याचे संस्थापक परमपूजनीय डॉ. केशवराव हेडगेवार यांचेवर डॉ. मुंजे यांनी पुत्रवत् प्रेम करून त्यांच्या क्रांतिकारी मार्गातही त्यांचें समर्थन व संरक्षण केलें होतें व पुढे जेव्हा संघाचें कार्य सुरू झालें तेव्हापासून त्याचें संवर्धन करण्यात त्यांनी सर्व प्रकारचें साह्य केलें आणि डॉ. हेडगेवार हे संघाचे प्रमुख व आपण एक स्वयंसेवक असे प्रत्येक प्रसंगी उद्घोषित करून संघाच्या कार्यक्रमांना गणवेषात उपस्थित राहून तें प्रत्यक्ष सर्व लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आणण्यात सदैव भूषण मानलें. प. पू. डॉ. हेडगेवारांनंतर तोच लोभ व तेंच आशीर्वादपूर्ण सहकार्य माझ्याही वाटचाला आलें. डॉ. मुंजे असेतोपर्यंत मला हिमाचलासारखा अढळ आधार प्राप्त झालेला असे व

निर्भयपणाने हिंदुराष्ट्राच्या सत्यसिद्धान्ताचें मंडन करीत देशभर संचार करीत राहण्याचें साहस व उत्साह अनुभवाला येत असे. डॉ. मुंजे यांचा कृपापात्र म्हणूनही ग्रंथकर्त्यांनी माझ्यावर हें दायित्व टाकलें असावें असें वाटतें.

या ग्रंथाचा पुरस्कार करण्याची माझी योग्यता नाही. ग्रंथाच्या श्रेष्ठतेसंबंधी मत देणें माझ्या आवाक्याबाहेरचें काम आहे. पण डॉ. मुंजे ह्यांच्यासारखा राष्ट्रभक्त, स्वार्थशून्य, सवंग कीर्तीची अवहेलना करून ध्येयावर अढळ राहणारा धीरोदात्त पुरुष हा वर्ण्य विषय, व महा-महोपाध्याय साहित्याचार्य बाळशास्त्रीसारखा प्रथितयश, विद्वान्, डॉ. मुंजे यांच्या नेतृत्वाखाली उदंड कार्य केलेला कर्मठ कार्यकर्ता हा लेखक असा मणिकांचनयोग या ग्रंथाच्या भाग्यात आलेला आहे. इतकें सांगितलें म्हणजे या महान् चरित्रग्रंथाची श्रेष्ठता वाचकांच्या सहज ध्यानात येईल.

शेवटी या ग्रंथाचा उत्तरार्ध शीघ्र प्रकाशित होवो व उगवत्या पिढ्यांना याच्या परिशीलनाने निःस्वार्थ राष्ट्रसेवेची प्रेरणा प्राप्त होवो म्हणून व देशवासियांना या ग्रंथाचा संग्रह करून स्वतःचें खरें हित साधण्याची सद्बुद्धि लाभावी म्हणून सर्वशक्तिमान् श्रीपरमेश्वरचरणी प्रार्थना करीत हा अल्प व गुणहीन, पण अंतःकरणपूर्वक लिहिलेला ‘ पुरस्कार ’ पूर्ण करतो. इति शम् ।

डॉ. हेडगेवार भवन<br>
नागपूर २<br>
दि. २४-५-१९६६

**मा. स. गोळवलकर**

# अनुक्रमणिका

प्रकरण १ लें – कुलवृत्तान्त १ ते ११

मुंजे आडनांवाची उत्पत्ति; त्यासंबंधाने विविध मतें; श्रीमंत रघोजीराव भोसले यांच्या घराण्याशी मुंजे घराण्याचा संबंध; डॉ. मुंजे यांचे वडील शिवरामपंत मुंजे यांचें बिलासपूरला वास्तव्य; त्यांचा स्वभाव, दणकट प्रकृति व पराक्रम; शिवरामपंत मुंजे यांच्या त्रिविध निष्ठा; डॉ. मुंजे यांची आई; डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे यांची जन्मकुंडली.

प्रकरण २ रें – बालपण व शिक्षण १२ – २७

डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे यांचें बालपण; लहानपणीच्या काही आठवणी; आखाड्याचा नाद; प्राथमिक शिक्षणात पहिले; हायस्कूल शिक्षणासाठी रायपूरला प्रयाण; चित्रकलेतील प्रावीण्य; चीफ कमिशनरचें बक्षीस; मॅट्रिक पास झाले; डॉ. मुंजे यांचा विवाह; नागपूरच्या मॉरिस कॉलेजात नांव नोंदलें; बायबलचा अभ्यास; संस्कृत भाषेवर प्रभुत्व; जुन्या काळच्या परदेशगमनविषयक धार्मिक समजुती; रसायन शास्त्राचे प्राध्यापक डॉ. रॉबर्टसन यांची स्वदेश-भक्ति; ख्रिस्ती धर्म हिंदुधर्मापेक्षा श्रेष्ठ आहे या प्रचाराला डॉ. मुंजे यांचें आव्हान; इंटरमीजिएट परीक्षेत पहिले; मुंबईला प्रयाण; ग्रँट मेडिकल कॉलेजात नांव दाखल केलें; मुंबईचा प्लेग व त्याविषयी सरकारी व्यवस्थेसंबंधाने असंतोष व दंगा; प्लेगात उप-चाराचें कार्य; त्यात निर्माण झालेला एक प्रसंग; मुंजे प्रभृतींचा सिंहगडचा प्रवास; १८९८ साली एल. एम. अॅण्ड एस्. उत्तीर्ण.

प्रकरण ३ रें – मुंबईतील सुखी जीवन २८ – ४१

मुंबई कॉर्पोरेशनच्या मेडिकल खात्यात डॉक्टर म्हणून नोकरी; प्लेगप्रतिबंधाचें कार्य; रायगडची सफर; लो. टिळकांची पहिली भेट; पोहण्याची शर्यत; मुसलमान वस्तीतील प्लेगनिवारणाचें कार्य; एक चमत्कारिक प्रसंग; डॉ. मुंजे यांचें नैतिक अधिष्ठान; जबाबदारी

स्वीकारण्याची सहजप्रवृत्ति; फिरोज उद्दिन नांवाच्या शिपायाला डॉक्टरांनी संरक्षण दिलें. म्यु कमिशनर मि. जेम्स डुबोले यांनी अभिनंदन केलें. १९४२ च्या चळवळीच्या वेळी हें उदाहरण देऊन मुंजे यांनी म. गांधींना पाठविलेलें पत्र व त्यांना नेतृत्वाच्या जबाबदाऱ्यांची दिलेली जाणीव.

प्रकरण ४ थें — बोअर युद्ध व डॉ. मुंजे ४२ — ५२

युद्धात मेडिकल ऑफिसर म्हणून जाण्यासाठी हिंदी लोकांना आवाहन; डॉक्टरांनी तयारी केली; पत्नीची नागपूरला रवानगी करून आफ्रिकेला बोअर युद्धात मेडिकल ऑफिसर म्हणून गेल्याचें वडिलांना पत्र पाठविलें; बोटीवरील अनुभव; युरोपियन प्रवाशांची विरोधी प्रवृत्ति; दरबान येथे गांधींच्या घरी पाहुणे म्हणून गेले; 'काला आदमी'ला गोऱ्यांचा विरोध; सैनिकी वेषाचा परिणाम; सैनिकी केंद्राकडे प्रयाण; दारू न पिणारे डॉ. मुंजे व दारूबाज इतर अधिकारी; डॉ. मुंजे यांना घोडा मिळाला; ब्रिटिश सैनिकांची कठोर कर्तव्यनिष्ठा; बोअर युद्ध समाप्तीनंतर हिंदुस्थानात परत आले.

प्रकरण ५ वें — हिंदुस्थानात आल्यावर ५३ — ६९

समुद्रगमन व प्रायश्चित्त प्रकरण; काशी विश्वेश्वराचें दर्शन; कानपूरविहिरीचें स्मारक पाहिलें; सर सच्चिदानंद सिंह यांची भेट; त्यांच्या रेल्वेवरील अडचणीचें निवारण; प्रयागला बंधूंची भेट; दिल्लीच्या कुतुबमिनारला हिंदुमंदिरांच्या दगडांचा उपयोग केल्याची कथा; राष्ट्रीय अपमानाच्या सुडाची भावना जागृत झाली; पेशावरला प्रयाण; लाला लोरिंदामल यांची सहजगत्या भेट; त्यांच्या पांढऱ्या घोडीवरून रपेट करण्याची हौस; घोडीने डॉक्टर मुंजे यांची दमछाट केली; जिवंत सुरक्षित परत; काश्मीर राजाचा शीख सहचर; त्याची आडदांड शरीरयष्टि; काश्मीर महाराजांचा परिचय; त्यांनी सांगितलेली गोष्ट; आपल्याला हिंदु करा म्हणून मुसलमान मागे लागले असताही काश्मिरी ब्राह्मणांनी विरोध केला व जीव देण्यास निघाले; काबूलच्या अमिराला डॉ. मुंजे यांनी पत्र पाठविलें; काबूलला स्थायिक होण्याचा विचार; वाट पाहूनही अमिराचें उत्तर न आल्यामुळे डॉ. मुंजे अखेर नागपूरला परतले. १९०१-पासून नागपूरला नेत्रवैद्य म्हणून व्यवसायास प्रारंभ; डोळ्यांवरील शस्त्र-

क्रियेसाठी हात बसण्याकरता केलेला अभिनव उपक्रम; बोकडांचीं व शेळयांचीं मुंडकीं आणून त्यांच्या डोळ्यांवर प्रयोग; ब्राह्मण वस्तीतील या प्रकारामुळे समाजात गोंधळ; गैरसमज दूर केला; जिवंत कुत्र्यांच्या डोळ्यांवर प्रयोग; अखेर नेत्रवैद्यकात धन्वन्तरि बनले; व्यवसायातील काही चमत्कारिक अनुभव; गुंडांनी बनविलें; डॉक्टरांची आत्मरक्षणाची सिद्धता; दाढी राखण्याची हौस; महाराजबाग क्लबातील खेळ; नागपूरच्या जीवनातील थोर व नामवंत मंडळींचा परिचय; सनातनी सुद्धा मदिराभक्त बनलेले आढळले; वेगळा जिमखाना काढण्याचा प्रयत्न; मर्दानी खेळांचा शोक; १९०३-मध्ये नेत्रवैद्यकात शस्त्रक्रियेच्या पद्धतीत नवा शोध.

प्रकरण ६ वें – संशोधक डॉ. मुंजे ७० – ८१

प्रत्यक्ष शस्त्रक्रियेच्या अनुभवातील प्राथमिक स्वरूपाच्या उणीवा; प्रत्यक्ष प्रयोगानंतर नवें संशोधन; 'स्मिथ थिअरी' ही मुळात 'मुंजे थिअरी'; चरक व सुश्रुत ग्रंथांचा सूक्ष्म अभ्यास; जुनीं व नवीं नांवें; नेत्रचिकित्सेवर संस्कृतात ग्रंथ—प्रथम खंड—लिहिला; दादासाहेब खापर्डे यांची त्यास प्रस्तावना; संस्कृत ही विद्वानांची भाषा; संस्कृत व्याकरण, धर्मशास्त्र, राजनीतिशास्त्र, वैद्यशास्त्र यांचा सूक्ष्म अभ्यास; सिद्धान्त कौमुदीच्या काही भागांचें भाषांतरही केलें.

प्रकरण ७ वें – डॉ. मुंजे यांच्या उदयापूर्वीचें नागपूर ८२ – ९६

नागपूरचा जुना इतिहास ; भोसल्यांची सत्ता; नंतर इंग्रज आले; ब्रिटिश इंडिया ॲसोसिएशन नावाच्या संस्थांची स्थापना; थिऑसफिकल सोसायटीचें अड्यार येथे संमेलन; त्यांतून कॉंग्रेसचा उगम; १८८५-मध्ये कॉंग्रेसची स्थापना; पहिलें अधिवेशन पुण्यात भरावयाचें; पण रोगाच्या साथीमुळे मुंबईत स्थलांतर; दुसऱ्या कॉंग्रेसला नागपूरचे प्रतिनिधि; नागपूरच्या सार्वजनिक व शैक्षणिक संस्था; आरंभीचे सुधारक व सनातनी गट; १८८९-च्या मुंबई कॉंग्रेसचे नागपूरचे प्रतिनिधि; १८९१-ची नागपूर कॉंग्रेस; १८९१ ते ९९ मधील कार्य; नव्या विचारक्रांतीचीं पदचिन्हें; १९०४-मध्ये डॉ. मुंजे यांचा राजकारणप्रवेश.

प्रकरण ८ वें – डॉ. मुंजे यांचा राजकारणात प्रवेश ९७ – ११०

डॉ. मुंजे यांचा १९०४ मध्ये Reformed Opinion on Hindu Social Reforms या विषयावर इंग्रजी निबंध; राजकीय सुधारणांना विरोध करणाऱ्या समाजसुधारकांवर मर्मभेदी प्रहार; १९०४-च्या मुंबई काँग्रेसला गेले; मवाळ व जहाल यांच्यातील भेद; डॉ. मुंजे यांनी आपला निबंध टिळकांना दाखविला; टिळकांची पसंती; त्यांच्या सूचनेवरून निबंधाचें प्रकाशन; प्रांतिक परिषद भरविण्याची कल्पना; हॉकी खेळासाठी येणाऱ्या मुसलमान खेळाडूंचा स्वयंसेवक होण्यास नकार; अखेर हिंदु समाजातून स्वयंसेवक मिळविले; १९०५-ची प्रांतीय परिषद; तिलाच जोडून सामाजिक व आर्थिक परिषदा; टिळकांचें राजकारण मध्यप्रांतात दृढमूल करण्याचे डॉ. मुंजे यांचे प्रयत्न; राष्ट्रीय शिवाजी महोत्सवास प्रारंभ; १९०५-मध्ये बंगालची फाळणी; सार्वत्रिक असंतोष उफाळला; सर्व लोक चळवळीत सामील; अरविंद घोषांचें क्रांतिकारक नेतृत्व; १९०५-ची वाराणशी येथील राष्ट्रीय सभा; स्वदेशी बहिष्काराची चळवळ; डॉ. मुंजे यांची कामगिरी; डॉ. मुंजे यांनी व्यवसाय आखडता घेऊन सार्वजनिक कार्यास वाहून घेतलें.

प्रकरण ९ वें – कलकत्ता काँग्रेस १११ – १३५

१९०६-च्या प्रारंभापासून स्वदेशी व विलायती मालावरील बहिष्काराचा जोरदार प्रचार; जबलपूर येथे मध्यप्रांतीय राजकीय परिषद; दादासाहेब खापर्डे यांचें स्वदेशीवर व्याख्यान; टिळकांचें नागपूरला आगमन; त्यांचें भव्य स्वागत; खापर्डे व डॉ. मुंजे यांच्या समवेत टिळकांचें कलकत्त्यास प्रयाण; कलकत्ता येथील प्रचंड स्वागत; कलकत्त्यात शिवाजी उत्सव; टिळकांची सत्कार सभा; विद्यार्थ्यांच्या सभा; ब्राह्मणसभेची पानसुपारी; गंगास्नानाचा अपूर्व समारंभ; कलकत्त्यातील तीन पक्ष; खरगपूरला भेट; टिळकांचें नागपूरला आगमन व स्वागत, सभा, प्रचार; स्वदेशी, बहिष्कार, स्वराज्य व राष्ट्रीय शिक्षण या चतु:सूत्रीवर भर; सरकारचा विरोध भडकला; कलकत्ता काँग्रेसची पूर्व तयारी; अध्यक्षपदासाठी टिळक, लजपतराय यांचीं नांवें; मवाळांनी दादाभाई नौरोजींचें नांव पुढे केलें. टिळकांना तें मान्य; दादाभाईचें टिळकांना पत्र; दादाभाई नौरोजींच्या अध्यक्षतेखाली कलकत्ता काँग्रेसचें १९०६-चें गाजलेलें अधिवेशन; स्वदेशी

बहिष्कार, स्वराज्य व राष्ट्रीय शिक्षण या चतुःसूत्रीचा पुरस्कार; हें नवें निर्माण झालेलें वातावरण बदलण्याचा मवाळांचा प्रयत्न; नागपूर मवाळांचा बालेकिल्ला म्हणून पुढील काँग्रेस नागपूरला भरविण्याचें मवाळांचें धोरण.

प्रकरण १० वें – सन १९०७-चा संघर्ष १३६ – १६०

कलकत्ता काँग्रेसनंतरच्या मवाळांच्या हालचाली; नागपूरला मवाळ आपला बालेकिल्ला समजले; मवाळांचें आव्हान डॉ. मुंजे यांनी स्वीकारलें; राष्ट्रीय मंडळाची स्थापना, क्रांतिकारक चळवळींचा पदन्यास; आर्यबांधववीथिका संस्थेतर्फे स्वदेशीचा प्रचार; मुंजे व दादासाहेब खापर्डे यांचा धुमधडाक्याचा प्रचारदौरा; मवाळांनी रायपूरला प्रांतिक परिषद भरवली; "नेमस्तपण हें आमचें ब्रीद आहे" ही त्यांची घोषणा; डॉ. मुंजे व खापर्डे यांचा सभात्याग;त्यांचीं जाहीर सभेतील स्वदेशीवरील भाषणें; राज्यकर्त्यांचीं प्रक्षोभक कृत्यें; संस्थानांतूनही दडपशाहीची धमाल; रिस्ले सर्क्युलरला सार्वत्रिक विरोध; लोकानेत्यांना अटक, खटले व शिक्षा, व वृत्तपत्रांकडून जामिनक्यांची मागणी; तरुणांच्या क्रांतिकारक संघटना; मोर्ले सुधारणा फोल ठरल्या; नागपूरचें वातावरण बदलल्याची मवाळांची खात्री झाली; काँग्रेसचें अधिवेशन नागपूरहून अन्यत्र भरविण्यासाठी मवाळांच्या योजना सुरू; राष्ट्रीय सभेचें अधिवेशन नागपूरलाच भरविण्याचा डॉ. मुंजे प्रभृतींचा आग्रह; स्वागतमंडळात मुंजेपक्षीयांची बहुसंख्या, पण तीन चतुर्थांश बहुमत मिळालें नाही; मवाळांच्या मदतीस सरकार धावलें; डॉ. मुंजे यांच्या राष्ट्रीय मंडळाला चिरडून टाकण्याचें धोरण; पोलिस इन्स्पेक्टर जनरलला आदेश; दडपशाही वाढत चालली.

प्रकरण ११ वें – सुरत काँग्रेस १६१ – १७७

स्वदेशी बहिष्काराचा ठराव रद्द करून घेण्याचा मवाळांचा प्रयत्न व त्या ठरावांची कार्यवाही करण्याचा टिळकपक्षीयांचा आग्रह यातून वाद निर्माण झाला; काँग्रेसचें नागपूर अधिवेशन मवाळांनी रद्द केलें; फेरोजशहा मेथा यांच्या घरी झालेली ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची सभा; वाद व चर्चा; तडजोड झाली नाही; मवाळांनी काँग्रेस सुरतेला नेली; काँग्रेसच्या अध्यक्षपदी मवाळांना टिळकांचें

वावडें; लजपतराय यांचें नांव पुढे आलें; तेंही मवाळांना अमान्य; उभयपक्षी सुरतेस प्रचार; दादासाहेब खापर्डे यांचीं गुजराथी भाषेतील व्याख्यानें; सुरतेसही दोन तट पडले; मवाळांनी डॉ. रासबिहारी घोष यांची अध्यक्षपदी नियुक्ति केली; मवाळांची नियमबाह्य कारवाई सुरू झाली; गुंडांच्या साह्याने टिळकपक्षाला धडा शिकविण्याचा खेळ सुरू झाला; स्वागताध्यक्षांच्या भाषणानंतर अध्यक्षीय निवडीची सूचना; टिळकांची त्यावर उपसूचना; वाद वाढला; गडबड उडाली; जोडे फेकले गेले; दंगल सुरू झाली. मारामारी होऊन काँग्रेसचें अधिवेशन बंद पडलें. मवाळांनी आपलें स्वतंत्र कन्व्हेन्शन भरविलें व काँग्रेसचे सभासद होण्यासाठी नवें क्रीड निर्माण करून टिळक पक्षाला काँग्रेसचें प्रवेशद्वार बंद करून टाकलें.

प्रकरण १२ वें – चळवळ, दडपशाही व हिंसा १७८ – २०२

सरकारी दडपशाही वाढत गेली; तिची समाजावर झालेली प्रतिक्रिया; गुप्त मंडळयांचें जाळें; अरविंद घोष यांचें भाषण; बाँब मॅन्युअलचा प्रभाव; खुदीराम बोस यांनी अग्निगोलक फेकला; १८१८-च्या रेग्युलेशनचा वापर; टिळकांना अटक, खटला व शिक्षा; या शिक्षेने देशभर अस्वस्थता; नागपुरात मिरवणुका, निषेध, सरकारचा धिक्कार; प्रि.जोन्स यांजवर दगडफेक; सरकारची दडपशाहीची धमकी; वृत्तपत्रांवर खटले; संपादकांना तुरुंगवास; अच्युतराव कोल्हटकरांना दीड वर्षाची शिक्षा; व्हिक्टोरिया राणीच्या पुतळ्याला डांबर फासलें; सरकारची मुसलमानांना हिंदूंपासून फोडण्याची कारवाई; मुस्लिम लीगची स्थापना; चळवळीपासून दूर राहण्याचा मुसलमानांना सरकारचा उपदेश; नागपूरला मुस्लिम लीगचें अधिवेशन; दारूबंदीची चळवळ; तिला सरकारी विरोध; मवाळ व जहाल पक्ष यांच्यात तडजोडीसाठी एकतर्फी प्रयत्न; बोडस यांचें परिपत्रक; स्वतंत्र राष्ट्रीय सभा बोलावण्याचा डॉ. मुंजे यांचा प्रयत्न; बंगाली नेत्यांशी विचारविनिमय; निरनिराळ्या पुढाऱ्यांचीं निरनिराळीं मतें; मुंजे यांनी स्वतंत्र काँग्रेस भरविण्याची तयारी केली, पण सरकारनेच बंदी हुकूम काढून ती बंद पाडली; डॉ. मुंजे यांच्या पत्नीचें निधन.

प्रकरण १३ वें – सरकारी दडपशाहीचा धुमाकूळ २०३ – २३०

खुदीराम बोस व बारींद्र यांचे विचार; बॅ. नॉर्टन यांना बारिंद्राने दिलेलें उत्तर; राष्ट्रीय पक्ष व क्रांतिकारक यांचा अंतःसंबंध; मोर्ले यांचे सुधारणाविषयक विचार; डॉ. मुंजे यांचा क्रांतिकारकांशी संबंध; डॉ. हेडगेवार यांची या काळातील कामगिरी; सरकारी दडपशाही; अच्युतराव कोल्हटकर यांचे तुरुंगातील हाल; त्यांची केसरीला मुलाखत; १९०८-नंतरच्या काळातील काँग्रेसचीं होत चाललेलीं मवाळ अधिवेशनें; आफ्रिकेत गांधीची सत्याग्रहाची चळवळ; दादासाहेब खापर्डे यांचें टिळकांसाठी प्रिव्ही कौन्सिलकडे अपील करण्याकरिता विलायतेस प्रयाण; डॉ. हेडगेवार यांचा क्रांतिकारकांशी संबंध; त्यासाठी कलकत्यास प्रयाण.

प्रकरण १४ वें – राष्ट्रकार्याचीं विधायक साधनें २३१ – २४९

राष्ट्रीय विचारांच्या प्रसारासाठी कीर्तनसंस्थेचा उपयोग करण्याचा डॉ. मुंजे यांचा प्रयत्न; दादाशास्त्री कायरकर व दाजीशास्त्री चांदेकर; स्वतः कीर्तनकार बनण्याचा डॉ. मुंजे यांचा प्रयत्न; त्यासाठी गांधर्व महाविद्यालयाची स्थापना; १९११- चा बादशहाचा दिल्ली दरबार; लॉर्ड हार्डिज यांजवर अग्निगोलक फेकला; पुढे सरकारी धोरणात बदल घडून आला; दडपशाहीची धार बोथट झाली; पुन्हा राष्ट्रीय चळवळीचें पुनरुज्जीवन; नागपूरच्या महाराष्ट्र वृत्तपत्राचा जन्म, व त्यासंबंधीचा इतिहास; डॉ. मुंजे यांचे त्यासाठी झालेले प्रयत्न; हिंदुधर्मशास्त्रविषयक ग्रंथ लिहवून घेण्याचा डॉ. मुंजे यांचा प्रयत्न; त्यांच्या वडिलांनी या कामासाठी ठेवलेली पांच हजारांची देणगी; या ग्रंथाच्या स्वरूपाचा तपशील; डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर इत्यादिकांशी पत्रव्यवहार.

प्रकरण १५ वें – पहिल्या जागतिक महायुद्धाच्या सावलीत २५०–२७४

१९१४ साली लो. टिळकांची सुटका; लोकांत सार्वत्रिक आनंद व त्यामुळे सरकारचा मात्र क्षोभ; पहिलें महायुद्ध सुरू झालें; युद्धाच्या संधीचा लाभ घेण्याचा टिळकांचा विचार; टिळकांचें निवेदन व चिरोलच्या आरोपांचा इन्कार; सरकारला पाठिंब्याच्या खाली युद्धापासून लाभ मिळविण्याचें टिळकांचें धोरण; सरकारची सावधानता; सार्वत्रिक पाहणीत नागपूर प्रांताच्या अधिकाऱ्यांकडे आलेली प्रश्ना-

वलि व चीफ कमिशनरने त्यास दिलेली उत्तरावलि; मध्यप्रांतातील परिस्थितीचें सरकारी अधिकाऱ्यांचें वस्तुनिष्ठ सूक्ष्म निरीक्षण; युद्धप्रयत्नांना मदत करण्याच्या नांवाखाली सैन्यभरतीसाठी प्रचार; राष्ट्रसभेत शिरण्याचा प्रयत्न; कन्व्हेन्शन काँग्रेसने केलेली कोंडी फोडण्यासाठी प्रांतिक परिषदांचा उपक्रम; स्वराज्याचें ध्येय मान्य, पण प्रतिनिधित्वाबद्दल वाद; पुण्याची जहालांची जंगी प्रांतिक परिषद; मवाळांच्या परिषदेचा फजितवाडा.

प्रकरण १६ वें – नागपूरची चौथी प्रांतिक परिषद २७५ – २९८

डॉ. मुंजे यांचे विरोधी राजकीय पक्षातील नेत्यांशीही वैयक्तिक चांगले संबंध; त्याचा परिणाम; जहाल-मवाळ संयुक्त राजकीय परिषद भरविण्याचा डॉ. मुंजे यांचा उपक्रम; नागपूरच्या मवाळ नेत्यांचा त्यास पाठिंबा; लो. टिळकांचें डॉ. मुंजे यांना या संबंधात मार्गदर्शन; संयुक्त परिषदेसाठी स्वागत समितीची संयुक्त सभा; लो. टिळकांचा स्वराज्य संघाचा उपक्रम; ॲनी बेझंट यांची होमरूल लीग; नागपूरची चौथी यशस्वी प्रांतिक परिषद; मुंबईची १९१५-ची राष्ट्रीय सभा; मुंबईकर मवाळांचा हट्टवाद.

प्रकरण १७ वें – राष्ट्रीय सभेत पुन्हा प्रवेश २९९ – ३२३

युद्धकाळातील भारत संरक्षण निर्बंध; पंजाबचें कामागोटामारू प्रकरण; अटक व शिक्षा; पुण्यास टिळकांनी स्वराज्यसंघाचें ध्येय मान्य असणारांची सभा बोलाविली; ॲनी बेझंट यांचा जहाल-मवाळ तडजोडीसाठी प्रयत्न; पुण्याची बैठक; डॉ. मुंजे यांच्या विरोधामुळे चर्चा-सभा मोडली; पुन्हा नव्या वाटाघाटी; टिळकांचा स्वराज्यसंघ; दादासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखाली बेळगावची राजकीय परिषद; स्वराज्यसंघाची बेळगांवची सभा; सर्वत्र शाखा उभारण्याचा आदेश; मवाळही तडजोडीस तयार झाले; सेटलूर व गोखले यांच्यातील चर्चा; 'टिळक काँग्रेसमध्ये आले की त्यांनी काँग्रेस काबीज केलीच समजा.' यवतमाळची जिल्हा परिषद; 'महाराष्ट्र' पत्राकडून जामिनकी; १९१६-चा टिळकांच्या षष्टयब्दीचा अपूर्व समारंभ; सरकारचा त्यास अपशकून करण्याचा प्रयत्न; बेळगांव व नगर येथे केलेल्या भाषणांबद्दल टिळकांवर जामीन देण्याचा खटला; हायकोर्टात दोषमुक्त ठरले; स्वराज्यसंघाच्या चळवळीचा वाढता जोर; मुस्लिम

लीगचें धोरण ; जिनांचें त्या वेळचें राष्ट्रीय धोरण ; काँग्रेस व लीग जवळ आली ; सरकारला राग आला ; कलकत्ता येथे काँग्रेस व लीग नेत्यांची संयुक्त सभा व समेट; १९१६-ची लखनौ काँग्रेस; टिळकांच्या अनुयायांची 'स्पेशल ट्रेन'; मवाळ व जहाल, काँग्रेस व मुस्लिम-लीग या सर्वांची एकजूट व संयुक्त मागणी; स्वराज्याच्या मागणीचा ठराव ; टिळकांचें भाषण, मुसलमानांच्या स्वतंत्र मतदारसंघाला काँग्रेसची मान्यता.

प्रकरण १८ वें – स्वराज्यसंघाचें प्रचारकार्य ३२४ – ३४९

जिनांची 'राष्ट्रीय' विचारसरणी; स्वतंत्र मतदारसंघाला हिंदुमहासभेचा विरोध; डॉ. मुंजे यांचाही विरोधच होता; नागपूरला टिळकांचें स्वागत; स्वराज्यसंघाचा प्रचारदौरा; सरकारी दडपशाही; ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची कलकत्त्याची बैठक; टिळक, डॉ. मुंजे, खापर्डे यांचा दौरा; स्वराज्यसंघाचे १४१२८ सभासद; मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड पेटलंड पेटले ; ॲनी बेझंट यांना अटक; चंपारण्यातील गांधीजींची चळवळ व तिचें यश; भारतमंत्र्यांचा जाहिरनामा; माँटेग्यू हिंदुस्थानात आले; शिष्टमंडळें व चर्चा; ॲनी बेझंट प्रभृतींची सुटका; १९१७-चें कलकत्ता येथील राष्ट्रीय सभेचें अधिवेशन; ॲनी बेझंट यांनाच अध्यक्ष केलें; स्वराज्याची सर्वत्र एकमुखी मागणी; कीर्तनकारांचा प्रचारकार्यासाठी उपयोग करून घेण्याचा डॉ. मुंजे यांचा प्रयत्न ; त्यासाठी कीर्तन संमेलन भरविलें ; निबंध मागविले ; कीर्तनसंमेलनाचे टिळक अध्यक्ष ; टिळकांचे कीर्तनकारांसंबंधाने विचार; मध्यप्रांत वऱ्हाडात स्वराज्यसंघासाठी टिळकांचे दौरे; लाखावर निधि जमा झाला; युद्धसाहाय्यासाठी व्हाईसरॉय यांनी सभा बोलावली ; युद्ध संपताच स्वराज्य देण्याच्या आश्वासनाची मागणी व तरच युद्धकार्यात मदत देण्याची तयारी ; मॅाटेग्यू चेम्सफर्ड रिपोर्ट प्रसिद्ध झाला ; सुधारणा अपुऱ्या व निराशाजनक ; अकोला प्रांतिक परिषद ; स्वराज्याबद्दलचा आग्रह कायम ; टिळक चिरोल केससाठी विलायतेस गेले ; इकडे रौलेट ॲक्टचा धुमाकूळ.

प्रकरण १९ वें – अमृतसरची काँग्रेस ३५० – ३७१

युद्धकाळात सशस्त्र क्रांतिकारकांनी केलेली उठावणी ; त्यावर उपाय म्हणून क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्टचा उपयोग; त्यास देशभर

विरोध; सार्वत्रिक सभा, निदर्शनें व हरताळ ; स्वामी श्रद्धानंदांवर हत्यार रोखलें ; पंजाब, दिल्ली, मुंबई येथील दंगे; दादासाहेब खापर्डे यांनी कौन्सिलचा राजीनामा द्यावा अशाबद्दल सूचना; त्यांचा नकार; टिळकांवर प्रश्न सोपविला ; दडपशाहीची वाढ ; अमृतसरचें हत्याकांड ; सरकारने डायर ओडवायरना पाठीशी घातलें ; टिळक चिरोल खटला हरले ; त्यासाठी तीन लाखांचा निधि लोकांनी उभारला ; 'नागपूर नॅशनल यूनियन' ची स्थापना ; डॉ. हेडगेवार याचें नेतृत्व; अमृतसरची राष्ट्रीय सभा ; गांधी सहकारवादी तर टिळक प्रतियोगी सहकारवादी; 'सुधारणा अपुऱ्या, असमाधानकारक व निराशाजनक' ठराव मान्य झाला ; १९२०-च्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाला नागपूरचें आमंत्रण ; टिळकांना अध्यक्ष करण्याचा हेतु ; डॉ. मुंजे यांची 'संकल्प' या हिंदी पत्राची योजना; अच्युतराव कोल्हटकर प्रकरण; लॉर्ड हंटर यांचा पंजाब अत्याचार प्रकरणी रिपोर्ट; त्याला चिमणलाल सेटलवाड प्रभृतींची भिन्नमतपत्रिका ; गांधी असहकारावर आले ; खिलाफतही बुडाली ; लो. टिळकांचें निधन ; कलकत्ता येथे सप्टेंबर १९२०-मध्ये कॅांग्रेसचें विशेष अधिवेशन; गांधींच्या असहकार योजनेस कॉंग्रेसचा पाठिंबा ; महाराष्ट्र व मध्यप्रांत यांचा कौन्सिल बहिष्कारास विरोध.

प्रकरण २० वें – १९२०-ची नागपूर कॉंग्रेस ३७२ – ३८४

लो. टिळकांच्या निधनामुळे डॉ. मुंजे प्रभृतींवर वज्राघात; कॉंग्रेसच्या अध्यक्षपदी नेता निवडण्यासाठी डॉ. मुंजे यांची खटपट; अरविंद घोषांना पत्र व भेट ; अरविंदांचा नकार ; त्यांचें पत्र ; अधिवेशनाचें कार्य पतकरलें तें पार पाडलें पाहिजे; अध्यक्षपदी विजय राघवाचार्य यांची निवड ; त्यांना असहकाराचें धोरण अमान्य ; तथापि म. गांधींच्या असहकार योजनेस कॉंग्रेसचा पाठिंबा ; खापर्डे आदींचा त्यास विरोध; लो. टिळकांच्या मृत्यूमुळे टिळकपक्षीय स्तंभित झाले ; डॉ. मुंजे यांच्या सार्वजनिक जीवनाचा प्रथम खंड येथे समाप्त.



# धर्मवीर डॉ. बा. शि. मुंजे यांचें चरित्र

## भाग १ ला

### प्रकरण पहिलें

## कुलवृत्तान्त

कै. धर्मवीर डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे हे शुक्ल यजुर्वेदीय माध्यंदिन शाखेचे देशस्थ ब्राह्मण होत. स्वयंभू वेदत्रयीविरुद्ध स्वत:चा स्वतंत्र ध्वज उभारून उच्चार व ध्वनिशास्त्रासहित स्वत:च्या नव्या वेद-संहितेचें प्रवर्तन करणाऱ्या महर्षि याज्ञवल्क्यांच्या शाखेचें हें ऋण कै. डॉ. मुंजे यांनी धर्मशास्त्राच्या वचनांचे स्वतंत्र अर्थ लावून अनेकवार फेडलें आहे.

मुंजे हें उपनांव प्रचारात कसें आलें असेल हें निश्चित सांगणें कठीण आहे. प्रत्येक गोष्टीचें मूळ वेदांत शोधण्याची सवय असलेल्या लोकांच्या मते व्रतबंधविधीच्या वेळी उपयोगात येणाऱ्या मुंज नांवाच्या तृणाच्या दोरीशी या उपनांवाचा संबंध असला पाहिजे. दुसरी एक उपपत्ति अशी आहे की, पूर्वी या कुळात समावर्तन संस्कार न झालेला एखादा मनुष्य मृत्युमुखी पडला असावा व अतृप्त वासनेचा तो जीव मुंजा (पिशाचयोनिविशेष) झाला असावा व जुन्या काळच्या समजुती-प्रमाणे त्या कुळालाच हें नांव मिळालें असावें. तिसरी उपपत्ति अशी आहे की, मुंजे यांचे पूर्वज ज्या मूळ गावी रहात असतील तेथे तत्कालीन समजुतीप्रमाणे मुंजाचें एखादें जागृत स्थान असावें, त्या स्थानाचा मुंजे यांच्या पूर्वजांशी पुजारीपणाचा अथवा वहिवाटीचा संबंध असावा व या संबंधावरून प्रस्तुत घराण्याचें हें नांव पडलें असावें.

या संबंधातला माझा स्वत:चा तर्क मात्र वेगळा आहे. नागपूरकर भोसल्यांच्या राजघराण्याशी या आडनांवाचा संबंध असावा असें मला वाटतें. स्वत:च्या आवडत्या माणसाला थट्टेने हवें तें नांव राजाने द्याव-याचें व वारंवार त्याचा उपयोग करण्यामुळे मूळ आडनांव लोपून हें नवें नांवच आडनांव म्हणून रूढ व्हावे असा प्रकार नागपूरकर भोसल्यांच्या राजवटीत पुष्कळ आडनांवांच्या संबंधात झालेला आहे. आजदेखील हीं अशीं आडनांवें रूढ असल्याचें दिसून येईल. फडणीस, चिटनवीस, खर्डेनवीस, इत्यादि आडनांवें जशीं नागपूरकर भोसल्यांच्या

राजवटीतील राज्यव्यवहाराच्या वेगवेगळ्या क्षेत्रांचीं स्मारकें म्हणून सांगण्यायोग्य आहेत तशींच उधोजी, उळाभाजे, खोलकुटे, वडाभात, माकोडे, गाढवे, मुरकुटे इत्यादि आडनांवें भोसले राजघराण्याच्या नर्मप्रियतेचीं स्मारकें म्हणून सांगता येण्यासारखीं आहेत. या विनोदाला ग्राम्यता व अश्लीलता यांचा वास येतो हें कोणालाही अमान्य करता यावयाचें नाही. उधोजी या नांवात तर अश्लीलता व ग्राम्यता यांचा इतका कळस झाला आहे की, त्या मूळच्या सहा अक्षरी नांवातल्या तीन अक्षरी उत्तरार्धाचा हेतुतः लोप करून केवळ उधोजी हा तीन अक्षरी पूर्वार्धच उर्वरित ठेवणें भाग पडलें आहे. पण नागपूरच्या उघड्या वातावरणातला हा विनोद आहे. भाषाभामिनीच्या ध्वनिविभ्रमाला या वातावरणात विशेष वाव नाही. नागपुरी संस्कृतीचा सारा खेळच उघड्यावरचा. तिथल्या वागणुकीत जसा आडपडदा नाही तसाच भाषेत व विनोदातही नाही. ब्रह्मराक्षस व मुंजे हीं उपनांवेंही भोसले राजघराण्याच्या या सरळसोट व आडदांड विनोदातूनच निघालेलीं असावीत अशी माझी कल्पना आहे. त्याला भक्कम आधारही आहे. तो आधार म्हणजे नागपूरकर भोसले राजघराण्याचे पूर्वज व बाळकृष्णपंत मुंजे यांचे पूर्वज यांचा काही पिढ्यांचा असलेला सेव्यसेवक भावाचा घनिष्ठ संबंध होय.

डॉ. मुंजे यांचे पणजोबा नागपूरकर भोसल्यांचे विख्यात रणशूर सेनानी भास्करराम कोल्हटकर यांच्या सैन्यात होते. इ. सन १७३८-पासून तर १७४४-पर्यंतच्या भास्करराम कोल्हटकरांच्या बंगालवरील स्वाऱ्यांत व त्यानंतर इ. स. १७४५-पासून प्रारंभ झालेल्या पहिल्या रघूजी भोसल्यांच्या स्वाऱ्यांत ज्या वीरवरांनी यवनांकित वंगमाता दास्यमुक्त करण्याच्या पवित्र आकांक्षेने बंगालच्या रणभूमीवर आपल्या नग्न खड्गाचें तिखट पाणी पाजून अलिवर्दीखानाची खोड मोडली त्यांत मुंजे यांच्या पणजोबांनी आपल्या बुभुक्षित खड्गाला यथोचित खाद्य पुरविलेलें होतें. सैनिक वृत्ति व भोसले राजघराण्याचा कडवा अभिमान हे डॉ. मुंजे यांच्या स्वभावातील विशेष कुलक्रमागत होते. या संबंधातून मुंजे या उपनांवाची निर्मिति झाली असावी असा माझा तर्क आहे.

असो. डॉ. मुंजे यांच्या वडिलांचें नांव शिवराम अमृत मुंजे असें होतें. भोसले व मुंजे यांचा सेव्यसेवक भावाचा संबंध शिवरामपंतांच्या दोन पिढ्या आधीपासून आरंभ होऊन त्यांच्या पिढीपर्यंत टिकून होता. शिवरामपंतांचा जन्म इ. स. १८३३-मध्ये झाला. भोसल्यांचें नागपूरचें

राज्य नष्ट होईपर्यंत ते स्वतः नागपूरला भोसल्यांच्या पदरीच होते. त्यांचें सर्व शिक्षण तत्कालीन पद्धतीला अनुसरून उर्दूमध्ये झालें होतें. हिंदवी स्वराज्यात मातृभाषेला मानाचें स्थान मिळवून देण्याचा प्रयत्न राज्याभिषेकानंतर पुण्यश्लोक श्री शिवछत्रपतींनी राज्यव्यवहार कोषाच्या द्वारे प्रारंभ केला. पण शिवछत्रपतीनंतर त्यांच्यासारखा सुपूर्त प्रतिभचा द्रष्टा पुरुष स्वराज्यात उत्पन्न न झाल्यामुळे जसजशी राज्याभिवृद्धि होत गेली तसतसा बादशाही उर्दू भाषेचा मराठी राज्यातील राज्यव्यवहाराच्या विभागावर अधिकाधिक परिणाम होत गेला. त्यामुळें फडणिशी, दप्तरदारी कारकुनी, कुळकर्णीपणा, पटवारीपणा इत्यादि खात्यांत काम करणाऱ्या लोकांना उर्दू शिकणें आवश्यक झालें. जिला ज्ञानेश्वरापासून तर मोरोपंतांपर्यंतच्या कविसम्राटांनी आपल्या प्रतिभेचा साज चढविला, समर्थांच्या चैतन्यमय स्फूर्तीने जिच्या द्वारे राष्ट्रजीवनात कायापालट घडवून आणला, पुण्यश्लोक शिवछत्रपतींच्या प्रतिभेतून जिच्या शुद्धीकरणाची कल्पना अंकुरित झाली, ती मराठी शिकण्याची किंवा स्वतंत्र अभ्यासाची गोष्ट आहे याची मराठी राज्यात कोणाला कल्पनाच शिवू नये इतकें राजकीय कामकाजात उर्दूचें प्रस्थ माजलें होतें. शिवरामपंत मुंजे यांचें शिक्षण पुढील व्यवसायावर दृष्टि ठेवून याचमुळे उर्दूतून झालें. शिवरामपंतांचा जन्म बतूल जिल्ह्यातील मूलताईजवळचा म्हणजेच हिंदी प्रांतातला! त्यांचें सारें बाळपण तेथेच गेलें असल्यामुळे व शिक्षणही उर्दूतून झालें असल्यामुळे कुटुंबात बायकांशी बोलताना वापरण्यापलीकडे त्यांच्या व्यवहारात मराठी भाषेला अधिक महत्त्वाचें स्थान नव्हतें. डॉ. मुंजे आपल्या आठवणीत असें सांगत की, " घरी बायकांशीच काय ते माझे वडील मराठीत बोलत. एरवी आम्हा मुलांशी बोलतानाही ते हिंदी भाषेचाच उपयोग करीत." प्राचीन संस्कृत नाटकांत ज्याप्रमाणे बायका व खालच्या प्रतीच्या लोकांतच काय तें प्राकृत भाषेला स्थान व अन्यत्र संस्कृतला मान असे, त्याचप्रमाणे शिवरामपंतांच्या जीवननाटकात मराठी व हिंदीची अवस्था होती. स्वतः डॉ. मुंजे यांचें बाळपण व शिक्षणही हिंदी प्रांतात झाल्यामुळे घरातल्या या वातावरणाचा परिणाम त्यांच्या स्वतःवरही झाला होता. डॉ. मुंजे यांचीं हिंदी भाषेतून होणारीं भाषणें मराठीपेक्षा तर अधिक प्रभावशाली असतच, पण भाषाशुद्धीच्या दृष्टीनेही तीं त्यांच्या मराठीपेक्षा अधिक शुद्ध व सौष्ठवाच्या दृष्टीने अधिक सरस असत. घरी डॉ. मुंजे हे त्यांचे धाकटे बंधु हरिभाऊ यांच्याशी कधीही मराठीत बोलावयाचे नाहीत. याच्या उलट आपल्या वडील बहिणीशी बोलताना मात्र ते नेहमीच मराठीत बोलत. त्यांचे बंधु हरिभाऊ मुंजे यांच्या धनतोलीवरील बंगल्यात डॉ. मुंजे यांच्यासमवेत जाण्याचा मला अनेकवार प्रसंग आला. दारात पाय

ठेवताच डॉक्टरसाहेब, " क्यों हरि " म्हणून हरिभाऊंशी बोलताना व हरिभाऊही आपल्या खुर्चीवरून त्यांना उत्थापन देत, " आइये तात्या " म्हणून प्रत्युत्तर देताना पाहून कुतूहल वाटल्याविना राहत नसे.

शिवरामपंत मुंजे यांना जनार्दनपंत या नांवाचे धाकटे बंधु होते. नागपूरला शिवरामपंत दुसरे रघूजी अथवा बाजीरावसाहेब भोसले यांच्या चाकरीत होते. ते व त्यांचे बंधु जनार्दनपंत शेवटपर्यंत एकत्रच रहात असत. जनार्दनपंतांना सीताराम, लक्ष्मण, शंकर व माधव अशीं चार मुलें होतीं. त्यांपैकी पहिला मुलगा सीताराम लहानपणीच वारला. उर्वरित तिघांपैकी दोघे नोंदणी कार्यालयात असून तिसरे घरीच शेती पहात.

नागपूरकर भोसल्यांचें राज्य दुसरे रघोजीरावसाहेब अथवा बाजीरावसाहेब भोसले यांच्या अंतानंतर नष्ट झालें. त्यानंतर इ. स. १८६५-मध्ये ब्रिटिशांच्या नव्या राजवटीत शेतीची जी पहिली धारावंदी (Land Settlement) झाली त्यात भंडाऱ्याला त्या विभागात शिवरामपंतांना नोकरी लागली. त्या वेळी ते बत्तीस वर्षांचे होते. काही दिवसांनंतर डेप्युटी कमिशनरचे नाझर म्हणून शिवरामपंतांची नियुक्ति भंडाऱ्याहून बिलासपूरला झाली. पुढे निवृत्तिवेतन घेईपर्यंत ते बिलासपूरला त्याच स्थानावर होते. बिलासपूरला त्यांनी स्वत:चें घर बांधलें. आज बिलासपूरला विख्यात विधिज्ञ व राजकीय नेते कै. त्र्यंबकराव देहनकर यांचा जो वाडा आहे तो डॉ. मुंजे यांच्या घराचेंच रूपांतर होय. इ. स. १९४४-च्या डिसेंबरमध्ये बिलासपूरला डॉ. श्यामाप्रसाद मुकर्जी यांच्या अध्यक्षतेखाली हिंदुमहासभेचें जें अधिवेशन झालें त्या वेळी डॉ. मुंजे यांच्या या वास्तूचें दर्शन घ्यावयास अनेक अखिल भारतीय तोलाचे हिंदु नेते गेले होते. कारण या वास्तूतच डॉक्टरसाहेबांचा जन्म झाला.

बिलासपूरला आल्यावर शिवरामपंतांनी खटपट करून आपले बंधु जनार्दनपंत यांनाही बिलासपूरच्या नोंदणी कार्यालयात नोकरी लावून देऊन आपल्याजवळ स्थिरपद केलें. नोकरीनिमित्त कधी कधी जनार्दनपंतांना बिलासपूर सोडून जांगीरला जाऊन रहावें लागे. इ. स. १८९०-पर्यंत म्हणजे वयाचीं ५५ वर्षे पूर्ण होईपर्यंत शिवरामपंतांची ही नाझरची नोकरी निर्वेधपणे चालू होती. एकदा मात्र ह्या नोकरीत कसला तरी ठपका येऊन त्यांच्यावर एक महिनाभर घरी बसण्याचा प्रसंग आला होता. डॉ. मुंजे हे त्या वेळी ८-९ वर्षांचे असतील. तत्कालीन धार्मिक समजुतीप्रमाणे संकटनिवारणार्थ देवाला संतत धारेचा अभिषेक चालू होता व कसला तरी मंत्रपाठ करावयास्तव एक काशीकर ब्राह्मण बसविला होता असें स्मरत असल्याचें डॉ. मुंजे आपल्या आठवणीत सांगत असत.

सुदृढ शरीरयष्टि, व्यायामाचा नाद, निश्चयीपणा, धैर्य व विशाल-मनस्कता या गोष्टींची देणगी बाळकृष्णपंत मुंजे यांना त्यांच्या वडिलां-पासून मिळाली होती. शिवरामपंत हे पूर्ण ६॥ फूट उंच व धिप्पाड शरीरयष्टीचे होते. व्यायामाचा त्यांना मनापासून नाद असे. १८९०-मध्ये सेवानिवृत होईपर्यंत त्यांचा व्यायाम घड्याळाच्या काटयाप्रमाणे नियमित चालू होता. बंधु जनार्दनपंत यांना तर व्यायामाबरोबरच आखाड्याचाही नाद होता. पुढे एका साधूच्या संगतीने त्यांना गांजा ओढण्याचें व्यसन लागलें. त्या व्यसनाच्या खाईत त्यांनी स्वतःच्या सुदृढ शरीराचा तर बळी दिलाच, पण पुढे वेड लागण्यापर्यंत त्यांची अवस्था गेली. शरीरा-प्रमाणेच मनानेही शिवरामपंत सुदृढ व साहसी असत. आपल्या वडिलांच्या साहसाच्या डॉ. मुंजे यांनी सांगितलेल्या काही गोष्टी माझ्या टिपणात आहेत. त्यांतील दोन येथे देतो. एकदा शिवरामपंतांचे धाकटे बंधु जनार्दनपंत यांची बायको बाळंत होती. बाळंतघराच्या मोरीतून जवळजवळ वीस फूट लांब व एक फूट रुंद असा भला मोठा अजगर तोंड वर काढून आला. तो अर्धाअधिक खोलीत शिरला होता. एकच आरडा-ओरडा झाला. सारी मंडळी धावून आली; पण कुणालाच काय करावें तें सुचेना. तत्कालीन धार्मिक समजुतीप्रमाणे तो अजगर असल्यामुळे त्याला मारता येईना व तो तर अर्धा अधिक आत घुसलेला! शिवरामपंत त्या खोलीच्या बाहेर आले व खोलीच्या मागच्या बाजूला असलेल्या मोरीच्या दुसऱ्या तोंडाशी येऊन त्यांनी भिंतीवर दोन्ही पाय रोखून तो अजगर शेपटाकडून दोन्ही हातांनी धरला व सारें बळ खर्च करून ओढून बाहेर काढला व नंतर त्याला ढकलत ढकलत नदीपर्यंत नेऊन नदीत लोटून दिला.

बिलासपूरला शिवरामपंतांच्या शेजारी दशपुत्र नांवाचे एक गृहस्थ राहत असत. वडील भाऊ बापूजी, मधले बाबाजी व धाकटे अण्णाजी असे ते तिघे बंधु होते. मुंजे व दशपुत्र या दोघांचा अतिशय घरोबा होता. दशपुत्रांच्या घरात मुलें मुळीच नसल्यामुळे शिवरामपंतांची सारीं मुलें त्यांच्याच अंगावर असत. या बंधूंपैकी सर्वांत धाकटे अण्णाजी यांची बायको काही घरगुती भांडणामुळे इतकी वैतागली की, तिने एके दिवशी अफू खाऊन आत्महत्या केली. गोष्ट गावात फुटली व चौकशी-साठी पोलीस आले. मित्राच्या पत्नीच्या प्रेताची दुर्दशा होऊ नये म्हणून शिवरामपंतांनी डेप्युटी कमिशनरची भेट घेतली व प्रेताची चिरफाड होऊ नये अशी विनंती केली. पण साहेबाने दिलेलें उत्तर त्यांना मुळीच समाधानकारक वाटलें नाही. ते रागाने फणफणतच घरी आले. हातात एक जाडजूड सोटा घेऊन "देखता हूं कौन मरीज की इज्जत लेने आता है" असें म्हणत दशपुत्रांच्या दाराशी ते येऊन उभे राहिले. पुढे डेप्युटी

कमिशनरने सामान्य चौकशी करून चिरफाड न करता प्रेत जाऊ दिलें म्हणून प्रसंग निभावला.

शिवरामपंतांच्या काळी हिंदु व मुसलमान समाजांत विशेष तेढ नव्हती. त्यामुळे मुसलमानांनी हिंदूंच्या उत्सव-महोत्सवात भाग घेणें व हिंदूंनी मुसलमानांच्या देवदेवतांना भजून वलीपीर इत्यादिकांविषयी श्रद्धा ठेवणें, त्यांच्या मोहरमात खिचडा व फकिरी देणें हे प्रकार अखंड चालू असत. शिवरामपंतांचे काही मुसलमान मित्रही असत. पण हिंदूंनी मोहरमात भाग घेणें व खिचडा नि फकिरी देणें त्यांना संमत नव्हतें. डॉ. मुंजे यांची आई सर्वसामान्य लोकांप्रमाणे मोहरमच्या सणात मुसलमानांना फकिरी व खिचडा देई. पण पतीच्या विरोधामुळे तिला तो चोरून व त्यांच्या नकळत द्यावा लागे. कधी शिवरामपंतांना हें कळलें की, ते असा काही रुद्रावतार धारण करीत की, कोणाची त्यांच्यापुढे येण्याची प्राज्ञा नसे.

शिवरामपंतांचा सामाजिक आत्माभिमान तीव्र होता. एकदा त्याचें उघड आविष्करणच झालें. गणेशोत्सवात सार्वजनिक रस्त्याने भजनी दिंडी घेऊन जाण्याची प्रथा इतर ठिकाणांप्रमाणेच बिलासपूरलाही होती. मुसलमान तिला कधी अडथळा आणीत नसत. पण सन १८७५-मध्ये सार्वजनिक रस्त्यावर असलेल्या मशिदीवरून भजनी दिंडी न्यावयास मुसलमानांनी अडथळा केला. हिंदूंच्या स्वभावातील बावळटपणामुळे ती लगेच गंभीर समस्या झाली. शिवरामपंतांना या गोष्टीची मनस्वी चीड आली. त्यांनी स्वतः पुढाकार घेऊन आपल्या बळावर मशिदीवरून दिंडी नेली. मुसलमान काय समजावयाचे तें समजले, व पुन्हा बिलासपूरला हा प्रश्न उपस्थित झाला नाही.

शिवरामपंतांच्या जाज्वल्य निष्ठेचे पुढील तीन विषय असत : (१) धर्म व वेदशास्त्रें (२) नागपूरकर भोसले यांचें राजघराणें, व (३) लोकमान्य बाळ गंगाधर टिळक. त्यांच्या धर्म व वेदशास्त्रविषयक जाज्वल्य निष्ठेचें प्रतीक म्हणजे नागपूरच्या भोसला वेदशास्त्र महाविद्यालयाला त्यांनी दिलेली पांच सहस्र रुपयांची देणगी हें होय. त्यांना वेतन अवघें मासिक साठ रुपये होतें. त्या वेळच्या अन्नधान्याच्या परिस्थितीच्या मानाने येवढ्या वेतनातही मध्यम स्थितीतल्या माणसाला सुखासमाधानाने राहता येत असे हें खरें; पण पांच सहस्र रुपये एखाद्या संस्थेला दान म्हणून सहजपणे देऊन टाकण्याची परिस्थिति अशा व्यक्तीची निश्चितच नसते.

नागपूरकर भोसल्यांच्या राजघराण्याविषयीचा शिवरामपंतांचा अभिमान त्यांच्या पूर्वापार संबंधातून उत्पन्न झालेला होता. डॉ. मुंजे सांगत की, "आमचे वडील म्हणावयाचे की, देख रे तात्या, चर्बी कहीं भी मिला ले, लेकिन हड्डी भोसलोंकी है यह कभी भूलना नहीं।" वडिलांचा हा उपदेश डॉ. मुंजे यांच्या भावनेत इतका मुरलेला होता की, देशकालपरिस्थितीच्या विरुद्धही त्याचें उत्कट प्रकटीकरण होई. त्याचीं काही उदाहरणेंच येथे देतो.

(१) नागपूरला कित्येक जुनीं श्रीमंत घराणीं विद्यमान आहेत. या घराण्यांतील लोकांचा श्रीमंत हें उपपद लावून उल्लेख करावयाची प्रथा नागपूरला आहे. त्यांतील कित्येक घराण्यांचा डॉ. मुंजे यांच्याशी घनिष्ठ संबंध असे. पण मुंजे यांनी कधी चुकूनही श्रीमंत हें उपपद या घराण्यांतील व्यक्तींच्या नांवामागे लाविलें नाही. ते एकतर त्यांना साधे श्रीयुत म्हणावयाचे अथवा आवश्यकच वाटल्यास श्रीमान् म्हणावयाचे. मुंजे यांना श्रीमंत हें उपपद वापरावयाचें झाल्यास तें केवळ जुन्या मोडकळीस आलेल्या भोसले राजघराण्यातील व्यक्तीला उद्देशूनच ते वापरीत. मला एकदा हें खटकलें, व मी त्याविषयी त्यांना विचारलें. त्यावर ते उद्गारले, "श्रीमंत एकटे राजेबहादुर रघोजीरावसाहेब भोसले होत. इतर सगळे नुसते श्रीयुत किंवा फार तर श्रीमान्. त्यांना कुणी श्रीमंत म्हणू नये व त्यांनीही तें उपपद स्वतःच्या मागे लावून घेऊ नये. त्यांचा तो अधिकारच नव्हे. श्रीमंत एकतर भोसले किंवा पेशवे. तिसरा कुणी श्रीमंत नाही." (२) भोसले राजघराण्याचें स्मारक म्हणून त्यांनी नाशिकला स्थापन केलेल्या स्वतःच्या सैनिकी शाळेला 'भोसला सैनिकी विद्यालय' हें नांव दिलेलें आहे. वस्तुतः भोसल्यांचें हें स्मारक प्रथम नागपूरलाच व्हावें अशी त्यांची इच्छा होती. पण तो योग नव्हता हें खरें. (३) कित्येक दिवसांपूर्वी नागपुरातील एका सारहीन, उथळ व तत्त्वशून्य दैनिकाच्या वार्तिकात एका पोरसवदा कम्युनिस्टाने कै. राजे-बहादुर रघोजीरावसाहेब भोसले यांच्या व्यक्तित्वावर निम्नस्तरावरून टीका केली. ती वाचताच डॉ. मुंजे अत्यंत विचलित झाले. स्वतःवर हवी तशी गलिच्छ टीका होत असतानाही मेरुमांदाराच्या स्थैर्याने अविचल असणारे डॉक्टरसाहेब भोसले राजघराण्याच्या या अवहेलनेने इतके विचलित झालें की, त्यांनी आपला राग "तेथे पैजाराचें काम, अधमासी व्हावें अधम।" या कठोर शब्दांनी वृत्तपत्रीय वक्तव्यात प्रकट केला. (४) इ. स. १९४७-मध्ये नागपूरच्या कॉंग्रेस मंत्रिमंडळाने रामटेकचें सुप्रसिद्ध श्रीराममंदिर पूर्वास्पृश्यांना मोकळें करून द्यावयाचें

ठरविलें. राजेबहादुर रघोजीरावसाहेब भोसले हे त्या मंदिराचे धनी. त्यांच्या धार्मिक श्रद्धा जुन्या पद्धतीच्या व अत्यंत जाज्वल्य होत्या. त्यांनी डॉ. मुंजे यांना आपल्या वाड्यात बोलावून या संकटातून वाचविण्याची अभ्यर्थना केली. वस्तुतः डॉ. मुंजे हे अस्पृश्यता निवारणाचे उघड पुरस्कर्ते व त्या दृष्टीने आजन्म प्रयत्नशील असलेले असे होते. पण वृद्ध राजेबहादुरांच्या शब्दासाठी त्यांनी राजेबहादुर असेपर्यंत रामटेकचें राममंदिर व तेथील रूढी तशाच असाव्या अशी खटपट सुरू केली. पुढे राजेबहादुरांची समजूत पटून प्रश्न समाधानकारकपणे सुटला ही गोष्ट वेगळी. (५) स. १९४७-च्या मध्यात वऱ्हाड प्रांतावर हैद्राबादच्या निजामाचें आधिपत्य असावें कीं नसावें या प्रश्नाची चर्चा ऐकू येत होती. निझामाने इंग्रजांकडे युद्धातील साह्याची परतफेड म्हणून वऱ्हाडची मागणी केल्याच्या अफवा सर्वत्र पसरल्या होत्या. ब्रिटिश भारतातील सत्ता सोडून जात असल्यामुळे पूर्वी देवगावच्या संधिपत्रात त्यांनी निजामाला दिलेल्या व राज्यकारभाराच्या सोयीसाठी तात्पुरत्या स्वतःकडे घेतलेल्या वऱ्हाडचें स्वामित्व पुनश्च निजामाकडे देण्याचा संभव आहे असें सर्वत्र बोललें जात होतें. त्या वेळी काही रिकामटेकड्या लोकांनी नागपूरचे वृद्ध राजेबहादूर रघोजीरावसाहेब भोसले यांच्या मनात असें भरवून दिलें की, वऱ्हाडवर भोसल्यांचा जुना राजेपणाचा अधिकार असून इंग्रज हिंदुस्थान सोडून जाण्याच्या सत्तांतराच्या काळी निजामाप्रमाणे भोसल्यांनी जर वऱ्हाडवर आपलें स्वत्व दाखविलें तर वऱ्हाडचें राज्य भोसल्यांना मिळण्याचा संभव आहे. राजेसाहेबांचे इच्छेनुसार त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव फत्तेसिंगरावसाहेब भोसले एका प्रतिष्ठित नागरिकाला बरोबर घेऊन डॉक्टरांच्याकडे आले व त्यांनी डॉक्टरांना राजेसाहेबांचा मनोदय कळवून त्या दृष्टीने खटपट करण्याची विनंती केली. वस्तुतः हा साराच प्रकार तथ्यहीन होता. वऱ्हाड इंग्रजांनी भोसल्यांकडून युद्धात जिंकून घेतलेला प्रदेश होता, व तो मैत्रीची भेट म्हणून त्यांनी निजामाला दिला होता. अर्थातच जित भोसल्यांचा त्यावर काहीही अधिकार नव्हता. डॉक्टरसाहेबांसारखा विचक्षण पुरुष ही गोष्ट जाणत होता व कै. डॉ. श्रीधर व्यंकटेश पुणतांबेकर यांच्यासारख्या घटनापंडितानेही त्यांना तसेंच सांगितलें. पण राजे भोसले यांना वाईट वाटू नये म्हणून त्यांच्यासाठी त्यांनी तज्ज्ञांची एक बैठक बोलावून त्यांचें समाधान करावयाचा प्रयत्न केलाच. भोसल्यांच्याविषयीचा त्यांच्या अंतःकरणाचा हा कोमलपणा त्यांच्या वडिलांच्या एतद्विषयक निष्ठेचा परिपाक होय.



डॉ. मुंजे यांचे वडील शिवराम अमृत मुंजे

शिवरामपंत मुंजे यांच्या जाज्वल्य अभिमानाचा तिसरा विषय म्हणजे लो. बाळ गंगाधर टिळक हे होत. डॉक्टरसाहेबांनी, त्यांची चरित्रविषयक टिपणें मी त्यांच्याजवळून घेत असता, यासंबंधी पुढील-प्रमाणे गोष्ट सांगितली. लो. टिळकांचें गीतारहस्य प्रसिद्ध झाल्यावर महाराष्ट्रभर टिळक कीं शंकराचार्य या वादाची जी रणधुमाळी माजली ती सर्वांच्या आठवणीत आहेच. त्या कालखंडात एकदा वाईचे विख्यात धर्ममार्तंड काशीनाथशास्त्री लेले यांचें नागपूरला आगमन झालें. येथील स्थानिक मंडळींनी त्यांचें नागपूरच्या नगरभवनात गीतारहस्यावर व्याख्यान ठेवलें. लेले शास्त्री यांनी गीतारहस्य प्रकरणात धरसोडीचें वर्तन केलें असल्यामुळे त्यांची त्यासंबंधात फारशी प्रतिष्ठा राहिलेली नव्हती. ते टिळकांना आपला गुरु मानीत. टिळकांनी प्रथम त्यांना ज्या वेळी गीतारहस्य दाखविलें त्या वेळी या धर्ममार्तंडानी निःपक्षपाती-पणाने त्याची अतिशय प्रशंसा केली. पण त्यानंतर आचार्यभक्तांनी त्यावर केलेला टीकास्त्रांचा मारा पाहून शास्त्रीबोवा गडबडले व त्यांचें लवकरच मतपरिवर्तन होऊन ते गीतारहस्याविरुद्ध व्याख्यानें देत फिरू लागले. शास्त्रीमहाशयांच्या भाषाभामिनीला मर्यादेचा सासुरवास कधी सहन होत नसे. रहस्यसिद्धान्तापेक्षा रहस्यकारांवर ते अकारण आघात करीत. नागपूरच्या त्यांच्या उपर्युक्त व्याख्यानातही हाच अप्रस्तुत प्रकार झाला. शिवरामपंत या व्याख्यानाला गेले होते. ते जे घरी आले ते रागावलेलेच होते. डॉक्टरसाहेबांना पाहताच ते त्यांना म्हणाले, "क्यों जी तात्या, तुम व्याख्यानको नहीं आये?" डॉक्टरसाहेब त्यांना म्हणाले, "नहीं बाबाजी, मैं दूसरे काममें था। नहीं आ सका।" त्यावर थोडा वेळ थांबून किंचित् उद्वेगाने ते डॉक्टरांना म्हणाले, "तुम अंग्रेजी पढने लिखनेवाले आदमी कैसे हो जी? कोई भी आकर तिलक महा-राजको चाहे जो गालियाँ देते हैं ओर तुम चुपचाप सुन लेते हो। मुझे तो व्याख्यान सुनकर ऐसा गुस्सा आया कि मुंहमें दोचार तमाचे कसकर मार दे।"

शिवरामपंतांची शरीरयष्टि शेवटपर्यंत पोलादाच्या कांबीसारखी सुदृढ होती. आजारपण असें त्यांना सामान्यतः आलें नाही. इ.स. १९१२-मध्ये मात्र रस्त्याने जाताना टांग्याचा घोडा उधळून त्यांना बराच मार लागला व पुष्कळ दिवस अंथरुणावर पडून रहावें लागलें. नोकरीत असताना व नंतरही बिलासपूरच्या सार्वजनिक जीवनात त्यांना सन्मानाचें स्थान असे. इ.स. १९१९-मध्ये वयाच्या ८६-व्या वर्षी, त्यांचे पूज्य पुढारी लो. टिळक यांच्या पूर्वी एकच वर्ष ते स्वर्गवासी झाले. ते वारले त्या वेळी डॉक्टर बाळकृष्णपंत व न्यायमूर्ति हरिभाऊ ही

त्यांचीं दोन्ही विख्यात मुलें त्यांच्याजवळ नव्हतीं. काही शेतीच्या कामानिमित्त ते बालाघाटजवळच्या आठनेर नांवाच्या खेड्यावर गेले होते, व तेथेच चारपांच दिवस आजारी पडून वारले. आजाराऐवजी त्यांच्या केवळ मृत्यूचीच वार्ता अकस्मात् त्यांच्या मुलांना कळली.

डॉ. मुंजे यांच्या आईचें नांव राधाबाई असें होतें. त्याही शरीराने सुदृढ असत. साधी पुस्तकाची पिशवी फार वेळ हातात धरावी लागली तर चेहरा मलूल करणाऱ्या आजच्या नाजूक मुलींना त्यांच्या सुदृढतेचें व सामर्थ्याचें वर्णन सांगितलें तर आश्चर्यच वाटेल. डॉक्टरसाहेब असें सांगत की, बिलासपूरला त्यांच्या घरामागेच असलेल्या नदीवर त्यांची आई पाणी आणायला जाई. म्हणजे येताना डोक्यावर एक मोठा गुंड, त्यावर एक लहान गुंड व कमरेच्या दोन्ही भागांवर एकएक गुंड, व खांद्यावर धुण्याचे पिळे असें घेऊन नदीचा संबंध घाट चढून ती येत असे. जुन्या काळच्या सुदृढ स्त्रियांच्या या नेहमीच्याच पद्धति होत्या. सामान्यतः मागच्या पिढीच्या कुटुंबांतून धुणें, पाणी, दळणकांडण इत्यादि गोष्टी घरच्या स्त्रियाच करीत. लग्नासारख्या मोठ्या समारंभातच स्वयंपाकाचा विभाग आचाऱ्याच्या स्वाधीन व्हावयाचा. एरवी सर्वसामान्य समारंभासाठी आचारी व पाणके कोणी पाहिले नाहीत. घरी कामाला बाई ठेवणें व पाणकी असणें हें वाया चाललेल्या श्रीमंतीचें लक्षण मानीत. या कामामुळे त्या स्त्रियांची प्रकृति कधी बिघडल्याचें कुणी पाहिलें वा ऐकलें नाही. उलट हा व्यायाम व कसदार अन्न यामुळे त्यांची प्रकृति उत्कृष्ट असे.

मुंजे यांचे वडील तर धार्मिक आचारविचारांचे होतेच, पण आईचें सोवळें अत्यंत कडक असे. डॉक्टरसाहेब त्यांच्या विद्यार्थिदशेत नागपूरला शिकत असताना आई त्यांच्याजवळ होती. आईने त्यांच्याविना दुसऱ्या कुणाच्याही हातचें पाणी घेऊ नये. पण आजन्म मांसाहाराचें समर्थन करणाऱ्या डॉक्टरांना आईला पाणी देण्यासाठी जी तपश्चर्या करावी लागे ती विलक्षण कडक होती. विहिरीवरून थंड पाण्याने स्नान करून ओलेत्याने कुणालाही न शिवता डॉक्टरांनी आईसमोर येऊन उभें रहावें व तिने आधल्या दिवशी सोवळ्याने भरून ठेवलेला थंड पाण्याचा घडा त्यांच्या मस्तकावर रिता करून त्यांना प्रथम सोवळें करून घ्यावें व नंतरच आपल्या सोवळ्यात त्यांना वावरू द्यावें. सन १८५७-च्या स्वातंत्र्ययुद्धाच्या धामधुमीत या बाईंना आपल्या लहान वयात, सेनापति तात्या टोपे गावावर स्वारी करणार असल्याची वार्ता पसरल्यामुळे पळून

जाण्याचा प्रसंग आला होता. या बाईचें माहेरचें आडनांव केकदपुरे असें होतें. त्यांचा देहान्त सन १८९५-मध्ये झाला.

शिवरामपंत व राधाबाई या दांपत्याला संतति पुष्कळ झाली तरी त्यांतून केवळ तीन अपत्येंच वाचलीं. या तीन अपत्यांपैकी सर्वांत वडील मुलगी असून त्यांचें नांव दादीबाई असें होतें. रायपूरच्या सुप्रसिद्ध लाखे घराण्यात त्या दिलेल्या होत्या. आपले चरित्रनायक डॉ. बाळकृष्णपंत मुंजे हे मधले चिरंजीव होत. हरिभाऊ हे सर्वांत धाकटे.

डॉ. मुंजे यांचा जन्म बिलासपूर येथे दि. १२ डिसेंबर १८७२-मध्ये झाला. त्या वेळी संवत् १९३० व शालिवाहन शक १७९५ असून तिथि मार्गशीर्ष वद्य अष्टमी, वार शुक्रवार होता. जन्म मध्यरात्री व जन्मतिथि वद्य अष्टमी, असल्यामुळे या मुलाचें नांव बाळकृष्ण असें ठेवण्यात आलें. डॉ. मुंजे यांची जन्मकुंडली पुढीलप्रमाणे आहे.

### जन्मकुंडली



प्रकरण दुसरें

# बालपण व शिक्षण

(कै. डॉ. मुंजे यांच्या अप्रकाशित आत्मवृत्ताच्या आधारे)

सामान्य मध्यम स्थितीतल्या सुखी कुटुंबातील मुलें ज्या पद्धतीने वाढतात त्या पद्धतीने शिवरामपंत मुंजे यांच्या कुटुंबांतील हीं तीनही मुलें वाढू लागलीं. डॉ. मुंजे यांचें माध्यमिक शाळेपर्यंतचें शिक्षण बिलासपूर येथे झालें व पुढचें विद्यालयीन शिक्षण रायपूरला झालें. वडिलांच्या आदर्शामुळे व्यायामाची आवड त्यांना लहानपणापासूनच लागली होती. त्या काळी आखाड्यात जाऊन लाल मातीने अंग भरवून येणें अशिष्टतेचें मानलें जाई. त्यामुळे घरी जोरबैठका कराव्या व शेजारच्या नदीच्या वाळवंटात बरोबरीच्या सोबत्यांबरोबर कुस्ती व दंगामस्ती करावी अशा पद्धतीने बाळकृष्णपंतांनी आखाड्याची उणीव भरून काढली. निर्भयता आग्रहीपणा, करारीपणा, क्रोधीपणा हीं त्यांचीं स्वभाववैशिष्ट्यें होतीं. पुढे प्रौढपणी त्यांच्या अस्मितेचे पंख साऱ्या हिंदु जातीवर पखरण घालण्याइतके विशाल झाल्यामुळे हीं वैशिष्ट्यें व्यक्तिजीवनातून लुप्त होऊन सामाजिक जीवनात केवळ सामाजिक समस्यांसंबंधातच प्रकट होत. त्यांच्या स्वभाववैशिष्ट्याचीं काही उदाहरणें येथे देतो.

(१) बाळकृष्णपंत आठ वर्षांचे असतानाची ही गोष्ट. ते एकदा एकटेच आपल्या घरी वरच्या मजल्यावर आपल्याशीच खेळत बसले होते. त्या वेळी त्यांचा एक वर्गबंधु तेथे आला व त्यांच्याबरोबर खेळू लागला. हा मुलगा त्यांच्यापेक्षा वयाने मोठा असून त्यांच्या साऱ्या सोबत्यांत मोठा गुंड म्हणून प्रसिद्ध असे. मुलें त्याला भीत. आपल्या स्वभावानुसार तो मुलगा बुद्ध्या भांडण उकरू लागला. बाळकृष्णपंत त्याच्याइतके शक्तिमान् तर नव्हतेच, पण त्या दिवशी त्यांच्या हाताच्या एका बोटाला फोड झाला असल्यामुळे ते एक प्रकारे अधूही होते. पण तो भांडावयास लागताच अनपेक्षितपणे बाळकृष्णपंतांनी त्या मुलाच्या तोंडावर एकदम ठोसे द्यावयास व त्याला दोन्ही हातांनी ओरबाडावयास प्रारंभ केला. फोड फुटून हात रक्ताने भरला तरी ते त्याला सोडीनात. या प्रकाराने तो इतका घाबरला की काय करावें हें न सुचून तो आपल्या घरी गेला. आक्रमण हाच प्रतिकाराचा खरा उपाय होय हें आपल्या भाषणातून सांगताना डॉक्टरसाहेब पुष्कळदा ही लहानपणची गोष्ट सांगत व पुढील दोहा म्हणत :

ग्यानी गणिती पंडित हारे।
सो जीते जो आगे मारे॥

(२) बिलासपूरच्या नदीचें नांव आप्रा. या नदीच्या काठावरच मुंजे यांचें घर वसलेलें होतें. नदी इतक्या जवळ असल्यामुळे थंड पाण्याने स्नान करणें, पाण्यात बराच वेळ डुंबत राहणें व हवा तितका वेळ पोहणें या सवयी त्यांना लागल्या. नदीच्या वाळवंटात आपल्या संवगड्यां-बरोबर खेळत असताना लहानग्या बाळकृष्णाने धावत जाऊन एकदम घोड्याच्या पाठीवर झेप घेऊन चढून बसावें व त्याच्या आयाळाला हात घालून त्याला पिटाळावें. या खेळात कधी बाळकृष्ण यशस्वी होई तर कधी घोडा त्यांना खाली पाडून व घायाळ करून आपला सूड साधून घेई. आपल्या वर्गात अभ्यासात ते नेहमीच पहिले असत व मिडल स्कूलची परीक्षा ते उत्तीर्ण झाले त्या वेळी साऱ्या शाळेतून ते पहिले आले. हा बुद्धिमान् मुलगा मुख्याध्यापकांच्या प्रेमाचा विषय होता. त्याचा हूड-पणा जावा म्हणून मुख्याध्यापकांनी विविध उपाय केले. छडीचे प्रयोगही केले. पण अभ्यासाकरिता जसा बाळकृष्णाने शिक्षकाकडून ठपका कधीच घेतला नाही त्याचप्रमाणें पोहणें, झाडावर चढणें, घोड्यावर चढणें, कुस्ती करणें व मारामारीत आघाडीवर असणें, या गोष्टीत शिक्षकांच्या छड्या खाऊनही ते कधी मागे हटले नाहीत. डॉक्टरसाहेबांचें घोड्यावरील बालपणापासूनचें प्रेम शेवटपर्यंत तसेंच होतें. कुणीही तरुण मनुष्य त्यांना भेटावयास गेला तर ते "घोडेपर बैठो और बंदूक चलाव" असाच त्याला संदेश देत. नाशिकला त्यांच्या भोसला सैनिकी विद्यालयात त्यांचा निवास असताना शाळेतील मुलें घोड्यावरून रपेट करून येत असलेलीं डोळे भरून पाहणें हा त्यांचा आवडीचा छंद होता. वयाच्या ७६-व्या वर्षी प्रतिदिनी सकाळ संध्याकाळ ते नाशिकला नियमितपणे घोड्यावरून रपेट करीत. मध्यंतरी घोड्यावरून पडून बरगड्या तुटून ते अतिशय आजारी झाले. तरी बरे होताच त्यांचा हा नाद पूर्वीप्रमाणेंच सुरू झाला.

(३) लहानपणी डॉक्टरसाहेब अतिशय तापट असत. त्यापायी एकदा एक विचित्र प्रसंग उद्‌भवला होता. त्यांचा एक मुसलमान सहाध्यायी असे. त्या मुलाला त्या लहान वयात विड्या ओढण्याची घाणेरडी सवय होती. त्या वेळी आजच्यासारखी आयत्या विड्या मिळण्याची सोय नसे. लोक झाडाचीं पानें तोडून व आत तंबाखू घालून त्याच्या विड्या वळीत व त्या ओढीत. मुंजे यांनी या तऱ्हेच्या विड्या त्या मुलाजवळ पाहिल्या. तो त्या विड्या व काड्यांची पेटी आपल्या केसांत लपवून ठेवी व वरून टोपी घाली. मुंजे यांना त्याचा इतका

संताप आला की, त्यांनी होऊन त्या मुलाशी भांडण उकरून काढलें व थांब तुला जाळूनच टाकतो असें म्हणून त्यांनी आगपेटीची काडी ओढून ती त्या मुलाच्या केसांना लावली. केस जळू लागताच तो मुलगा तर प्राणभयाने ओरडून आकाशपाताळ एक करू लागलाच; पण मुंजे यांचीही भीतीने बोबडी वळली. तरी त्या लहान वयात प्रसंगावधान राखून त्यांनी त्याचे केस हाताने चोळून विझविले. दोघांनीही ती गोष्ट तेथेच दाबून टाकली. कारण केलेल्या अतिप्रसंगाबद्दल मुंजे यांना जसें घरून व शाळेतून शिक्षकांकडून शिक्षा होण्याचें भय होतें तसेंच त्या मुलालाही विडी ओढण्याची गोष्ट बाहेर फुटल्यास घरून व शाळेतून शिक्षा होण्याचें भय होतेंच.

(४) एकदा संध्याकाळी खेळून दमल्यावर बाळकृष्णपंत मित्रांच्या टोळक्यासह आम्रा नदीच्या वाळवंटात गप्पा मारीत बसले असता एका मुलाला नदीच्या पलीकडच्या तीरावर चित्रविचित्र रंगाचा जाळासारखा हलता प्रकाश दिसला. काही मुलें म्हणू लागलीं की तें पिशाच्च आहे, तर काही मुलें म्हणू लागलीं की तो जाळ आहे. मुंजे पिशाच्चवादी पक्षाच्या विरुद्ध होते. पण पिशाच्चवादी मुलांनी असें आव्हान दिलें की तें पिशाच्च नाही असें ज्यांचें मत आहे त्यांनी तेथे जाऊन तें काय आहे तें पाहून यावें. त्याला मात्र कोणीही सिद्ध होईना. पूर्वी मुंजे यांच्या पक्षात असलेलीं मुलेंही तेथे जावें लागण्याच्या भयाने पिशाच्चवादी पक्षात समाविष्ट होऊ लागलीं. पण मुंजे स्वतःच तेथे जावयास निघाले. त्यासरशी सर्व मुलांनी घाबरून त्यांना परतविण्याचे पुष्कळ प्रयत्न केले; पण कोणाचेंच न ऐकता त्यांनी धूम ठोकली. गुडघाभर नदीच्या पाण्यातून तेथे गेल्यावर त्यांना असें आढळून आलें की, चमकणाऱ्या वाळूवर सूर्याचे सायंकालीन किरण पडल्यामुळे ती चित्रविचित्रपणे चमकत होती. थोडीशी वाळू बरोबर आणून त्यांनी पिशाच्चवादी मुलांचीं तोंडें बंद केलीं.

(५) डॉक्टरसाहेबांचे चुलते जनार्दनपंत यांना लहानपणापासून आखाड्याचा नाद असे. याचा निर्देश मागच्या प्रकरणात केलाच आहे. त्यांच्या घरापासून जवळच असलेल्या मुसलमान वस्तीत एक आखाडा होता. व्यायामाचे नादी असलेले हिंदु व मुसलमान तरुण त्या आखाड्यात जात असत. त्या मुसलमान आखाड्याचा मुसलमान वस्ताद लहानग्या डॉक्टरसाहेबांवर प्रेम करी. तरी पण वडिलांना मुसलमानांच्या आखाड्यात जाणें संमत नसल्यामुळे ते तेथे जात नसत. लहानग्या बाळकृष्णाला प्रतिदिनी शाळेत जाताना रस्त्यावरच्या त्या

मुसलमान आखाड्यावरून जावें लागे. आखाड्यातील मुसलमान मुलें बाहेर येऊन बाळकृष्णाची थट्टा करीत व म्हणत "चले बेटे बम्मनके लडके पाटी-पेन्सिल लेकर स्कूलको । अबे :

खेलोगे कुदोगे बनोगे नबाब ।
पढोगे लिखोगे होवोगे खराब ।।

त्यांचें तें प्रतिदिनीचें चिडविणें बाळकृष्णाला झोंबलें व त्याने आपल्या सोबत्यांसह चोरून एक लहानसा आखाडा काढला. या आखाड्यात महादेव या नांवाचा एक न्हाव्याचा मुलगा होता. एकदा नागपंचमीला थोडे दिवस असताना लाल मातीची रग अंगात असल्यामुळे तो म्हणाला, "हीं बामणांचीं मुलं लोण्याच्या गोळ्यासारखीं लिबलिबीत असतात. मी त्यांना सहज लोळवीन." तो मुलगा बाळकृष्णापेक्षा वयाने मोठा व शक्तीनेही अधिक होता. तरी बाळकृष्णाने त्याला सांगितलें की, "मी तुझ्याशी येत्या नागपंचमीला लढत घेऊन साऱ्यांदेखत तुझी पाठ जमिनीला लावतो. बामणाचीं मुलं लोण्यासारखीं असतात कीं लोखंडासारखीं हें तुला कळेल." त्यावर तो मुलगा म्हणाला की, वडिलांना सांगायचें नाही, या अटीवर हें मला मान्य आहे. बाळकृष्णाने ती गोष्ट मान्य केली. ठरल्याप्रमाणे नागपंचमीच्या दिवशी आम्रा नदीच्या वाळवंटात साऱ्या मित्रमंडळींसमोर ही कुस्ती झाली व शक्तीने तो मुलगा अधिक होता तरी, आपल्या चुलत्याजवळून काही खास डाव शिकलेल्या मुंज्यांनी त्याला चीत केलें. त्या क्षणापासून तो बाळकृष्णाचा जिवलग मित्र बनला. पुढे मोठेपणी अखिल भारतीय कीर्तीचे नेते म्हणून डॉक्टरसाहेब आपल्या संचारात कधी बिलासपूरला गेले तर त्याला आपल्या निवासस्थानी बोलावून घेत व ही जुनी आठवण काढून ते दोघेही मित्र पोट धरून हसत. डॉक्टरांची ही व्यायामाची आवड आयुष्याच्या संध्याकाळपर्यंत तशीच होती. पुढे आगगाडीचा डबा हेंच घर इतका प्रवासाचा व्याप मागे लागल्यावरही त्यांचा नियमित व्यायाम कधीच सुटला नाही.

सन १९२९-मध्ये एकदा सिमल्याहून परतत असता वाटेत ते काल्का स्टेशनवर वेटिंग रूममध्ये थांबले; व त्यांची वेळ होताच त्यांनी तेथेच जोर काढावयास प्रारंभ केला. त्यांच्या समवेतचे इंग्रज उतारू आश्चर्याने त्यांच्याकडे पहातच राहिले. व्यायामाचा अल्पस्वल्पसुद्धा संस्कार ज्या शरीरावर नाही त्याचा त्यांना मनापासून तिटकारा वाटे, व कोणाला कितीही अप्रासंगिक अथवा अपमानास्पद वाटलें तरी तो तिटकारा व्यक्त करण्याचे प्रसंग ते कधी वाया जाऊ देत नसत. एकदा

नागपूर येथील राजाराम वाचनालयाच्या सुवर्ण महोत्सवाच्या प्रसंगी कै. न. चिं. केळकर हे नागपूरला आले असता नागरिकांच्या वतीने डॉ. मुंजे यांच्या अध्यक्षतेखाली त्यांचें स्वागत झालें. त्या प्रसंगी केळकरांच्या बहुविध विशेषांचें वर्णन करताना डॉ. मुंजे यांनी त्यांच्या व्यायामाचे संस्कार न झालेल्या शरीरयष्टीचें असें काही अप्रासंगिक वर्णन केलें की, केळकर कावरेबावरे झाले. वस्तुतः डॉ. मुंजे केळकरांना वडील बंधूसारखा मान देत. पण केळकरांविषयीचा आदर व प्रसंगाचें औचित्य या दोन्ही गोष्टी डॉक्टरसाहेबांच्या व्यायाम प्रेमासमोर इतक्या थिटचा पडल्या की, शेवटी केळकरांना आपल्या भाषणाच्या प्रारंभी व्यायाम न घेताही आपलें आरोग्य न बिघडता चांगलें राहिल्याचा निर्वाळा द्यावा लागला.

असो. मुंजे यांचें प्राथमिक व माध्यमिक शिक्षण बिलासपूर येथेच झालें. सन १८८८-मध्ये ते माध्यमिक शाळेची परीक्षा उत्तीर्ण झाले. साऱ्या बिलासपूर जिल्ह्यात या परीक्षेत त्यांचा क्रमांक पहिला आल्यामुळे पुढील शिक्षणासाठी त्यांना बारा रुपये प्रतिमास छात्रवृत्ति मिळू लागली. बिलासपूरला यापुढील विद्यालयीन शिक्षणाची सोय नव्हती. नागपूर विश्वविद्यालय त्या वेळी अस्तित्वात आलेलें नव्हतें, मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेचा विद्यालयीन शिक्षणक्रम कलकत्ता विश्वविद्यालयाला जोडलेला होता व त्या शिक्षणाची व्यवस्था रायपूरला सरकारी हायस्कूलमध्ये होती. बिलासपूरच्या विद्यार्थ्यांना पुढील शिक्षणासाठी रायपूरला जाऊन रहावें लागे. मुंजे यांच्यावरही तीच पाळी आली. या विभागात त्या वेळी आगगाडी सुरू झाली नव्हती. घोडे व बैलगाडी हींच वाहतुकीचीं व प्रवासाचीं साधनें होतीं. मुंजे यांना त्यांच्या वडिलांनी बैलगाडीतूनच बिलासपूरहून रायपूरला पाठविलें. बिलासपूर व रायपूर यांमधील अंतर बैलगाडीच्या प्रवासाच्या मानाने साठ मैल म्हणजे काही थोडेथोडकें नव्हतें. तीनचार दिवस हा प्रवास करावा लागे. भोवताली झाडी असल्यामुळे एकटचा दुकटचा प्रवाशाला अथवा बैलगाडीला वाटमाऱ्यांचा चांगलाच उपद्रव होई. त्यामुळे सोबतीची आवश्यकता असे. मुंजे यांना बिलासपूरहून बैलगाडीने रायपूरला यावयास तीन दिवस लागले. सोबतीला तीनचार बैलगाडचा होत्या. रायपूरला येताच त्यांनी शाळेत नांव नोंदविलें. यथाक्रम त्यांचें पुढील शिक्षण प्रारंभ झालें. विद्यालयात मुंजे यांचा चित्रकलेचा एक मद्रासी शिक्षक असे. तो धर्माने ख्रिश्चन होता. रंगाने तो तेलात खललेल्या कोळशासारखा तुकतुकीत काळचा रंगाचा होता. मुंजे यांना या शिक्षकामुळे चित्रकलेची अतिशय गोडी लागली व त्यांच्या त्या



डॉ. बा. शि. मुंजे



पत्नी सौ. कृष्णाबाई

विषयातील प्रावीण्यामुळे शिक्षकसुद्धा त्यांच्यावर प्रसन्न असे. मिस्टर अँथनी मॅक्डोनल्ड हे त्या वेळी त्या विभागाचे चीफकमिशनर होते. हेच गृहस्थ पुढे बंगालचे गव्हर्नर होऊन सर अँथनी मॅक्डोनल्ड म्हणून प्रसिद्धीस आले. एकदा हे चीफ कमिशनर मॅक्डोनल्ड रायपूरच्या सरकारी हायस्कूलला भेट द्यावयास आले. त्या वेळी त्या ख्रिश्चन शिक्षकाने मुलांच्या चित्रकलेच्या वह्या बुद्धया त्यांना दाखविल्या. त्यांत मुंजे यांचीही वही होती. ती वही पाहून मॅक्डोनल्ड यांनी त्या मुलाला बोलवावयास सांगितलें. बाळकृष्ण येऊन उभा राहताच त्या वहीतील एक चांगलें चित्र त्याच्यासमोर धरून त्यांनी विचारलें, "हें चित्र कुणी काढलें ?" बाळ-कृष्णाने नम्रपणे उत्तर दिलें, "महाराज, तें मीच काढलें आहे." साहेबाचा त्यावर विश्वास बसला नाही. त्यांनी रंगाची पेटी देऊन त्याला तें चित्र पुन्हा काढावयास सांगितलें. तों तें पूर्वीच्या चित्राहून अधिक सरस निघालें. मॅक्डोनल्ड यांनी बाळकृष्णाची मोठी प्रशंसा करून त्याला स्वतःचें असें विशेष पारितोषिक दिलें. डॉक्टरसाहेबांच्या चित्रकलेचे काही नमुने त्यांच्या ज्येष्ठ भगिनी दादीबाई लाखे यांच्याजवळ शेवट-पर्यंत असत व ते दाखवून त्या त्यांचें अतिशय रसाळपणे वर्णन करीत. डॉक्टरांचें इंग्रजी व मराठी हस्ताक्षर अत्यंत वळणदार असे.

सन १८९०-मध्ये वयाच्या १८-व्या वर्षी डॉ. मुंजे मॅट्रिकला बसले. पण 'दैवं चैवात्र पंचमम्' च्या प्रभावाने त्यांना अपयश आलें. परीक्षेसंबं-धात त्यांना लाभलेलें हें पहिलें व शेवटलेंच अपयश होय पुढच्या वर्षी म्हणजे सन १८९१-मध्ये ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले.

डॉक्टरांच्या आयुष्यातील या वर्षीची महत्त्वाची घटना म्हणजे त्यांचा विवाह होय. नागपूर येथील सुप्रसिद्ध पारधी घराण्यातील मुलीशी त्यांचा विवाह झाला. पुढे आजन्म लंडनमध्ये प्रॅक्टिस करीत असलेले व बादशहा पंचम जॉर्जच्या खास चिकित्सक मंडळीत बहुमानाचें स्थान मिळालेले विख्यात डॉ. कृष्णराव पारधी यांची धाकटी बहीण म्हणजे डॉक्टरांची पत्नी होय. त्या वेळेच्या मानाने डॉक्टरांचें लग्न उशिराच झालें असें म्हटलें पाहिजे. डॉक्टरांच्या पत्नीचें लग्नानंतरचें नांव कृष्णाबाई असें होतें. विवाहानंतर पुढील शिक्षणासाठी आपली आई व धाकटे बंधु हरिभाऊ यांना घेऊन बाळकृष्णपंत नागपूरला आले. त्या वेळी रायपूर ते ते राजनांदगांव आगगाडी नव्हती. त्यामुळे त्यांना तो प्रवास बैलगाडीतून करावा लागला. राजनांदगांव ते नागपूर मात्र ते आगगाडीतून आले. नागपूरला राहण्याचा तीन माणसांच्या खर्चाचा मोठाच प्रश्न त्या वेळी त्यांच्यापुढे उभा राहिला. वडिलांनी पेन्शन घेतलेलें असून तें केवळ मासिक

तीस रुपये इतकेंच होतें. पण मुंजे यांच्याविषयीचे शाळेतील अभिप्राय अतिशय चांगले असल्यामुळे थोडीशी खटपट करताच त्यांना मासिक पंधरा रुपयांची शिष्यवृत्ति मिळाली पण एवढचाशा पैशांतून महाविद्यालयाच्या शिक्षणाचा व तीन माणसांच्या प्रपंचाचा खर्च चालविणें कठीण होतें. त्यांनी शिकवण्या व इतर लहानमोठीं कामें करून कशीबशी खर्चाची तोंडमिळवणी करावी. तो काळ अत्यंत स्वस्ताईचा असल्यामुळे व काटकसरीने राहण्याची त्यांची सवय असल्यामुळे त्यांना विशेष जड गेलें नाही. महाविद्यालयीन जीवनापासून आर्थिक दृष्टीने डॉक्टरसाहेब पूर्णपणे स्वत:च्या पायावर उभे होते. त्यांनी वडिलांकडून कधी कपर्दिकेचीही अपेक्षा केली नाही. आर्थिक चणचणीच्या परिस्थितीमुळे त्यांचे हे दिवस कष्टात गेले. हल्ली जेथे केळकरांचें गांधर्व महाविद्यालय आहे त्या टिळक पुतळ्याजवळील राममंदिराच्या पिछाडीच्या बोळातील एका घरात दोन खण जागा घेऊन आई व बंधूसह ते राहात. घरभाडें आठ आणे महिना होतें. घर गैरसोयीचें असून या घराच्या वास्तुदेवतेला सूर्यकिरणांची विशेष लगट मानवत नव्हती. तें इतकें ठेंगू होतें की, आत नीटपणे उभें राहून वावरण्याची सोय नव्हती. त्यामुळे डॉक्टर व त्यांचे बंधु यांचा पुष्कळसा वेळ बाहेर जाई. घरीसुद्धा पुष्कळ व्यवहार ते ओटचावर करीत. घरापासून बाजार मैल दीडमैल अंतरावर असे. पण आर्थिक चणचणीमुळे ओझेवाला परवडणारा नसल्यामुळे आठवडचाचें जळणही ते तितक्या अंतरावरून पाठीवर वाहून आणीत.

त्या वेळी नागपुरात मॉरिस कॉलेज (सध्याचें नागपूर महाविद्यालय ) व हिस्लॉप कॉलेज अशीं दोन कॉलेजें होतीं. त्यांपैकी मॉरिस कॉलेज सरकारी होतें, तर हिस्लॉप कॉलेज हे युरोपियन मिशनऱ्यांनी चालविलेलें कॉलेज होतें. मुंजे यांनी हिस्लॉप कॉलेजमध्ये आपलें नांव नोंदविलें. त्या वेळी कॉलेजचे प्रिन्सिपॉल मि. व्हिटन या नांवाचे स्कॉच गृहस्थ असून प्राध्यापक वर्गात रसायनशास्त्र व पदार्थविज्ञानशास्त्र यासाठी डॉ. रॉबर्टसन ( स्कॉच ) व संस्कृतसाठी महामहोपाध्याय सदाशिव जयराम देहाडराय अशीं बडीं धेंडें होतीं. मुंजे यांनी इंटरमिजिएटपर्यंतचें दोन वर्षांचें शिक्षण हिलॉस्प कॉलेजमध्ये घेतलें. इंग्रजी व संस्कृत हे त्यांचे अत्यंत आवडीचे विषय होते. हिस्लॉप कॉलेजमध्ये बायबलचा वर्ग असे व त्या वर्गात प्रत्येक विद्यार्थ्याला भाग घ्यावाच लागे. करडचा सोवळेपणाचे संस्कार असलेल्या मुंज्यांना बायबलच्या वर्गात पहिला पदन्यास करताना चांगलाच मनस्ताप झाला. पण एकदा वर्गात जाऊं लागल्यावर त्यांनी आपल्या करारी स्वभावानुरूप बायबल इतकें

आत्मसात् केलें की, त्या वर्गातील त्यांचा पहिला क्रमांक कधी ढळला नाही. कॉलेजमध्ये संस्कृतवर त्यांनी इतकें प्रभुत्व संपादन केलें की, इंग्रजी कवितांची ते संस्कृत कवितेत भाषांतरें करीत. त्यांचे प्राध्यापक म. म. देहाडराय त्यांच्यावर इतके प्रसन्न असत की, मुंजे यांनी सोडविलेली भाषांतराची प्रश्नपत्रिका भरवर्गात विद्यार्थ्यांसमोर धरून ते म्हणत, "जर संस्कृतची प्रश्नपत्रिका सोडवावयाची झाली तर ती अशी सोडविली पाहिजे. मुंजे यांना कॉलेजच्या मर्यादित विश्वात त्यांच्या संस्कृतच्या अध्ययनाची तहान भागविता येईना म्हणून त्यांनी नागपूरच्या घरंदाज संस्कृत पंडितांजवळ प्राचीन पद्धतीने संस्कृतचें अध्ययन प्रारंभ केलें. त्या वेळी विख्यात वैयाकरणकेसरी महामहोपाध्याय भट्टजीशास्त्री घाटे, न्यायपंचानन गजाननशास्त्री वखरे, साहित्यपंडित गोपाळशास्त्री हरदास इत्यादि पंडितमंडळी विद्यमान असून नागपूरच्या पांडित्याचा कीर्तिडिंडिम काशीरामेश्वरपर्यंत गाजत होता. मुंजे यांनी भट्टजीशास्त्री घाटे यांच्याजवळ व्याकरण व पं. गोपाळशास्त्री हरदास यांचे पुतणे पं.श्रीनिवासशास्त्री हरदास यांच्याजवळ काव्य या विषयांचें अध्ययन केलें. तत्कालीन समाजात धर्मविषयक समजुती कशा करड्या असत याचा अनुभव मुंजे यांना त्यांच्या व्याकरणाच्या गुरुजीकडे एका विचित्र योगायोगाने आला. भट्टजीशास्त्री घाटे हे अतिशय कर्मठ असे अग्निहोत्री ब्राह्मण असून धर्मशास्त्रासंबंधात त्यांचा निर्णय महत्त्वाचा मानला जात असे. एकदा डॉ. मुंजे हे त्यांच्याकडे व्याकरणाचा पाठ घेत बसले असता सकाळच्या वेळी दाजीसाहेब कुकडे ( प्रसिद्ध कर्नल कुकडे यांचे वडील ) हे आले. त्या वेळी कर्नल कुकडे हे शिक्षणासाठी इंग्लंडमध्ये होते. आदरसत्कार व औपचारिक गोष्टी झाल्यावर दाजीसाहेब कुकडे शास्त्रीबुवांना म्हणाले की, मुलगा परीक्षा पास होऊन विलायतेहून येतो आहे, आपण त्याला शुद्ध करून घेण्यासाठी एखादें प्रायश्चित्त सांगा. भट्टजीशास्त्री काही वेळ स्तब्ध राहिले. पण नंतर गंभीरपणे व निश्चयी स्वरात म्हणाले की, " दाजीसाहेब, समुद्रगमनाच्या व म्लेंच्छ देशात राहण्याच्या पापाला अग्निकाष्ठभक्षणाशिवाय दुसरें प्रायश्चित्त नाही. " हें ऐकून दाजीसाहेब कुकडे सर्द झाले. नंतर काही वेळ बसून व शास्त्रीबुवांना नमस्कार करून ते खाली मान घालून मार्गस्थ झाले.

कॉलेजच्या जीवनात असताना एकदा युरोपिअन लोकांच्या कणखर स्वदेशाभिमानाचा डॉ. मुंजे यांना विलक्षण योगायोगाने प्रत्यय आला. एके दिवशी मुंजे हे कॉलेजच्या आपल्या काही मित्रांच्या समवेत त्यांचे रसायन शास्त्राचे प्राध्यापक रॉबर्टसन यांच्या बंगल्यावर गेले. डॉ. रॉबर्टसन

हे स्कॉच गृहस्थ होते. ते अतिशय उमद्या स्वभावाचे गृहस्थ असल्यामुळे विद्यार्थिवर्ग नेहमी त्यांच्याकडे येत जात असे. ज्या दिवशी मुंजे आपल्या सहाध्यायांसह रॉब्रर्टसन यांच्याकडे गेले त्या दिवशी चर्चा करीत असताना रॉब्रर्टसन यांना तहान लागली. त्यांनी आपल्या नोकराला सोडा आणावयास सांगितलें. पण तें सांगताना स्कॉच सोड्यावाचून दुसरा कोणताही सोडा न आणण्याविषयी वारंवारदा बजाविलें. मुलांनी त्यांना कारण विचारताच ते शांतपणे म्हणाले, "मी स्कॉटलंडमध्ये निर्माण होणाऱ्या वस्तूंवाचून इतर वस्तूंचा शक्यतोवर वापर करीत नाही. कारण स्कॉटलंड माझा स्वदेश आहे. स्कॉच लोकांच्या स्वदेशाभिमानाचें असेंच एक दुसरें उदाहरण डॉक्टरांना त्यांच्या उत्तर आयुष्यात अनुभवावयास मिळालें. सन १९३०-मध्ये डॉक्टरसाहेब राऊंड टेबल कॉन्फरन्ससाठी विलायतेला गेले असता तेथे एके दिवशी बडोद्याचे श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांनी त्यांना एका बड्या हॉटेलमध्ये जेवणासाठी नेलें. सयाजीरावांना मटन हवें होतें. म्हणून त्यांनी त्या हॉटेलच्या नोकराला बोलावून इंग्रजीत सांगितलें, "I want good Indian mutton." त्यांच्या जवळच एक स्कॉच बाई बसली होती. तें ऐकून ती महाराजांना म्हणाली, No, you want good Scotch mutton. युरोपियन माणसांची स्वदेशाभिमानाची धार अशी तीव्र असते. सोडा पिऊन तृषा शांत केल्यावर डॉ. रॉबर्टसन यांनी त्या विद्यार्थ्यांशी पुढे संभाषण चालविलें. संभाषणाच्या ओघात डॉ. मुंजे यांना भान न राहून त्यांनी रॉबर्टसन यांना असें म्हटलें की, "हीं जीं मिशनरी कॉलेजें, शाळा, दवाखाने इत्यादि आहेत तीं सारीं ब्रिटिशांनी हिंदुस्थानच्या लोकांना ख्रिस्ती बनविण्यासाठी हेतुत: निर्माण केलेलीं साधनें आहेत. हिंदु बाटविले की त्याबद्दल या युरोपियन लोकांना मोबदला म्हणून भरपूर कमिशन मिळतें, व त्या लोभाने हे लोक त्यागाचा देखावा उत्पन्न करीत असतात. डॉ. रॉबर्टसन यांच्या कानांवर हे शब्द आदळताच त्यांच्या रागाचा पारा चढला. पण मुलें मूर्ख आहेत, त्यांच्या बोलण्याकडे विशेष लक्ष काय द्यावयाचें असा विवेक करून त्यांनी तो राग मनातच जिरविला व असें म्हटलें की, "आम्ही लोकांना ख्रिश्चन करतो हें खरें आहे, पण त्यासाठी कोणतेही बळाचे अथवा प्रलोभनाचे मार्ग आम्ही मुळीच अवलंबीत नाही. सेवा हें आमच्या धर्माचें मुख्य व्रत असल्यामुळे आम्ही लोकांची सेवा करतो व सगळ्या विद्यमान धर्मांपेक्षा ख्रिश्चनधर्म हा अत्यंत श्रेष्ठ आहे अशी लोकांची खात्री पटविल्यावर त्यांनी इच्छा प्रदर्शित केली तरच त्यांना ख्रिश्चन धर्माची दीक्षा देतो. त्यावर मुंजे

यांनी त्यांना जोरात विचारलें, "काय, आपण आमच्या हिंदु धर्मापेक्षाही आपला ख्रिश्चन धर्म श्रेष्ठ आहे असें लोकांना पटवून देऊ शकता ?" त्यावर तेथे मोठाच हशा पिकला.

सन १८९३-मध्ये बाळकृष्णपंत मुंजे इंटरमीजिएटची परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यांच्या बरोबरच्या विद्यार्थ्यांत त्यांचा क्रमांक पहिला आला. त्यानंतर त्यांची इच्छा मुंबईला जाऊन मेडिकल कोर्स घेण्याची होती. त्यांनी बिलासपूरला आपल्या वडिलांना स्वतःचा मनोदय कळविला. पण त्या वेळी इतर कोणत्याही प्रतिष्ठित व्यवसायपेक्षा वकिलीचा व्यवसाय अनेक दृष्टींनी लाभदायक असल्यामुळे त्यांच्या वडिलांनी त्यांना कायद्याचें शिक्षण घेण्याचा अत्याग्रह करून त्यांचें नांव बी.ए.च्या वर्गात नोंदवावयास भाग पाडलें. मुंजे काही दिवस त्या वर्गात होते, पण त्यांना वकिलीच्या व्यवसायाविषयी औदासीन्य व डॉक्टरीच्या व्यवसायाविषयी अतिशय आकर्षण वाटत असल्यामुळे त्यांचें मन त्या शिक्षणात रमेना. त्यांनी वडील व इतर मंडळी यांच्या लक्षात न येईल अशा रीतीने मुंबईला ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये नांव नोंदविल्यास शिष्यवृत्ति मिळावी म्हणून प्रयत्न चालविला. शेवटी त्यांच्या त्या खटपटीला यश येऊन त्यांना प्रतिमासी वीस रुपयांची शिष्यवृत्ति मिळाली. त्यासरशी त्यांनी वडिलांना काहीच न कळविता नागपूरहून मुंबईस प्रयाण केलें. त्यांचे प्राध्यापक त्यांच्या बुद्धिमत्तेमुळे त्यांच्या कॉलेज सोडण्याच्या कल्पनेच्या विरुद्ध होते. पण मुंजे यांच्या मनाचा निर्धार अविचल राहिला. मागाहून वडिलांना ही गोष्ट कळल्यावर त्यांना स्वाभाविकपणेच अतिशय राग आला. पण मुलगा पहिल्यापासून आर्थिक दृष्ट्या अगदी स्वतंत्र असल्यामुळे त्यांना मूग गिळून बसणें अगदी क्रमप्राप्तच होतें.

सन १८९४-मध्ये मुंजे यांनी मुंबईस येऊन प्रसिद्ध ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये आपलें नांव नोंदविलें. डॉक्टरांचे मेहुणे श्री. कृष्णराव पारधी, डॉ. गाडगीळ प्रभृति मंडळी त्यांच्या सहाध्यायांमध्ये होती. ही सर्व मंडळी कालेजच्या वसतिगृहातच राहत असत. ग्रॅन्ट मेडिकल कॉलेजचा शिक्षणक्रम एकंदर पांच वर्षांचा होता. पण मुंजे यांनी डॉक्टरीच्या अभ्यासक्रमासाठी आवश्यक असलेल्या फिजिक्स व सायन्स या विषयांचा अभ्यासक्रम हिस्लॉप कॉलेजमध्येच पूर्ण केलेला होता. त्यांनी ही गोष्ट वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या दृष्टीला आणून दिल्यावर एक वर्षाची सूट त्यांना मिळाली. मेडिकल कॉलेजमध्येही त्यांचा क्रमांक बहुधा पहिलाच असे. कधीकधी या क्रमांकात परिवर्तन झालें तरी

तीनच्या खाली त्यांचा क्रमांक कधीच गेला नाही. व्यायामाची त्यांना विशेष आवड असल्यामुळे विशेष प्रयत्न करून कॉलेजचे प्रिन्सिपॉल कर्नल हॅच यांच्या साहृयाने व सहकार्याने त्यांनी कॉलेजचा जिमखाना संघटित केला. मुंजे कॉलेजमध्ये असेतोपर्यंत तेच या जिमखान्याचे मुख्य कार्यवाह होते.

मुंजे यांना मिळणारी मासिक वीस रुपयांची शिष्यवृत्ति कॉलेजच्या व इतर खर्चाच्या दृष्टीने अपुरी होती. तथापि त्यासाठी घरचा आधार त्यांना मिळण्यासारखा नव्हता. त्यामुळे वेगळा प्रयत्न करणें अवश्य होऊन बसलें. त्या वेळी मुंबईला ब्युबॉनिक प्लेग या नव्या रोगाची साथ पसरली होती. हा रोग हिंदुस्थानात अगदीच नवा असल्यामुळे व त्यातून सुदर्शन चक्राच्या आघातासारखा संहार सुरू झाल्यामुळे जिकडे तिकडे एकच हाहाकार होऊन सरकार व लोक यांची तारांबळ उडाली होती. त्या वेळी सरकारने लोकांची व्यवस्था करण्यासाठी एक मोठें यंत्रच उत्पन्न केलें होतें. या यंत्राच्या द्वारे प्लेगने लागलेल्या लोकांना सरकारी दवाखान्यात नेऊन टाकणें व उर्वरित लोकांना प्रतिबंधक उपाय म्हणून प्लेगची लस टोचणें, घरेंदारें स्वच्छ करणें, इत्यादि कामें पार पाडण्यात येत. सरकारी रुग्णालयें, तेथील युरोपियन अथवा इंग्रजी पद्धतीने वावरणारे देशी डॉक्टर्स व व्यवस्थापक, लस टोचणें इत्यादि प्रकार यांना समाज इतका अनभिज्ञ होता की, त्यात काहीतरी धर्मबुडवेपणा आहे अशीच लोकांची समजूत होऊन बसली होती. त्यामुळे घरी प्लेगचे उंदीर पडले तरी तें बाजूसच राहिलें, पण एखादा मनुष्य प्रत्यक्ष प्लेगने लागला तरी लोक ती गोष्ट गुप्त ठेवीत. हे प्रकार सरकारच्या ध्यानात येताच अधिकाऱ्यांनी लोकांच्या घरांची बळाने झडती घ्यावयास सैनिकांचा उपयोग करण्यास प्रारंभ केला. यात प्लेगचा प्रतिकार हें उद्दिष्ट तर होतेंच, पण आणखीही एक उद्दिष्ट होतें. कित्येक दिवसांपासून त्या वेळच्या इंग्रज सरकारची अशी समजूत होऊन बसली होती की, महाराष्ट्रातले ब्राह्मण सरकारविरुद्ध सशस्त्र बंड करणार आहेत. या दुसऱ्या गोष्टीचा शोध करण्यासाठी झडत्यांच्या सत्राला अधिक वेग आला. पुण्याला सरकारी अत्याचार अधिक वाढल्यामुळे रँडचा वध होऊन त्यातून चाफेकर प्रकरण उद्भवलें हें प्रसिद्धच आहे. मुंबईला सरकारने मुंबई महानगरपालिकेच्या द्वारे प्लेगप्रतिबंधक व्यवस्था प्रारंभ केली व त्याचें एक स्वतंत्र कार्यालयच उघडलें. मुंजे यांनी या कार्यालयात फावल्या वेळात सवेतन नोकरी पत्करून आपल्या मुंबईच्या खर्चाची व्यवस्था केली.

मुंबई महानगरपालिकेच्या आरोग्यखात्याने प्लेगप्रतिबंधक म्हणून जे अधिनियम केले व सैनिकांचें साह्य घेऊन व्यवहारात आणले त्यासंबंधात लोक इतके असंतुष्ट होते की, त्या असंतोषाचा केव्हा भडका उडेल याचा काही नियम नव्हता. सैन्याचे लोक केव्हाही घरात घुसत, देव फेकून देत, वाटेल त्या सामानाची नासधूस करीत व बायकांच्या अंगावर देखील हात टाकीत. चोरी वगैरे प्रकार तर सर्वसाधारणच होते. या सर्व प्रकारांचा परिणाम म्हणून पुण्याप्रमाणे मुंबईला एखाद्या युरोपियन अधिकाऱ्याची हत्या झाली नसली तरी दंगे मात्र अतिशय मोठ्या प्रमाणावर उद्भवले. मुंबईच्या दंग्यांच्या इतिहासाला या प्लेगच्या काळातच प्रारंभ झाला असें म्हटलें तरी चालेल. मुंजे हेही या दंग्यांच्या वावटळीत सापडले. एके दिवशी मुंजे हे आपल्या सहाध्यायां-समवेत आपल्या वर्गामध्ये सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्याने Phisiological specimens चा अभ्यास करीत बसले होते. इतक्यात त्यांना दुरून बेलासिस रस्त्यावरील मस्तान तलावाच्या दिशेने भयंकर आग लागली असल्याचें दिसलें. ते तसेच वर्ग सोडून आग पाहण्यासाठी बाहेर आले. कॉलेजच्या आवाराच्या बाहेर येताच त्यांना असें सांगण्यात आलें की, प्लेग-व्यवस्थेच्या विरुद्ध गावात भयंकर दंगा सुरू झाला असून तुम्हांला मरायचें नसलें तर आधी आवारात परत जा. हें ऐकताच मुंजे व त्यांची मित्रमंडळी कॉलेजच्या आवारात परत आली खरी; पण दंगा कसा असतो हें पाहण्याची उत्कंठा असल्यामुळे ते टाचा उंचावून व डोळे फाडफाडून कॉलेजच्या व्हरांड्यातून दूरवर पाहण्याचा प्रयत्न करीत होते. थोड्याच वेळाने त्यांना ग्रँटरोडवरून एक व्हिक्टोरिया परळच्या रस्त्याच्या रोखाने वेगाने जात असलेली दिसली. त्या व्हिक्टोरियाच्या मागे अतिशय प्रक्षुब्ध झालेला हिंदु मुसलमानांचा संमिश्र जमाव लाठ्या परजीत धावत जात होता. हे सगळे लोक एकजात घाटी असून ते तोंडाने अत्यंत गलिच्छ व भयंकर स्वरूपाचे शिव्याशाप देत होते. पुढे व्हिक्टोरिया शक्य तितक्या वेगाने पळत होती व तिच्या पाठीमागे लागलेला तो प्रक्षुब्ध जमाव व्हिक्टोरियावर लाठ्यांचे निसटते तडाखे हाणीत होता. ती व्हिक्टोरिया येता येता जेथे मुंजे व त्यांचे सहकारी उभे होते त्या मेडिकल कॉलेजच्या आवारात आली. इतक्यात तिच्या मागे लागलेल्या जमावातून एक घाटी आपली लाठी परजीत समोरच्या बाजूने आला व त्याने आपल्या लाठीचे जोरदार रट्टे व्हिक्टोरियाच्या घोड्याच्या पायावर लगावले. घोडा खाली कोसळला. तें पाहताच व्हिक्टोरियात असलेले दोन युरोपियन गृहस्थ

तिच्यातून उड्या मारून कॉलेजच्या रोखाने जीव घेऊन पळू लागले. तोंच जमावाने त्यांना घेरलें व लाठ्यांचे तडाखे हाणून खाली पाडलें. मुंजे व त्यांची मित्रमंडळी हा सारा प्रकार अवाक्‌पणे पहात होती. ते युरोपियन गृहस्थ रक्तबंबाळ होऊन मूच्छित पडताच लोकांना ते मेले असें वाटलें व आनंदाने आरडाओरड करीत ती मंडळी बेलासिस रोडच्या रोखाने निघून गेली. ते लोक काही अंतरावर गेले तोंच त्यांच्यापैकी एक घाटी ते मेले कीं जिवंत आहेत हें पाहण्यासाठी पुनश्च त्या जागी परत आला. तो भला उंच व धिप्पाड असून त्याच्या डोक्यावर काळी फरकॅप होती. त्याने मुंडन केलें असल्यामुळे तर तो अधिकच भेसूर दिसत होता. मुंजे व त्यांचे मित्र तो काय करतो हें पाहण्यासाठी तेथेंच थांबले. त्याने त्या युरोपियनांच्या नाकाजवळ हात नेऊन पाहिलें, तेव्हा त्याला ते मूच्छित असून श्वासोच्छ्वास चालू आहे असें आढळून आलें. त्याने मुंजे व त्यांच्या मित्रांना हाक मारून सांगितलें की, "बाबा लोक, इनको उठा ले जाव, मल्मपट्टी करो, अभी ये जिंदे हैं। आजका दिन टोपीवालोंका हैं। तुम लोग बाहर मत निकलो।" त्यांना असें सांगून तो गृहस्थ आपल्या मंडळीत निघून गेला. मुंजे व त्यांच्या मित्रमंडळींनी त्या युरोपियन गृहस्थांना कॉलेजच्या रुग्णालयात नेऊन त्यांची व्यवस्था केली. ही मंडळी परत आपापल्या जागी येऊन दंग्याच्या दिवसांत युरोपियन पोशाखात फिरणें किती धोक्याचें आहे याची चर्चा करीत असताना त्यांच्या असें ध्यानात आलें की, त्यांच्याचपैकी एकजण युरोपियन पोशाखात हॅट डोक्यावर चढवून आपल्या नोकरीवर गेलेला आहे. मंडळी जागच्या जागी बसून त्याच्यासंबंधी नुसती काळजी करीत होती. पण जीविताच्या भयामुळे बाहेर जाऊन त्याला परत आणण्याचें धाडस करावयास कोणीच सिद्ध नव्हतें. हें पाहून मुंजे यांनी आपली फेज कॅप डोक्यावर चढविली व ते बाहेर पडले. वेळ प्रसंगी उपयोगी पडावी म्हणून त्यांनी एक साधी हिंदु टोपी आपल्या खिशात घालून नेली होती. त्यांनी त्या मित्राला शोधून काढलें व सुरक्षितपणे आपल्याबरोबर वसतिगृहात आणलें. रस्त्यात त्यांनी ठिकठिकाणी प्रक्षुब्ध जमावाचे थवे पाहिले, पण देवाच्या दयेने त्यांच्यावर काही विपरीत प्रसंग आला नाही. मित्राच्याकरिता या पद्धतीने आपली अब्रू व आपलें जीवित पणाला लावण्याचे प्रसंग डॉक्टरसाहेबांवर आयुष्यात अनेकवार आले आहेत. एकदा आपला म्हटल्यावर त्याच्यासाठी हवें तें संकट स्वतःवर ओढवून घेण्याच्या औदार्यामुळे डॉक्टरसाहेबांना अनेकवार तोंडघशी पडावें लागलें आहे. पण तो त्यांचा स्वभावच बनून गेल्यासारखा झाला होता.

वरील प्रसंगाहूनही अधिक रोमहर्षक असा प्रसंग याच दिवसांत त्यांच्यावर आला. त्या वेळी मस्तान तलावाच्या जवळ निम्नश्रेणीचे मुसलमान व सिद्दी लोक यांची वस्ती होती. प्लेग व्यवस्थेसंबंधीचा असा कडक सरकारी नियम होता की, जर प्लेग झालेला मनुष्य कोठेही असला तर त्याची तत्काळ सेग्रेगेशन कँपमध्ये पाठवणी करून तें घर स्वच्छ व रोगजंतुविरहित केलेंच पाहिजे. एके दिवशी डॉ. मुंजे यांच्या कार्यालयात असें वृत्त आलें की, या विभागातील एका सिद्द्याच्या घरी त्याची बायको प्लेगने लागलेली आहे. तो संपूर्ण विभाग मुंजे यांच्याकडे असून त्या विभागातील सर्वच जण त्यांना ओळखीत असत. वृत्त हाती येताच मुंजे तेथे गेले व तें वृत्त खरें असल्याचें त्यांना आढळून आलें. सिद्दी त्यांच्या ओळखीचा होता. त्यांनी त्याला समजावून सांगितलें की, त्याने आपल्या बायकोला कायद्याप्रमाणे कँपमध्ये पाठवावें व घर धुऊन काढण्याच्या व्यवस्थेला लागावें. सिद्द्याने ती गोष्ट नाकारली पण कडक पडद्याची चाल असूनही मुंजे यांच्यावर त्याची श्रद्धा असल्यामुळे बायकोला एकवार पाहून जाण्यासाठी तो त्यांना आग्रह करू लागला. मुंजे यांनी आत जाऊन पाहिलें तों त्या बाईला भयंकर ताप चढला असून ती पूर्ण-पणे बेशुद्धावस्थेत होती. ती केवळ काही तासांचीच सोबती असल्यामुळे तिला तेथून हलविणें व्यर्थ आहे हें मुंजे यांच्या ध्यानात आलें. त्यांनी आपला वरिष्ठ अधिकारी कॅप्टन आर. एम. प्रिचर्ड याला हें वृत्त कळ-विलें. त्याने मुंबई महानगरपालिकेचे मुख्याधिकारी व मुंबईचे कमिशनर मि. जेम्स डुबोले आय.सी.एस. यांना हें वृत्त कळविलें. बऱ्याच विचारविनि-मयानंतर या दोन युरोपियन अधिकाऱ्यांनी असें ठरविलें की, कोणत्याही परिस्थितीत नियमात सूट देऊ नये; नाहीतर व्यवस्थेचें तंत्र कोलमडून पडेल. मुंजे यांनी त्यांना संभाव्य गंभीर परिणामांची जाणीव दिली. पण अधिकाऱ्यांनी स्वतःच त्या जागी जाऊन नियमाची अंमलबजावणी कर-ण्याचा निर्णय घेतला. आपल्याबरोबर ॲम्ब्युलन्स कार, ऑफिसच्या शिपा-यांचें पथक असलेलीं वाहनें, घर स्वच्छ करणारे कामकरी यांना घेऊन हे ब्रिटिश अधिकारी मुंजांच्या समवेत त्या ठिकाणी आले. तो सिद्दी बाहे-रच बसला होता. मुंजे यांनी त्या साहेबांची त्याला ओळख करून दिली. तो जमाव पाहून पुष्कळ सिद्दी व अन्य मुसलमान लोकही तेथे लाठ्या घेऊन जमले होते. सिद्द्याने या अधिकाऱ्यांचें म्हणणें ऐकून घेतलें. पण मुंजे सोडून दुसऱ्या कोणलाही तो घरात पाऊल टाकू देईना. त्याने त्या साहेबांना स्पष्ट शब्दांत सांगितलें की, "कृपा करून अल्लासाठी माझ्या पडद्याचा अपमान करू नका. कोणी आत पाऊल टाकलें तर याद राखा.

माझी बायको मरू घातली आहे. तिला शांतपणे मरू द्या. ती मेली की, तिला दफन करायला नेताना हलवायचीच आहे. तोंवर तिला अल्लाशिवाय कोणी पाहू नका." या वेळेपर्यंत मुसलमानांचा खूप समूह तेथे जमला होता व त्याने त्या अधिकाऱ्यांना वेढून टाकलें होतें. ते युरोपिअन अधिकारी नियमांच्या काटेकोर अंमलबजावणीच्या हट्टाला पेटले होते. मुंजे त्या सिद्याला समजावून थकले होते. तो सिद्दी देहभान विसरून तोंडाने अद्वातद्वा शिव्या देत घरातून एक मोठी लोखंडाची पहार घेऊन आला व साहेबाने अथवा कोणीही आत पाऊल टाकण्याचा प्रयत्न केल्यास त्याचें डोकें फोडण्याच्या पवित्र्यात उभा राहिला. प्रसंग मोठाच विचित्र होता. मुंजे पुनश्च त्याला समजाविण्यासाठी त्याच्याजवळ गेले; तोंच त्या घरातून बायकांचा जोरजोराने रडण्याचा आवाज ऐकू येऊ लागला. त्याचा अर्थ स्पष्टच होता. जिच्या संबंधाने बाहेर एवढा गोंधळ होऊन प्रकरण रक्तपातापर्यंत वाढलें होतें ती त्या सिद्द्याची बायकोच वारली होती. दुःखातिरेकाने सिद्दी मटकन खालीच बसला. त्या घटनेने सारें वातावरणच एकदम बदललें. ते दोघे इंग्रज अधिकारी मुंजे यांच्यासहित त्या सिद्द्याच्या दुःखात सहभागी होऊन त्याला समजावू लागले. याप्रमाणे मृत्यूने पुढचा भीषण प्रसंग टळला.

यानंतर पुष्कळ वर्षांनी या अधिकाऱ्यांपैकी एक जेम्स डुबोले यांची नागपूरला डॉ. मुंजे यांच्याशी भेट झाली होती. त्या वेळी ते 'सर' झालेले असून व्हॉइसरॉय लॉर्ड हार्डिंजचे वैयक्तिक कार्यवाह होते. लॉर्ड हार्डिंज नागपूरला आले असता त्यांच्याबरोबर सर जेम्स डुबोले हेही आले होते. मुंजे नागपूरला आहेत असें कळताच त्यांनी त्यांना आपल्याकडे बोलावून घेतलें. गव्हर्नमेंट हाऊसमध्ये दोघांची भेट झाल्यावर जुन्या गोष्टी निघून व विशेषतः हा सिद्द्याचा प्रसंग आठवून दोघेही हसू लागले.

ग्रँड मेडिकल कॉलेजच्या दुसऱ्या वर्षात असताना मुंजे व त्यांचे मित्र यांनी महाराष्ट्रातील सिंहगड इत्यादि स्थानांचा पायी प्रवास केला. त्यांच्या टोळीत कृष्णराव पारधी, डॉ. जतकर, डॉ. गाडगीळ, डॉ. प्रभाकरराव परांजपे इतके जण होते. या मंडळींपैकी डॉ. कृष्णराव पारधी हे सिंहगडची चढण, कुठेही न थांबता एका दमात चढून गेले. डॉ. मुंजे यांना एकदा थांबावें लागलें. या मंडळींत डॉ. जतकर हे सर्वांत लठ्ठ असून वारंवार थकत. त्यांना फार वेळा थांबावें लागे. तेथे करवंदीचीं फळलेलीं झाडें पुष्कळ होतीं. व जतकरांना करवंदं फार आवडत. आपण थकलो नसून करवंदं खाण्यासाठीच थांबत आहोत असें ते आपल्या

मित्रांना भासवीत. पण त्यांतील रहस्य ओळखून त्यांचे मित्र त्यांची थट्टा करावयास चुकले नाहीत. सिंहगडावर या मंडळींची सुप्रसिद्ध मवाळ पुढारी दाजी आबाजी खरे यांच्याशी भेट झाली. त्यांच्याच बंगल्यात ते एक रात्र राहिले. सिंहगडानंतर भोर व पुणें असा पायी प्रवास करून पंधरा दिवसांनी सर्वजण मुंबईला परतले.

सन १८९८ या वर्षी मुंजे हे एल्. एम्. अँड एस्. ची पदवी परीक्षा उत्तीर्ण झाले. परीक्षेत त्यांचा दुसरा क्रमांक आला होता. त्या वेळी एम्.बी.बी.एस् ची परीक्षा नव्हती. पुढच्या शिक्षणासाठी इंग्लंडला जाणें पैशाच्या अभावी शक्य नव्हतें. त्यामुळे शिक्षण येथेच पूर्ण करून, डॉक्टर झालेल्या बाळकृष्णपंतांनी व्यावसायिक जीवनात प्रवेश करावयाचें ठरविलें. मात्र मुंबईलाच स्थिरपद व्हावें असें त्यांना वाटत होतें, व सुदैवाने तशी संधिही त्यांना मिळाली.



प्रकरण तिसरें

# मुंबईतील सुखी जीवन

ग्रँट मेडिकल कॉलेजमधील चार वर्षांचा शिक्षणक्रम पूर्ण करून डॉक्टर झाल्यावर मुंजे यांनी मुंबईलाच स्थिरपद व्हावयाचा निर्णय घेतला याचा निर्देश मागच्या प्रकरणाच्या शेवटी केलाच आहे. थोडीशी खटपट करताच त्यांना बाँबे म्युनिसिपल कार्पोरेशनच्या प्लेग उपचार विभागात पांचशे रुपये मासिक वेतनाची नोकरी लागली. अल्पवयातच वारलेले त्यांचे मित्र डॉ. प्रभाकरपंत परांजपे सोडून डॉ. पारधी यांच्यासुद्धा त्यांचे सर्व मित्र त्याच खात्यात व त्याच वेतनावर लागल्यामुळे आणखी काही दिवस या मित्रमंडळींना परस्परसहवासाचा आनंद उपभोगता आला. या नोकरीचें वेतन पांचशे रुपये, शिवाय प्लेग इनॉक्युलेशन्सचें वेगळें कमिशन व खाजगी व्यवसायाचें उत्पन्न मिळून डॉ. मुंजे यांचें मासिक उत्पन्न लवकरच बाराशे रुपयांच्यावर गेलें. मुलाचा मुंबईला चांगलाच भाग्योदय होत असल्याचें पाहून बिलासपूरला असलेल्या त्यांच्या वृद्ध वडिलांना अतिशय आनंद होत होता. दारिद्र्याच्या दिवसांत त्यांच्यावर मायेचें पांघरूण घालणारी त्यांची आई मात्र त्या वेळी जिवंत नव्हती ही दुःखाची गोष्ट होती. डॉक्टरांना एक मुलगी झालेली असल्यामुळे वैवाहिक जीवनातही वसंत फुलला होता. पत्नी व तीन वर्षांची छोटी बिजलाबाई (मुलगी) यांना डॉक्टरांनी लवकरच मुंबईला आणलें. याप्रमाणे मुंबईचें त्यांचें सुखी व संपन्न सांसारिक जीवन सुरू झालें.

विद्यार्थी असतानाही मुंजे हे पुस्तकातले किडे बनून कधीच राहिलेले नसत. बाहेरच्या वातावरणाकडे त्यांचें पूर्ण लक्ष असे. आवडीच्या चळवळीत ते अभ्यास संभाळून थोडाफार भागही घेत. प्लेगच्या धामधुमीच्या वेळी महाराष्ट्रात व विशेषतः पुण्यातील उत्पाती घटना, दामोदरपंत चाफेकरांच्या पिस्तुलाचे नाद व त्यांनी उठलेलें वादळ या सर्व गोष्टींनी डॉ. मुंजे यांचें देशाभिमानी अंतःकरण चांगलेंच वेधलें. महाराष्ट्र त्या वेळी प्रसुप्ति सोडून जागृत होऊ लागलेल्या ज्वालामुखीचें स्वरूप धारण करीत होता. महर्षि अण्णासाहेब पटवर्धन, वासुदेव बळवंत फडके, न्यायमूर्ति माधवरावजी रानडे, दादाभाई नौरोजी, सर फेरोजशहा मेथा प्रभृति राष्ट्रशिल्पकारांच्या प्रेरणेने एक नवी जागृति समाजजीवनात दिसू लागली होती. परसत्तेविषयीच्या असंतोषाच्या अधिष्ठानावर या

जागृतीला स्थिरपद करून क्रांतीच्या दिशेने कार्यान्वित करणारा एक युगंधर पुरुष या वेळी उदयाचलावर दिसू लागला होता व त्याने तरुण पिढीचीं अंत:करणें आपल्याकडे आकर्षित करावयास प्रारंभ केला होता. हा युगंधर पुरुष म्हणजे लोकमान्य बाळ गंगाधर टिळक हे होत. प्लेगच्या प्रतिबंधक उपायांच्या नांवाखाली परकीय सरकारने जे अत्याचार चालविले होते त्यांचा टिळकांच्या केसरीने परसत्तेविषयी घृणा व तिरस्कार उत्पन्न करण्यास्तव अवश्य तो उपयोग करून घेतला. गणेशोत्सवाला सार्वजनिक अशा राष्ट्रीय महोत्सवाचें स्वरूप देऊन व रायगडावरील छत्रपति शिवाजी महाराजांच्या समाधीच्या दुरुस्तीच्या निमित्ताने शिवाजी उत्सव नव्याने प्रारंभ करून टिळकांनी त्यांतून लोकजागृतीचीं नवीं नवीं साधनें उपयोगात आणलीं. या उत्सवांच्या निमित्ताने मेळे, पोवाडे, व्याख्यानें कथाकीर्तनें या साधनांच्या द्वारे सामान्य जनतेत स्वातंत्र्यकांक्षा निर्माण करणें हा टिळकांचा हेतु होता. सर व्हॅलेंटाईन चिरोल यांना आपल्या 'दि इंडियन अनरेस्ट' या पुस्तकात, व रॉलेट कमिटीला आपल्या प्रतिवृतात भारतीय असंतोषाच्या कारणांची मीमांसा करताना या दोन उत्सवांचा निर्देश करावा लागला. यावरूनच टिळकांचीं हीं साधनें किती प्रभावी होतीं याची कल्पना येते. गणेशोत्सवाहूनही शिवाजी उत्सवाचा लोकमान्यांना अधिक उपयोग झाला. कारण देशाच्या दास्यविमोचनाची आवश्यकता रूपकाच्या आडवळणाने सांगतो म्हटलें तरी त्याला शिवाजीमहाराजांच्या जीवनातील ऐतिहासिक घटनांचा प्रत्यक्षासारखाच उपयोग होत असे. अशाच एका शिवाजी उत्सवात सन १८९९-मध्ये रायगडावर जावें व जुनें राष्ट्रदैवत शिवाजी महाराज नि नवें राष्ट्रदैवत लोकमान्य टिळक यांचें दर्शन घ्यावें अशी डॉ. मुंजे यांना प्रबळ इच्छा झाली. नोकरीतून रजा घेऊन डॉ. मुंजे हे डॉ. पारधी व डॉ. गाडगीळ या आपल्या मित्रांसह रायगडला जावयास मुंबईहून निघाले. ते महाडला संध्याकाळी येऊन पोहोचले. तेथे पोचल्यावर त्यांना असें कळलें कीं उत्सव प्रारंभ झाला असून रात्री गडावर कीर्तन आहे व लोकमान्य टिळक कीर्तनास उपस्थित रहाणार आहेत हें ऐकताच विश्रांतीच्या भानगडीत न पडता रात्रीच या तरुण मंडळींनी रायगड चढावयास प्रारंभ केला. वाट अपरिचित, व रायगडची विशिष्ट चढण, यांमुळे या मंडळींना वर पोहोचावयास बरीच रात्र झाली. मध्यरात्र होऊन गेली होती. गडावर व देवळात सर्वत्र सामसूम झालें होतें. बाहेर जो मंडप घातला होता तेथे पसरलेल्या मोठ्या सतरंजीवर कित्येक लोक गाढ झोपलेले दिसले. ही मंडळीही

गड चढण्याच्या परिश्रमाने इतकी थकलेली होती की, त्यांनीही त्या बिछायतीचा एक कोपरा गाठला व ताणून दिली. सकाळी ते उठले त्या वेळी चांगलेंच उजाडलेलें होतें व मंडपात कोणीच नव्हतें. आपलें सामान तेथेच टाकून ही मंडळी प्रातर्विधि व मुखमार्जनासाठी बाहेर पडली. परत येऊन पाहतात तो त्यांना त्यांचें सामान कोठेच दिसेना. चौकशी केल्यावर त्यांना असें कळलें की, ही मंडळी बाहेर गेल्यावर स्वत: लो. टिळक तेथे आले होते. सामान पाहून तें कोणाचें म्हणून त्यांनी चौकशी केली व अनोळखी नव्या मंडळींचें सामान पाहून तें चोरीला जाऊ नये म्हणून सुरक्षिततेसाठी त्यांनी तें आपल्या झोपडीकडे नेलें आहे. नवे पाहुणे आले कीं त्यांना आपल्या झोपडीकडे पाठवून द्यावयाचा टिळकांचा निरोपही त्यांना कळला. काही आदराच्या पोटी वाटणारा धाक व काही औत्सुक्य अशा संमिश्र भावनेने ही मंडळी टिळकांच्या प्रथम दर्शनाला गेली. तेथे एक साधासुधा दिसणारा गृहस्थ त्यांना झोपडीच्या बाहेरच उभा असलेला दिसला. त्याला विचारताच त्या गृहस्थाने त्यांचें सामान त्यांना दाखविलें व कोठचे कोण म्हणून विचारलें. टिळक कोठेच दिसेनात. म्हणून या मंडळींनी त्याची विचारपूस थांबवून त्याला विचारलें, " टिळक महाराज कोठे आहेत ? " त्या माणसाने, ' मीच टिळक ' असें सांगताच ही मंडळी चांगलीच चपापली. टिळक इतके साधे असतील अशी कल्पनाच ते करू शकत नव्हते. लगेच टिळकांच्या पायांवर डोकें ठेवून त्यांनी त्यांना नमस्कार केला. आपला परिचय लोकमान्यांना सांगून ही मंडळी त्यांचा निरोप घेऊन परत फिरली. काही वेळाने तेथील तलावावर डॉ. मुंजे आपल्या मित्रांसह स्नानासाठी गेले. तेथे त्यांनी पाहिलें तों स्वत: टिळक पाण्यात पोहत होते व नरसिंह चिंतामण उपाख्य तात्यासाहेब केळकर हे आपलें स्नान आटोपून व रेशमी लाल रंगाचा कद नेसून त्या वेळी चांगलें ऊन पडलेलें असल्यामुळे, त्याचा उपसर्ग होऊ नये म्हणून उघडी छत्री हातात घेऊन तळ्याच्या काठावर उभे होते. ही मंडळी तेथे येताच टिळकांनी त्यांना म्हटलें " काय हो तरुण मंडळी, तुम्हांला पोहायला येतें का ? " या मंडळींनी ' हो ' म्हटल्यावर टिळक त्यांना म्हणाले, " ते पहा आपले तात्यासाहेब केळकर. कुटुंबांतल्या एखाद्या वृद्ध वडील माणसारखे छत्री डोक्यावर घेऊन आपणांकडे पहात उभे आहेत. त्यांच्याजवळून त्यांची छत्री मागून घेऊन व ती आपल्या दोन्ही हातात धरून तुम्ही तळ्याच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत जाऊन पुन्हा तसेंच परत येऊ शकाल काय ? डॉ. मुंजे व त्यांच्या मित्रांनी टिळ-कांना होकार दिला व केळकरांच्या जवळची छत्री घेऊन एकामागून

एक याप्रमाणे तळचात उतरून ते प्रयत्न करू लागले. त्यांच्यापैकी काही जण अर्ध्या वाटेपर्यंत जाऊन परत फिरले; तर काही थोडे अधिक पुढे गेले. पण कोणालाच तळ्याचें दुसरें टोक काही गाठता आलें नाही. मग टिळकांनी स्वत: ती छत्री आपल्या दोन्ही हातांत धरून तळ्याच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत दोनदा पोहत फेऱ्या मारून दाखविल्या. त्यांचें तें कौशल्य व सामर्थ्य पाहून ही तरुण मंडळी चांगलीच ओशाळली. डॉ. मुंजे यांना त्यांच्या राजकीय गुरूचें झालेलें हें पहिलें दर्शन होय.

मुंबईच्या या वास्तव्यात एकदा मुंजे यांच्या महामनस्कतेची अग्निपरीक्षा झाली. डॉक्टरसाहेब महानगरपालिकेच्या वतीने बाकुल्ला वॉर्डातील मस्तान तलावाच्या सभोवारच्या मुसलमान वस्तीचे मेडिकल ऑफिसर होते. मुंजे आपल्या स्वभावामुळे तेथे चांगले लोकप्रिय झाले होते. त्या वस्तीत प्लेगच्या दिवसांत काम करण्यासाठी तेथील सार्वजनिक नेत्यांनीही स्वत:ची एक समिति स्थापन केली होती. या लोकसमितीचे प्रमुख खानबहादूर हकीम महम्मद दयाम, बॅरिस्टर काजी कबीर उद्दीन व इतर लोक यांच्याशी मुंजे यांचे संबंध अतिशय चांगले होते. मुख्यत: या मुसलमान पुढाऱ्यांच्या भक्कम पाठबळामुळेच त्या तशा हिरवट वस्तीत प्लेग व्यवस्थेचें काम शांतपणे व सुव्यवस्थित रीतीने चाललेलें होतें. एकदा डॉ. मुंजे यांच्याकडे असें वृत्त आलें की, मस्तान तलावावरील हिंदू चाळीत एक गृहस्थ प्लेगने लागलेला आहे. मुंजे हे तत्काळ त्या ठिकाणी गेले व त्यांनी तो प्लेगचा रोगी रुग्णालयाकडे पाठविला. पुढे प्लेग व्यवस्थापनाच्या अधिनियमांनुसार ती सगळी चाळ धुऊन स्वच्छ नि शुद्ध करणें आवश्यक होतें. त्यासाठी त्यांनी चाळीतील सर्व लोकांना आपापलीं निवासस्थानें सोडून बाहेर निघण्याची सूचना दिली. त्या चाळीतील एका जागेत एक वृद्ध जोडपें रहात असून त्यापैकी पुरुष हा सेवानिवृत्त पोलीस हेड कॉन्स्टेबल होता. तो आपल्या खोल्या सोडून बाहेर जावयास मुळीच तयार होईना. मुंजे यांनी त्याला परोपरीने समजावून सांगितलें; पण तो ऐकेना. शेवटी मुंजे त्याला म्हणाले, " जर तुम्ही खोल्या न सोडल्या तर पोलीस बोलावून तुम्हांला बळाने येथून बाहेर काढण्याचा अधिकार महानगरपालिकेच्या अधिकाऱ्यांना आहे. त्यापेक्षा सभ्यपणाने बाहेर गेलेलें काय वाईट ? " ते ऐकताच तो गृहस्थ रागाने फणफणत आपल्या बायकोसहित बाहेर आला व खोल्यांना आपलीं कुलुपें घालून काही एक सामान न घेता तीं दोघेही बाहेर निघून गेलीं. मुंजे यांनी वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या हें निदर्शनास

आणलें. त्यांच्या आज्ञेने त्यांनी, त्यांचा फिरोज उद्दीन नांवाचा एक पंजाबी मुसलमान शिपाई होता त्याला त्यांच्या कुलुपांवर महानगरपालिकेचें कुलूप लावावयास सांगून ते आपल्या घरी परतले. डॉ. मुंजे घरीच असताना काही वेळाने एक इंग्रज सार्जंट त्यांच्याकडे आला व त्यांची भेट घेऊन म्हणाला की, " तुम्ही डोळेझाक न करण्यासारखा ( Cognizable) अपराध केला असून कोणाला तरी अटक करणें भाग आहे. " काय अपराध झाला तें पाहण्यासाठी डॉक्टरसाहेब त्या सार्जंटबरोबर गाडीतून त्या स्थानी गेले. तेथे त्यांनी जें दृश्य पाहिलें त्यामुळे त्यांच्या मनाचा चांगलाच गोंधळ उडाला. त्या सेवानिवृत्त हेड कॉन्स्टेबलची वृद्ध बायको दोन कुलुपें लावलेल्या त्या खोलीत बंद होती व कोणी तरी तिची सुटका करावी म्हणून एका खिडकीशी येऊन जोरजोराने ओरडत होती. तिने डॉ. मुंजे यांना पाहताच त्यांना, त्या गोऱ्या सोजिराला व महानगरपालिकेच्या साऱ्याच अधिकाऱ्यांना लाखोली वहावयास प्रारंभ केला. तें प्रकरण नियमबाह्य अटकेच्या सदरात मोडणारें होतें. मुंजे यांना हें झालेंच कसें याचें आश्चर्य वाटत होतें. कारण ती नवरा बायको मिळून बाहेर जाताना त्यांनी स्वतःच पाहिलें होतें. व नंतरच आपल्या शिपायाला दाराला कुलूप घालावयास सांगून ते घरी आले होते. त्यांनी आपला पंजाबी शिपाई फिरोज उद्दीन याला हें कसें झालें म्हणून विचारलें. तो अतिशय घाबरला होता. डोळयांत पाणी आणून तो शपथेवर सांगू लागला की, " मी ज्या वेळी दाराला कुलूप घातलें त्या वेळी ही बाई निश्चितपणे बाहेर गेलेली असून खोलीत कोणीच नव्हतें. ती खोलीत आली कशी तें मला काहीच कळत नाही. जर ती आत असती तर दाराला कुलूप घालताना दिसली नसती काय ? व ती आत असताना मी कुलूप लावलें असतें तर आता ती जो आरडाओरडा करते आहे तो तिने त्या वेळीच केला नसता काय ?" पण फिरोज उद्दिनच्या या स्पष्टीकरणाचा त्या वेळी काही उपयोग नव्हता. ती बाई आत होती व फिरोजउद्दीनने दाराला कुलूप घातलें होतें हें उघड दिसत होतें. डॉ. मुंजे यांनी त्याला दाराला कुलूप घालावयास सांगितलें होतें याचा अर्थ त्या बाईला कोंडून ठेवावयास सांगितलें असा मुळीच होत नव्हता. जरी तो वात्रटपणा त्या बाईचा व तिच्या नवऱ्याचाच होता तरी दृश्यावरून ते दोघे व डॉ. मुंजे हे निर्दोषी ठरत असून अपराधी दिसत होता काय तो तो पंजाबी मुसलमान शिपाई फिरोज उद्दीन. यास्तव डॉ. मुंजे यांच्याबरोबर आलेल्या त्या युरोपियन सार्जंटने मुंजे यांना सांगितलें की, " आपण आता घरी जा व आम्हांला फिरोज उद्दीनला पकडून

पोलिस ठाण्यात नेऊ द्या. " हें ऐकताच तो बिचारा शिपाई घाबरून अधिकच गयावया करू लागला.

शेवटी या वादाला अंत नाही व आपला शिपाई निरपराधी असून त्या जोडप्याचाच तो वात्रटपणा आहे हें मुंजे यांनी ओळखलें, व आपल्या आज्ञेवरून त्या बिचाऱ्या शिपायाने दाराला कुलूप घातलें या एकाच जाणिवेने त्यांनी झाल्या प्रकाराचें दायित्व स्वतःकडे घ्यावयाचें ठरविलें. फिरोज उद्दीनने ज्या वेळी दाराला कुलूप घातलें त्या वेळी मुंजे स्वतः तेथे नसूनही त्यांनी त्या सार्जंटला सांगितलें की, "जर अहेतुपूर्वक का होईना पण अपराध झालाच असेल व त्यासाठी अटक करणेंच आवश्यक असेल तर फिरोज उद्दीनला अटक न करता तुम्ही मलाच अटक करावी." त्यावर तो अधिकारी म्हणाला, "दार तुम्ही बंद न केल्यामुळे मी तुम्हांला पकडणार कसा?" शेवटी त्या निरपराध शिपायाला वाचविण्यासाठी मुंजे यांनी त्या अधिकाऱ्याला असें लिहून दिलें की, "जरी दाराला फिरोजउद्दीनने कुलूप घातलें असलें तरी तें माझ्या सांगण्यावरून, माझ्या समक्ष, वरिष्ठाधिकाऱ्यांची आज्ञा पाळावयाची म्हणून घातलेलें होतें." या लेखी वक्तव्यामुळे फिरोज उद्दीन ऐवजी डॉ. मुंजे अपराधी असल्याचें सिद्ध होत होतें. पण डॉ. मुंजे यांना स्वतःच्या दायित्वावर अटक करण्याचें धैर्य त्या अधिकाऱ्याला होईना. त्याने तत्काळ म्युनिसिपल कमिशनर मि. जेम्स डुबोले यांना टेलिफोनवरून सारें वृत्त कळविलें. कमिशनरांना तें ऐकून मोठें आश्चर्य वाटलें व स्वतः काय प्रकार आहे तो पहावा म्हणून ते त्या स्थानी आले. मुंजे यांच्या कार्यतत्परतेने जेम्स डुबोले यांचें त्यांच्यावर प्रेम असे. सारें वृत्त समजावून घेतल्यावर त्यांनी डॉ. मुंजे यांना असें सांगितलें की, "फिरोज उद्दीनलाच अटक होऊ देणें इष्ट आहे. महानगरपालिका त्याला वाचविण्यासाठी सर्व तऱ्हेची खटपट करील व शेवटी या खटल्यातून तो ९९ टक्के निर्दोष सुटेल." पण डुबोले साहेबांचा आग्रह मुंजे यांना पटला नाही. त्यांनी सांगितलें की, "जर अपराध गृहीत धरावयाचा असला तर त्याचें नैतिक दृष्टीने सर्व प्रकारचें दायित्व मीच पत्करलें पाहिजे. कोणत्याही कारणास्तव तें दायित्व टाळून त्या बिचाऱ्या निरपराध शिपायाला बळी जाऊ देणें मला इष्ट वाटत नाही. सर्व तऱ्हेचे परिणाम भोगावयास मी सिद्ध आहे." शेवटी मुंजे यांचा कृतनिश्चय पाहून अचंबा व खेद यांनी गोंधळलेले जेम्स डुबोले, डॉ. मुंजे, तो युरोपियन सार्जंट व शिपाई फिरोज उद्दीन यांना घेऊन न्यायालयात

गेले. तेथे मुंजे यांना अटक करण्यात येऊन तत्काळ जामिनकीच्या भरतवाक्याने त्यांची सुटका करण्यात आली. या त्यांच्या कृत्याने फिरोज उद्दीनवरचें संकट टळलें व तो त्यांच्या समाचारास आला. त्यांच्या पायावर मस्तक ठेवून तो त्यांना म्हणाला, "साहेब, स्वतः संकट आपल्या अंगावर घेऊन आपल्या हाताखालच्या नोकरांना वाचविणारा दुसरा अधिकारी मी पाहिला नाही." तो मुसलमान शिपाई शेवटपर्यंत डॉ. मुंजे यांच्याशी अत्यंत प्रामाणिक होता. काही दिवस न्यायालयात हा अभियोग चालला. मुंजे यांनी न्यायालयातही जसें घडलें तसेंच वृत्त सांगितलें; पण अपराधाचें नैतिक दायित्व मात्र स्वतःकडेच घेतलें. शेवटी मुंजे न्यायालयातून निर्दोषी सुटले. त्या वेळी कमिशनर जेम्स डुबोले बुद्धया त्यांचें अभिनंदन करावयास न्यायालयात आले होते.

स्वतःचा काही एक अपराध नसताना साध्या हाताखालच्या शिपायासाठी एका भयंकर स्वरूपाच्या अपराधात स्वतःला अडकवून घेणारे डॉ. मुंजे व आपल्याच 'चलेजाव'च्या घोषणेच्या प्रभावाने इंग्रजी राज्याविरुद्ध उठावणी करून संकटात सापडलेल्या लोकांसंबंधीचें स्वतःचें दायित्व नाकारणारे, १९४२-च्या आन्दोलनाचे प्रवर्तक गांधीजी यांच्यातील एका वैचारिक संघर्षाचा या ठिकाणी निर्देश करणें योग्य होईल. गांधीजींनी ४२-च्या आन्दोलनातील हिंसात्मक कृत्यें करणाऱ्यांचें दायित्व आपल्याकडे नसल्याचें १९४४-मध्ये व्हाइसरॉयांना एका पत्राने कळविलें होतें. तें पत्र व संबंधित साहित्य अभिप्रायासाठी त्यांनी डॉ. मुंजे यांना पाठविलें. दि. २७ जून १९४४-ला त्याचें उत्तर म्हणून गांधीजींना पाठविलेल्या पत्रात डॉ. मुंजे लिहितात :

Ramabhoomi, Nasik.
27th June, 1944

Dear Mahatma Gandhi,

Many thanks for your letter of 10th instant which was handed over to me by three Gujrathi gentlemen who have been deputed by Mr. Shantikumar Narotam Morarji. Along with the letter they have also given me two volumes being copies of correspondence between the Government of India and the Bombay Government, and yourself during your incarceration in the palace of H. H the Agakhan in Yeravada.

You would like to know my reactions upon the correspondence. They are two bulky volumes and it will take time to study them carefully. But I have carefully read what parts of this correspondence have been published in the Times of India of

19th and 21st instant and I may here put down my reactions as they have occurred while reading them.

The first point that strikes me is that you have perhaps needlessly denied the responsibilities of what has occurred as a consequence after your resolution of August 1942 was adopted. You say that " the mass movement was never started by me. Though you have also announced that it is now an ' open rebellion. ' It may be legally maintainable, but two outstanding facts remain :

(1) Passing of the resolution which invested you with full powers of starting the movement at your discretion whenever you thought fit. The relevant part of the All India Congress Committee's resolution is as follows :

" The Committee resolves, therefore, to sanction, for the vindication of India's inalienable right to freedom and independence, the starting of a mass struggle on non-violent lines on the widest possible scale, so that the country might utilise all the non-violent strength it has gathered during the last twenty-two years of peaceful struggle. Such a struggle must inevitably be under the leadership of Gandhiji and the Committee requests him to take the lead and guide the nation in the steps to be taken."

Thus the responsibility is entirely yours, though by a legal quibble, it may be said that you did not give the actual command to start the movement but there is not the least doubt that the Congress pro-paganda had arranged for mass mobilisation.

(2) That as a consequence of the passing of the resolution the Government immediately arrested you and other first rank Congress leaders and as a reaction there was enough in the resolution to inspire the mass Congressmen to start the movement. Of course, when the movement goes into the mass, it can never remain non-violent. Many people have been shot down and many others have suffered imprisonment and various other hardships, all in the name of the Congress and in the conviction of the truth of your slogan " Do or Die " as you proclaimed.

Now the question is whether the leader of the movement, rather the commander-in-chief should now disown his soldiers. What would the soldiers feel if they are disowned. At present there is a particular case before my eyes. My dear friend Babu Jagat Narayanlal, who formerly was General Secretary of the

Hindu Mahasabha when I was its Working President, has had an hairbreadth escape from being shot, and suffered various hardships and indignities and now is in jail sentenced to five years rigorous imprisonment if I remember right. He is a poor man with practically no means of livelihood with his wife and a large family of growing children. I have taken complete charge of one of his sons who has been a free residential student in my school for the last four years. I know him very well. He is spotless in character. Though he is now in the Congress he has staunch Hindu heart and also is a Hindusabha man though not officially. There must be many such cases. What are they to do ? How will they suffer and put up with various hardships if they are disowned and know that they are thus in a way condemned by the very Congress for which they have risked their all. What source of consolation there could be for them now ? It is most painful to be disowned and condemned both by the leader whose ambitions and intentions they have sought to the best of their intelligence to carry out in practice and also by the Government who have mercilessly punished them as criminals.

An ordinary man like me cannot understand this disowning and denying the responsibility. In order to illustrate the working of my mind on similar occasions though smaller in importance I will mention a small incident in my life. In 1898 having passed out of the Grant Medical College I was working as a plague Medical officer in the Bombay Corporation. There was my peon named Firoz-uddin who was working with me. Under the rules then in vogue we had to vacate rooms where plague cases had occurred and clean and disinfect the whole chawls. If the owner of a room did not allow such disinfection, it was to be locked under the authority of the Corporation. An old couple, husband and wife, was in a room in Masten Tank chawl. They would not allow their rooms to be disinfected. They walked out of the room and I told my peon Firoz-uddin to lock the front door. When we had returned home after doing our morning duty, the woman, the wife of the old man, was found to be calling loudly from one of the windows of the locked room. Her husband made a complaint to the police for wrongful restrainment of his old wife. Soon a warrant of arrest for Firoz-Uddin was presented to me. To our full belief, we had taken care to see that there was no body in the rooms and I had seen with my own eyes that the husband and the wife had walked out of

the rooms. I knew that the room was locked by Firoz-Uddin with quite a clean motive. But when the question of arresting him—a mere peon stared me in the place. I immediately told the European Sergeant that " if any one is to be arrested it should be I, and not Firoz-Uddin ". I took the entire responsibility on my head. Mr. J. H. Duboley, the then Commissioner of the Bombay Corporation, who afterwards became Sir James Duboley, private Secretary to H. H. Lord Harding, the then Viceroy of India, accompanied me to the Police station, and as soon as I was arrested, he stood bail for me and I was released on bail. Eventually I was acquitted with honour. Mr. Firoz-Uddin, the poor peon, who was terror-striken at the immediate prospect of being arrested for a criminal offence felt relieved and remained tremendously grateful to me.

Under the circumstances what I believed you should do is to explain the legal position and mention that though the sanction was given by the A. I. C. C. for starting a mass struggle on the widest possible scale, so that the country might utilize all the non-violent strength it has gathered during the last twenty-two years of most peaceful struggle, the actual order, however, for starting the struggle as intended was not given which was spontaneously started by the people according to your instructions—that is "every man and woman who is participating in this movement must function for himself or herself within the four corners of the general instructions issued. Every Indian who desires freedom and strives for it must be his own guide. Urging him on along the hard road where there is no resting place and which leads ultimately to independence and deliverence in India."

The people in masses acted according to your instructions and used freely their limited intelligence inspired as they felt with the highest motives of patriotism and enthusiasm for achieving independence and deliverance of India. The noblest act of the noble leader like yourself, therefore, should be to undertake the entire responsibility upon yourself and thus give satisfaction to the thousands of people who have acted to carry out your instructions and willingly suffered death and grave hardships and humiliations and indignities. Such is my honest reaction and I have put it down as it occurred to me without meaning any disrespect in any manner whatsoever.

Yours Truly
**B. S. moonje**

( प्रिय महात्मा गांधी, दि. १० ला तीन गुजराथी इसमांनी श्री. शांतिकुमार नरोत्तम मुरारजी यांच्याकडून आपलें म्हणून मला जें पत्र आणून दिलें त्याबद्दल मी आपला आभारी आहे. त्या पत्राबरोबरच आपण आगाखानांच्या येरवड्यातील राजवाड्यात बंदिवान असता मुंबई सरकार, हिंदुस्थान सरकार व आपण यांच्यात जो पत्रव्यवहार झाला त्याचीं पुस्तकेंही दिलीं. पत्रव्यवहार वाचून मला काय वाटलें तें जाणण्याची आपल्याला इच्छा असेल. पत्रव्यवहाराचीं दोन्ही पुस्तकें मोठीं असून तीं काळजीपूर्वक वाचावयास बराच वेळ लागेल. परंतु या पत्रव्यवहाराचे दि. १९ जून १९४४ व २१ जून १९४४ च्या 'टाइम्स ऑफ इंडिया'च्या अंकांत जे भाग प्रकाशित झाले आहेत ते मी काळजी-पूर्वक वाचलेले असून त्यामुळे माझ्या मनात जे विचार आले ते मी आपणांस या पत्रात कळवितो.

इ. स. १९४२-च्या ऑगस्ट महिन्यात तुमचा ठराव काँग्रेसने पास केल्यानंतर देशात ज्या घटना घडून आल्या त्यांची जबाबदारी तुम्ही अजिबातच नाकारली, ही गोष्ट माझ्या मनाला विशेष लागली. तुम्ही स्वतः त्या चळवळीला 'उघड बंड' असें त्या वेळी म्हटलेलें असूनही आता मात्र म्हणत आहा की, सामुदायिक चळवळ मी कधीच सुरू केली नव्हती. कायद्याच्या शब्दांत कदाचित् हें बसू शकेल; तरी पण दोन महत्त्वाच्या गोष्टी शिल्लक उरतातच. पहिली गोष्ट अशी की, काँग्रेसने जो ठराव केला त्यात तुम्हांला योग्य वाटेल तेव्हा तुमच्या इच्छेनुसार चळवळ सुरू करण्याचा अधिकार तुम्हांला देण्यात आला होता. ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या ठरावातील यासंबंधीचा भाग पुढीलप्रमाणे आहे: "हिंदुस्थानचा स्वतंत्र राहण्याचा व स्वराज्य संपादन करण्याचा हक्क प्रस्थापित करण्यासाठी अहिंसात्मक मार्गाने व अत्यंत विस्तृत प्रमाणावर सामुदायिक लढा देण्याचा काँग्रेसने निश्चय केला आहे. गेलीं वीस-बावीस वर्षे हिंदुस्थानने शांततात्मक व अहिंसा-त्मक लढा करण्यासाठी जें सामर्थ्य संपादन केलेलें आहे तें सर्व या लढ्यात पणास लागेल. हा लढा गांधीजींच्याच नेतृत्वाखाली लढण्यात आला पाहिजे म्हणून काँग्रेस कमिटी गांधीजींना नेतृत्व स्वीकारण्याची व लढ्याच्या बाबतीत संपूर्ण मार्गदर्शन करण्याची विनंती करते." आज जरी आपण प्रत्यक्ष लोकांना लढा सुरू करण्याची आज्ञा मी दिली नाही असें म्हणत असला व कायद्याच्या शब्दांच्या कसरतीच्या तत्त्वानुरूप तें क्वचित् खरेंही असलें तरी लढ्याची जबाबदारी संपूर्णपणे तुमच्यावरच आहे हें या ठरावावरून उघडच होतें व लढ्यासाठी सिद्धता करावयाला काँग्रेसने आपलें प्रचारतंत्र पूर्णपणे उपयोगात आणलेलें होतें.

दुसरें असें की, हा ठराव पास होताच त्याचा परिणाम म्हणून सरकारने तुम्हांला व पहिल्या रांगेतील इतर काँग्रेस पुढाऱ्यांना ताबडतोब अटक केली. ठरावामध्ये असा उत्तेजक भाग निःसंशय होता की, ज्यामुळे ह्या अटकेची प्रतिक्रिया म्हणून लोकांनी चळवळ सुरू करावी. अर्थातच चळवळ पूर्णपणे अहिंसात्मकच रहावी असा आपला केवढाही आग्रह असला तरी ती एकदा जनतेत पसरल्यावर अहिंसात्मक कधीही राहू शकत नाही. काँग्रेसच्या नांवासाठी व 'करा अथवा मरा' या तुमच्या घोषवाक्यातील प्रत्येक शब्द खरा समजून अनेक लोक गोळ्या खाऊन मेले, अनेक कारागृहाच्या अंधेरीत फेकले गेले व अनेकांना नाना प्रकारच्या आपदा सहन कराव्या लागल्या. आता असा प्रश्न उत्पन्न होतो की, या लढ्याच्या नेत्यांनी नव्हे, प्रत्यक्ष सेनापतीने आपल्या सैनिकांच्या बाबतीतली जबाबदारी टाळून आपण नामानिराळे होणें शोभण्यासारखें आहे काय ? सैनिकांच्या मनावर याचा काय परिणाम होईल ? सध्याच माझ्यासमोर एक उदाहरण आहे. मी हिंदुमहासभेचा कार्याध्यक्ष असताना बिहारचे बाबू जगत नारायणलाल हे सभेचे मुख्य कार्यवाह होते. आता ते अखिल भारतीय काँग्रेस महासमितीचे सदस्य आहेत. त्यांचेंच उदाहरण मी घेतो. आपल्या ४२-च्या लढ्यात बंदुकीच्या गोळीने मरण्याच्या प्रसंगातून त्यांची केवळ एक केसभर अंतरानेच सुटका झाली व अनेक प्रकारचे कष्ट व विपत्ति सोसून पांच वर्षांच्या सश्रम कारावासाची शिक्षा भोगीत ते तुरुंगात खितपत पडलेले आहेत. त्यांना पत्नी असून घर मुलाबाळांनी भरलेलें व प्रपंच वाढता आहे. माझ्या माहितीप्रमाणे त्यांच्याजवळ उपजीविकेचें म्हणण्यासारखें कोणतेंही साधन नाही. त्यांच्या मुलांपैकी एकाचें दायित्व मी पूर्णपणे स्वीकारलेलें असून तो मुलगा गेल्या चार वर्षांपासून माझ्या शाळेत विनामूल्य राहत व शिक्षण घेत आहे. जगत नारायणलाल माझ्या चांगले परिचयाचे आहेत. त्यांचें चारित्र्य अत्यंत विशुद्ध आहे, व जरी ते आज काँग्रेसमध्ये असले तरी त्यांचें हृदय कट्टर हिंदूचें असून प्रत्यक्ष नसले तरी वस्तुतः ते हिंदुसभेचेच आहेत. यांसारखीं अनेक उदाहरणें सांगता येतील. या लोकांनी आता काय करावें ? नेत्याने उत्तरदायित्व पत्करण्याचें नाकारलें व जिच्यासाठी आपण आपलें सर्वस्व वेचलें त्या काँग्रेसनेच एक प्रकारे आपला धिक्कार केला हें जर त्यांना कळलें तर त्यांनी आपलें दुःख व विपत्ति कशाच्या आधारावर सहन कराव्या ? त्यांना आत्मसमाधानाची जागा कोणती ? एकीकडे सरकारने दयाशून्यपणाने अपराधी म्हणून शिक्षा करावी व दुसरीकडे ज्याच्या महत्त्वाकांक्षेच्या व हेतूंच्या पूर्ततेसाठी आपण आपलें सर्व सामर्थ्य पणाला

लावावयाचें त्या नेत्याने उत्तरदायित्व नाकारून धिक्कार करावा ही गोष्ट अत्यंत दुःखाची आहे.

माझ्यासारख्या सर्वसामान्य मनुष्याला सुद्धा असें घेतलेलें दायित्व टाळणें व नाकारणें मोठें चमत्कारिक वाटतें. माझा मुद्दा स्पष्ट करण्यासाठी व माझें मन आपणांसमोर उघडें करण्यासाठी माझ्या आयुष्यात घडलेल्या एका घटनेचा मी येथे हेतुतः निर्देश करतो. ती गोष्ट लहान असली तरी मुद्द्यावर प्रकाश पाडावयाला पुरेशी आहे. १८९८-मध्ये मी ग्रँट मेडिकल कॉलेजमधून पदवी घेतल्यावर मुंबई महानगरपालिकेत प्लेग मेडिकल ऑफिसर म्हणून काम करीत होतो. फिरोज उद्दीन या नांवाचा माझा एक शिपाई होता. कायद्याप्रमाणें जेथे प्लेगच्या केसेस झाल्या असतील तीं घरें व खोल्या मोकळया करून स्वच्छ करणें व चाळी रिकाम्या करून घेणें हें काम माझ्याकडे असे. जर खोलीच्या अथवा घराच्या धन्याने ही गोष्ट करू द्यावयाचें नाकारलें तर महानगरपालिकेच्या अधिनियमाप्रमाणे त्या खोलीला अथवा घराला कुलूप ठोकावें लागत असे. मुंबईतील मस्तान तलाव चाळीतल्या एका खोलीत एक वृद्ध कुटुंब राहात असे. तेथे प्लेगची केस झाली असता ती दोघेही नवराबायको खोली साफ करू देईनात. शेवटी माझ्या रागावण्याने तीं दोघेही तणतणत खोली सोडून निघून गेलीं व मी माझा नोकर फिरोज उद्दीन याला खोलीला कुलूप घालावयास सांगितलें. नंतर आम्ही आमच्या घरी गेल्यावर असें आढळून आलें की, त्या वृद्ध गृहस्थाची बायको खोलीत बंद आहे. ती बाई जोरजोरानें साहाय्यासाठी ओरडत होती. तिच्या नवऱ्याने पोलिसमध्ये कागाळी केली व लवकरच फिरोज उद्दीनवर वॉरंट निघालें. माझी अशी खात्री होती की खोलीला कुलूप लावताना खोलीत कुणीही नव्हतें. कारण की त्या पतिपत्नींना खोलीबाहेर जाताना मी स्वतः पाहिलें होतें. खोलीला कुलूप घालताना फिरोज उद्दीनचा कोणताही वाईट उद्देश नव्हता याची मला खात्री होती. त्यामुळे माझा काही संबंध नसूनही सारें दायित्व स्वतः पत्करून मी त्या युरोपियन सार्जंटला सांगितलें की जर तुम्हांला कोणाला अटक करावयाचीच असली तर ती मला करा. मुंबई महानगरपालिकेचे त्या वेळचे कमिशनर मि. जे. एच्. डुबोले हे माझ्याबरोबर पोलिस ठाण्यावर आले व जामीन घेतल्यावर माझी सुटका झाली. हेच डुबोले पुढे ‘सर’ झाले व लॉर्ड हार्डिज हिंदुस्थानचे व्हॉइसरॉय असताना त्यांचे वैयक्तिक कार्यवाह होते. पुढे माझ्यावर खटला चालून माझी निर्दोषी म्हणून सुटका झाली. एका गंभीर स्वरूपाच्या अपराधात माझी ढाल पुढे करून मी वाचविलें म्हणून फिरोज उद्दीन माझ्याशी अखेरपर्यंत प्रामाणिक राहिला.

मला असें वाटतें की प्राप्त परिस्थितीत आपण प्रस्तुत घटनेची कायदेशीर बाजू स्पष्ट करून असें म्हणावें की, ऑल इंडिया काँग्रेस कमेटीने गेल्या बावीस वर्षांत शांतिमय संग्राम चालविण्याचें जें सामर्थ्य राष्ट्राच्या अंगी बाणलें असेल तें सारें पणाला लावून व्यापक प्रमाणावर अहिंसात्मक सामुदायिक लढा लढवावयास जरी अनुज्ञा दिली होती तरी प्रत्यक्ष आदेश काही काँग्रेस देऊ शकली नाही. लोकांनी स्वयंस्फूर्तीने लढा दिला ही गोष्ट खरी असली तरी तो तुमच्या सूचनेप्रमाणेच दिला होता. तुम्ही असें स्पष्टपणे सांगितलें होतें की, या लढ्यात ज्या पुरुषाला किंवा स्त्रीला भाग घ्यावयाचा असेल त्यांनी ज्या सर्वसाधारण सूचना करण्यात आल्या आहेत त्यांच्या मर्यादेत आपापल्या दायित्वावर स्वतःच स्वतःचें पुढारीपण पत्करून लढा करावा. ज्या ज्या हिंदुस्थानी मनुष्याला स्वातंत्र्याची तळमळ असेल व तत्प्रीत्यर्थ काही करण्याची इच्छा असेल त्याने या लढ्यात स्वतःच स्वतःचें मार्गदर्शन केलें पाहिजे. हा मार्ग खडतर असून त्यात विश्रांतिस्थलाचें नांवही नाही. मात्र त्याचें अंतिम मातृभूमीच्या दास्यमुक्ततेत व स्वातंत्र्यप्राप्तीत आहे हें निश्चित.

जनता आपल्या बुद्धिसामर्थ्यानुरूप तंतोतंत तुमच्या या आज्ञेप्रमाणे वागलेली आहे. मातृभूमीची दास्यमुक्तता व स्वातंत्र्यप्राप्ति यांच्या उद्घोषाने उत्पन्न झालेली उत्साहशक्ति व देशभक्तीची उच्च भावना याच त्यांच्या कृत्यांच्या प्रेरक शक्ति होत्या. म्हणून तुमच्यासारख्या महान् नेत्याचें आता हेंच महनीय कर्तव्य आहे की, सर्व दायित्व स्वतः पत्करून सहस्रावधि लोकांना समाधान देणें. कारण तुमच्या सूचना आचरणात आणण्याची पराकाष्ठा करीत असतानाच या लोकांनी मरण, कारावास व छळ सहन केलेला आहे. आता उत्तरदायित्व नाकारून स्वतः नामानिराळें होणें तुम्हांला शोभणारें नाही. आपल्याविषयी कोणत्याही प्रकारचा अनादर अथवा इतर विपरीत भावना न ठेवता, एकंदर आपला पत्रव्यवहार वाचून माझ्या मनात जे विचार आले ते मी स्पष्टपणे जसेचे तसे आपणांस कळवीत आहे.

आपला

**बा. शि. मुंजे**

असो. याप्रमाणे डॉ. मुंजे यांचा हा काळ पैशाच्या दृष्टीने संपन्नतेत व संसाराच्या दृष्टीने सुखासमाधानात चालला होता. पण त्यांच्या साहसी स्वभावाने त्यांना पुरी दोन वर्षेंही या स्थितीत राहू दिलें नाही. त्या स्वभावाला त्याचें खाद्य मिळताच मुंजे यांना त्याने दक्षिण आफ्रिकेचा मार्ग दाखविला.

✦ ✦ ✦

प्रकरण चौथें

# बोअर युद्ध व डॉ. मुंजे

(कै. डॉ. मुंजे यांच्या अप्रकाशित आत्मवृत्ताच्या आधारें)

मुंबईच्या वास्तव्यात, दिवसभराचीं सगळीं कामें संपल्यावर संध्याकाळच्या वेळी मित्रमंडळींसह फिरावयास जाण्याचा डॉ. मुंजे यांचा नित्याचा क्रम असे. त्याप्रमाणे एके दिवशी डॉ. पारधी, डॉ. जतकर व व डॉ. गाडगीळ यांच्यासह डॉ. मुंजे हे बॅकबेच्या बाजूला फिरावयास गेले. त्यांच्या मार्गावरच त्या वेळी कास्मॉपॉलिटन क्लब या नांवाचा एक क्लब असे. क्लबच्या इमारतीवरून जाताना त्यांनी सहज आत डोकावून पाहिलें, तों सेठ दामोदरदास गोवर्धनदास सुकलातवाला हे बिलियर्ड खेळताना दिसले. खेळ पहावा म्हणून ही मंडळी आत शिरली व बिलि-यर्डच्या टेबलाशी खेळ पाहत उभी राहिली. त्या वेळी या सर्व मंडळींच्या अंगावर युरोपियन पद्धतीचा पोशाख असून मुंजे यांच्या डोक्यावर त्यांची आवडती फेज कॅप होती. तर बाकीच्या मंडळींनी स्ट्राहॅट्स् घातलेल्या होत्या. सुकलातवाला यांना ते हिंदु आहेत की अन्य कोणी हें कळेना. पण त्यांच्या खिशातून डोकावणाऱ्या स्टेथॉस्कोपमुळे ते हिंदुस्थानी डॉक्टर्स आहेत हें मात्र त्यांनो चटकन ओळखलें. चौकशीअंती या मंडळींचा परिचय झाल्यावर सुकलातवाला किंचित् खिन्नपणाने त्यांना म्हणाले, "तरुण गृहस्थहो, मी नुकतीच दिलेली जाहिरात तुमच्या वाचनात आली असेल. पांच तरुण पदवीधर डॉक्टर्स दक्षिण आफ्रिकेत सध्या बोअर लोकांशी इंग्लंडच्या चालू असलेल्या युद्धात मेडिकल ऑफिसर्स म्हणून पाठवावयाचे आहेत. हिंदुस्थानी माणसांनी या संधीचा लाभ घेऊन तेथे जावें असें माझें मत आहे व म्हणून मी ती जाहिरात दिली." त्या वेळी (सन १८९९ ते १९००) दक्षिण आफ्रिकेतील बोअर लोकांनी इंग्लंडशी चालविलेलें युद्ध जोरात होतें. लेडी स्मिथ नगर पडण्याच्या बेतात असून बोअर लोकांची सरशी होती. सुकलातवाला पुढे म्हणाले, "मोठी दुःखाची व लज्जेची गोष्ट आहे की, मी जाहिरात देऊन दोन महिने होऊन गेले तरी एकाही हिंदु पदवीधर डॉक्टरचें माझ्याकडे आवेदनपत्र आलेलें नाही. आतापर्यंत आलेल्या आवेदनपत्रांत बहुतेक सारीं आवेदनपत्रें अँग्लो-इंडियन्सचींच आहेत. मी आणखी पंधरा दिवस वाट पहावयाचें ठरविलें आहे. जर तेवढया अवधीत हिंदु पदवीधर

डॉक्टरांची आवेदनपत्रें न आलीं तर मला अँग्लो-इंडियन्समधून निवड करणें भाग पडणार आहे. आधुनिक युद्ध म्हणजे काय असतें हें प्रत्यक्ष पाहण्याची ही अनायासें चालून आलेली सुसंधि आहे. हिंदुस्थानी लोकांना सैनिक म्हणून या युद्धात पाठवावयास ब्रिटिश सरकार सिद्ध नाही. पण मेडिकल विभागात हिंदी लोकांना घ्यावयाची सिद्धता ब्रिटिश सरकारनें दाखविली आहे. अशा स्थितीत जर हिंदु लोक या संधीचा लाभ घेणार नाहीत तर त्यांच्यासारखे हतभागी तेच होत." सेठ सुकलातवाला यांची ही विचारसरणी या मंडळींना पटली, व डॉ. पारधी, डॉ. जतकर, डॉ. गाडगोळ या तिघांनी आपलीं नांवें तेथेच शेठजींना देऊन आपली युद्धावर जाण्याची सिद्धता पटविली. मुंजे यांची अनिवार इच्छा असूनही त्यांना एकदम तसें करता येत नव्हतें. या त्यांच्या तीन मित्रांचीं लग्नें झालेलीं नसल्यामुळे त्यांच्यावर सांसारिक दायित्व नव्हतें. मुंजे कुटुंबवत्सल असून व बायको व मुलीसह घर करून मुंबईला होते. परत येताना ही संधि सांसारिक कारणासाठी हातची घालवू नये असा मुंजे यांचा निश्चय झाला व त्यांनी त्या मित्रांना तसें सांगितलें. इतर मित्रांना तर आनंद झाला; पण त्यांचे मेव्हणे डॉ. पारधी त्यांच्यावर रागावले. "आमच्यासारखे तुम्ही काही स्वतंत्र नाही. बायको व मुलीला वाऱ्यावर सोडणार आहा काय ? " असें त्यांनी त्यांना स्पष्टच विचारलें.

प्रापंचिक मनुष्य या दृष्टीने विचार केला तर बोअर युद्धावर जाणें मुंजे यांना आर्थिक दृष्टीनेही लाभाचें नसून उलटें हानिकारक होतें. त्यांच्या चालू नोकरीत त्यांना पांचशे रुपये वेतन व शिवाय इतर प्राप्ति मिळून बाराशे रुपयांचें मासिक उत्पन्न होतें याचा निर्देश मागे केलाच आहे. शिवाय, व्यावसायिक क्षेत्रात त्यांचा जम बसत चाललेला होता. बोअर युद्धात जाण्याने हें उत्पन्न बुडणार होतें व परत आल्यावर व्यवसायाच्या दृष्टीने 'पुनश्च हरि:ओम्'ची पाळी होती. शिवाय या युद्धाच्या नोकरीत वेतन केवळ अडीचशें रुपयेच मिळणारें होतें. तरीही मुंजे यांचें मन युद्धाकडेच आकर्षित झालें.

ही सर्व मंडळी त्या वेळी मेडिको-टेक्निकल लॉज, बेलासिस रोड बाकुल्ला येथे एकाच क्लबात चाळीत वरच्या मजल्यावर राहत होती. मित्रमंडळींसमवेत निवासस्थानी आल्यावर मुंजे त्यांचा निरोप घेऊन आपल्या खोलीत गेले. थोड्याच वेळात बोअर युद्धावर जाण्याचा त्यांचा पक्का निश्चय झाला व जेवायला बसताना, काहीही कारण न सांगता व आपल्या मनातील विचारांचा सुगावाही लागू न देता त्यांनी निश्चयाच्या स्वरात आपल्या पत्नीला सांगितलें की, उद्या सकाळच्या गाडीने मुलीला

घेऊन तुला नागपूरला तुझ्या माहेरी जावयाचें आहे. वेळेवर गोंधळ नको म्हणून आता रात्रीच सारी सिद्धता करून ठेव. मी स्वतः बरोबर स्टेशनवर येऊन तुला गाडीत बसवून देईन." मुंजे यांच्या पत्नीला प्रथम ते काय म्हणत आहेत हेंच कळेना. पण त्यांचा तापट स्वभाव माहीत असल्यामुळे व त्यांच्या स्वरावरून विचारण्याची अथवा काही बोलण्याची सोयच न दिसल्यामुळे सामानाची आवराआवर करून उद्या निघण्याची सिद्धता करावयाची आहे येवढें तिने ठरविलें.

दुसऱ्या दिवशी सकाळी मुंजे यांनी आपल्या मुलीला व पत्नीला स्टेशनवर नागपूरकडे जाणाऱ्या गाडीत लेडीज कंपार्टमेंटमध्ये बसवून दिले व वॉर ऑफिसमध्ये जाऊन दक्षिण आफ्रिकेत जाणाऱ्या डॉक्टर्सच्या यादीत आपलें नांव नोंदवून घेतलें. घरी बिलासपूरला आई वारलेली असल्यामुळे व धाकटे बंधु हरिभाऊ हे नागपूरला कॉलेजमध्ये शिकत असल्यामुळे पत्नीला तिच्या माहेरी पाठविण्याचा निर्णय मुंजे यांनी घेतला. त्यांच्या या निश्चयात आणखी एक अडचण अनपेक्षितपणे निर्माण झाली. घरून वडिलांचें पत्र आलें की, "हरिभाऊंचें लग्न ठरविलें असून मुहूर्त दोन महिन्यांनंतरचा धरला आहे. तरी त्या वेळी रजा मिळेल अशी आतापासून खटपट करून येण्याच्या तयारीत असा." आपण आपला युद्धावर जाण्याचा बेत वडिलांना कळविला तर त्यांना तो मुळीच संमत न होता त्याला ते सडकून विरोध करतील, किंबहुना मुंबईसही येऊन आपल्या निश्चयावर पाणी ओततील अशी डॉ. मुंजे यांना धास्ती वाटल्यामुळे त्यांनी वडिलांना त्यांच्या पत्राचें उत्तरच पाठविलें नाही. आपल्या मित्रमंडळींकडून व विशेषतः मेहुणे डॉ. कृष्णराव पारधी यांच्याकडूनही तें त्यांना कळू नये अशी व्यवस्था केली. प्रयाणाचा दिनांक निश्चित ठरल्यावर निघायच्या आधल्याच दिवशी त्यांनी हरिभाऊंच्या लग्नासाठी म्हणून पंधराशे रुपये वडिलांच्याकडे पाठवून दिले व पैशाबरोबरच त्यांना असें पत्र पाठविलें की, "युद्ध पाहण्याच्या उत्कंठेमुळे बोअर युद्धावर हिंदुस्थानातून जाणाऱ्या डॉक्टर्सच्या यादीत मी माझें नांव नोंदविलें असून उद्याच्याच बोटीने मी दक्षिण आफ्रिकेला जाण्यासाठी निघत आहे. त्यामुळें मला घरच्या लग्नप्रसंगी उपस्थित राहता येणार नाही, तरी क्षमा करावी. आपण सर्व मंडळींनी माझ्या उपस्थित न राहण्याची गोष्ट मनाला लावून घेऊ नये. समारंभ ईश्वरकृपेने व्यवस्थित व चांगला पार पडेल. सोबत पंधराशे रुपये पाठवीत आहे. स्वीकार व्हावा." डॉक्टरांनी पत्र अशा बेताने पाठविलें की, तें वडिलांच्या हाती पडलें त्या वेळी ते समुद्रमार्गाने हिंदुस्थानातून मार्गस्थ झालेले होते.

डॉ. मुंजे यांच्या आफ्रिकेला जाण्याच्या बेताला, मागे उल्लेखिलेले त्यांचे वरिष्ठाधिकारी जेम्स डुबोले यांचाही विरोध होता. ते बुद्धचा त्यांना भेटून म्हणाले, “ पांचशें रुपयांची नोकरी व संभाव्य बढती सोडून अडीचशे रुपयांवर जाण्यात काय शहाणपणा आहे ? ” त्यावर डॉक्टरांनी त्यांना सांगितलें की, “ पुरेसे उभें राहता येणेंही कठीण अशा आठ आणे महिना भाड्याच्या ठेंगू व अंधाऱ्या घरात मी माझ्या कुटुंबीयांना घेऊन दिवस काढलेले आहेत. पैसा कमी कीं अधिक या गोष्टीची भुरळ मला पडू शकत नाही. या युद्धावर जाण्यात जो अनुभव मला मिळेल तो मात्र मोठ्या वेतनाच्या या नोकरीत मला मिळू शकणार नाही. ” मुंजे हे त्यांच्या कार्यक्षेत्रात अतिशय लोकप्रिय असल्यामुळे त्या मुसलमान वस्तीतील लोकांनी त्यांना निरोप द्यावयाचा समारंभ करून थाटाची पानसुपारी केली. ते बोटीत चढत असताना या लोकांनी मोठे गेंदेबाज हार त्यांच्या गळ्यात घालून त्यांच्याविषयीचा आपला आदर व प्रेमभाव व्यक्त केला.

ठरल्या दिवशी दुपारी मुंजे व त्यांचे तिघे मित्र यांच्या जल-प्रवासाला प्रारंभ झाला. जलप्रवासाचा तो आयुष्यातील पहिलाच प्रसंग असल्यामुळे बोट चालू लागताच ती बोट व समुद्राचा देखावा इत्यादि पहाण्यात ही तरुण मंडळी इतकी गुंग झाली की दुपारची जेवणाची घंटा झाली तरी ती जेवणाची आहे हें काही त्यांना उमगलें नाही. शेवटी जेवणाची वेळ टळून गेली व सकाळच्या न्याहारीच्या वेळी खाल्लेला दहीभात तर केव्हाच पचून गेला. कडाडून भूक लागल्यामुळे चौकशी करू लागताच त्यांना कळलें की आपल्या अनवधानाने जेवण बुडालें. मग बोटीवरील अधिकाऱ्यांच्या कृपेने काही सटरफटर खाऊन रात्रीच्या मुख्य जेवणाच्या घंटेची ही मंडळी उत्कंठेने वाट पहात बसली. त्यांना मिळा-लेल्या सूचनेप्रमाणे ती घंटा होताच डिनर सूट परिधान करून डॉ. मुजे व त्यांचे मित्र जेवणाच्या जागी आले. वस्तुत: त्यांच्या आजच्या अधि-काराप्रमाणे ते सैन्यातील कॅप्टनच्या श्रेणीतील अधिकारी होते व कोण-त्याही इंग्रज अधिकाऱ्यासमवेत एका टेबलावर जेवण घेण्याचा त्यांना अधिकार होता. पण ते जेवणाच्या जागी येताच त्यांना इंग्रज लोकां-पासून दूर अंतरावर एका कोपऱ्यात नेऊन बसविण्यात आलें. तेथे त्यांच्या साठीच एक वेगळें टेबल मांडून त्यांच्यापुरत्या चारच खुर्च्या ठेवण्यात आल्या होत्या. एखाद्या अस्पृश्याप्रमाणे आपणांस लेखण्यात आल्याचें पाहून डॉ. मुंजे व त्यांचे मित्र इतके दुखावले व रागावले की ते तेथील श्वेतवर्णीयांच्या ध्यानात आल्याविना राहिलें नाही. त्या श्वेतवर्णीय

लोकांत मिसेस न्यूजेंट ( Mrs. Newgent ) नांवाची एक महिला होती. मुम्बई प्रांताच्या गव्हर्नरच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे एक सदस्य Mr. Newgent यांची ती पत्नी होती. ही तरुण मंडळी रुष्ट झाल्याचें पाहून ही महिला जेवण झाल्यावर त्यांच्या खोलीत गेली व तिने त्यांचा परिचय करून घेतला. दुसऱ्या दिवशी दुपारच्या जेवणाच्या वेळी श्रीमती न्यूजेंटने बुद्धया त्यांच्याच टेबलावर जेवण घेतलें. तेव्हा मात्र या मंडळींची खिन्नता व राग गेला.

या प्रवासात समुद्राच्या लाटांचें रौद्रताण्डवही डॉ. मुंजे यांनी पाहिलें. प्रवासात डॉ. मुंजे, डॉ. जतकर व डॉ. गाडगीळ यांना बोट लागून त्रास झाला. डॉ. कृष्णराव पारधी यांना मात्र तसा काही त्रास झाला नाही. ते आपलें जेवण भरपूर घेत व या मंडळींची त्यांच्या कुरबुरीबद्दल मनसोक्त थट्टा करीत.

डॉ. मुंजे मुंबई सोडल्यापासून बरोबर एकवीस दिवसांनी दक्षिण आफ्रिकेत दरबान येथे येऊन पोहोचले. त्या वेळी तेथे गांधीजी रहात होते. गांधीजी त्या वेळी महात्मा नसून साधे कोर्टात वकिली करणारे बॅरिस्टर मोहनदास करमचंद गांधी होते. दरबान येथील युरोपिअन लोकवस्तीच्या मध्यभागी बॅ. गांधी यांचें राहतें घर असून त्यांचें एकट्याचेंच असें हिंदुस्थानी माणसाचें घर तेथे होतें. डॉ. मुंजे आपल्या मित्रमंडळीसमवेत गांधीजींच्या घरी पाहुणे म्हणून उतरले.

काही दिवसांनंतर गांधीजींनी आपल्या या नव्या पाहुण्यांना दरबान येथील हिंदी लोकवस्तीची खास जागा पाहून येण्यास सुचविलें. ती जागा अतिशय घाणेरडी होती. युरोपियन वस्तीच्या विभागाला जे नगरपालिकेचे नियम लागू करण्यात आले होते त्यांपासून हिंदी लोकवस्ती अगदी अलिप्त ठेवण्यात आली होती. रस्ते व सडका पक्कया बांधलेल्या नव्हत्या. डॉक्टरसाहेब या कालखंडातील आपल्या आठवणी सांगताना म्हणत, "युरोपियन व हिंदी लोकवस्तीची दक्षिण आफ्रिकेतील मी पाहिलेलीं दृश्यें मनात आणलीं तर स्वर्ग व नरक यांचीं दृश्यं एकाच रंगपटावर पाहिल्यासारखें वाटतें. दरबान येथे 'काला आदमी'ला मनुष्य म्हणून जगू द्यावयास गोरी कातडी सिद्ध नव्हती. त्यांना पायपथावरून चालू देत नसत. ट्राम्स मधून 'For Coloured Persons Only' अशी प्रत्यक्ष पाटी जेथे असेल तेथेच भारतीयांना बसू देत; अन्यस्थानी त्यांना बसावयास बंदी होती. विशेषत: स्थानकें व आगगाड्या येथे ही विषमता बोचण्याइतकी जाणवत असे. स्टेशनच्या सुद्धा दोन इमारती असावयाच्या. एक केवळ युरोपियन लोकांसाठी; व दुसरीवर " For Coloured Persons Only

अशी पाटी लावलेली असे. युरोपियनांची जागा सुंदर, भव्य व शोभिवंत असे; तर हिंदी लोकांची ओबडधोबड, कच्ची बांधलेली, घाणेरडी व अंधारी असे. कोणालाही तेथे प्रवेश करताना उबग वाटावा. आगगाडीतून प्रवास करताना तर या वर्णविद्वेषाच्या पिशाच्चाचें थैमान चांगलेंच प्रत्ययास येई. हिंदी माणसाची शैक्षणिक योग्यता, त्याची सांपत्तिक स्थिति व त्याची सामाजिक श्रेणी केवढीही थोर असली तरी त्याला पहिल्या किंवा दुसऱ्या वर्गातून प्रवास करण्याची बंदी असे. गांधीजींनी डॉ. मुंजे यांना असें सांगितलें की "निग्रो व हिंदुस्थानी लोक यांच्यात हे गोरे लोक काही एक भेद करीत नाहीत. येथे राहणाऱ्या व येणाऱ्या भारतीयांना त्यांचें जीवन या अपमानास्पद वातावरणाशी समरस करूनच राहिलें पाहिजे. दुसरें गत्यंतर नाही. हे सगळे अपमानास्पद नियम काटेकोरपणे पाळण्यात येतात व पाळावेच लागतात."

डॉ. मुंजे व त्यांचे सहकारी मात्र या नियमांच्या चौकटीत त्या वेळी तरी सापडू शकत नव्हते. कारण ते सैन्यातील अधिकारी असून ज्याचा सन्मान ब्रिटिश साम्राज्यांतर्गत प्रत्येकाने केलाच पाहिजे तो "साम्राज्ञीचा वेष" (Queen's Uniform) त्यांच्या अंगावर असे. एकदा डॉ. मुंजे यांना यासंबंधात गमतीचा अनुभव आला. त्यांना आगगाडीतून बाहेर गावी जावयाचें होतें. त्यांच्या अंगावर नित्याप्रमाणे त्यांच्या अधिकाराचा निदर्शक असा सैनिकी अधिकाऱ्याचा गणवेश होता. त्यामुळे युरोपियन लोक स्टेशनच्या ज्या इमारतीतून प्रवेश करीत तेथूनच मुंजे यांनीही प्रवेश केला. त्यासरशी तेथे असलेल्या युरोपियन प्रवाशांचेंच नव्हे, तर स्टेशनच्या युरोपियन अधिकाऱ्याचेही डोळे त्यांच्यावर एकदम रोखले गेले. ते रागाने पहात होते पण तो गणवेश पाहताच त्यांना काही बोलता येईना. रेल्वे अधिकाऱ्यांनी अधिकउणा असा एकही शब्द न काढता मुकाटपणे त्यांच्या फॉर्मवर हस्ताक्षर केलें व त्यांच्या मागणीप्रमाणे पहिल्या वर्गाचें तिकीट त्यांच्या स्वाधीन केलें. डॉ. मुंजे हे आपलें तिकीट व साहित्य घेऊन सरळ पहिल्या वर्गाच्या बर्थवर जाऊन बसले. त्यांच्या समोरच्या बर्थवर एक युरोपियन मनुष्य बसला होता. त्याने रोखून रागाने मुंजे यांच्याकडे टक लावून पहावयास प्रारंभ केला. त्याचा आशय मुंजे यांच्या ध्यानात येताच त्यांनीही तिरस्काराने आपली दृष्टि त्याच्यावर रोखली. त्या इंग्रज गृहस्थाला तो सैनिकी गणवेश या 'निगर' च्या अंगावर कसा याचेंच आश्चर्य वाटत होतें. पण त्या गणवेशामुळे त्याला अधिकउणा एकही शब्द बोलण्याची सोय मात्र उरलेली नव्हती. 'काला आदमी' समवेत प्रवास करणें तर त्याच्या मनाला येईना. शेवटी

जागच्या जागी बरीच चुळबूळ केल्यावर मुकाट्याने त्याने आपली सुट-केस घेऊन तो डबा सोडला व तो दुसऱ्या डब्यात जाऊन बसला.

दरबानहून लवकरच डॉ. मुंजे यांची सैनिकी केन्द्राकडे (Military Head Quarters) पाठवणी करण्यात आली. त्यांचें हें केन्द्र पिटर मॉरिस-बर्ग येथे होतें. तेथील इंग्रज अधिकाऱ्याने वर्णविद्वेषाची कोणतीही भावना न दाखविता त्यांचें अत्यंत दिलदारपणाने स्वागत केलें. स्नान व जेवण झाल्यावर या अधिकाऱ्याने डॉ. मुंजे यांना त्यांच्या तीन मित्रां-समवेत गारठा बराच असल्यामुळे शेकोटीशेजारी शेकावयास व गप्पा मारावयास आग्रहाने बोलाविलें. सगळी मंडळी शेकोटीसभोवार गोल खुर्च्या टाकून बसल्यावर त्या अधिकाऱ्याने इंग्रजांच्या नित्याच्या क्रमा-प्रमाणे उत्तम इंग्रजी दारू मागविली व ग्लास भरून त्याने सर्वांना ती घेण्याचा आग्रह चालविला. मुंजे यांच्या मित्रमंडळीत डॉ. जतकर सोडून कोणीही तोवर दारूला स्पर्श केला नव्हता. जतकरही पट्टीचे पिणारे नव्हतेच. बाकीची मंडळी अगदीच सोवळी होती, तर जतकर कधी प्रसंगाने घेत इतकेंच. त्यामुळे त्या सगळ्यांनी त्या अधिकाऱ्याला विन-याने सांगितलें की, आम्ही दारू कधीच घेत नाही. मुळीच सवय नसल्याने आम्हांला त्रास होईल, तरी क्षमा करावी. पण तो अधिकारी ऐकेना. शेवटी त्याच्या भिडेस्तव व तो वरिष्ठाधिकारी आहे हे ध्यानात घेऊन त्याने पुढे केलेली व्हिस्की व सोडा यांनी भरलेले ग्लास तोंडें वेडींवाकडीं करीत या मंडळींनी घशात उतरविले. गप्पांत काही वेळ गेल्यावर या लोकांच्यावर मद्यार्काचा प्रभाव दिसू लागला. आपली ही आठवण लिहि-तांना डॉक्टरसाहेब म्हणतात, " लवकरच माझ्या अंगात ती दारू भिनू लागली. समोरचे दिवे हळूहळू वर्तुळें वाढत वाढत खूप मोठे होत आहेत असें दिसू लागलें. आपल्या खुर्चीवर मी स्थिर नसून कुठेतरी अधांतरीच लोंबकळतो आहे असें मला वाटू लागलें. कितीही बडबड केली तरी ती कमीच वाटून आणखी आणखी बोलावें असें वाटू लागलें. पण या साऱ्या अवस्थेत दारू चढली असून आपण काहीतरी वेडयासारखें करीत आहोत या जाणिवेचें शल्य सुदैवाने मनात सारखें टोचत होतेंच. त्या टोचणीनेच मी वाचलो. प्रयत्नपूर्वक मी स्वतःचें नियंत्रण केलें व थोडयाच वेळात पूर्व स्थितीवर आलो. त्यानंतर मात्र पुन्हा कोणाच्याही भिडेस्तव-सुद्धा या भानगडीत पडावयाचें नाही असा मी दृढनिश्चय केला." दुसऱ्या दिवशी सकाळी या मंडळींना त्यांच्या कामाची माहिती देऊन निरनिराळ्या सैनिकी केंद्राकडे त्यांची पाठवणी करण्यात आली. डॉ. मुंजे व डॉ. कृष्णराव पारधी यांना रुईपुइंट (Rooipooint) येथे जाण्यास

सांगण्यात आलें. प्रवास काही तासांचाच असला तरी चढणीचा होता. दरबान व जोहान्सबर्ग यांच्यामधील रेल्वेमार्गावर वरच्या बाजूला तें स्थळ होतें. हें स्थळ खालच्या बाजूला जाणाऱ्या आगगाडीच्या संरक्षणासाठी वरच्या टेकडीवर निर्माण केलें होतें. तेथे निव्वळ ब्रिटिश सैनिक व आफ्रिकेतील गोरे वसाहतवाले यांचेंच साम्राज्य असून डॉ. मुंजे व डॉ. पारधी हे दोघेच काय ते कृष्णवर्णीय होते. या ठिकाणी डॉ. मुंजे यांना इंग्लंडमधील इंग्रज व गोरे वसाहतवाले यांच्या वागणुकीतील एक भेद प्रत्ययास आला. खास ब्रिटनमधील सैनिकांना हिंदुस्थानी लोक व निग्रो यांच्यातील भेद पूर्णपणे माहीत असल्यामुळे डॉ. मुंजे व डॉ. पारधी हे सैनिकी गणवेषात असले अथवा नसले तरी सभ्यपणाची व सन्मानाचीच वर्तणूक त्यांच्याशी करीत. पण तेथील गोऱ्या वसाहतवाल्यांचें मात्र तसें नसे. हे दोघे जेव्हा सैनिकी गणवेशात असत तेव्हा हे वसाहतवाले त्यांना अवशतेने सन्मानाने व सभ्यतेने वागवीत. पण ते साध्या पोशाखात असले की, त्यांना मुळीच न जुमानता तुच्छतेचें प्रदर्शन करीत.

डॉ. मुंजे रुईपुइंटच्या सैनिकी केंद्रावर येऊन पोहोचताच तेथील मुख्याधिकाऱ्याने त्यांचें नांव व सैन्यातील स्थान टिपून घेऊन त्यांना त्यांच्या आवश्यकतेनुसार सामान व साधनें पुरविण्याची खालच्या अधिकाऱ्यांना आज्ञा केली. डॉ. मुंजे यांना इतर वस्तूंबरोबरच घोडा, त्यावरील खोगीर वगैरे साहित्य व एक सईस इतक्यांची आवश्यकता होती. पण सैनिकी जीवनाचा अनुभव अगदीच नवा असल्यामुळे संकोचाने त्यांनी या वस्तु मागितल्या नाहीत. सारीं कामें ते पार पाडीत होते. पण घोड्याची पुष्कळ प्रतीक्षा करूनही न मागितल्यामुळे तो त्यांना मिळाला नाही. एके दिवशी दळणवळण खात्याचा जी. ओ. सी. जनरल सर जेम्स विलकॉक्स आपल्या दोन ए. डी. सी. सह त्या सैनिकी तळाला भेट देण्यासाठी अवचितपणे आला. सैनिकी तळाच्या मुख्याधिकाऱ्याने डॉ. मुंजे व डॉ. पारधी या नवागत अधिकाऱ्यांशी त्याची ओळख करून दिली. या दोघांनाही कॅप्टनचा अधिकार देण्यात आला होता व त्यांना सैनिकी परिभाषेत व्हॉलेंटियर्स सिव्हिल सर्जन म्हणून संबोधिण्यात येत असे. सर जेम्स विलकॉक्स यांनी औपचारिक चौकशी करून काही विशेष गोष्टींची आवश्यकता आहे काय असें विचारलें. डॉ. मुंजे यांनी हळूच घोड्याची गोष्ट काढली. त्याबरोबर विलकॉक्स हसून म्हणाला. " हें पहा, मुंजे, हें सैनिकी वातावरण आहे. तुमचें मनोगत ओळखून येथे तुम्हांला कोणी काही देणार नाही. तुम्ही सैन्यातील एक अधिकारी आहात. अधिकाऱ्यासारखे वागावयास शिका. ज्याची आवश्यकता असेल

तें सरळ मागा की तें मिळालेंच पाहिजे. त्याच दुपारी त्यांना एक युरोपियन सइस व पांढऱ्या रंगाचा उमदा घोडा मिळाला.

एके दिवशी आपल्या सैनिकी तळापासून दूर उंच टेकडीवर असलेल्या एका सैनिकी तळाच्या वैद्यकीय तपासणीसाठी डॉ. मुंजे आपल्या घोड्यावर बसून जात होते. मार्ग खडकाळ, वाकड्या वळणाचा व सभोवार टेकाडें पसरलेलीं, त्यामुळे सावधपणे जात असताही तोल सुटून ते खाली आदळले व घोडा उधळून भरधाव पुढे निघून गेला. समोरून काही गोरे वसाहतवाले जात होते. मुंजे यांनी पडल्या जागेवरून जोरजोराने ओरडून त्यांना साह्यासाठी बोलाविलें व घोडा अडवावयास सांगितलें. पण त्या 'काला आदमी'कडे तिरस्काराने पाहून ते तेथून निघून गेले. काही वेळाने दुसऱ्या बाजूने काही ब्रिटिश सैनिक येत होते. त्यांनी जवळ येऊन व मुंजे यांना सैनिक सलामी देऊन त्यांना सर्व प्रकारे साह्य केलें व मुंजे घोड्यावर बसून मार्गस्थ होईपर्यंत ते त्यांच्या जवळच होते. गोरे वसाहतवाले व ब्रिटिश सैनिक यांच्या वागणूकीतील मुंजे यांना प्रत्यक्ष आलेला हा विचित्र अनुभव होय.

एकदा मुंजे यांना ब्रिटिश सैनिकांचें कर्तव्यकठोर चारित्र्य पहावयास मिळालें व त्याचा त्यांच्या मनावर कधीही पुसून न जाण्यासारखा परिणाम झाला. एके दिवशी कडाक्याची थंडी व गडद अंधकार यांचें सर्व वातावरणात साम्राज्य पसरलें असता पहाऱ्यावरील सैनिकांनी सैनिक तळाच्या मध्यभागी असलेल्या मुख्याधिकाऱ्याच्या तंबूत दोन ब्रिटिश सैनिकांना आणून उभें केलें. डॉ. मुंजे यांचा तंबू त्या मुख्याधिकाऱ्याच्या तंबूशेजारीच असल्यामुळे त्या अधिकाऱ्याने मुंजे यांना हाक मारली व त्या दोघांनी त्यांची विचारपूस करावयास प्रारंभ केला. त्या सैनिकांनी सांगितलें की, एका सैनिकी तळावर काही महत्त्वाचा संदेश पोहोचविण्याच्या कामगिरीवर आमची नेमणूक झाली असून त्या कामासाठी निघालो असता अंधारामुळे वाटेत आम्ही रस्ता चुकलो. त्यामुळे येथे यावें लागलें. कृपापूर्वक आम्ही कोणत्या रस्त्याने गेलो असता इच्छित स्थळी जाऊ शकू तें सांगावें, म्हणजे अतिशय आभारी होऊ. मुख्याधिकारी त्यांना म्हणाला की, इतक्या गडद अंधारातून व भयंकर थंडीच्या वेळी तो तळ शोधण्याची यातायात न करता तुम्ही आमच्या शिबिरात स्वस्थ विश्रांति घ्या व सकाळी उजाडताच जा. दिवसाउजेडी तुम्हांला तुमचा इच्छित तळ शोधायला त्रास होणार नाही, व रात्रभराच्या विश्रांतीमुळे तुम्ही ताजेतवाने झालेले असाल. त्या सैनिकांनी त्या अधिकाऱ्याला उत्तर दिलें की, आपल्या सौजन्याबद्दल आम्ही आपले फार

आभारी आहोत. पण आम्हांला जो संदेश पोहोचवावयाचा आहे तो अत्यंत तातडीचा असून एक क्षणही व्यर्थ दवडता उपयोगाचें नाही. कृपापूर्वक कोणाला तरी आम्हांला मार्ग दाखवावयास सांगावें म्हणजे आम्ही मार्गस्थ होऊ. अधिकाऱ्याने शेवटी त्यांना म्हटलें की " ठीक आहे, मी तुमच्या कर्तव्यपालनाच्या मुळीच आड येत नाही. पण निदान चहा तरी घेऊन जा. या अशा कडाक्याच्या थंडीत चहा घेतला म्हणजे तुम्हांला थोडें गरम व तरतरीत वाटेल. " पण अत्यंत सभ्यपणे व नम्रपणे त्यांनी सांगितलें की, आता थंडीच्या वेळी विस्तव पेटविण्यात व चहा करण्यात अतोनात वेळ जाईल, कृपापूर्वक आम्हांला जाऊ द्यावें. अधिकाऱ्याने त्यांच्या या कर्तव्यदक्षतेबद्दल त्यांना अतोनात धन्यवाद दिले व रस्ता दाखवावयास मनुष्य देऊन मार्गस्थ केलें.

ते सैनिक तेथून गेल्यावर त्या तळाचा मुख्याधिकारी व डॉ. मुंजे काही वेळ तेथेच उभे असता एकाएकी कांठाळ्या बसविणारा मोठा आवाज झाला व त्याच्या मागोमाग आकाशात धुराळा व माती उडताना दिसून ज्वालेचा मोठा लोळ रेल्वे लाईनच्या बाजूने भडकलेला दिसला. त्याच्या मागोमाग बंदुकांचे धाडधाड आवाज ऐकू आले. या दोघांच्याही लक्षात आलें की, बोअर लोकांनी लोहमार्ग उद्ध्वस्त केला आहे. ते दोघे थोडे पुढे गेले तों बंदुकीच्या गोळ्या सू सू करीत येऊन त्यांच्या गालांना चाटून गेल्या. दुसऱ्या दिवशी सकाळी वृत्त आलें की, बोअर घोडेस्वारांनी रात्री हल्ला करून तो लोहमार्ग उद्ध्वस्त केला. डॉ. मुंजे यांच्या जिवावर बेतलेला बोअर युद्धातील तो पहिला प्रसंग होता.

सैन्यातील अधिकाऱ्यांना दर आठवड्याला आवश्यक त्या वस्तु पुरविल्या जात असत. त्यासाठी आठवड्याच्या पहिल्याच दिवशी प्रत्येक अधिकाऱ्याला त्याची यादी मागण्यात येई व त्या मागणीप्रमाणे वस्तूंचा पुरवठा होई. एकदा मुंजे यांची यादी तपासून अधिकाऱ्याने त्यांना त्या यादीत व्हिस्कीसारखी महत्त्वाची गोष्ट नसल्याबद्दल विचारणा केली. त्यावर मुंजे म्हणाले की," मला या गोष्टीची सवय नाही व आवश्यकताही वाटत नाही." त्यावर तिमजली हास्य करीत तो अधिकारी म्हणाला की, " तुम्ही काय सांगता? येथील कडाक्याच्या थंडीत व्हिस्कीवाचून तुमचें निभणारच नाही. मुंजे नको नको म्हणत असता त्याने व्हिस्कीच्या पांच बाटल्या त्यांच्या सामानात कोंबल्या. बोअर युद्ध संपेपर्यंत त्या त्यांच्याजवळ तशाच न फोडलेल्या होत्या. पुढे डॉक्टरसाहेब हिंदुस्थानात आल्यावर त्यांनी त्या बाटल्या आपल्या मित्रमंडळीतील मदिराभक्तांना देऊन टाकल्या. दारूविषयी डॉक्टरसाहेबांना इतका तिटकारा होता की,

पहिल्या दिवसाचा अपवाद सोडून सैनिकी जीवनात तर ते या व्यसनापासून अलिप्त राहिलेच पण पुढे नागपूरला स्थिर झाल्यावर 'पीत्वा पीत्वा पुनः पीत्वा यावत्पतति भूतले' अशा श्रीमान् गोपाळराव बुटी, सुभेदार, डॉ. गद्रे इत्यादि पट्टीच्या मदिराभक्तांच्या सहवासात राहूनही या व्यसनापासून ते सर्वस्वी अलिप्त राहिले. आजन्म तरुणांना सैन्यात जाण्याचा उपदेश करण्याऱ्या डॉक्टरसाहेबांना गेल्या महायुद्धात सैन्यात जाणारे शेकडो तरुण भेटावयास व आशीर्वाद मागावयास येत. तेव्हा त्यातील प्रत्येकाला ते असा उपदेश करीत की, "सावध रहा, तुम्हांला आग्रह होईल, व तुम्ही मोहाला बळी पडाल. पण दारूच्या एका थेंबालाही स्पर्श करू नका."

असो. बोअरयुद्ध संपल्यावर युद्धावर गेलेल्या हिंदी डॉक्टरांना ब्रिटिश सरकारने त्यांच्या सैन्यातील नोकरीतून मुक्त करून घरी जाण्याची अनुज्ञा दिली. डॉ पारधी, डॉ. जतकर व डॉ. गाडगीळ यांच्या पाठीमागे कोणताही सांसारिक पाश नसल्यामुळे त्या तिघांनी इंग्लंडला मेडिकल सायन्सच्या पुढील अभ्यासासाठी जावयाचा निर्णय घेतला. पण डॉ. मुंजे यांच्या पाठीमागे सांसारिक पाश असल्यामुळे त्यांना हिंदुस्थानात परत येणेंच भाग होतें. ही सर्व मंडळी परत दरबान येथे आली. व गांधीजींच्यांकडे पाहुणी म्हणून राहिली. गांधीजींचें मुसलमानप्रेम डॉक्टरसाहेबांना त्या वेळीही खटकलें. गांधीजींच्या घरी एक मुसलमान स्वयंपाकी असे. तो वस्तुतः मुसलमान भंगी होता व तो कुटुंबीयासारखा त्यांच्या घरच्या बायकामंडळीत मोकळेपणाने वावरत असे. डॉक्टरसाहेबांना हा ओंगळपणा पाहून धक्काच बसला.

येथून डॉ. मुंजे हिंदुस्थानाकडे परतले व त्यांचे मित्र इंग्लंडच्या मार्गाने निघाले. आठ वर्षें एककुटुंबीयाप्रमाणे एकत्र राहिलेले हे जिवलग मित्र एकमेकापासून विलग होताना त्यांच्या भावना उचंबळून येणें स्वाभाविक होतें. या मंडळीत डॉ. जतकर व डॉ. गाडगीळ यांच्या गाठीभेटी डॉ. मुंजे यांच्याशी लवकरच झाल्या. पण डॉक्टरसाहेबांचे मेव्हणे डॉ. कृष्णराव पारधी यांची मात्र पुढे तीस वर्षें भेट झाली नाही. डॉ. कृष्णराव पारधी हे इंग्लंडलाच स्थायी होऊन राहिले होते. ते बर्मिंगहॅम येथील हॉस्पिटलमध्ये मोठे सर्जन म्हणून गाजले असून हार्लीस्ट्रीट लंडन येथे प्रॅक्टिस करीत असत. त्यानंतर तीस वर्षांनी डॉ. मुंजे गोलमेज परिषदेसाठी इंग्लंडला गेले असता तेथे या दोघांची भेट झाली व जुन्या गोष्टींना पुन्हा नवा उजळा मिळाला.

✦ ✦ ✦

प्रकरण पांचवें

# हिंदुस्थानात आल्यावर

दरबानहून मित्रमंडळींचा निरोप घेऊन डॉ. मुंजे स्टीमरने निघाले ते बरोबर पंचवीस दिवसांनी कलकत्ता येथे येऊन पोहोचले. कलकत्ता येथील किल्ल्याच्या पायथ्याशी असलेल्या सरकारी मिलिटरी रेस्ट कँपमध्ये त्यांचा निवास होता. कलकत्त्याला येताच डॉक्टरसाहेबांनी बिलासपूरला आपल्या वडिलांना एक सविस्तर पत्र लिहिलें. त्या पत्रात त्यांनी शेवटी असें लिहिलें होतें की, माझी प्रकृति उत्तम असून मी काशी, प्रयाग, कानपूर, दिल्ली व पेशावर हीं स्थानें पाहून पंधरावीस दिवसांनी नागपूरला पोहोचतो. इतके दिवसांनी आलेलें मुलाचें पत्र पाहून त्यांच्या वडिलांना अतिशय आनंद झाला. शिवरामपंत कट्टर धार्मिक प्रवृत्तीचे होते याचा निर्देश मागे केलाच आहे. आपल्या मुलाच्या हातून समुद्रगमन, खानपान, स्पर्शास्पर्श इत्यादि अनेक धर्मविरोधी गोष्टी घडलेल्या आहेत, व तो अनायासेच तीर्थराज प्रयागला जातो आहे यास्तव त्यांनी मुलाला पाठविलेल्या उत्तरात असें लिहिलें की, " जर तू अनायासे प्रयागला जातोच आहेस तर समुद्रगमनादि दोषांबद्दल प्रायश्चित्त घेऊन व शुद्ध होऊन मगच नागपूरला ये." डॉ. मुंजे यांना वडिलांची ती सूचना वाचून गंमत वाटली. त्यांनी त्यांना पुन्हा पाठविलेल्या पत्रात असें कळविलें की, प्रायश्चित्त घेऊन शुद्ध होण्याने आपल्या मनाला समाधान वाटत असेल तर माझी प्रायश्चित्त घ्यावयास काहीच हरकत नाही व त्या दृष्टीने इतर लौकिक ठिकाणी प्रायश्चित्त घेण्यापेक्षा प्रयागसारख्या तीर्थावर तें घेणें अधिक चांगलें. पण ज्या उद्दिष्टासाठी प्रायश्चित्त घेऊन शुद्ध व्हावयाचें त्याच्या नेमकी उलट अशीं अनेक कृत्यें व दोष यापुढच्या प्रवासात माझ्या हातून होणार आहेत ही गोष्ट निश्चित आहे. अशा स्थितीत आज प्रायश्चित्त घेऊन काय उपयोग ? त्यापेक्षा मी तूर्त प्रायश्चित्त घेण्याच्या भानगडीत न पडता माझा उत्तर हिंदुस्थानातील प्रवास संपल्यावर घरी येतो व प्रत्यक्ष आपल्या देखरेखीखालीच प्रायश्चित्त घेऊन शुद्ध होतो म्हणजे झालें." वडिलांनी त्यांच्या म्हणण्याला संमति दिली.

डॉक्टरसाहेब कलकत्त्याहून प्रथम काशीला आले. काशीविश्वेश्वराच्या मंदिराची मशीद झालेली पाहून जसें त्यांना दुःख झालें, ज्ञानवापीसंबंधीच्या दंतकथा ऐकून जशी त्यांना लाज वाटली, तसाच

सुरसरिता भागीरथीच्या प्रशांत प्रवाहाकडे पाहून त्यांना आनंद झाला व भोसल्यांचा घाट पाहून त्या राजघराण्याविषयीच्या भक्तिभावाने त्यांच्या भावना आर्द्र झाल्या. काशीहून डॉक्टरसाहेब कानपूरला आले. कानपूरला आल्यावर तेथील अठराशें सत्तावनच्या कानपूरच्या विख्यात विहिरीसारख्या स्मारकाचें दर्शन घेण्याची त्यांना अतोनात इच्छा झाली. स्वातंत्र्यवादी भारताच्या १८५७-मध्ये उफाळलेल्या महान् ऊर्मीची स्फूर्तिदायक स्मृतिचित्रें उत्तर भारतात सर्वत्र विखुरलेलीं आहेतच. पण त्यातल्या त्यात तीं कानपूरला इंग्रजांनीच एका वेगळ्या उद्दिष्टाने कां होईना, पण अगदी जपून संरक्षिलेलीं होतीं. सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धाचा महान् सकल्प श्रीमंत नानासाहेब पेशवे यांनी भागीरथीचें पवित्र पाणी हातात घेऊन जेथे सोडला तें ब्रह्मावर्त अथवा बिठूर कानपुरापासून अवघ्या सहा मैलांवर आहे. ज्या तीरावर उभें राहून या समराचे महान् सेनापति तात्या टोपे यांनी रणशंख फुंकला व कानपूरच्या गंगेच्या हिमधवल प्रवाहाला इंग्रजी रक्ताचा लालभडक प्रवाह संगम म्हणून जोडून दिला तें स्फूर्तिशाली स्थान कानपूरलाच आहे. रणशूर नानासाहेब पेशव्यांचा वाडा कानपूरला नसला तरी त्या नानासाहेबांच्या राजमदिराच्या अस्तित्वाची साक्ष देणारा राजमंदिराच्या प्रवेशद्वारालगतचा तो वटवृक्ष जुन्या स्फूर्तिदायक आठवणी जागवीत अजून तेथेच उभा आहे. आणि ती कानपूरची प्रख्यात विहीर! नानासाहेबांच्या प्रासादाच्या बाहेरच्या पिछाडीलाच ती होती व तेथेच ती आहे. पण तिच्या पोटात आता पाण्याचा एक थेंबही नाही की समोर त्या प्रासादाचा अणुमात्र अवयव नाही. फितुऱ्या इंग्रज स्त्रियांचा व पुरुषांचा संहार करून नानासाहेबांनी त्यांचीं प्रतें त्या विहिरीत टाकलीं असें म्हणतात. इंग्रजांच्या दृष्टीने ती विहीर चीड आणणारी असली तर भारतीयांचें तें महान् स्फूर्तिस्थान आहे. त्या विहिरीत पाणी नाही; पण ज्यांचा संहार झाला त्या स्त्रीपुरुषांचीं नांवें असलेले दगड लाविलेले आहेत. इंग्रजांनी ते लाविले तें क्रौर्याचें स्मारक म्हणून. पण वस्तुतः झाले आहेत ते, अन्नदात्यांच्या नरडीला नख लावण्याचा प्रयत्न करणाऱ्या लोकांना भारतीय कसें शासन करीत त्यांचे स्मृतिशिलालेखच. डॉ. मुंजे यांच्या स्वदेशाभिमानी मनाला शेवटच्या पेशव्यांचें तें स्मारक पाहण्याची तीव्र इच्छा होणें हें स्वाभाविकच होतें. पण १८५७-चें तें स्मृतिचिन्ह (म्यूटिनी मेमोरियल) पाहण्याची त्यांनाच अनुज्ञा होती की, जे खटपट करून अधिकाऱ्यांकडून तसा अनुज्ञेचा परवाना घेत. डॉक्टर साहेबांना तें पाहण्याची इच्छा तर तीव्र होती; पण अनुज्ञेचा परवाना

काढण्याइतका वेळ मात्र नव्हता. यास्तव त्यांनी एक साधी युक्ति केली. त्यांनी आपला सैनिकी पद्धतीचा युरोपियन गणवेष धारण केला व मिशांचे आकडे वळवून ते सरळ तीं स्मृतिचिन्हें ज्या उद्यानात होतीं तेथे गेले. काही हिंदी शिपाई त्या उद्यानाच्या दारावर पहारा करीत होते. डॉ. मुंजे यांनी त्यांना काहीएक न विचारता सरळ आत प्रवेश केला व त्या शिपायांनी त्यांचा गणवेश व रुबाब पाहून त्यांना मुळीच अडविलें नाही. आत गेल्यावर ते 'कानपूरची विहीर' या स्मृतिस्तंभाजवळ आले. तेथे बाहेरच्या अंगाला एक युरोपियन सार्जंट पहारा करीत होता. मुंजे यांनी त्याच्याजवळ जाऊन त्याला सांगितलें की, "मी नुक ताच बोअर युद्धावरून परत आलो असून तेथे मी कॅप्टनच्या हुद्द्याचा सर्जन होतो. मी हें स्थळ पाहण्याची तीव्र इच्छा झाल्यामुळे येथे आलो. पण वेळ न मिळाल्यामुळे परवाना मात्र आणू शकलो नाही. जर तू मला हें स्थळ पाहू देशील तर बरें होईल." आपला समानधर्मी मनुष्य मिळालेला पाहून त्या सार्जंटला आनंद झाला. त्याने मुंजे यांना सारीं स्थळें दाखविलीं. नंतर आपल्या घरी नेऊन व चहा देऊन त्यांचें आतिथ्य केलें.

कानपूरहून डॉ. मुंजे प्रयागला गेले. येताना त्यांची पुढे पाटणा युनि-व्हर्सिटीचे व्हाइस चॅन्सेलर झालेले सर सच्चिदानंद सिंह (सिन्हा) यांची एका गमतीच्या प्रसंगाने ओळख झाली. डॉ. मुंजे हे गाडीत सेकंड क्लास-मध्ये होते तर सच्चिदानंद सिन्हा पहिल्या वर्गात होते. वाटेत बक्सार स्टेशनवर गाडी थांबली असताना डॉ. मुंजे यांनी सरसाहेबांना फलाटा-वर अस्वस्थ मनाने फेऱ्या घालताना पाहिलें. त्यांनी बुद्ध्या त्यांच्या जवळ जाऊन त्यांच्या अस्वस्थतेचें कारण विचारलें. सर साहेबांनी सांगितलें की "पहिल्या वर्गाच्या डब्यात दिवे नाहीत व रेल्वे अधिकाऱ्यां-कडे वारंवार कागाळ्या करूनही कोणी लक्ष देत नाही." हें ऐकताच डॉक्टरसाहेब गार्ड व स्टेशनमास्तर यांना भेटले. त्यांच्या अंगावरील सैनिकी अधिकाऱ्याच्या गणवेषाचा परिणाम होऊन सर साहेबांच्या डब्यात तत्काळ दिवे आले. सरसाहेबांना या तरुण गृहस्थाचें इतकें कौतुक वाटलें की, त्यांनी आग्रहपूर्वक डॉक्टरांना आपल्या डब्यात बसवून घेऊन त्यांची चौकशी केली. ते बोअर युद्धात गेले होते असें कळताच सर सिन्हा यांना त्यांचें अतिशय कौतुक वाटून त्यांनी त्यांना प्रयागला आपल्या घरीच उतरण्याचा आग्रह केला, तदनुसार प्रयागला ते दोन-तीन दिवस सरसाहेबांचे पाहुणे होते. प्रयागला डॉक्टरांचे धाकटे बंधु हरिभाऊ लॉ कॉलेजमध्ये शिकत होते. दोन बंधूंची भेट झाली. इंदूरचे सरदार कै. माधवराव किबे, सरदार मुळे इत्यादि मंडळी हरिभाऊंची

सहाध्यायी होती. या वेळच्या परिचयानंतर सरदार किबे आजन्म डॉक्टरांना ज्येष्ठ बंधूप्रमाणे मानीत असत.

प्रयागहून डॉ. मुंजे दिल्लीला गेले. तेथे ऐतिहासिक स्थळें पाहण्याच्या त्यांच्या ठरलेल्या कार्यक्रमानुसार ते प्रसिद्ध कुतुबमिनारही पहावयास गेले. तेथे त्यांना एक दंतहीन व सुरकुत्या पडलेला वृद्ध मुसलमान वाटाड्या मिळाला. कुतुबमिनाराच्या आसपासच्या प्रत्येक वास्तूची सविस्तर माहिती सांगितल्यावर शेवटी मुख्य मिनारासंबंधी बोलताना तो डॉ. मुंजे यांना म्हणाला, "साहेब, थोर पराक्रमी बादशहा कुतुबुद्दीन याने एकवीस मोठीं हिंदु मंदिरें भुईसपाट करून त्यांच्या दगडांनी हा मिनार बांधलेला आहे." त्याचे ते शब्द तापलेल्या शिशाच्या रसाप्रमाणे डॉक्टरसाहेबांच्या कानाला व हृदयाला झोंबले. ही आठवण सांगताना डॉ. मुंजे म्हणतात, "त्या भिकारड्या मुसलमानाचें तें अपमानास्पद वाक्य व साऱ्या राष्ट्राचा अपमान करणारें तें कुतुबमिनाराचें दृश्य पाहून माझ्या मनात चीड व क्रोध उत्पन्न झाला. मी स्वत:च्याच मनाला असा प्रश्न विचारला की, कधी तरी मला या राष्ट्रीय अपमानाचा सूड घेता येईल काय? सारी रात्र मला झोप आली नाही.

दिल्लीहून ते पेशावरला गेले. पेशावरला त्यांची कोणाशीच ओळख नसल्यामुळे ते स्टेशनवर पहिल्या वर्गाच्या प्रतीक्षालयात थांबले. तेथेच सामानाची नीट व्यवस्था लावून व सकाळचा चहा-फराळ आटोपून ते गावात एक फेरफटका मारण्याच्या उद्देशाने स्टेशनच्या आवाराच्या बाहेर पडले. रस्त्यात सहज एका मोठ्या दुकानाशी थांबले असता पेशावरचे त्या वेळचे एक धनाढ्य नागरिक रायबहादूर लाला खोरिन्दामल हेही त्या दुकानातच बसले होते. परप्रांतीय दिसणारा हा नवीन रुबाबदार तरुण पाहून त्यांनी डॉ. मुंजे यांना "तुम्ही कोण? कुठले?" इत्यादि प्रश्न विचारून चौकशी करावयास प्रारंभ केला. रायबहादूर बोलण्याचालण्यात बरेच अघळपघळ होते. डॉ. मुंजे व राय बहादूर यांच्यातील परस्परप्रश्नोत्तरांच्या ओघात डॉक्टरसाहेब नुकतेच बोअर युद्धातून परतल्याचें कळताच त्यांना ह्या तरुणाविषयी बरेंच कुतूहल वाटू लागलें. रायबहादुरांची एक दुधाच्या फेसासारखी पांढरी शुभ्र घोडी होती. ज्या दुकानात हे दोघे गप्पा मारीत उभे होते त्याच्या बाहेरच्या बाजूला त्यांचा नोकर तिला धरून उभा होता. ती शुभ्र घोडी पाहताच तिच्यावर बसून फेरफटका मारण्याची डॉक्टरांना अनावर इच्छा झाली व त्यांनी रायबहादुरांना तशी विनंतीही केली. त्यासरशी रायबहादुर मनापासून हसले व मानेनेच नकार दर्शवून म्हणाले,

"ही घोडी फार वात्रट आहे व परक्याला ती अंगाला हात देखील लावू देत नाही. तुमच्यासारख्या परप्रांतातल्या चांगल्या तरुणाचा जीव धोक्यात घालण्याची माझी इच्छा नाही." पण डॉक्टरांनी अनेक प्रकारे त्यांना समजावून शेवटी त्यांचें मन वळविलें. रायबहादूर त्या दुकानाच्या बाहेर आले व त्या घोडीच्या मानेवर थोपटून प्रेमाने तिला म्हणाले, "हें बघ, नेहमीप्रमाणे वात्रटपणा करू नकोस बर का ? हा परप्रांतातला तरुण अगदीच नवखा आहे. त्याचा जीव धोक्यात घालू नकोस." त्यांनी पुन्हा एकदा घोडीच्या मानेवर थोपटलें व घोडी डॉ. मुंजे यांच्या स्वाधीन केली. घोडी मिळताच त्यांना परमानंद झाला. मुंजे यांनी घोडीच्या पाठीवर मांड कसली व सइसाने आपला तिच्यावरील हात काढून घेतला मात्र; तों वारा प्यालासारखी ती रस्त्यावरून बेफामपणे जी भरधाव निघाली ती कुठे थांबेचना! डॉक्टरसाहेबांनी आपलें सारें बळ एकवटून तिचा लगाम खेचून आवरण्याचा प्रयत्न केला. पण सारें व्यर्थ, सारखी धाव ··· उन्मत्त धाव! असें काही होईल याची पूर्वीच कल्पना असल्यामुळे रायबहादुरांनी आपलीं माणसें तिच्या मार्गावर पाठविलीं होतीं. झाला प्रकार कळताच तेही घाबरले. इकडे मुंजे यांनी घोडीला आवरण्याची आशा सोडूनच दिली होती. एखादें माकड झाडाला विलगून बसावें तसे ते घोडीला बिलगून बसले होते. त्यांच्या डोक्यावर फेटा होता. वाऱ्याच्या झोतामुळे व घोडीच्या त्या बेफाम धावण्यामुळें बसणाऱ्या हेलकाव्यांनी तो फेटा सुटून त्याचा फास त्यांच्या मानेला बसला व दम कोंडू लागला. फेट्याचा एक पदर सुटून डोळ्यां-वर आला व त्यामुळे रस्ताही नीट दिसेना अशा त्या असहाय स्थितीत डॉक्टरांनी जीविताची आशा सोडून दिली. भरधाव सुटलेली ती बेफाम घोडी दोन अडीच मैल तशीच गेली. त्या रस्त्याच्या शेवटी एक चौरस्ता असून तेथे रस्ता संपत होता. बेफामपणाने धावत ती घोडी रस्त्याच्या शेवटापर्यंत गेली व तेथे वळण संपत असल्यामुळे गोंधळून जाऊन एकदम थांबली. तशी ती थांबताच मुंजे यांना जोराचा धक्का बसून ते खाली कोसळण्याच्या बेतात आले होते. घोडीच्या डोक्याच्या वरच्या भागा-वर तर त्यांचें तोंड आदळलेंच. पण त्यांनी महत्प्रयासाने कसाबसा आपला तोल संभाळला व रिकिबीत पाय घट बसवून व तिच्या पोटाशी ते आवळून ते तिला घट्ट पकडून राहिले. घोडीला ताब्यात घेण्याचा तोच काय तो क्षण होता. चाणाक्षपणाने डॉक्टरांनी घोडीच्या पाठीवर व मानेवर ममतेने हातानी थोपटून तिला चुचकारलें. या थोपटण्यामुळे व चुचकारण्यामुळे ती गोंधळलेली घोडी माणसाळली. मुंजे यांनी

ईश्वराचे आभार मानले व त्याच रस्त्याने त्याच घोडीवरून ते सावकाशपणे परतले. इकडे दुकानाच्या दाराशी रायबहादूर लाला लोरिन्दामल काळजीत उभेच होते. मुंजे यांना घोडीवरून सावकाशपणे येताना पाहून त्यांचा जीव भांड्यात पडला. आपल्या कुलदेवतेला त्यांनी गहिवरून धन्यवाद दिले व मुंजे यांची पाठ थोपटली. ते म्हणाले, "आज मला ब्रह्महत्येचें पातक घडत होतें. तुमचें भाग्य चांगलें म्हणूनच हातपाय न मोडता तुम्ही सुरक्षितपणे आलात. ईश्वर तुम्हांला भरपूर आयुष्य व समृद्धि तर देवोच; पण असें जिवावरचें धाडस करण्याची बुद्धि मात्र न देवो." मुंजे यांनी संकटातून सुटल्याबद्दल ईश्वराचे आभार मानले व रायबहादुरांचा निरोप घेऊन परत वेटिंग रूमकडे जाऊ लागले. पण आता रायबहादूर त्यांना कसें सोडणार? त्यांनी आग्रहपूर्वक त्यांना आपल्या घरी रहावयास्तव नेलें. त्यांचें सामान नोकरांकरवी वेटिंग रूममधून आपल्या घरी आणविलें. तेथे डॉक्टरसाहेब एक आठवडा होते. सन १९००-च्या नोव्हेंबर महिन्यातील ही घटना आहे.

रायबहादूर लाला लोरिन्दामल यांच्या घरी डॉ. मुंजे पाहुणे म्हणून असताना तेथे आणखी एक पाहुणे आले. तो एक मध्यम वयाचा शीख गृहस्थ असून अंगापिंडाने भला भक्कम मोठ्या जबड्याचा असा होता. त्याचा चेहरा भव्य असून दाढी व मिशांमुळे तो अधिकच रुबाबदार दिसे. हा गृहस्थ म्हणजे एक मोठें प्रस्थ असून तो काश्मीरच्या तत्कालीन महाराजांचा मित्र व सहचर होता. काश्मीरचे महाराज एक दोन दिवसांत पेशावरला यावयाचे असून तो त्यांच्या व्यवस्थेसाठी पुढे आलेला होता. डॉ. मुंजे यांची व त्याची थोड्याच वेळात, दोघांच्याही गोष्टी वेल्हाळपणामुळे चांगलीच गट्टी जमली. त्या शीख गृहस्थाने डॉक्टरांना सांगितलें की "मी काश्मीरच्या महाराजांचा सहचर असून महाराजांच्यासाठी रानडुकरांच्या शिकारीची ( pig-sticking ) व्यवस्था करणें हें माझें काम आहे. स्वत: महाराज नेहमी घोड्यावर बसून भाल्याने डुकराची शिकार करतात. पण मला स्वत:ला जेव्हा भाल्याने रानडुकराची शिकार कराविशी वाटते तेव्हा मी मात्र ती घोड्यावर बसून न करता जमिनीवरूनच करतो. मला घोड्यावरून शिकार करणें आवडत नाही." त्याचें हें बोलणें ऐकताच डॉ. मुंजे यांनी त्याच्या शरीराकडे किंचित् लक्षपूर्वक पाहिलें. त्याच्या भक्कम मनगटाची रुंदी तरुण डॉक्टरांच्या मनगटापेक्षा दुप्पट होती व त्याला शोभेशीच त्याची छाती व दंड होते. त्याच्या त्या अतिबलिष्ठ शरीरयष्टीकडे पाहताच त्याच्या म्हणण्यात यत्किंचितही अतिशयोक्ति नाही अशी डॉक्टरांची खात्री पटली.

त्या नवागत पाहुण्याच्या सांगण्यानुसार दोन तीन दिवसांनंतर काश्मीरचे महाराज पेशावरला आले व त्यांच्या सन्मानासाठी ठरलेल्या संकेताप्रमाणे तेथे मोठी राजसभा झाली. गावातले प्रतिष्ठित म्हणून या राजसभेला रायबहादूर लाला लोरिन्दामल यांना तर निमंत्रण होतेंच; पण नव्याने परिचित झालेले तरुण डॉ. मुंजे हे त्या शीख गृहस्थाला इतके आवडले की त्याने त्यांनाही आपल्या समवेत त्या राजसभेला नेलें. तेथे गेल्यावर त्या गृहस्थाने व रायबहादुरांनी महाराजांना डॉक्टरांची ओळख करून दिली. नूतन-परिचित असा हा तरुण नुकताच बोअर युद्धाहून जाऊन आलेला आहे हें ऐकून महाराजांना संतोष झाला. आज या गोष्टीचें विशेष काही वाटण्यासारखें नसलें तरी ही गोष्ट सन १९००-मधील आहे हें ध्यानात घेतलें पाहिजे.

राजसभा संपल्यावर खाजगी बैठक झाली. त्या शीख गृहस्थाच्या सौजन्याने डॉक्टरांना त्या बैठकीलाही उपस्थित राहता आलें. त्या बैठकीत महाराज थट्टेने तरुण डॉक्टरांना म्हणाले, "तुम्ही दक्षिणी ब्राह्मण. समुद्रगमन तर धर्मशास्त्राप्रमाणे निषिद्ध आहे. तुम्ही भ्रष्ट झालात." या त्यांच्या उद्‌गारावर तेथील सर्वच मंडळी हसू लागली. त्यावरून जुन्या रूढींच्या आहारी गेलेल्या तथाकथित धार्मिक लोकांचा विषय निघाला. त्यावर महाराजांनी मोठी हृदयद्रावक घटना सांगितली. आजही काश्मीरमध्ये मुसलमानांची अधिक सख्या असून हिंदुस्थान व पाकस्थान यांच्या संघर्षाचें तेंच खरें मूळ आहे. ही मुसलमानांची संख्या काश्मीरमध्ये इतकी कां झाली व राहिली कशी? महाराजांनी जी गोष्ट सांगितली तिच्यावरून या बाबीवर विदारक प्रकाश पडतो. महाराज म्हणाले, "आजपासून (१९००) जवळ जवळ पन्नास वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. त्या वेळी माझे आजोबा काश्मीरच्या राजसिंहासनावर होते. एकदा संस्थानातल्या सर्व मुसलमानांनी त्यांच्याकडे एक शिष्टमंडळ पाठवून एक लेखी आवेदनपत्र सादर केलें. त्यात असें लिहिलें होतें की, आम्हांला मुसलमान धर्म सोडून परत हिंदुधर्मात व आमच्या जातीत यावयाचें आहे. कारण की, आम्ही बळाने धर्मान्तरित झालो आहोत. तरी कृपा करून आम्हांला शुद्ध करून आमच्या मूळच्या जमातीत परत घ्यावें. आम्ही मूळचे हिंदुच होतो. गेल्या दोनशे वर्षांत काश्मीरच्या अफगाण सत्ताधाऱ्यांनी बलात्काराने आमच्या पूर्वजांना त्यांच्या इच्छेविरुद्ध मुसलमान केलें. आता आपण हिंदु धर्माचे राजे काश्मीरवर राज्य करीत आहा. तरी कृपापूर्वक आपण आम्हांला आमच्या मूळच्या हिंदु धर्मात घेऊन आमच्या मूळ जातीत सुखाने नांदावयास अनुज्ञा द्यावी. आपण आज्ञा कराल तें प्रायश्चित्त घेऊन आम्ही हिंदु होऊ इच्छितो."

आपल्या मुसलमान प्रजेची ही स्वयंस्फूर्त इच्छा पाहून महाराजांना अत्यंत आनंद झाला. त्यांनी आपल्या राज्यातील शास्त्री व पंडितांची एक परिषद बोलावून तिच्यासमोर विचारासाठी तें आवेदनपत्र टाकलें. या अदूरदर्शी पण्डितांनी त्या आवेदनपत्राला नाकें मुरडलीं व मुसलमानांना आपण हिंदु धर्मात परत घेणार नाही असें सांगितलें. तशी धर्मशास्त्रात सोय नसल्याचें ते म्हणू लागले. महाराजांनी त्यांना सांगितलें की, " अशी संधि पुन्हा येणार नाही. अनायासे ती आलेली असल्यामुळे ती एक ईश्वरी आज्ञाच आहे असें समजून मी या मुसलमानांना हिंदु करावयाचा निर्धार केला आहे. तुम्ही ते विधिपूर्वक अथवा नवा विधि तयार करून तें करून घ्यावें. पण ते अदूरदर्शी लोक हट्टास पेटले. शेवटी महाराजांनी काशीच्या पंडितांच्याकडे धाव घेतली; पण तेथेही त्यांच्या पदरी निराशाच पडली. त्या दीर्घदर्शी राजाला या कूपमंडूक वृत्तीच्या शब्दपंडितांसाठी ती आलेली संधि हातची घालविणें आत्मनाशाचें वाटलें. त्यांनी काशीचा व स्थानिक शब्दपंडितांचा निर्णय धुडकावून लावला व असें घोषित केलें की, " या मूळच्या हिंदु असलेल्या व परत हिंदु होऊ इच्छिणाऱ्या प्रजाजनांना राजा या नात्यानें मला असलेल्या अधिकारानुसार एक मोठा यज्ञ करून त्यात त्यांना परत हिंदु करून घेणार आहे. " तदनुसार यज्ञाची सिद्धता सुरू झाली व लोकांचें तिकडे औत्सुक्याने लक्ष वेधलें.

काश्मीरच्या राजघराण्यात अशी प्रथा असे की, सकाळी आपले धार्मिक आह्निक आटोपल्यावर स्वत: महाराज प्रथम राजपुरोहित व इतर पंडित यांचें दर्शन घेऊन त्यांना प्रणाम व दक्षिणा समर्पण केल्याविना अन्नग्रहण करीत नसत. महाराज आपल्या विरुद्ध जाऊन मुसलमानांना हिंदु करून घेणार म्हणून संतापलेल्या राजपुरोहिताने व त्याच्या सहकाऱ्यांनी या अधार्मिक कृत्याचा निषेध म्हणून आक्रस्ताळीपणाने प्रकटपणे आत्महत्या करावयाचा निर्णय घेतला. त्यामुळे या राजाला ब्रह्महत्येचें पातक लागून नरकवास घडेल अशी त्यांची समजूत होती. जणू काय आत्महत्या करण्याच्या घोर पातकाबद्दल या पंडिताना घोर नरकवास मिळालाच नसता! राजपुरोहित व त्यांचे पांच सहकारी एका लहान नावेत बसून झेलम नदीत उतरले व नदीच्या प्रवाहातून ती वल्हवीत नदीतीरावरील महाराजांच्या राजवाड्यासमोर त्यांनी ती नाव आणली. महाराजांनी खिडकी उघडली तोंच या लोकांनी खालून जोराने ओरडून सांगितलें की " हे अधार्मिक राजा, तू यवनांना आम्हा महाब्राह्मणांच्या इच्छेविरुद्ध यज्ञ करून परत हिंदु धर्मात घेण्याचे जें अधार्मिक

कृत्य करीत आहेस त्यामुळे तुझा सर्वनाश होईल व तो लवकर व्हावा म्हणून आम्ही या नदीत उड्या घेऊन प्राणत्याग करीत आहोत व ब्रह्म-हत्येचें पाप तुझ्या डोक्यावर लादीत आहोत." असें म्हणून त्यांनी खरो-खरीच नदीत उड्या टाकल्या. हा प्रकार पाहून महाराज घाबरले, व ब्रह्महत्येच्या पातकाच्या भयाने यज्ञ व शुद्धीचा कार्यक्रम रहित करून त्या पंडितांना साष्टांग नमस्कार घातला व अशा रीतीने ब्रह्महत्येचें पातक टाळलें. त्या बिचाऱ्या दयाळू राजाच्या ही गोष्ट ध्यानातच आली नाही की, या प्रकरणात राजाला कोणतेंही ब्रह्महत्येचें पातक धर्मशास्त्रा-नुसार लागणार नसून केवळ त्या असमंजस ब्राह्मणांना मात्र आत्महत्येचें घोर पातक लागणार होतें. शिवाय ही थोडीशी ब्रह्महत्या पत्करूनही राजाला पुढे एका शतकाच्या आत होणारी व्यापक प्रमाणावरील मोठी ब्रह्महत्या टाळता आली असती; इतकेंच नव्हे तर मानवता, न्याय व संस्कृति यांचीही हत्या वाचविता आली असती. हें वृत्त सांगून काश्मीरचे राजेसाहेब म्हणाले "हें अज्ञान की, दुर्दैव ? आमच्या जुन्या समाज-नेत्यांना जर थोडीशीही व्यावहारिक बुद्धि असती तर आपल्या समाजाचें किती कल्याण झालें असतें ! "

कलकत्ता ते पेशावरपर्यंत प्रवास करताना डॉ. मुंजे यांच्या मनाला एका विचित्र विचाराने ग्रासलें होतें. हिंदुस्थानात व्यवसाय न करता हिंदुस्थानाबाहेर कोठेतरी स्थिर व्हावें हा तो विचार होय. बोअर युद्धाच्या निमित्ताने त्यांनी जो रणक्षेत्राचा अनुभव घेतला व परदेश-प्रवासामुळे त्यांच्या बुद्धीत जो चौकसपणा उत्पन्न झाला त्याचा येथे काही उपयोग व्हावयाचा नाही असें त्यांना वाटत होतें. त्यांनी मेडिकल विभागात सरकारी नोकरी स्वीकारली असती तर असिस्टंट सर्जनपेक्षा अधिक मोठी जागा त्यांना मिळू शकली नसती, आणि बोअर रणक्षेत्रावर कॅप्टनच्या हुद्द्यावरून सिव्हिल सर्जनच्या नात्याने ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या बरोबरीने एकदा काम केल्यावर हिंदुस्थानात त्यांच्याच हाताखाली असिस्टंट सर्जन म्हणून काम पत्करणें त्यांना अतिशय अपमानास्पद वाटत होतें. हिंदुस्थान सोडून बाहेर स्थायिक व्हावयाचा विचार मनात आल्यावर पेशावरच्या मुक्कामात काबूलला जाऊन तेथेच स्थायिक व्हावयाचें त्यांनी ठरविलें. त्या वेळच्या काबूलच्या अमिराला त्यांनी एक आवेदनपत्र पाठविलें. त्यात बोअर रणक्षेत्रावरील आपल्या काम-गिरीचा प्रामुख्याने उल्लेख करून असें लिहिलें होतें की, अफगाण सरकारला जर त्यांच्या नोकरीची आवश्यकता असेल व रणक्षेत्रा-वरील त्यांच्या अनुभवाचा आपल्या सेनाविभागात उपयोग करून

घ्यावयाचा असेल तर अत्यंत निष्ठेने अमिराची सेवा करण्याची त्यांची सिद्धता आहे. अमिराची तशी इच्छा नसली तर त्याने अफगाणिस्थानात स्थायिक होण्याची परवानगी देण्याची जरी कृपा केली तरी काबूल किंवा कंदाहार येथेच स्थायिक होऊन खाजगी प्रॅक्टिस करण्याची त्यांची तयारी आहे. हें आवेदनपत्र पाठविल्यावर रायबहादूर लाला लोरिंदामल प्रभृति त्यांच्या हितचिंतकांनी त्यांना त्या पत्राचें उत्तर येईपर्यंत पेशावर येथेच रहावयाचा आग्रह केला. डॉ. मुंजे त्या वेळी पाहुणे म्हणून रायबहादुरांच्याकडेच रहात होते. त्यांच्या सौजन्याचा वाजवीपेक्षा अधिक लाभ घेणें डॉक्टरांना उचित वाटेना. म्हणून त्यांनी रायबहादुरांना अशी विनंती केली की, मला एक स्वतंत्र भाड्याची जागा पाहून द्यावी. माझ्या आवेदनपत्राचें उत्तर येईपर्यंत मी स्वतंत्रपणेच तेथे राहीन.” रायबहादुर ऐकेनात. शेवटी डॉक्टर जेव्हा अगदी हट्टच धरून बसले तेव्हा मोठ्या अप्रसन्नतेने त्यांनी त्यांची विनंती मान्य केली व किस्सेखानी बाजार नांवाच्या एका लोकवस्तीत त्यांना स्वतंत्रपणे राहण्यासाठी एक सुरेख जागा पाहून दिली. अफगाणिस्थानच्या अमिराच्या उत्तराची वाट पहात तेथे डॉक्टरसाहेब एक महिनाभर राहिले. शेवटी उत्तर येईना म्हणून अमिराला स्मरणपत्रांवर स्मरणपत्रें पाठविण्याचा सपाटा डॉ. मुंजे यांनी चालविला. पण अक्षरपरब्रह्याप्रमाणे अफगाणिस्थानच्या अमिराची समाधि भंग पावेना व उत्तराचें कमलपत्र डॉ. मुंजे याच्या हातात येण्याचें चिन्ह दिसेना! इकडे डॉ. मुंजे यांचे वृद्ध वडील व त्यांच्या पत्नी डॉक्टरसाहेब परत कां येत नाहीत या काळजीने त्यांना पत्रावर पत्रें पाठवीत होतीं शेवटी दीड दोन महिने वाट पाहूनही अमिराकडून काहीच उत्तर न आल्यामुळे घरच्या पत्रांना मान देऊन अत्यंत अनिच्छेने डॉ. मुंजे बिलासपूरला परतले. आपला मुलगा काळाच्या दाढेतून सुखरूपपणे व कीर्ति घेऊन परत आलेला पाहून वृद्ध शिवरामपंतांना अतिशय आनंद झाला. त्यांनी डॉक्टरांना प्रयागला गेल्यावर समुद्रगमनाच्या पातकाबद्दल यथाविधि सक्षौर प्रायश्चित्त घ्यावयास सुचविलें होतें याचा उल्लेख मागे केलाच आहे. पण घरी परत आल्यावर त्यांनी या संबंधात चौकशी केली नाही. इतकेंच नव्हे, तर मी प्रायश्चित्त घेतलेलें नाही असें डॉक्टर म्हणत असता तिकडेही त्यांनी पूर्ण दुर्लक्ष केलें. त्याच दिवशी कोठेतरी ब्राह्मण भोजनाचा समारंभ असून तेथे शिवरामपंतांना जेवावयास जावयाचें होतें. त्यांनी प्रायश्चित्त न घेतलेल्या डॉक्टरांना पीतांबर नेसून जेवावयास नेलें. इतकेंच नव्हे, तर पंक्तीतल्या कर्मठ ब्राह्मणांनी या भ्रष्ट ब्राह्मणाचा केवळ पीतांबर पाहून त्यावरच समाधान मानलें.

प्रायश्चित्ताच्या भानगडीची चौकशीसुद्धा केली नाही. डॉक्टरसाहेबांचे संस्कृत व्याकरणाचे गुरु म. म. भट्टजीशास्त्री घाटे यांनी जलप्रवासाबद्दल कर्नल कुकडे यांच्या वडिलांना देहान्त प्रायश्चित्ताचा निर्णय देऊन फार दिवस लोटले नव्हते. पण तेवढ्या काळात परिस्थितीने इतकें परिवर्तन घडवून आणलें होतें.

काही दिवस बिलासपूरला पित्याजवळ राहून आपली पत्नी व मुलगी यांना भेटण्यासाठी डॉक्टरसाहेब नागपूरला आपल्या सासुरवाडीला आले. काही दिवस विश्रांतीत घालविल्यावर नागपूरलाच व्यवसाय सुरू करण्याचा त्यांनी निर्णय घेतला. सीताबर्डीवर मोदी लाइनमध्ये एक घर भाड्याने घेऊन त्यांनी आपलें रुग्णालय थाटलें व दि. १ जानेवारी १९०१-ला व्यवसाय प्रारंभ केला.

डॉ. मुंजे यांना औषध योजनेपेक्षा डोळ्यावरील शस्त्रक्रियेच्या विद्येची मनापासून हौस होती. नेत्ररोगचिकित्सक म्हणून कीर्ति मिळवावी व त्यावर स्वतंत्र संशोधन करावें अशी त्यांची मनीषा होती. पण शस्त्रक्रियेत कुशलता यावयास नुसतें ग्रंथवाचन व विचार यांचा उपयोग होत नसून प्रत्यक्ष हात बसावा लागतो. सवयीशिवाय हें हाताचें कौशल्य येणें शक्य नसतें. आपल्याकडे त्या वेळी शस्त्रक्रियेचा प्रकारच नवा असल्यामुळे त्या वेळचे लोक शस्त्रक्रिया शक्य तोवर टाळीत. विलायती औषधें पोटात घेण्याने धर्म बाटतो अशा समजुतीच्या त्या काळात शस्त्रक्रियेच्या प्रकारापासून लोक दूर राहणें स्वाभाविक होतें. शिवाय डॉक्टरांनी नुकतेंच व्यवसायात पदार्पण केलें होतें. अगदीच नव्या डॉक्टरला डोळ्यावरील शस्त्रक्रियेसारख्या नाजूक बाबीत अधिक रोगी मिळावे कसे? रोगी न मिळाल्यामुळे शस्त्रक्रियेत हात बसणें अडचणीचें झालें. शेवटी विचारान्ती डॉ. मुंजे यांनी आपली सवय व अभ्यास वाढवावयास्तव एक नवीच शक्कल शोधून काढली. त्या दिवसांत नागपुरातील सीताबर्डीच्या विभागात आठवड्यातून दोनदा बाजार भरत असे. डॉक्टरांनी एका मुसलमान वस्तादाशी असा करार केला की, प्रत्येक बाजाराच्या दिवशी त्याने यांना कसाईखान्यात मारलेल्या बोकडांची व शेळ्यांची सारीं मुंडकीं आणून द्यावीं व यांनी त्याला त्याच्या या कामगिरीबद्दल प्रत्येक मुंडक्याबाबत एक आणा द्यावा. त्या मुंडक्यांच्या डोळ्यांवर ऑपरेशन्सचे वेगवेगळे प्रयोग करून डॉक्टरांनी आपलें ईप्सित साध्य केलें. पण त्यातून एक नवीच भानगड काही दिवसांसाठी निर्माण झाली.

कट्टर धर्मनिष्ठांचें प्राबल्य व पारंपरिकांचें साम्राज्य असलेल्या पन्नास वर्षांपूर्वीच्या त्या काळात भर ब्राह्मणवस्तीत एका तरुण ब्राह्मण

डॉक्टरांच्या घरी रोज पडणारीं तीं बकऱ्यांच्या मुंडक्यांची रास पाहून सीताबर्डीची ब्राह्मण मडळी हादरून गेली. खवळलेल्या ब्राह्मण समाजाने मुंजे यांना जातिबहिष्कृत करून बर्डीवरून हुसकून देण्याची खटपट चालविली. मुंजे यांच्या कानावर हें प्रकरण जाताच त्यांनी साऱ्या प्रमुख मंडळींना एकत्र करून बकऱ्यांच्या मुंडक्यांचें खरें रहस्य समजावून सांगितलें. मग मात्र साराच अपसमज नष्ट होऊन पुनश्च डॉक्टरांना या संबंधात कोणीही त्रास दिला नाही. काम झाल्यावर तीं बकऱ्यांचीं मुंडकीं त्या वस्तादालाच परत करण्यात येत. बकऱ्यांचीं मुंडकीं झालीं तरी तीं निर्जीव होतीं. सजीव वस्तूवर प्रयोग केल्याविना डॉक्टरसाहेबांच्या मनाचें समाधान होईना. म्हणून त्यांनी आणखी एक नवा उपक्रम केला. त्यांनी रस्त्यावरचीं उनाड कुत्रीं पकडून आणावीं, त्यांना क्लोरोफॉर्म देऊन त्यांच्या एका डोळ्यावर ऑपरेशनचा प्रयोग करावा व नंतर त्यांना सोडून द्यावें. याप्रमाणे दीर्घ प्रयत्नाने व सततोद्योगाने डोळ्यांच्या शस्त्रक्रियेला लागणारें कौशल्य व स्थैर्य आपल्या हातांच्या व बोटांच्या ठिकाणी त्यांनी उत्पन्न केलें. तसेंच त्यांनी स्वत: शस्त्रक्रियेची एक नवीन पद्धति शोधून काढली. त्यांच्या त्या नव्या पद्धतीने मोतीबिंदूवरची त्यांची प्रत्येक शस्त्रक्रिया यशस्वी होऊ लागली. त्यांची कीर्ति सर्वत्र वाढून त्यामुळे व्यवसायात लवकरच चांगला जम बसला. व्यवसायाचा व्याप इतका वाढला की, सीताबर्डीवरील एका रुग्णालयाने त्यांचें काम भागेना. म्हणून त्यांनी शहरातील इतवारी विभागात आपलें दुसरें रुग्णालय थाटलें. सकाळी त्यांनी बर्डीवरील आपल्या मुख्य रुग्णालयात काम करावें व दुपारी इतवारीतील रुग्णालयात काम करावें.

डॉक्टरांना या वेळी पैसे चांगलेच मिळत असल्यामुळे त्यांची राहणी उच्च श्रेणीची, थाटामाटाची व तत्कालीन विचार प्रवाहानुरूप सर्वस्वी युरोपियन पद्धतीची झाली. व्यवसायात त्यांना कोणीही प्रतिस्पर्धी नसल्यामुळे संपत्तीच्या त्यांच्याकडे येणाऱ्या ओघात अडथळा असा नव्हताच. पण त्यामुळे अनेक लोकांच्या डोळ्यांत ते सलू लागले. अशा मत्सरग्रस्त लोकांच्या चिथावणीवरून म्हणा किंवा स्वयंप्रेरणेने म्हणा, पण एके दिवशी इतवारीतील काही मुसलमान बदमाशांनी त्यांना लुटण्याचा घाट घातला. हे बदमाश प्रतिदिनी नियमितपणे त्यांच्या रुग्णालयात येत व डॉक्टरसाहेब नसताना त्यांच्या उत्पन्नाची चौकशी करीत. खाजगी प्रॅक्टिस सुरू केल्यापासून डॉ. मुंजे यांनी प्रथमपासूनच वागण्याचा असा नियमच केला होता की, ते डोळ्याच्या कोणत्याही रोग्याच्या तपासणीची फी ५ रुपयांपेक्षा कमी मुळीच घेत नसत. जर एखादा

गरीब रोगी ही फी द्यावयास असमर्थ असला तर ते त्याची तपासणी अजिबात काही न घेता फुकट करून देत. पण फी कमी म्हणून घ्याव-याची नाही असा त्यांचा दंडक होता. तसेंच लोकांच्या प्रामाणिकपणावर विश्वासून राहावयाचें व ज्याचें त्याचें पापपुण्य ज्याच्या त्याच्या बरोबर या न्यायाने बिलाचे पैसे मागावयाचे नाहीत असा त्यांचा दुसराही दंडक होता. यामुळे त्यांचे अनेक वेळा शेकडो रुपयांचें नुकसान झालें आहे. पण त्यांची प्रॅक्टिस चालू होती तोपर्यंत व त्यानंतरही त्यांची ही सवय कधीही गेली नाही. असो.

एके दिवशी संध्याकाळच्या सुमारास उत्तम पोशाख केलेला एक मुसलमान गृहस्थ डॉ. मुंजे यांच्या सीताबर्डीवरील निवासस्थानी गेला व त्याने त्यांना एक रोगी तपासण्यासाठी स्वतःबरोबर येण्याची विनंती केली. येताना तो गृहस्थ आपल्याबरोबर टांगा घेऊनच आलेला होता व त्याने रोग्याच्या घरीच फी वगैरे ताबडतोब मिळेल असेंही न विचा-रता आपण होऊनच सांगितलें. डॉ. मुंजे यांना या प्रकारात काही कपट असण्याचा नुसता संशय येण्याचेंही काही कारण नव्हतें. त्यांनी आपला पोशाख चढवून नेहमीप्रमाणे आपली काठी ( walking stick ) घेतली व त्या गृहस्थाबरोबर टांग्यात बसून ते निघाले. टांगा जो निघाला तो कितीतरी लांब अंतर गेलें तरी थांबेचना. शेवटी नागपुरातल्या साऱ्या सभ्य लोकवस्ती सोडून टांगा गावाबाहेरच्या गुंडवस्तीतून जाऊ लागला तेव्हा मात्र डॉ. मुंजे यांना प्रथम आश्चर्य व नंतर संशय वाटू लागला. त्यांना वाटलें की, या झोपडयांमधून आपणांस आपली नियो-जित फी पांच रुपये देऊन मुद्दाम बोलाविणारा गृहस्थ राहणें शक्य तरी आहे काय ? व ज्याची इतकी फी देण्याइतकी सुस्थिति आहे तो गृहस्थ या झोपडयांमधून राहील तरी कशाला? काही तरी कपट असून अस्वा-भाविक व आकस्मिक संकटात आपण सापडणार आहोत असें या आश्च-र्याच्या मागोमागच त्यांना अंधुकपणे वाटू लागलें. पण कोणी आपल्याला उगाच काय म्हणून त्रास देईल ? आपलें व कोणाचें वाईट तर मुळीच नाही असा विचार त्यानंतर मनात येऊन त्यांना असें वाटू लागलें की, आपल्या मनोदौर्बल्यामुळे उगाच अस्थानी आपणांस संकटाचा वास येत आहे. त्यांनी भीति व संकटाचे सारे विचार जागच्या जागीच जिरवून टाकले व काय होतें तें पहात ते स्वस्थ राहिले. बराच वेळ तो टांगा चालून शेवटी एका पडक्या घराजवळ येऊन थांबला. टांग्यातून उतरताच त्या सोबतच्या मुसलमान गृहस्थाने डॉ. मुंजे यांना सांगितलें की, "रोगी वरच्या मजल्यावर असून तेथेच त्याला तपासण्यासाठी जावें लागेल."

त्या घराची ती अवस्था व बोलताना त्या मुसलमान गृहस्थाच्या आवाजात व चेहऱ्यात झालेला फरक यामुळे मग मात्र डॉ. मुंजे यांना आपल्या भोवती संकटाचें जाळें विणलें जात असल्याची खात्री वाटू लागली. डोळ्याच्या रोग्याला वर पडून राहण्याचें कारण काय ? असें डॉ. मुंजे यांनी त्या गृहस्थाला विचारलें. पण त्याने त्याचें काही समाधानकारक उत्तर न देता पुनश्च त्यांना लवकर आत चलण्याविषयी सुचविलें. त्याने वर आणखी " आपणांस दुसरा काही संशय येण्याचें कारण नाही. आम्ही फार सभ्य गृहस्थ आहोत व आपली जबाबदारी सर्वस्वी माझ्यावर आहे " असेंही दडपून सांगावयास कमी केलें नाही. त्या अवस्थेत खिशात पैसे घेतले नाहीत हें बरेंच केलें असें त्यांना वाटू लागलें. त्यांनी काही विशेष प्रसंगच आला तर चांगल्या जोरकस प्रतिकारावाचून आपण त्याला बळी पडू नये या आत्मविश्वासाने आपली काठी नीट हातात घेतली व त्या गृहस्थाला पुढे चलण्यास सांगितलें. त्या सभ्य पोशाख केलेल्या मुसलमान गृहस्थाचा वास्तविक धंदा व लोकांस जाळ्यात आणण्याची ही बदमाशीची तऱ्हा कळण्याची विचित्र उत्कंठा त्यांच्या मनात त्या वेळी जोराने उसळी मारू लागली. तो मुसलमान गृहस्थ पुढे झाला व डॉ. मुंजे त्याच्या मागोमाग जाऊ लागले. जिन्यातून वर जाताना डॉक्टरसाहेबांच्या दृष्टीस पडलें की, एक घाणेरडी, मळकट व फाटकी सतरंजी तेथे अंथरलेली असून भिंतीला टेकून तशीच मळकट व घाणेरडी उशीही ठेवलेली आहे. तेथे येताच त्या मुसलमान गृहस्थाने मोठ्या अजिजीच्या व नम्रतेच्या स्वरात डॉ.मुंजे यांना विनविलें की, "आपण थोडा वेळ या तक्क्याला टेकून बिछायतीवर बसावें, मी आत जाऊन रोग्याला घेऊन येतो. " " दगलबाज दूना नमे " या कक्षेतली त्याची ती उसनी अजिजी व नम्रता पाहून त्या स्थितीतही डॉक्टरसाहेबांना फार गंमत वाटली. ते बिछायतीवर बसले. आत जाऊन त्या गृहस्थाने कोणाच्या तरी नांवाने जोरजोराने बराच शंखनाद केला. त्याला कोणीही प्रत्युत्तर मात्र दिलें नाही. कितीतरी वेळ डॉक्टरसाहेब तिथे बसून होते. तो गृहस्थही बाहेर येईना व रोग्याचा तर मुळीच पत्ता नव्हता. बऱ्याच वेळानंतर तीन मुसलमान तरुण बाहेर आले. त्यांच्या चेहऱ्यावरून व पोशाखावरून ते अट्टल बदमाश दिसत होते. त्यांनी डॉक्टरसाहेबांना मिस्किलपणाने हात जोडले व मोठ्या नम्रतेचा आव आणून सांगितलें की, " आपली पुष्कळ वेळ खोटी झाली, माफ करा. रोगी कुठेतरी बाहेर गेला आहे, आपण थोडा वेळ थांबा ; तो इतक्यात येईलच. " आपण बदमाशांच्या तावडीत सापडलो आहोत हें त्यांनी

पूर्णपणे ओळखलें. पण त्यांच्या साहसी स्वभावानुसार कोणत्याही परिस्थितीत ते घाबरणें शक्य नव्हतें. आपल्या चेहऱ्यावर त्यांनी कोणताच भाव दिसू दिला नाही. फक्त आपली काठी मात्र सावरून बळकटपणे त्यांनी आपल्या हातात घेतली. त्या लोकांनी थोडया वेळाने अत्तर गुलाब व पानसुपारी आणली. डॉक्टरसाहेबांना पानसुपारी देऊन त्यांना बोलवावयास आलेला गृहस्थ त्यांना म्हणू लागला की, रोग्याचा अजून पत्ता नसल्यामुळे आपला वेळ फार कंटाळवाणा जात असेल. आपण पत्ते खेळू या." मुंजे यांनी नकार देताच आवाजात करडेपणा आणून त्यांना पत्त्यांचा जुगार त्यांच्याबरोबर खेळलाच पाहिजे असें सांगितलें. त्याच्यापेक्षाही आपला आवाज चढवून ते आपली काठी घेऊन उठले व जावयास निघाले. त्यासरशी त्यांच्या कपडयांना अत्तर लावण्याच्या मिषाने त्याने त्यांच्या खिशात हात घातला. तो काय करीत आहे हें डॉक्टरांच्या ध्यानात आलें. पण पैशाचें पाकीट न घेताच निघाल्यामुळे डॉक्टर पूर्णपणे निर्धास्त होते. डाव पूर्ण फसला हें पाहून ती मंडळी ओशाळली. त्या गडबडीत डॉक्टर एकदम खाली आले. दुसरे दिवशी त्यांनी सिटी सुपरिंटेंडंट ऑफ पोलिसला तें वृत्त कळविलें. तो स्वतः मुसलमान होता. त्या अट्टल बदमाशांना तो ओळखत होता. त्याने पुन्हा एकटे असें जाऊ नये म्हणून डॉक्टरांना सुचविलें व त्या बदमाशांना पोलिस ठाण्यात बोलावून खरपूस चोप दिला, व धमकी देऊन हाकलून दिलें.

काही दिवसांनंतर डॉक्टरांच्या वर्डीवरील मुख्य रुग्णालयाचें काम अतोनात वाढल्यामुळे त्यांनी आपलें इतवारीतील रुग्णालय बंद केलें. व्यवसायाचा व्याप इतका वाढला असताना सुद्धा त्यांच्या दैनंदिन व्यायामात कधीही अंतर पडलें नाही. जोर, बैठका इत्यादि व्यायाम तर ते घेतच; पण सकाळी नियमाने लाकडें फोडीत असत. एकदा लाकडें फोडीत असता त्यांनी एक नाग मारला होता. दाढी राखण्याचा नाद त्यांना त्या वेळी होता; पण त्या वेळची ती दाढी पुढे त्यांच्या प्रसिद्ध असलेल्या दाढीसारखी ऋषिमुनींच्या पद्धतीची नसून ते इंग्रजी पद्धतीची खालच्या हनुवटीवर केवळ छोटी दाढी राखीत. त्यांचा पोशाख इंग्रजी पद्धतीचाच असे. संध्याकाळी ते महाराजबाग क्लबमध्ये नियमितपणे टेनिस खेळावयास जात असत. नागपुरातील तत्कालीन जिल्हा न्यायाधीश रायबहादूर संन्याल, रावबहादूर रामकृष्णराव पंडित, दादासाहेब सुभेदार, चांदूरकर, बॅ. रामदास, सुधारकाग्रणी, वामनराव कोल्हटकर ( विख्यात अच्युत बळवंत कोल्हटकर यांचे वडील ) बॅ. चक्रवर्ती इत्यादि नागपूरच्या जीवनातील थोर व नामवंत मंडळी त्या

क्लबमध्ये नियमितपणे जात असत. मुंजे यांच्या टेनिसमधील प्रावीण्यामुळे या मंडळींत त्यांचा जम चांगलाच बसला. या मंडळींच्या महाराज बाग क्लबमध्ये नेहमी पार्ट्या झडत व सगळ्यांनाच कमालीचें दारूचें व्यसन होतें. सुधारक व सनातनी असे या क्लबचे सभासद सारखेच मदिराभक्त होते. सुभेदार इत्यादि कट्टर सनातनी मंडळी इतकी मदिराभक्त होती की, त्यांना दैत्यगुरु शुक्राचार्यांचीच उपमा शोभावी! चतुर्थीचा अगदी निर्जल असा उपवास करावा. बाहेर जाताना बैलगाडीच्या चाकाएवढें भलें अगडबंब पागोटें घालावें, भस्माच्या छटा कोपऱ्यात दिसताहेत अशा भव्य कपाळावर या कानापासून त्या कानापर्यंत लांब आडवें त्रिपुंड्र गंध लावावें व क्लबमध्ये दारू पिऊन निश्चेष्ट पडावें असा या मंडळींतील पुष्कळांचा खाक्या होता. डॉ. मुंजे मात्र अशा मंडळीत राहूनही दारूपासून सर्वस्वी अलिप्त राहिले. या क्लबमध्ये फुटबॉल व हॉकीसारख्या खेळांना स्थान नव्हतें. तेथील सभासदांच्या प्रौढपणामुळे तें शक्यही नव्हतें. तरुण डॉ. मुंजे यांनी त्या दृष्टीने वेगळा जिमखाना काढण्याचा प्रयत्न चालविला. पण लब्धप्रतिष्ठितपणाच्या कल्पनेमुळे त्यांना हिंदु विद्यार्थ्यांतून कोणी सहकारी मिळू शकले नाहीत. शेवटी हिस्लॉप कॉलेजमधील ख्रिश्चन व मुसलमान विद्यार्थ्यांची एक चमू त्यांनी तयार केली व खेळासाठी महाराज बाग क्लबमधील त्यांचे मित्र श्रीमंत गोपाळराव बुटी यांच्याकडून निडहॅम पार्कची जागा मागून घेतली. आपसांत वर्गणी गोळा करून त्यांनी तेथे एक टिनशेड बांधली व अशा रीतीने नागपुरातील पहिला जिमखाना तयार झाला. या जिमखान्यात स्वत: डॉक्टरसाहेब मर्दानी खेळ खेळावयास प्रतिदिनी जात.

नागपुरात स्थायिक झाल्यावर पहिल्याच वर्षी 'बोअर युद्ध' या विषयावर डॉक्टरसाहेबांचें हिस्लॉप कॉलेजमध्ये इंग्रजीत व्याख्यान झालें. कॉलेजचे प्रिन्सिपॉल व्हिटनसाहेब हे अध्यक्षस्थानी होते. या प्रसंगी एके काळी नागपूरच्या राजकारणात आपल्या धारदार वक्तृत्वाने चमकलेले व पुढे लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर या ना त्या कारणास्तव राजकारणाचा संन्यास घेतलेले श्री. नारायणराव अळेकर वकील यांची व डॉक्टरसाहेबांची एका विचित्र पद्धतीने ओळख झाली. व्याख्यान संपल्यावर डॉक्टरसाहेब सहज कॉलेजच्या सभागृहात उभे असताना त्यांच्या भोवती असलेल्या घोळक्यात उभे असलेले तरुण वकील नारायणराव अळेकर त्यांना म्हणाले, "Do you think you are transparant ?" त्यावर डॉक्टरांनी त्यांना विचारले, "Can't you speak like a gentleman ?"

नागपूरला स्थायिक होण्यापूर्वी डॉक्टरसाहेबांना एक मुलगी असल्याचा मागे उल्लेख केलाच आहे. नागपूरला स्थायिक झाल्यावर पहिल्या आठवड्यातच त्यांना मुलगा झाला. तेच बादलराव होत. या प्रमाणे सुखी, समृद्ध व संपन्न जीवन नागपूरला घालवीत असतानाच त्यांनी स्मिथ थिअरी या नांवाने प्रसिद्ध असलेला नेत्रवैद्यकाच्या शस्त्रक्रियेच्या क्षेत्रातील आपला विख्यात शोध लावला. इ. स. १९०३-मध्ये डॉक्टरांनी हा शोध लावला. या त्यांच्या शोधावर त्यांनी इंग्रजीत पुस्तक न लिहिता तें भारताची राष्ट्रभाषा जी संस्कृत त्या भाषेत लिहिलें. त्याचें वृत्त पुढील प्रकरणात देऊ.

✦ ✦ ✦

प्रकरण सहावें

# संशोधक डॉ. मुंजे

डॉ. मुंजे यांनी एका खाटकाशी करार करून बकऱ्यांचीं मुंडकीं व उनाड कुत्रीं यांच्यावर प्रयोग करून आपला नेत्रशस्त्रक्रियेचा अभ्यास चालविला होता याचा निर्देश मागच्या प्रकरणात केलाच आहे. इ. स. १९०३ मध्ये त्यांनी स्मिथ थिअरी या नांवाने जो शोध लावला त्याचे त्यांनी स्वत: मला सांगितलेलें वृत्त पुढीलप्रमाणे आहे. "मी ज्या वेळी मुंबई येथे ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये शिकत होतो त्या वेळी मला औषधि विभागापेक्षा (medicine) शस्त्रक्रियेच्या विषयात (Surgery) विशेष गोडी वाटत असे. या माझ्या विशेष आवडीनुरूप मी शेवटच्या परीक्षेचा निर्णय होईपर्यंत जनरल सर्जन व ऑप्थॉल्मिक यांच्या क्लिनिक्समध्ये नेहमी जात असे व तेही मला आपल्या विद्यार्थ्याप्रमाणे मोठ्या प्रेमाने शिकवीत असत. त्या वेळी सर्जन ट्रीट हे साहाय्यक सर्जन होते व त्यांच्या बहुतेक शस्त्रक्रियांच्या वेळी ते मला क्लोरोफॉर्म द्यावयास सांगत असत. त्याचप्रमाणे डोळ्याची शस्त्रक्रिया करणारे सर्जन डॉ. हर्बर्ट यांच्याही डोळ्याच्या क्लिनिक्समध्ये डोळ्यावरील शस्त्रक्रियांच्या वेळी मी नेहमी उपस्थित राहत असे. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी की शेवटी ज्या दिवशी परीक्षेचा निर्णय लागला त्याच्या दुसऱ्या दिवसापासून या दोघांही शस्त्रवैद्यांनी त्यांच्या क्लिनिक्समध्ये मी येऊ नये अशी इच्छा दर्शविली. परीक्षेच्या निर्णयात ग्वाल्हेरचे डॉ. आपटे हे पहिले व मी दुसरा आलो. दोघाही सर्जन्सच्या इच्छेनुरूप त्यांच्या त्यांच्या क्लिनिक्स-मध्ये माझें उपस्थित राहणें बंद झालें. त्यानंतर मुंबई महानगरपालिके-मध्ये प्लेग मेडिकल ऑफिसरचें काम करीत असता विद्यार्थी मित्रांच्या आग्रहावरून मी शस्त्रक्रियेच्या पारितोषकासाठी स्पर्धापरीक्षेला बसलो. माझ्याबरोबर माझे मेव्हणे डॉ. कृष्णराव पारधी व इतर मंडळीही परी-क्षेला बसली होती. ग्वाल्हेरचे उपर्युक्त डॉ. आपटे हे औषधि विभागाच्या पारितोषकासाठी याच वेळी स्पर्धापरीक्षेला बसले होते. त्यांच्यात व माझ्यात असा फरक होता की, ते माझ्याप्रमाणे दुसऱ्या कोणत्याही उद्योगात नसून केवळ परीक्षेच्या अभ्यासातच मग्न असत. त्यांचा क्रमांक पहिला येऊन त्यांना पारितोषक मिळालें. माझी स्थिति निराळी होती.

मी नोकरी करण्यावाचून माझें, माझ्या आईचें व धाकटचा बंधूचें चालण्यासारखें नव्हतें. या नोकरीत बराच वेळ जात असल्यामुळे माझ्या मनात परीक्षेला बसण्याची कल्पनाही नव्हती. तरी पण मित्रांच्या आग्रहावरून मी परीक्षेला बसलो. डॉ. मसीना हे आमचे सर्जन व त्या परीक्षेचे मुख्याधिकारी होते. लेखी परीक्षेचे प्रश्न मी यथातथा सोडविले, परंतु शस्त्रक्रियेच्या प्रयोगाच्या पूर्वीच्या क्लिनिक्समधील प्रत्यक्ष अनुभव असल्यामुळे प्रायोगिक शस्त्रक्रियेच्या विषयात मला पूर्ण गुण मिळाले. प्रायोगिक परीक्षेत माझा पहिला क्रमांक आल्याबद्दल सुवर्णपदकही मिळालें. यानंतर नागपुरात येऊन खाजगी व्यवसाय सुरू करीपर्यंत डोळयाच्या शस्त्रक्रियांचा मला प्रत्यक्ष अनुभव घेता आला नाही. नागपुरात व्यवसाय सुरू करण्यापूर्वी मी माझ्या वडिलांना भेटावयास्तव बिलासपूरला गेलो. तेथून जवळच रतनपूर येथे माझ्या वडिलांचे दत्तात्रेय महाराज या नांवाचे आध्यात्मिक गुरु राहत असत. वडिलांनी मला अतिशय आग्रह करून आपल्या या गुरुमहाराजांच्या डोळयातील मोतीबिंदूवर शस्त्रक्रिया करावयास सांगितलें. त्यांच्या आग्रहासाठी मी होकार दिला. परंतु हाताने प्रत्यक्ष शस्त्रक्रिया करावयाचा हा माझा पहिलाच प्रसंग होता. ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये आमच्या वेळी इंग्रज सर्जनशिवाय अन्य कोणालाही डोळयावर शस्त्रक्रिया करू देत नसत. त्यामुळे मला शस्त्रक्रिया फक्त पाहण्याचा अभ्यास होता, प्रत्यक्ष करण्याचा नाही. वडिलांच्या आग्रहास्तव सर्जरीच्या ग्रंथात सांगितल्याप्रमाणे मी शस्त्रक्रिया करू लागलो. पण मी इतका पुस्तक-परतंत्र होतो की ज्याने शस्त्रक्रिया करावयाची त्या चाकूला टोक असलें पाहिजे असें पुस्तकात लिहिलें नसल्यामुळे मी टोक नसलेलाच चाकू वापरला. इतर सर्व गोष्टी व्यवस्थित केल्यावर मी चाकू डोळयाला लावला तों तो आत शिरेचना. टोक असलेला चाकू वापरण्याची साधी गोष्ट न सुचल्यामुळे शेवटी सारें व्यर्थ होऊन माझी चांगलीच फजिती झाली. वडिलांच्या तें लक्षात आल्यावर काय समजावयाचें तें समजून त्यांनी मला राहू दे म्हणून सांगितलें. मी मनातून चांगलाच खजील झालो. पण वरवर अजून ऑपरेशनची वेळ यायची आहे. दोन महिन्यांनी या. मी ऑपरेशन करीन असें सांगून कशी तरी वेळ मारून नेली. पण माझ्या मनाला ती गोष्ट चांगलीच लागली होती. थोडा विचार केल्यावर टोक नसलेला चाकू वापरण्याची चूक माझ्या लक्षात आली व पुस्तकी ज्ञानाची व्यर्थता उमगली. यानंतर नागपूरला स्थिर झाल्यावर मी बकऱ्यांची मुंडकी व कुत्रीं यांच्यावर प्रयोग करून प्रथम माझा हात मी निष्णात

केला. सन १९०३ मध्ये एका योगायोगाने नेत्रशस्त्रवैद्यकाच्या शास्त्रांत एक स्वतंत्र पद्धति मी शोधून काढली. तो योगायोग असा :

एके दिवशी एका रोग्याच्या मोतीबिंदूवर चाकू खुपसून मी शस्त्रक्रिया करीत असताना स्पेक्यूलम् डोळ्यात असतानाच रोग्याने मोठ्या जोराने डोळा मिटावयाचा प्रयत्न केला. त्याबरोबर सबंध मोतीबिंदु, वरचें कॅपसूल न तुटता बाहेर निघून आला. लगेच मी डोळ्यात औषध टाकून व पट्टी बांधून रोग्याला निजविलें. या घटनेचें मला मोठें आश्चर्य वाटलें. तपासल्यावर असें लक्षात आलें की सबंध मोतीबिंदु कॅपसूल न तुटता बाहेर निघून आलेला आहे व त्यामुळे डोळ्याला कोणत्याही प्रकारची इतर इजा झालेली नाही. मग विचार करू लागलो की, अशा प्रकारे कॅपसूल न तुटता जर मोतीबिंदु आपोआप बाहेर निघू शकतो तर तो तसाच कां काढू नये? नेहमीची पद्धति कॅपसूल तोडून मोतीबिंदु बाहेर काढण्याची आहे. त्यामुळे या मोतीबिंदूचे अनेक छोटे भाग आत तसेच राहून दोष राहून जातात. कॅपसूल न तोडता संबंध मोतीबिंदु प्रयत्न केल्यास काढता येणें शक्य आहे असें मला या घटनेनंतर नक्की वाटू लागलें. म्हणून या वेळेपासून जे रोगी येत असत त्यांच्यावर सबंध मोतीबिंदु कॅपसूल न तोडताच काढण्याचे मी प्रयोग केले. आश्चर्याची गोष्ट ही की विशेष त्रास वा इजा न होताच मोतीबिंदु तसाच निघू लागला. या प्रत्येक घटनेचा संपूर्ण बरावाईट वृत्तान्त लिहून ठेवण्याची मी दक्षता घेत होतो. या प्रकारे दोनशे ते अडीचशे घटनांचे संपूर्ण वृत्तान्त मी लिहिल्यावर या माझ्या नव्या संशोधनावर एक निबंध वाचावा असें ठरवून मी तो लिहिला व मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजच्या मेडिकल ॲसोसिएशनसमोर तो वाचला. तेव्हा तेथल्या सगळ्या नामवंत डॉक्टरांना मोठें आश्चर्य वाटलें. दुर्दैवाने त्या काळात ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये इंग्रज सर्जनावाचून दुसऱ्या कोणालाही डोळ्यावरील शस्त्रक्रिया करण्याची बंदी असल्यामुळे माझ्या संशोधनाचें प्रात्यक्षिक मला तेथे दाखविता आलें नाही. मात्र त्या वेळेपासून पुढे मी याच पद्धतीने शस्त्रक्रिया करू लागलो. मेडिकल ॲसोसिएशनसमोर माझा निबंध वाचला जाऊन त्यातील सिद्धान्त महत्त्वपूर्ण ठरल्यावर अर्थातच तो प्रसिद्ध झाला. पुढे कित्येक दिवसांनी जालंधरचे कॅ. स्मिथ यांनी असें प्रसिद्ध केलें की, ही शस्त्रक्रियेची पद्धति मी पूर्वीच शोधून काढली आहे. त्यांचें निवेदन माझ्या वाचनात आल्यावर मी त्यांना जाहीरपणे असें उत्तर दिलें की, तुमचा शोध जर पूर्वीचा आहे तर तो तुम्ही मेडिकल

असोसिएशनसमोर मांडून प्रसिद्ध करणें अवश्य नव्हतें काय? येथे कोणासही या पद्धतीचें ज्ञान नाही हें स्पष्ट आहे. तेव्हा माझा शोध हा मेडिकल असोसिएशनसमोर आलेला पहिलाच शोध आहे. शेवटी दोघांचेंही संशोधन स्वतंत्र आहे असें मानून हा वाद मिटला. पुढे काही लोकांनी या प्रक्रियेच्या प्रात्यक्षिकासंबंधी संशय व्यक्त केल्यावर नामवंत डॉक्टर्ससमोर मी हें प्रात्यक्षिक करून दाखविलें. वस्तुतः हें संशोधन मुंजे थिअरी या नांवानेच रूढ व्हावयास पाहिजे होतें. पण त्या वेळचा कालमहिमा व माझें भारतीयत्व माझ्या आड आलें. कॅ. स्मिथ हा जन्माने इंग्रज असल्यामुळे, मी जन्माने काला आदमी असल्यामुळे आणि ते १९०३-चे दिवस असल्यामुळे हें संशोधन मुंजे थिअरीऐवजी स्मिथ थिअरी या नांवाने रूढ झालें."

नेत्रशस्त्रवैद्यकाच्या शास्त्रातील या संशोधनानंतर डॉ. मुंजे यांचें नांव व प्रतिष्ठा सर्वतोमुखी झाली. पण त्यांच्या तीक्ष्ण बुद्धीला, अभिजात ज्ञानपिपासेला व दीर्घोद्योगी स्वभावाला तेवढ्याने कृतकृत्यता वाटणें शक्यच नव्हतें. पाश्चात्य वैद्यकाहूनही आर्य वैद्यकात अधिक मूलग्राही-पणा आहे अशी त्यांची कल्पना होती. यास्तव भारतीय औषधिविज्ञान व चिकित्साशास्त्र यांचा सूक्ष्म अभ्यास करून पौरस्त्य व पाश्चिमात्य वैद्यकाचे सिद्धान्त तौलनिक पद्धतीने मांडणारा ग्रंथ लिहावा असें त्यांच्या मनाने घेतलें. त्यांचें संस्कृत मुळात चांगलें होतें. कै. महामहोपाध्याय भट्टजीशास्त्री घाटे यांच्यासारख्या महापंडिताजवळ त्यांनी संस्कृतचा अभ्यास केला होता याचा निर्देश मागे केलाच आहे. आता त्यांनी आयु-र्वेदाच्या अभ्यासास प्रारंभ केला. पुढे इ.स. १९०५-मध्ये डॉक्टरसाहेब राजकारणाच्या क्षेत्रात पडले. त्या क्षेत्रातील त्यांचा व्याप इतका वाढत गेला की रुग्णालयाला नित्यासाठी कुलूप ठोकून व घरादारावर तुळशी-पत्र ठेवून ते त्या जीवनाच्या अंतापर्यंत खोलवर बुडून राहिले. तरी पण त्यांची स्वभावसिद्ध उरकशक्ति अत्यंत प्रभावी असल्यामुळे या साऱ्या व्यापातूनही वेळ काढून त्यांनी आपलें संशोधन व अभ्यास हे चालूच ठेवले. सतत पंचवीस वर्षें व्यासंग केल्यावर त्यांनी नेत्रचिकित्सा या विषयावर तौलनिक पद्धतीने ग्रंथनिर्मिति करावयाचें ठरविलें. वस्तुतः कालमाहात्म्याच्या दृष्टीने असा ग्रंथ कोणीही इंग्रजी भाषेतच लिहिला असता. पण त्यांचा राष्ट्राभिमान अत्यंत उत्कट असल्यामुळे व संस्कृत हीच भारताची राष्ट्रभाषा व्हावी असा त्यांचा सिद्धान्त असल्यामुळे, इंग्रजीतून ग्रंथ लिहिण्यामुळे होणारे सारे लाभ सोडून देऊन त्यांनी संस्कृतमध्येच ग्रंथरचना करावयाचें ठरविलें. तदनुसार इंग्लंडमध्ये

गोलमेज परिषदेच्या वेळी भयानक राजनैतिक संघर्षाच्या ऐन धुमश्चक्रीत त्यांनी आपल्या चिकित्साशास्त्राचा पहिला भाग संस्कृतमध्ये लिहिला व तो 'नेत्रचिकित्सा' या नांवाने पुण्याच्या चित्रशाळा मुद्रणालयाच्या वतीने दि. १४ सप्टेंबर १९३० ला प्रसिद्ध केला. या ग्रंथाला कै. दादासाहेब खापर्डे यांनी इंग्रजीत प्रस्तावना लिहिली असून ग्रंथकार डॉ. मुंजे यांनी आपलें इंग्रजी निवेदनही जोडलें आहे. या निवेदनात डॉक्टरसाहेब लिहितात "माझी आठवण जर नीट असेल तर आज त्या गोष्टीला निश्चितपणे पंचवीस वर्षे झालीं आहेत. त्या वेळी टाइम्स ऑफ इंडिया या वृत्तपत्राच्या एका अंकात त्या वेळचे मुंबईचे सर्जन जनरल कर्नल जॅक्सन आय्. एम्. एस्. यांनी मुंबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्ये आयुर्वेदाच्या औषधि-विज्ञान पद्धतीवर केलेल्या भाषणाचें वृत्त प्रसिद्ध झालें होतें. तें माझ्या वाचनात आलें. विधिमंडळातील एक सभासद आयुर्वेदीय औषधिविज्ञान-पद्धतीचें महत्त्व सांगून तिचा सिद्ध अधिकार म्हणून सरकारने तिच्या विकासासाठी आर्थिक व इतर साह्य करणें आवश्यक आहे असें ठासून सांगू लागला असता त्याला उत्तर म्हणून तें भाषण होतें. आपल्या भाषणात सर्जन जनरल महाशयांनी आयुर्वेदीय औषधिविज्ञान कुच-कामाचें, अनुपयुक्त व विचारार्ह नसलेलें, इतकेंच नव्हे तर लक्षही देण्यास पात्र नसलेलें असल्याचा आपला अभिप्राय व्यक्त केला होता. तें भाषण वाचल्यावर मला आश्चर्याचा धक्का बसला. इतकेंच नव्हे तर माझी जिज्ञासा चाळवली गेली.

ज्या पद्धतीने सहस्रों वर्षे मानव जातीची अनुपम सेवा केली व सर्व आधुनिक औषधिविज्ञानपद्धतींची जिला जननी म्हणावें लागेल ती आयुर्वेदीय औषधिविज्ञानपद्धति पूर्णपणे धिक्कारणें व विस्मरणयोग्य पदार्थांच्या अंधाऱ्या गदळात ढकलून देणें कसें योग्य आहे हें मला समजेना. सरकारी क्षेत्रात विशेषाधिकार प्राप्त झालेल्या सद्‌गृहस्थाने इतक्या थिल्लरपणाने केलेला हा अधिक्षेप माझ्या मनाला सामान्यपणे तर जाण-वलाच; पण त्याने माझा सांस्कृतिक व राष्ट्रीय अभिमानही अतिशय दुखावला गेला.

या माझ्या सांस्कृतिक व राष्ट्रीय अभिमानावर झालेल्या तीव्र आघातानेच आयुर्वेदाच्या सूक्ष्म अभ्यासास मला प्रवृत्त केलें. मी आयु-र्वेदाचे प्रमाण ग्रन्थ असलेल्या चरक व सुश्रुत संहितांच्या अभ्यासास प्रारंभ केला. वस्तुतः या महान् संहितांचा अभ्यास तर दूरच राहिला; पण त्यांच्याकडे डोळे उघडून पाहण्याइतकीही मला त्या वेळी सवड नव्हती. माझें रुग्णालय व व्यवसाय त्या वेळी इतक्या वर्धिष्णु अवस्थेत होते की,

इतर कशाकडेही लक्ष देणें मला अशक्य मात्र होतें. तरी पण माझ्या स्वाभिमानावर झालेला हा आघात मला स्वस्थ बसू देईना. व म्हणून मी या अभ्यासाकडे वळलो. संहिता पाहताच माझ्या ज्ञानलालसेच्या मार्गात असलेली भाषेच्या अडचणीची विपत्ति माझ्या ध्यानात आली. जरी मी माझ्या महाविद्यालयीन जीवनात संस्कृतचा विचक्षण विद्यार्थी म्हणून प्रसिद्ध होतो; तरी पण चरक व सुश्रुत संहितेतील छंदोबद्ध व विशेष प्रकारची पारिभाषिक भाषा सहजासहजी मला समजणें शक्यच नव्हतें. ती समजायला मला अतिशय अवघड जाऊ लागलें व काम कठीण होऊन बसलें. परंतु माझ्या स्वाभिमानावरचा आघात इतका तीव्र होता की माझा अभ्यासाचा उत्साह मंदावला नाही व त्रासून मी काम सोडलेंही नाही. अनेक वेळा कित्येक वाक्प्रयोगांच्या अर्थासंबंधात मी अडे व तंडेही. या वाकप्रयोगांच्या अर्थासंबंधात एका बाजूला व्यावसायिक व निष्णात वैद्यांशी आणि दुसऱ्या बाजूला मोठमोठ्या महामहोपाध्यायांशी चर्चा करण्यात मी तासन् तास घालविले आहेत.

याप्रमाणे दीर्घकालीन सततोद्योगाच्या भरंवशावर हळूहळू संहितांच्या भाषेचें गूढ मला उकललें. तसेंच मेडिकल कोर्ससाठी म्हणून आर्टस् कॉलेज सोडल्यापासून अनेक वर्षेपर्यंत वाचण्याची व उपयोग करण्याची पाळीच न आल्यामुळे संस्कृत भाषेचें माझें ज्ञान जें अगदी मंद झालेलें व धुरकटलेलें होतें त्यालाही भरपूर उजळा मिळाला.

हा सततोद्योग प्रारंभ करते वेळी तो व्यर्थ आहे असें जें वाटत होतें तो सफळ झाल्यावर मात्र मला कल्पनातीत यश मिळाल्यासारखें वाटलें. माझें औत्सुक्य फार वाढलेलें होतें व या अभ्यासाने माझ्या दुखावलेल्या स्वाभिमानाची जखम पूर्णपणे भरून येऊन मला जें समाधान वाटलें त्यातून उत्पन्न झालेल्या आनंदाची ऊर्मि खरोखरी मर्यादातीत होती. मला असें आढळून आलें की, सांप्रदायिक ध्येयवादाच्या संघर्षातून व भिन्नभिन्न तत्त्वज्ञानांच्या पद्धतींनी त्यावर उभारलेलीं भिन्नभिन्न समाजशास्त्रें यांमुळे जो अंत:कलह उत्पन्न झाला त्यामुळे सारा देश जसा अध:पतित झाला तशीच दोन हजार वर्षांपासून जसें इतर शास्त्रांचें तसेंच आयुर्वेदाच्या शास्त्राचेंही प्रगतीचें सूत्र तुटलें व तें तसेंच तुटलेलें राहिलें आहे. एकंदर दोन हजार वर्षांपासून सुरू झालेल्या या भयानक राष्ट्रीय अध:पतनाबद्दल कोण्या एकाला कसें काय जबाबदार धरावें? हिमाचलापासून तो कन्याकुमारीपर्यंत दक्षिणोत्तर व सिंधपासून पूर्वबंगाल आसामपर्यंत पूर्वपश्चिम प्रदेशावर ज्या रानटी व पशुतुल्य आक्रमणाने एक हजार वर्षेपर्यंत स्थिरपद होऊन राष्ट्र बुडविलें व ज्याच्यातून

तें डोकें वर काढू शकलें नाही त्या पशुतेला प्रेम व अहिंसेने जिकावें असें सांगणारा महात्मा गांधींचा सांप्रदायिक ध्येयवाद व तत्त्वज्ञान व त्याचा अभूतपूर्व प्रचार हें जुन्या राष्ट्रीय अधःपतनाला कारणीभूत होणाऱ्या विचारप्रणालीचेंच एक मळसूत्र होय हें ध्यानात ठेवलें म्हणजे जुन्या काळी दोन हजार वर्षांपूर्वी जें काय राष्ट्रीय अधःपतन झालें त्याची कल्पना करता येते. असो.

चरक व सुश्रुत संहितांत प्रतिपादन केलेल्या औषधि विज्ञान पद्धतीच्या व शस्त्रक्रिया पद्धतीच्या बाबतीत येथे फारसें खोलात शिरून प्रत्येक बाबीचें सर्वांगपूर्ण दिग्दर्शन करण्याचा मोह टाळूनही मी येथे चरक व सुश्रुत संहितांच्या काळीही आयुर्वेदाचा विकास किती श्रेष्ठ प्रतीचा झाला होता हें एका उदाहरणावरूनच सांगतो.

मला सुश्रुत संहितेचा अभ्यास करताना असें आढळून आलें की, The system of oppthalmology सुश्रुत संहितेमध्ये आहे. कोणताही पूर्वग्रह मनात न ठेवता सत्यतेने व प्रामाणिकपणेच सांगावयाचें तर मला असें सांगता येईल की, आयुर्वेदातील system of oppthalmology ही आज विकसित होऊन (Opthalmoscope) या नांवाने प्रसिद्ध असलेल्या व सुमारे ऐंशी वर्षांपूर्वी Helmhaltz या जर्मन Savant ने लावलेल्या शोधापूर्वी आधुनिक पाश्चात्य पद्धति ज्या प्रकारची होती त्याच प्रकारची होती असें म्हटलें तर त्यात काही अतिशयोक्ति व्हावयाची नाही. दोन्ही पद्धतींचा अभ्यास करणाऱ्या अभ्यासकाला जर दोन पद्धतीत स्पष्ट व महत्त्वाचा कोणता फरक लक्षात येत असेल तर तो हा की, आयुर्वेदाच्या System of oppthalmology मध्ये जीं रोगांचीं नांवें दिलेलीं असतात तीं रोगांच्या चिह्नांवर आधारलेलीं व स्पष्ट निदर्शक असतात तर आधुनिक पाश्चात्य पद्धतीत ती शरीरशास्त्रावर आधारलेलीं असतात. उदाहरणार्थ, आयुर्वेदीय पद्धतीने दिलेलें एका रोगाचें "अजका" हें नांव पहा. या रोगाचें आयुर्वेदात दिलेलें लक्षण पाहिलें तर आधुनिक पाश्चात्य पद्धतीत ज्याला Prolapse of Iris म्हणतात त्याच रोगाचें हें आयुर्वेदीय नांव आहे असें आढळून येईल.

प्रस्तुत नेत्रचिकित्सा पुस्तक एकंदर तीन विभागांतून प्रसिद्ध करावयाचें असें मी ठरविलें आहे. (१) हा जो पहिला भाग प्रसिद्ध होत आहे त्यात शरीरशास्त्र (Anatomy), सामान्य प्राणिधर्मगुणज्ञान (General Physiology) सामान्य रोगनिरूपण विद्या (General Pathology) चिकित्सेचीं सामान्य सूत्रें, नेत्रशास्त्र, रोगपरीक्षेच्या सामान्य पद्धति व

आगंतुक अपघाताच्या नेत्रावरील परीक्षा पद्धति इतक्या गोष्टींचा समावेश आहे. (२) दुसऱ्या विभागात रोग व त्याची उपचार पद्धति यांचा समावेश राहील. व (३) तिसऱ्या विभागात डोळ्यातील बाहुलीवर करावयाची शस्त्रक्रिया व त्याची Appurtenances यांचा समावेश राहील. जुन्या संस्कृतातील पौरस्त्य ज्ञान नव्या पद्धतीच्या संस्कृत लेखन पद्धतीत बसवून आजच्या पाश्चात्य ज्ञानपद्धतीच्या जोडीला तें बसवावयाचें हा माझा मुख्य उद्देश आहे. माझा प्रस्तुत ग्रंथ हें त्याचें निदर्शन होय. देशातील संकुल राजनैतिक परिस्थितीचा विचार केला तर माझें सकल्पित उद्दिष्ट प्रत्यक्षात आणू शकण्याइतका स्वस्थतेचा व फुरसतीचा वेळ मला मिळू शकेल असें वाटत नाही. मध्यंतरी असा वेळ मिळण्याची आशा मला वाटू लागली होती. आमचे पुढारी श्री. माधवराव अणे यांनी यवतमाळ जिल्ह्यातील पुसद येथे जंगल सत्याग्रह केल्यानंतर त्यांना सरकारने सहा महिन्यांची कारावासाची शिक्षा दिली. दुसऱ्याच दिवशी मी त्याच ठिकाणी त्यांचें अनुकरण करून सत्याग्रह केला, तेव्हा मला फार आशा होती की मलाही त्यांच्याचप्रमाणे सहा महिन्यांची शिक्षा होईल. दोन कारणांस्तव मी अशा शिक्षेची वाट बघत होतो (१) एक तर इन्फ्ल्युएंझाच्या आजाराने बिघडलेली माझी प्रकृति मला सुधारता आली असती, व (२) माझ्या पुस्तकाचा दुसरा भागही मला पूर्ण करता आला असता. मी ही माझी इच्छा डिस्ट्रिक्ट सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस मिस्टर अक्रमखान व सबजज्ज मिस्टर सय्यद अहमद यांच्याजवळ बोलूनही दाखविली होती. पण मला अतिशय थोडी शिक्षा होऊन या बाबतीत पूर्ण निराशा माझ्या पदरी पडली. परमेश्वराची इच्छा असलीच तर मी राऊंड टेबल कॉन्फरन्सहून परत आल्यावर कदाचित् अशी विश्रांतीची संधि मला लाभेल.

आता असा प्रश्न उत्पन्न होण्याचा संभव आहे की, मृत भाषा म्हणून जिची हेटाळणी करण्यात येते त्या संस्कृत भाषेत मी हें महत्त्वाचें पुस्तक काय म्हणून लिहिलें? माझ्या आईची भाषा जी मराठी अथवा माझ्या वडिलांची भाषा जी हिंदी तिचा अवलंब मी कां केला नाही? जन्म व शिक्षण छत्तीसगड जिल्ह्यातील बिलासपूर येथे झालेलें असल्यामुळे आम्ही मिश्रभाषाभाषी लोक आहोत. आमच्या घरातील पुरुष व स्त्रिया यांचें शालेय शिक्षण हिंदीतून होत असलें व बाहेरचा सारा व्यवहार हिंदी भाषेतच होत असला तरी घरी बायकांचा व त्यांच्याशी होणारा पुरुषांचा सारा व्यवहार मराठी भाषेतूनच होत असतो. म्हणून माझ्या पुष्कळ मित्रांनी हा ग्रंथ मी संस्कृत भाषेत लिहिल्याबद्दल मला प्रश्नांचा

भडिमार करून भंडावून सोडलें. काही मित्रांनी तर संस्कृत भाषेच्या पांडित्यप्रदर्शनाचा हेत्वारोप करण्यासही कमी केलें नाही. पण संस्कृत भाषेची उपयुक्तता व मानवतेच्या लाभाच्या बाबतीतली सारवत्ता यांच्या बाबतीतल्या माझ्या कल्पना स्वतंत्र आहेत. आपलें राष्ट्र स्वतंत्र झाल्यावर त्यांचें महत्त्व लोकांना आपोआपच उमगेल. जवळ जवळ पंधरा वर्षांपूर्वी हिंदी साहित्य संम्मेलनाचे अध्यक्ष जुन्या इंपीरियल कौन्सिलचे सभासद व जबलपूर विभागातील सिहोऱ्याचे रहिवासी माझे मित्र पं. बिशनदत्त शुक्ल यांनी मला एकदा असा प्रश्न विचारला की, " तुमच्या मते कोणती भाषा हिंदुस्थानची राष्ट्रभाषा व्हावी? " मी त्यांना पुढीलप्रमाणे उत्तर दिलें. "स्वराज्य मिळून आपण आपल्या देशाचे खऱ्या अर्थाने धनी झाल्यावर संस्कृत ही विद्वानांची व हिंदी ही बहुजन समाजाची भाषा रहावी." माझें असें निश्चित मत झालें आहे की, आयुर्वेदीय औषधी विज्ञानाच्या कोणत्याही प्रामाणिक व मूलगामी शास्त्रीय दृष्टि असलेल्या अभ्यासकाला संस्कृतचें उत्तम ज्ञान असलें पाहिजे. त्याविना आयुर्वेदाच्या क्षेत्रात त्याचा प्रवेशसुद्धा होणें अशक्य आहे. भिन्न भिन्न प्रांतांतील भिन्न भिन्न भाषाभाषी अशा आयुर्वेदाच्या विद्यार्थ्यांना माझे हे संस्कृत ग्रंथ आवश्यक ग्रंथ म्हणून उपयोगी पडू शकतील.

वडिलकीच्या नात्याने मला पूज्य असलेले सन्मान्य लोकनेते श्रीमान् नामदार गणेश श्रीकृष्ण उपाख्य दादासाहेब खापर्डे यांनी अत्यंत आपुलकीने या ग्रंथाला प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल ज्या कृतज्ञतेच्या भावना माझ्या मनात उचंबळतात त्यांना प्रकट करणें माझें कर्तव्य आहे. ज्या वेळी प्रथम मी या ग्रंथाची रूपरेषा आखली त्या वेळी ग्रंथ पूर्ण झाल्यावर त्याला प्रकांड पंडित लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांची प्रस्तावना घ्यावयाची असें मी ठरविलें होतें. पण लवकरच आपली हक्काची व चिरकालिक विश्रांति घ्यावयास्तव ते देवलोकी निघून गेले व माझे बेत जागच्या जागीच विरले. मतभेद असतानाही अत्यादराने माझें मस्तक आपोआप ज्यांच्या समोर विनम्र झालें अशा दोनच व्यक्ति माझ्या दीर्घकालीन सार्वजनिक जीवनात मला आढळल्या. त्यांतील पहिली व्यक्ति म्हणजे माझ्या गुरुस्थानी असलेले महापुरुष लोकमान्य टिळक हे होत व दुसरे महापुरुष म्हणजे सनातन आचारधर्माचें मूर्तिमंत निदर्शन आणि जीवनातल्या विशुद्ध चारित्र्याचें व पावित्र्याचें मूर्त आविष्करण असलेले पं. मदन मोहन मालवीय हे होत. बुद्ध पूर्वकालीन तेजस्वी ब्राह्मण्याचें व आक्रमक हिंदु धर्माचें प्रतीक म्हणून लोकमान्य टिळकांनी माझ्या हृदयाची पकड घेतली. पं. मदन मोहन मालवीय यांना मी

बुद्धोत्तरकालीन ब्राह्मण्य व मृदु आणि सहनशील हिंदुधर्माचें प्रतीक मानतो. रानटी व पशुत्वपूर्ण आक्रमणाच्या मानसिक सामर्थ्यावर श्रद्धा ठेवून व आक्रमकांवर सीमातीत सवलतींचा वर्षाव करीत राहून अनाक्रमणाने उत्तर देणें व त्याच्या हृदयपरिवर्तनाची वाट पहात बसणें हें या प्रकृतीचें वैशिष्टय आहे. असो. या दोन व्यक्तींपैकी लोकमान्य टिळक हे स्वर्गवासी झाले व पं. मालवीयजी तुरुंगात आहेत. आता पं. मालवीयजींच्या केवळ आशीर्वादातच मला समाधान मानलें पाहिजे.

हें निवेदन लिहिताना माझी अशी इच्छा होती की, हिंदूंच्या शास्त्रविचाराच्या क्षेत्रात तौलनिक, टीकात्मक व मूलगामी विश्लेषण पद्धतीच्या बाबतीत ज्या सामाजिक संकेतामुळे मोठीं भगदाडें पडलीं, त्यांची चर्चा सोदाहरण स्वरूपात येथेच करावी. तसेंच प्रमाण समजण्यात येणारीं तथाकथित विधानें व अनुमानें यांच्या संबंधात स्वतःच्या अवलोकनाने मला अनेक ठिकाणी कराव्या लागलेल्या सत्यासत्य निर्णयाची छाननी व चर्चाही येथेच करावी. शब्दप्रामाण्यासबंधीच्या मर्यादातीत विश्वासाने व श्रद्धेने भारतीय शरीरशास्त्राच्या व तत्संबद्ध शास्त्राच्या उदयाला व प्रगतीला असीम धोका व अडथळा निर्माण झाला असें माझें अनुभवान्ती निश्चित मत झालें आहे. पण मी सध्या (गोल मेज परिषेदेला) जाण्याच्या घाईत असून मला मुळीच वेळ नाही. तेव्हा माझ्यापेक्षा अधिक सुयोग्य माणसाने हें काम करावें असें सुचवून अथवा जेव्हा केव्हा मला पुन्हा संधि मिळेल तेव्हा मीच हें काम करीन असें आश्वासन देऊन मी तूर्त रजा घेतो."

नामदार दादासाहेब खापर्डे आपल्या प्रस्तावनेत लिहितात :

"अगदी आतापर्यंत केन्द्रीय विधिमंडळाचे सदस्य असलेले डॉ. बा.शि. मुंजे एल्. एम्. अॅण्ड एस् यांनी नेत्रवैद्यक व त्याची चिकित्सापद्धति या विषयावर लिहिलेला हा वैद्यशास्त्राचा ग्रंथ आहे. स्वतः ते शस्त्रक्रियेच्या विशेषतः नेत्रावरील शस्त्रक्रियेच्या शास्त्रात अत्यंत निष्णात आहेत. त्यांनी यशस्वी चिकित्सा व उपचार पद्धतीच्या संबंधात फार मोठा लौकिक मिळविलेला आहे. आपल्या विश्वविद्यालयीन ज्ञानावरच केवळ संतुष्ट न राहता त्यांनी प्रस्तुत विषयावरील पाश्चिमात्य व पौरस्त्य अशा सर्व उपलब्ध अशा नव्या प्राचीन ज्ञानाचा अभ्यास व संग्रह केला. या ग्रंथरचनेसाठी त्यांनी योग्यता व अर्थाभिव्यक्तीची क्षमता या दृष्टीने श्रेष्ठ असणाऱ्या संस्कृत भाषेची निवड केली आहे. या ग्रंथनिर्मितीने डॉ. मुंजे यांनी वैद्यशास्त्रातील भारतीय पदवीधरांवर करण्यात येणाऱ्या एका मोठ्या आरोपाचें खंडन केलेलें

आहे. तो आरोप म्हणजे हे पदवीधर प्राचीन भारतीय वैद्यशास्त्रातील ज्ञानाकडे व अनुभवाकडे लक्ष न देता फटकून वागतात. माझा असा विश्वास आहे की, आयुर्वेदीय पद्धतीचे व्यावसायिक वैद्य डॉ. मुंजे यांच्या या उद्योगाचीं फळें चाखतील, व पुढे अधिक परिश्रम करून संस्कृत शास्त्रज्ञांनी शोधलेल्या चिकित्सापद्धति प्रकाशात आणावयास ते त्यांना साहाय्यक ठरतील. तसेंच पाश्चिमात्य वैद्यकाचें शिक्षण घेतलेलो विद्वान् डॉक्टर मंडळी आपला दुराग्रह सोडून, आता या ग्रंथाच्या द्वारे प्रकाशात येत असलेल्या चिकित्सा व उपचार पद्धतीचा प्रत्यक्ष व्यवहारात उपयोग करतील. प्राचीन भारतीयांनी जी उपचार-पद्धति शोधून काढली व जिच्यात त्यांनी उल्लेखनीय यश मिळविलें तिच्यात अनेक मार्गांनी संशोधन करून आधुनिक डॉक्टर आजच्या वाढलेल्या वैद्यशास्त्रात वस्तुतः अधिक भरच घालू शकणार आहेत.

अतिशय जोरात चाललेला व्यवसाय व धामधुमीच्या राजकीय चळवळी यांच्या भाऊगर्दीतूनही डॉ. मुंजे यांनी अफाट माहिती मिळवून हा मोलाचा ग्रंथ लिहिला व फार मोठी लोकसेवा आणि शास्त्रसेवा केली. त्यांनी निवडलेला विषय अतिशय महत्त्वाचा आहे. हें काही सांगावयास नको की, डोळा हें अतिशय नाजूक इंद्रिय असून त्यावरील उपचार काळजीपूर्वकच केले पाहिजेत. ही गोष्ट वस्तुतः जगन्मान्य आहे"

डॉ. मुंजे यांच्या प्रस्तुत नेत्रचिकित्सा ग्रंथाच्या प्रथम खंडाचे (१) चाक्षुषशारीरम् (२) चाक्षुषप्रकृतिविज्ञानम् (३) चाक्षुष-विकृतिविज्ञानम् (४) सामान्य चाक्षुषचिकित्सा (५) दृक्शास्त्रविज्ञानम् व (६) नेत्रपरीक्षापद्धति याप्रमाणे सहा अध्याय आहेत. विषय नीट व सुलभपणे समजावा म्हणून ग्रंथात आवश्यक तेथे निरनिराळ्या आकृति व चित्रें दिलेलीं आहेत. मुख्य ग्रंथात १०३ व परिशिष्टात १२ अशीं एकंदर ११५ चित्रें आहेत. ग्रंथाच्या शेवटी शब्दकोश दिलेला असून त्यात आजच्या मेडिकल सायन्समधील ६८२ इंग्रजी पारिभाषिक शब्दांना संस्कृत प्रतिशब्द दिलेले आहेत. हा प्रथमखण्ड अडीचशे पृष्ठांचा आहे.

आपल्या निवेदनात डॉ. मुंजे यांनी सवड मिळताच ग्रंथाचे उर्वरित खण्ड पूर्ण करण्याचें आश्वासन दिलें असलें तरी तशी सवड त्यांना कधी मिळू शकली नाही. गोलमेज परिषदेहून परत आल्यानंतर देशाच्या राजकारणात ते इतके गुंतून राहिले की, ग्रंथलेखनासाठी आवश्यक तें मनःस्वास्थ्य त्यांना लाभलें नाही. सार्वजनिक जीवनाच्या

व्यापासाठी त्यांना आपलें रुग्णालय बंद करून व्यवसायावरही तिलांजलि द्यावी लागली. मग ग्रंथलेखन कुठचें ?

मुख्यतः राजकारणी पुढारी या नात्यानेच डॉ. साहेबांशी लोकांचे संबंध आल्यामुळे त्यांच्या इतर विषयांतील व्यासंगाची असावी तशी कल्पना येत नाही. डॉ. मुंजे यांना संस्कृत विद्येची मनापासून आवड असून, व्याकरण, धर्मशास्त्र, राजनीतिशास्त्र व वैद्यशास्त्र यांचा त्यांनी सूक्ष्म व व्यापक अभ्यास केलेला होता. सिद्धान्तकौमुदी या व्याकरण-ग्रंथाचें मराठी भाषांतर त्यांनी करावयाचें ठरवून त्यातील तिङन्त प्रकरणातील काही भागाचें त्यांनी सानुवाद विवरण केलें होतें. मनुस्मृतीवर आधुनिक दृष्टिकोनानुसार त्यांनी, संस्कृत टीका, लिहावयास प्रारंभ केला होता. पण हे दोन्ही प्रयत्न त्यांच्या मागच्या त्या प्रचंड सार्वजनिक व्यापामुळे अर्धवटच राहिले. महाभारताचा त्यांचा व्यासंग सूक्ष्म व मर्मग्राही होता. कौटिलीय अर्थशास्त्रासारख्या राजनीतिशास्त्रावरील आकर ग्रंथाचे तर ते श्रेष्ठ भाष्यकार होते. डॉ. मुंजे यांच्या विद्या-व्यासंगाच्या संबंधात एवढ्याने नीट कल्पना येऊ शकेल.

✦ ✦ ✦

प्रकरण सातवें

# डॉ. मुंजे यांच्या उदयापूर्वीचें नागपूर

नागपूर व कै. डॉ. मुंजे यांचा इतका आत्मीय संबंध लोकांच्या अंत:करणात दृढमूल झाला होता की, नागपूरचीं वैशिष्टचें म्हणून उन्हाळा व संत्री यांच्या समवेतच डॉ. मुंजे यांचाही निर्देश होई. नागपूरच्या राजकीय जीवनाचे महान् शिल्पकार म्हणून लोकनायक अणे यांच्यासारखे मित्र व डॉ. खरे यांच्यासारखे प्रतिस्पर्धी हेही डॉ. मुंजे यांचाच आवर्जून निर्देश करतात हें ध्यानात घेतलें तर त्यात नवल नाही. राजनैतिक क्षेत्रात नागपूरला अखिल भारतीय महत्त्वाचें स्थान डॉ. मुंजे यांच्या कर्तृत्वानेच प्राप्त झालें. त्यामुळे डॉ. मुंजे यांच्या राजकीय जीवनाचा इतिहास हा एकंदर नागपूरच्या व जुन्या मध्यप्रदेशातील टिळक पक्षीय राजकारणाचा इतिहास ठरतो. यास्तव डॉ. मुंजे यांच्या सार्वजनिक व मुख्यत: राजकीय जीवनातील पदार्पणापूर्वीच्या नागपूरच्या इतिहासाचें समालोचन, पार्श्वभूमि या नात्याने अत्यावश्यक ठरतें.

सध्याचें नागपूर जेथे वसलें आहे त्या प्रदेशात अतिशय प्राचीन काळापासून वसाहत झाल्याचें दिसून येत असलें तरी इसवी सनाच्या दहाव्या शतकाच्या मध्यापर्यंत प्रत्यक्ष नागपूरचा नामनिर्देश कोरीव लेखांतून आढळत नाही. नागपूरजवळच्या रामटेकचा, इतकेंच नव्हे तर तेथील श्रीराममंदिराचा निर्देश मात्र इसवी सनाच्या पांचव्या शतकातील वाकाटकांच्या ताम्रपटातून आढळतो. नागपूर, नंदिवर्धन, नागवर्धन ( सध्याचें रामटेकजवळचें नागवर्धन ) इत्यादि नांवांवरून हीं गावें नागवंशीय राजांनी वसविलीं असावीत असा तर्क करता येईल. उत्तरेत कुशानवंशीय राजांचें साम्राज्य प्रस्थापित झाल्यानंतर नागवंशीय राजांनी इ. स. ८० ते इ. स. १७५ या काळात या प्रदेशात येऊन वसति केली असें प्रसिद्ध संशोधक बॅ. जयस्वाल यांचें मत असून विख्यात बौद्ध तत्त्वज्ञानी नागार्जुन हा येथेच होऊन गेला. नागपूरचा प्रथम स्पष्ट उल्लेख राष्ट्रकूट नृपति तृतीय कृष्णराज याच्या इ. स. ९४०-च्या ताम्रपटात आढळतो. या ताम्रपटात नागपूरजवळच्या कन्हान नदीचाही निर्देश आहे. राष्ट्रकूटानंतर उदयास आलेल्या उत्तर चालुक्यांच्या एका मांडलिकाचा लेख नागपूरच्या सीताबर्डी विभागात सापडलेला आहे.

इ. सनाच्या अकराव्या व बाराव्या शतकांत हा प्रदेश धारच्या परमार राजांच्या राज्यात मोडत होता. सन ११०४-ची नागपूर येथे सापडलेली परमारवंशीय राजांची सुंदर काव्यमय भाषेत रचलेली प्रशस्ति प्रसिद्ध आहे. परमारानंतर देवगिरीच्या यादवांच्या राज्यात हा प्रदेश समाविष्ट झाला. रामचंद्रराव यादवांचा एक त्रुटित लेख रामटेक येथील श्रीलक्ष्मणाच्या देवळात अद्यापि विद्यमान आहे. अठराव्या शतकात गोंड राजाचें राज्य या प्रदेशावर असताना त्यांचा जो किल्ला येथे होता त्यासभोवती हळूहळू नागपूर नगराचा विस्तार झाला असावा असा तर्क आहे. सन १६३७-मध्ये शहाजहान बादशहाच्या दहाव्या वर्षाच्या वर्णनात अबदुल हमीद लोहारी याने नागपूरचा उल्लेख केला आहे. त्यात नागपूर हा एक मोठा किल्ला असून त्या सभोवती सुदृढ प्राकार असल्याचें वर्णन आहे.

सोळाव्या शतकापासून नागपूरचा सुसंगत इतिहास उपलब्ध होतो. या शतकाच्या शेवटी गोंड राज्याची स्थापना झाली. प्रथम त्यांची राजधानी छिंदवाड्यापासून चोवीस मैलांवर असलेल्या देवगड या गावी होती. या घराण्याच्या तिसऱ्या किंवा चौथ्या पुरुषाचें नांव बख्तबुलंद असें होतें. त्याने बादशहा औरंगजेबाच्या वेळी दिल्लीला जाऊन हिंदु धर्माचा परित्याग केला व मुसलमानी धर्माची दीक्षा घेतली. तत्कालीन राजकारणातील हा कर्ता पुरुष असून त्यानेच नागपूरची नवरचना केली. बख्तबुलंदाचा मुलगा चांदसुलतान हाही बापाप्रमाणेच कर्तृत्ववान् होता. त्याने राज्यविस्तार व राज्याची भरभराट केली. त्याने नागपूरला प्रथम राजधानी आणली. सन १७३९-मध्ये चांद सुलतान मृत्यु पावल्या-वर त्याचा मुलगा मीरबहादुर गादीवर आला. परंतु थोड्याच दिवसांनी चांदसुलतानच्या वलीशहा नांवाच्या दासीपुत्राने मीरबहा-दुरची हत्या करून राज्य बळकाविलें. चांदसुलतानची राणी रतनकुवर हिला हें न आवडून तिने पेशव्यांच्याकडे साहाय्याची याचना केली. स्वराज्याचे भीमपराक्रमी सरदार पहिले रघूजी भोसले त्या वेळी विदर्भात होते. त्यांनी वलीशहाला ठार केलें व रतनकुवर राणीच्या अकबरशहा व बुऱ्हानशहा या दोन मुलांपैकी पहिल्यास गादीवर बसविलें. या दोन मुलांमध्ये लवकरच तंटा उपस्थित झाला. पहिले रघूजी भोसलें यांनी या तंटयाचा लाभ घेऊन नागपूरचें राज्य आपल्या स्वाधीन करून घेतलें. सन १७४८-मध्ये चांद्याचें गोंड राज्यही रघूजी भोसले यांनी आपल्या आधिपत्याखाली आणलें. पण दोन्ही गोंड राजवंशांना रघुजी भोसले यांनी वर्षासन करून देऊन त्यांच्या सन्मानात उणें पडू दिलें

नाही. नागपूरच्या गोंड राजाला पहिल्या रघुजीने तीन लाखांचें वर्षासन करून देऊन राहण्यासाठी एक किल्ला दिला होता. आजही गोंड राजाचे वंशज याच किल्ल्यात राहत असून त्या वंशातील हल्लीच्या राजपुरुषाने पुनश्च हिंदुधर्माचा स्वीकार केलेला आहे.

पहिल्या रघूजीनंतर त्याचा मुलगा जानोजी व नंतर त्याचा मुलगा द्वितीय रघूजी गादीवर आला. द्वितीय रघूजीच्या राजवटीत नागपूर राज्याचें वैभव विशेष वाढून मध्यप्रदेशाचा छत्तीसगड विभाग, विदर्भ, ओरिसा व छोटा नागपूर हे प्रदेश या राज्यात होते.

रघूजीच्या राजवटीच्या उत्तरार्धात मात्र राज्याला उतरती कळा लागली. शिंद्यांशी सख्य केल्यामुळे १८०३-मध्ये झालेल्या आडगावच्या लढाईत नागपूरच्या राज्यातील एक तृतीयांश अशा संपन्न भागावर त्याला उदक सोडावें लागलें. त्यानंतर इंग्रजांशी झालेल्या तहाप्रमाणे माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन या इंग्रज रेसिडेंटची नागपूरला नियुक्ति झाली. नागपूरच्या धनकोषात अतिशय तूट येऊन राज्यव्यवस्था लवकरच इतकी विस्कळीत झाली की, पेंढारी लोकांना नागपूर लुटणें कठीण गेलें नाही. रेसिडेंट मागोमाग तैनाती फौजेचें ठाणेंही नागपूरला सीताबर्डीवर बसलें. आता जेथे नागपूर महाविद्यालय आहे तेथे पूर्वी ब्रिटिश रेसिडेंट राहत असे. इ.स. १८१६-मध्ये द्वितीय रघूजीचा देहान्त होऊन त्याचा अंधळा मुलगा परसोजी गादीवर आला. त्याचा विषप्रयोगाने अंत होऊन त्याची राणी काशीबाई सती गेली.

परसोजीनंतर अप्पासाहेब भोसले नागपूरच्या गादीवर आले. त्यांचें व ब्रिटिश रेसिडेंटचें पटेना. रेसिडेंटच्या उर्मट वागणुकीने चिडून जाऊन १८१७-मध्ये त्यांनी ब्रिटिश रेसिडेन्सीवर चाल केली. पण त्यात अप्पासाहेबांना अपयश येऊन त्यांचा तोफखाना ब्रिटिशांच्या अधीन झाला. या वेळी इंग्रजांचा नागपूरनगरात प्रथम प्रवेश झाला.

यानंतर अप्पासाहेबांनी नर्मदा नदीचें खोरें, विदर्भ व काही किल्ले (यातच गाविलगड हा इतिहासप्रसिद्ध किल्लाही होता.) इंग्रजांना देऊन गादी मिळविली. थोड्याच दिवसांनंतर पेशव्यांशी संगनमत करून अप्पासाहेबांनी इंग्रजांविरुद्ध उठाव केला. पण त्यातही त्यांना अपयश येऊन पदच्युत व्हावें लागलें. अप्पासाहेबांना राजबंदी म्हणून उत्तर हिंदुस्थानात नेण्यात येत असता पहारेकऱ्यास लाच देऊन त्यांनी स्वतःची सुटका करून घेतली. पुढे ते राजपुतान्यात गेले व तिकडेच मृत्यूच्या अधीन झाले. यानंतर इंग्रजांनी दुसऱ्या रघूजीच्या नातवाला

तिसरा रघूजी म्हणून नागपूरच्या गादीवर बसविलें. तो वयाने लहान असल्यामुळे प्रत्यक्ष राज्यकारभार ब्रिटिश रेसिडेंटच पाहत असे.

सन १८५३-मध्ये तिसरा रघूजी निपुत्रिक स्थितीत वारला. या फुसक्या निमित्तासाठी लॉर्ड डलहौसीने नागपूरचें राज्य खालसा करून इंग्रजांच्या राज्यात तें समाविष्ट केलें- पुढे १८५७-च्या स्वातंत्र्ययुद्धात नागपूरच्या राजवंशाने इंग्रजांना साहाय्यभूत होऊन नागपूरला शांतता राखल्याचें पारितोषिक म्हणून येथील राजाचा दत्तक वारस जो जानोजी त्याला इंग्रजांनी 'राजा ऑफ देऊर' ही पदवी व नव्वद सहस्र रुपयांची वार्षिक नेमणूक करून दिली. हें देऊर गाव सातारा जिल्ह्यात असून भोसले घराण्याच्या मूळ जहागिरीपैकी तें आहे. जानोजीचे चिरजीव राजेबहादूर रघोजीराव भोसले व राजे लक्ष्मणराव भोसले यांनाही या वार्षिक नेमणुकीचा इंग्रजी राज्यात लाभ झाला. हल्ली स्वतंत्र भारताच्या सरकारने रघोजीरावांचे ज्येष्ठ चिरंजीव फत्तेसिंगराव भोसले यांना राजेबहादूर ही पदवी देऊन वार्षिक नेमणूकही करून दिलेली आहे.

असो. ब्रिटिशांच्या राजवटीत राजघराणीं व सरदार घराणीं यांचें महत्त्व संपुष्टात येऊन प्रत्यक्ष राज्यकारभार चालविणारा सुशिक्षित मध्यमवर्ग त्यांनी निर्माण केला. या वर्गातूनच भावी नेतृवर्गाचा उदय झाला. नागपूरचा यानंतरचा इतिहास म्हणजे या वर्गाचाच इतिहास होय. सुशिक्षित अथवा आंग्लविद्याशिक्षित अशा या मध्यमवर्गीय नेतृवर्गाची पहिली पिढी अंतर्बाह्य इंग्रजाळलेली होती. इंग्रजी संस्कृति, इंग्रजी जीवन, इंग्रजी वेष, इंग्रजी विद्या, इंग्रजी पदव्या यांची मोहिनी या पिढीवर इतकी होती की, तिला जें जें भारतीय तें तें हीन वाटून इंग्रजी जीवन आत्मसात् करणें हेंच इतिकर्तव्य वाटत असे. जुन्या स्वतंत्र भारताचा विद्यार्थी उच्च शिक्षणासाठी ज्याप्रमाणे काशीला जाई, त्याचप्रमाणे या काळातील भारतीय विलायतच्या महायात्रेचें पुण्य संपादन करावयास्तव झटत असे. जे लोक प्रत्यक्ष इंग्लंडमध्ये जाऊन व राहून येत, त्यांच्यातील डोळसांना भारतापेक्षा कितीतरी पटीने अधिक स्वतंत्र व मोकळ्या अशा तेथील वातावरणात रहावयास सापडून सर्व तऱ्हेच्या राजकीय व सामाजिक क्षेत्रातील व्यवहारांचे धडे मिळत. अशी ही मंडळी विलायतेतून हिंदुस्थानात परत आली की, त्यांना पाश्चिमात्य जीवनदृष्टीच्या धर्तीवर येथेही सार्वजनिक कार्याचा संसार उभारण्याची स्फूर्ति उत्पन्न होई. या स्वरूपाच्या स्फूर्तीतून सर्व प्रकारच्या धार्मिक, राजकीय व सामाजिक चळवळींचा उदय प्रथम बंगाल प्रांतात झाला व नंतर तेथून तें लोण भारतात सर्वत्र पसरलें.

ख्रिश्चन धर्माच्या धर्तीवर आपला धर्म नेल्याविना तरणोपाय नाही या कल्पनेने राजा राममोहनराय यांनी प्रथम बंगालमध्ये ब्राह्म समाज स्थापन केला व नंतर प्रार्थना समाज इत्यादि धार्मिक व सामाजिक सुधारणावादी संस्था भारतात सर्वत्र उदय पावल्या. राजकीय चळवळीच्यासंबंधातही हेंच म्हणता येईल. प्रथम सन १८५१-मध्ये कलकत्त्यास ब्रिटिश इंडिया अ‍ॅसोसिएशन या नांवाची संस्था स्थापन झाली. दोन वर्षेंपर्यंत तिचें कार्य बंगालमध्ये चालल्यावर सन १८५३-मध्ये मुंबई व मद्रास येथे त्याच धर्तीवर बाँबे इंडिया अ‍ॅसोसिएशन व मद्रास इंडिया अ‍ॅसोसिएशन या संस्थांची स्थापना झाली. सन १८७०-मध्ये पुण्याला सार्वजनिक सभेची स्थापना झाली. सन १८७६-मध्ये सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांच्या परिश्रमाने कलकत्त्याचें इंडियन अ‍ॅसोसिएशन स्थापन झालें. सन १८८५-मध्ये मद्रासचें इंडिया अ‍ॅसोसिएशन नामशेष होऊन त्याऐवजी तेथे महाजन सभा स्थापन झाली. याच वेळी मुंबईचेंही अ‍ॅसोसिएशन थंडावू पहात होतें; पण बद्रुद्दिन तय्यबजी, न्यायमूर्ति काशीनाथ त्रिंबक तेलंग इत्यादि मंडळींनी त्याला पुनश्च जीवदान दिलें.

या सर्व संस्थांचा इतिहास पाहिला तर सन १८५१ ते १८८५-पर्यंतचा काळ भारतीय जनतेत आधुनिक प्रातिनिधिक संस्थांची आवड निर्माण होण्यात गेला असें दिसून येईल. या सर्व संस्था-निर्मितीच्या चळवळींचा असा एक इष्ट परिणाम झाला की, कलकत्ता, मुंबई, मद्रास इत्यादि ठिकाणच्या सुशिक्षित नेतृवर्गाच्या मनात हिंदुस्थानचें प्रतिनिधित्व करू शकणारी अखिल भारतीय स्वरूपाची एखादी संस्था स्थापन करण्याचे विचार एकसमयावच्छेदेकरून येऊ लागले. सन १८८४-मध्ये डिसेंबर महिन्यात मद्रास प्रांतातील अडयार येथे थिऑसफिकल सोसायटीच्या वार्षिक सम्मेलनाच्या प्रसंगी अखिल हिंदुस्थानातील जी प्रमुख मंडळी जमली होती त्यांचें तें सम्मेलनच सन १८८५-मध्ये स्थापन झालेल्या ऑल इंडिया काँग्रेसचा वस्तुतः मूळ आरंभ होय असें डॉ. अ‍ॅनी बेझंट यांनी म्हटलें आहे. ह्यूम साहेबांनी काँग्रेसची स्थापना केली हें तर प्रसिद्धच आहे.

१८५७-मध्ये भारतात धडाडून पेटलेलें स्वातंत्र्ययुद्धाचें रणकुंड ह्यूम साहेबांनी पाहिलें होतें. स्वतः त्यांना तोंडाला काळा रंग फासून व स्त्रीवेष घेऊन आपला जीव वाचवावा लागला होता. या युद्धाची त्यांनी अशी काही धास्ती घेतली होती की, या प्रकाराची पुनरावृत्ति होऊ नये व भारतीय असंतोषाला सनदशीर सांडवाटेची सोय असावी, या हेतूने त्यांनी काँग्रेसची स्थापना केली. ही आपली योजना ब्रिटिश

मुत्सद्द्यांच्या गळी उतरविण्यासाठी त्यांनी बुद्धया इंग्लंडची वारी केली होती. त्यांनी लॉर्ड डफरीन यांच्या गळी आपलें म्हणणें उतरविलें व त्यांना असें सुचविलें की, प्रांतोप्रांतीच्या गव्हर्नरांनाच काँग्रेसचे अध्यक्ष करीत असावें. पण लॉर्ड डफरीन यांना ह्यूम साहेबांची ही सूचना अव्यवहार्य वाटली. ते म्हणाले की "सरकारनियुक्त इंग्रज गव्हर्नरांनाच काँग्रेसचे अध्यक्ष केल्यास हिंदी लोक मनमोकळेपणाने आपले विचार बोलणार नाहीत व आपला उद्देश सफळ होणार नाही. यास्तव काँग्रेसला लोकांच्याच स्वाधीन करावें; शिवाय मी या कल्पनेचा जनक आहे याची वाच्यता आपण हिंदुस्थानात असेतो करू नये."

यानंतर ह्यूम यांनी भारतीय लोकांच्या साहाय्याने सन १८८५-मध्ये इंडियन नॅशनल काँग्रेसची स्थापना केली, इंडियन नॅशनल काँग्रेस ही हिंदुस्थानातील अखिल भारतीय प्रातिनिधिक स्वरूपाची पहिली राजकीय संस्था होय. इंग्रजी राज्यामुळे भारतीयांची इतर अनेक प्रकारे हानि झाली असली तरी आसेतुहिमाचल अशी एकच मध्यवर्ती प्रबल शासनसंस्था अस्तित्वात आल्यामुळे भारतीयांचा सगळ्यात मोठा लाभ हा झाला की कित्येक शतकें नामशेष झालेली भारतीय एकराष्ट्रीयत्वाची भावना त्यांच्यात जागृत झाली. तसेंच आसेतुहिमाचल पसरलेल्या भारतीय जनतेचीं सारीं सुखदु:खें एकाच दावणीत बांधली गेल्यामुळे अखिल भारतीय स्वरूपाचें भावनात्मक ऐक्य निर्माण व्हावयास साहाय्य झालें. काँग्रेसचें व्यासपीठ हें या भावनेच्या आविष्करणाचें एक महान् वाक्पीठ ठरून तिच्या द्वारे या अत्युच्च भावनांच्या संवर्धनास अतिशय महत्त्वाचें साहाय्य झालें यात शंका नाही.

असो. काँग्रेसचें पहिलें अधिवेशन पुण्यास भरवावयाचें निश्चित झालें होतें. पण पुण्यास ऐन वेळी कॉलऱ्याचा संभव दिसू लागल्यामुळे हें अधिवेशन मुंबईला भरविण्यात आलें. पहिल्या काँग्रेसच्या अधिवेशनापूर्वी पुढील आशयाचें पत्रक प्रसिद्ध करण्यात आलें होतें. "२५ ते ३१ डिसेंबर पावेतो पुण्यास इंडियन नॅशनल कॉन्फरन्स भरेल. या परिषदेस मद्रास, बंगाल व मुंबईचे आंग्लविद्याविभूषित लोक येतील. राष्ट्रसेवकांची परस्परांना ओळख करून देणें व पुढील वर्षाचा कार्यक्रम आखणें हे परिषदेचे प्रमुख उद्देश राहतील. ही कॉन्फरन्स भावी हिंदी पार्लमेंटचा पाया राहील. व योग्य काम झाल्यास 'हिंदीलोक आपला कारभार चालविण्यास नालायक आहेत' या आरोपाला ती उत्तम उत्तर देऊ शकेल. परिषदेस येणाऱ्यांना प्रवास खर्च करावा लागेल. पण पुण्यातील मुक्कामाचा खर्च त्यांच्यावर पडणार नाही. एकंदर सत्तर मंडळी येतील असा अंदाज आहे."

या परिषदेला ७२ लोक उपस्थित होते. याच परिषदेला काँग्रेस हें नांव देण्यात आलें. दि. २८-१२-१८८५-ला मुंबई येथे गोकुळदास तेजपाल संस्कृत कॉलेजच्या इमारतीत काँग्रेसचें हें पहिलें अधिवेशन झालें.

पहिल्या काँग्रेसला नागपूरहून कोणीही गेलें नाही. दुसरी काँग्रेस कलकत्ता येथे भरली. दुसऱ्या काँग्रेसला प्रथमतः प्रतिनिधि म्हणून लोक गेले. हा पहिल्या व दुसऱ्या काँग्रेसमधील महत्त्वाचा भेद होय. या दुसऱ्या काँग्रेसला नागपूरहून, नागपूरचे पहिले एम्. ए. कै. बापूराव दादा किनखेडे, कै. सर गंगाधरराव चिटनवीस, गोपाळराव भिडे व कामठीचे मि. अबदुल अजीज हे प्रतिनिधि म्हणून गेले होते. व तेथे मि. अबदुल अजीज यांनी उर्दूत भाषण केलें. नागपूर प्रांताच्या प्रतिनिधीने काँग्रेसमध्ये केलेलें तें पहिलें भाषण होय.

या काँग्रेसनंतर सन १८८६-मध्ये नागपूरला सार्वजनिक लोकसभा या नांवाची संस्था स्थापन झाली. ती नागपूरची पहिली राजकीय सभा होय. नागपूरच्या वर्तमान इतिहासातील तो संस्थानिर्मितीचा कालखंड होता. त्या वेळीं स्थापन झालेल्या काही संस्था अजूनही चालू आहेत, हें नागपूरला भूषणास्पद आहे. सन १८६९-मध्ये नीलसिटी स्कूल स्थापन झालें. तें आजही वर्धिष्णु अवस्थेत चालू आहे. सन १८८१-मध्ये नागपूरला गोरक्षण सभा स्थापन झाली. तिचें कार्य आजही चालू आहे. याचवर्षी नागपूरला पहिला छापखाना निघाला. सन १८८३-मध्ये मॉरिस कॉलेज निघालें. तें आजही वैभवसंपन्न अवस्थेत चालू आहे.

लोकांच्यात मतांचा प्रादुर्भाव झाला की त्यांच्या प्रकटीकरणाची साधनें त्या मागोमागच निर्माण होऊं लागतात. या न्यायानुसार या कालखंडात नागपुरात वृत्तपत्र सृष्टीचाही प्रादुर्भाव झाला. सन १८८८-मध्ये सी.पी.न्यूज पेपर निघालें. सन १८९१-मध्ये इंडिपेंडंट, देशसेवक व गोरक्षा हीं पत्रें निघालीं. सन १८९२-मध्ये भोसला हें पत्र निघालें. कॉलेजमधील तत्कालीन प्राध्यापकवर्गही लोकजागृतीच्या कार्यास प्रत्यक्षाप्रत्यक्षपणें साहाय्य करीत असे. बळवंतराव महाजन व म.म. केशवरावजी ताम्हन हे अप्रत्यक्षपणे लोकजागृतीस सर्व प्रकारचें साहाय्य करीत. प्रत्यक्षपणे सार्वजनिक कार्यात भाग घेणाऱ्यांपैकी कै. सर बिपिन बोस यांचा सरकारकडे विशेष कल असे; तर कै. बापूराव दादा किनखेडे, कै. कृष्णराव देशपांडे, कै. गोपाळराव भिडे इत्यादि मंडळी लोकांशी विशेष समरस होत. कै. रावबहादूर वामनराव कोल्हटकर (सुप्रसिद्ध कै. अच्युत बळवंतराव कोल्हटकर यांचे वडील) हे सरकारी नोकर असूनही न्यायमूर्ति रानडे

यांच्या वळणावर सामाजिक कार्यात पुढाकार घेत असत. स्वतः पुनर्विवाह करून कर्ते सुधारक म्हणून त्यांनी लौकिकही संपादन केला होता. ते स्वतः मवाळ असून टिळकांच्या जहाल पक्षाशी त्यांनी पुढच्या आयुष्यात कठोर विरोध केला.

तत्कालीन नागपूरच्या सार्वजनिक कार्यकर्त्यांचे सुधारक व सनातनी असे सुस्पष्ट गट पडले होते. सुधारकांत रावबहादूर वामनराव कोल्हटकर, राजारामपंत दीक्षित (नागपूरचे प्रसिद्ध राजाराम वाचनालय यांच्याच नांवाने आहे. ) हरिपंत पंडित, चिंतोपंत केळकर, बापूसाहेब पटवर्धन इत्यादि मंडळी प्रमुख होती व सनातनी गटात कै. म. म. केशवराव ताम्हन, बापूराव दादा किनखेडे, बुलदेव, कृष्णराव देशपांडे, म. म. सदाशिव जयराम देहाडराय हे प्रमुख असत.

सन १८८१-मध्ये स्थापन झालेली नागपूरची गोरक्षण सभा हीच संपूर्ण भारतात गोरक्षणाच्या उद्दिष्टाने स्थापन झालेली पहिली संस्था होय. ही सभा त्या काळी गाजलेली असून सरकारचा तिच्यावर रोष असे. या संस्थेच्या मध्यप्रांत व वऱ्हाडात एकंदर ४७ शाखा असून तिच्या वार्षिक सम्मेलनाला भारतातील सर्व भागांतून लोक येत असत. मुंबई प्रांतात या कार्यासाठी साहाय्य मिळविण्यास्तव जेव्हा नागपूरहून प्रचारक गेले तेव्हा त्यांना भिवंडीचे वकील श्री. भास्करराव खरे ( प्रसिद्ध डॉ ना. भा. खरे यांचे वडील ) यांनी प्रथम साहाय्य केलें. गोपाळराव भिडे या कार्यात अग्रेसर असत. १८८६-मध्ये स्थापन झालेली सार्वजनिक लोकसभा ही नागपुरातील पहिली राजकीय संस्था असल्याचा निर्देश वर केलाच आहे. १८८७-मध्ये मद्रास येथे भरलेल्या काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनाला नागपूर प्रांतातून तेरा प्रतिनिधि गेले होते. या अधिवेशनामध्ये प्रथमच मंडप घालण्यात आला होता. मंडपाला तामिळ भाषेत पेंडाल म्हणतात. तेव्हापासून मंडपाला पेंडाल हा शब्द सर्व प्रांतांतून रूढ झाला.

सन १८८८-मध्ये अलाहाबादला झालेल्या काँग्रेसच्या वेळी सरकारने काँग्रेस विरोधाचें धोरण प्रथम प्रकटपणे स्वीकारलें. अधिवेशनाच्या प्रत्येक स्थळाला सरकार विरोध करू लागलें. शेवटी अलाहाबाद येथील लौथर कॅसल नांवाचा मोठा प्रासाद दरभंग्याच्या महाराजांनी विकत घेतला व काँग्रेसला वापरावयास दिला. या काँग्रेसमध्ये एक स्वदेशी दुकान थाटण्यात आलें होतें. अधिवेशनाला जोडून प्रदर्शनाची कल्पना येथूनच अंकुरित झाली. या काँग्रेसमध्ये प्रतिनिधींच्या झोपड्या प्रांतवार

बांधण्यात आल्या होत्या. विषयनियामक समिति निवडण्याची कल्पनाही येथेच प्रथम कार्यान्वित झाली. इतकेंच नव्हे, तर राजा शिवप्रसाद नांवाच्या गृहस्थाने प्रतिनिधि होऊन उघडपणे खुल्या अधिवेशनात ठरावांना विरोध करून लोकतंत्रात्मक कार्यपद्धतीचा पहिला पायंडा काँग्रेसमध्ये येथेच पाडला. सर्व दृष्टींनी हें अधिवेशन क्रांतिकारी ठरलें.

१८८९-ची काँग्रेस मुंबईला भरली. या काँग्रेसला नागपूर विदर्भातून एकंदर २१४ प्रतिनिधि गेले होते. नागपूरकरांनी या अधिवेशनात उत्साहाने भाग घेतला. काँग्रेसचे प्रतिनिधि निवडण्यासाठी त्या वेळी प्रांतभर लहानशी चळवळही झाली होती. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक काँग्रेसला प्रथम असे याच वेळी गेले. नागपूरच्या परिसरातून या काँग्रेसला गेलेल्या प्रतिनिधींत पुढील महत्त्वाचीं नांवें आढळतात. (१) सर गंगाधरराव चिटनवीस (२) बापूराव दादा किनखेडे (३) गोपाळराव भिडे (४) सेठ रामचंद्र (५) गोविंदराव बडकस (६) सदाशिवराव मुभेदार (७) म. म. केशव गोपाळ ताम्हन (८) दिवाकर जनार्दन वझे (९) बाळकृष्ण जयराम रत्नपारखी (१०) रामचंद्र रघुनाथ बोबडे (नागपूरचे विख्यात ॲड्व्होकेट मनोहरपंत बोबडे यांचे वडील (११) म. म. सदाशिव जयराम देहाडराय (१२) लक्ष्मण गणेश सोनक (१३) रामकृष्णपुरी पदमपुरी (१४) भगीरथ प्रसाद (१५) रावबहादूर नारायणस्वामी नायडू (विख्यात क्रिकेट पटू कंकय्या नायडू यांचे आजोबा.) (१६) राजारामपंत दीक्षित (१७) गोपाळ अण्णाजी पोफळी (१८) श्रीमंत गणपतराव गोपाळराव घटाटे (बाबासाहेब घटाटे यांचे आजोबा) (१९) हरि वामन केळकर, वकील (२०) प्रल्हाद भास्कर देशपांडे (सिंदीकर) (२१) दामोदर नीळकंठ खरे, वकील (२२) बळवंत केशव भवाळकर (२३) नीळकंठ दामोदर टालाटुले (सिंदीकर) (२४) वासुदेव विनायक परांजपे (धर्मवीर डॉ. ल. वा. परांजपे यांचे वडील) (२५) वासुदेव कृष्णाजी अभ्यंकर.

१८९०-च्या कलकत्ता काँग्रेसला नागपूर, वऱ्हाड व सिकंदराबाद मिळून २९ प्रतिनिधि गेले होते. त्या वेळी मि. ब्रॅडलॉ यांनी पार्लमेंटमध्ये हिंदी कौन्सिलात सुधारणा करण्यासंबंधात एक बिल आणलें होतें. या बिलाला पाठिंबा देण्याच्या ठरावावर नागपूर प्रांताच्या वतीने बॅरिस्टर सी. व्ही. नायडू यांनी भाषण केलें. या काँग्रेसमध्ये सौ. कादंबिनी गांगुली यांचें भाषण झालें. ते काँग्रेसच्या व्यासपीठावरून स्त्रीप्रतिनिधीचें होणारें पहिलें भाषण होय. यानंतरची काँग्रेस मद्रास किंवा नागपूर यांपैकी

कोठे भरवावी याची चर्चा होऊन सन १८९१-ची काँग्रेस नागपूरला भरविण्याचा निर्णय घेण्यात आला. असा निर्णय घेण्याइतकी लोकजागृति त्या वेळी राजकीय दृष्टीने नागपूरला झालेली होती हें यावरून स्पष्ट होतें.

सन १८९१-मध्ये नागपूरला झालेल्या या काँग्रेसचे स्वागताध्यक्ष बॅ. सी. नारायणस्वामी नायडू हे होते. प्रा. भगीरथ प्रसाद व नीलसिटी-स्कूलचे त्या वेळचे मुख्याध्यापक श्री. केशवराव जोशी हे स्वागत समितीचे कार्यवाह होते. संपूर्ण भारतातून निवडलेल्या १२४२ प्रतिनिधींपैकी ८१२ प्रतिनिधि काँग्रेसच्या अधिवेशनाला उपस्थित होते. स्वागताध्यक्ष बॅरि. नायडू यांच्याकडे श्रीमंत नवलोजीराव गुजर यांची लालबाग भाड्याने होती. ती त्यांनी या अधिवेशनासाठी विनामूल्य दिली होती. तेथे मोठा मंडप उभारण्यात येऊन प्रवेशद्वारावर 'हिंदी राष्ट्रीय सभा' अशी व आतल्या बाजूस 'ईश्वर महाराज्ञीस चिरायु करो' अशी सुवर्णाक्षरें झळकत होतीं. प्रतिनिधींची व्यवस्था प्रांतवार करण्यात आली होती. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचें नागपूरला पहिलें आगमन या काँग्रेसच्या निमित्ताने झालें. टिळक त्या वेळी डेक्कन काँग्रेस स्टँडिंग कमेटीचे कार्यवाह होते. टिळकांच्या तंबूतच विषयनियामक समितीची नियुक्ति झाली. सोमवार दि. २८ डिसेंबर १८९१-ला दुपारी दोन वाजता काँग्रेसचें अधिवेशन प्रारंभ होऊन तें तीन दिवस चाललें. तत्कालीन वृत्तपत्रांतून या अधिवेशनाच्या बहिरंगाचें पुढीलप्रमाणे वर्णन केलेलें आहे. "दोन वाजता भिन्नभिन्न ठिकाणांहून आलेले प्रतिनिधि व प्रेक्षक यांनी सभामंडप फुलून गेला होता. दक्षिणेकडील राव आणि पंत यांच्या चित्रविचित्र रंगाच्या पगड्या व मद्रासकडील अय्यर आणि नायडू यांचे जरीकाठी रुमाल व वऱ्हाडातील लोकांची चमत्कारिक पागोटीं, उत्तर प्रांतातल्या लोकांच्या शुभ्र व रंगीत टोप्या, बंगालीबाबूंच्या वस्त्रहीन डोक्यावरील कृष्णरंगी कचभार, आणि सिंधी लोकांच्या किनारेदार उंच टोप्या ह्या सर्वांची अप्रतिम शोभा दिसू लागली. स्वेच्छ सेवकांचे (स्वयंसेवक) गळ्यातील हिरव्या तांबड्या व सोनेरी अशा तीन रंगांचे कापडाचे पट्टे त्यांच्याबद्दल आदरभाव उत्पन्न करीत."

वस्तुत: श्री. सुब्रह्मण्यम् अय्यर या अधिवेशनाचे अध्यक्ष व्हावयाचे होते. पण त्यांची हायकोर्टाच्या न्यायमूर्तिपदावर नियुक्ति झाल्यामुळे मद्रासचे रायबहादूर पी. आनंदा चारलू यांना अध्यक्ष करण्यात आलें. अलाहाबादचे नामदार पं. अयोध्याप्रसाद यांनी त्यांचें नांव सुचविलें व

सर फेरोजशहा मेथा यांनी त्याला अनुमोदन दिलें. काँग्रेसचे जनक ह्यूमसाहेब हे या अधिवेशनाला उपस्थित होते व त्यांनी अधिवेशनात भाषणही केलें.

सन १८९१-च्या या काँग्रेसमध्ये काँग्रेस बंद करावी की चालू ठेवावी या प्रश्नाचा खल होऊन सुरेंद्रनाथ बॅनर्जी यांच्या प्रयत्नांनी अस्तिपक्षी निर्णय घेण्यात आला व काँग्रेसला जीवदान मिळालें हें या अधिवेशनाचें मोठें कार्य होय. या नागपूर काँग्रेसच्या कार्यकर्त्यांचा उत्साह अमाप होता. काँग्रेसच्या स्वागत समितीचे एक कार्यवाह केशवराव जोशी यांनी बैलगाडीतून हिंडून अधिवेशनासाठी पैसा गोळा केला; तर दुसरे कार्यवाह भगीरथ प्रसाद यांनी अधिवेशनानंतर उरलेले बटाटे भरबाजारात विकून तो पैसा स्वागत मंडळाच्या निधीत भरला. या अधिवेशनाने नागपूर प्रांतातील सार्वजनिक जीवनाला सर्वांगीण स्वरूपाची जोराची चालना मिळाली.

१८९१ ते ९९-पर्यंतच्या कालखंडात या जागृतीचीं अनेक पदचिन्हें आढळतात. या जागृतीचें स्वरूप विधायक होतें हें विशेष होय. औद्योगिक क्षेत्रात कृष्णराव फाटक यांच्या खटपटीने सुरू झालेली पुलगाव मिल, रावसाहेब केशवराव भवाळकर यांच्या खटपटीने सुरू झालेली हिंगणघाटची गिरणी व नागपूरची स्वदेशी मिल यांचा निर्देश पुरेसा आहे. हातमागात सुधारणा करून कोष्टयांच्या धंद्याला उत्तेजन देण्याकरिता व स्थानिक लोहारांच्या व्यवसायात सुधारणा करून चाकू व कात्र्यांचा धंदा वाढविण्याकरिता एक स्वदेशी वस्तु प्रचारिणी सभा नागपूरला स्थापन झाली होती. सामाजिक चळवळीही बाळसें धरू लागल्या होत्या. नंदनमिश्र समाज व सनातन धर्मसभा स्थापन होऊन त्या अनुक्रमे सुधारक व सनातनी मतांचा प्रसार करीत होत्या.

शेतकऱ्यांसंबंधीची चळवळही या कालखंडांत मूळ धरू लागली होती. त्या काळी एकामागून एक दुष्काळाचीं वर्षें आल्यामुळे शेतकऱ्यांच्या जीवनासंबंधीचा विचार लोकनेत्यांच्या मनात येणें स्वाभाविकच होतें. या वेळी प्रांतभर मालगुजारी सभा स्थापन होऊन त्या शेतकऱ्यांच्या वतीने काम करू लागल्या. १८९७,९९ व १९०० या वर्षीं लोकांना दुष्काळ अतिशय जाणवले. त्यामुळे या चळवळीला विशेष जोर चढला. त्याचा परिणाम होऊन सरकारकडून शेतकऱ्यांना सवलती मिळाल्या व सरकारने ठिकठिकाणी दुष्काळी कामेंही सुरू केलीं.

महाराष्ट्रातील स्वदेशीचे आद्यप्रवर्तक गणेश वासुदेव जोशी उपाख्य सार्वजनिक काका यांचे एक शिष्य त्रिबकराव खरे यांनी श्री. कृष्णराव फाटक यांच्या साहाय्याने स्वदेशीच्या प्रचाराचें काम नागपूर प्रांतात प्रारंभ केलें. १८९२-मध्ये अलाहाबादला झालेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात सहाव्या ठरावात पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या प्रतिवृत्ताचा निषेध करण्यात आला. त्यावर नागपूरच्या वतीने श्री. केशवराव जोशी यांनी भाषण केलें. पुढे बंगालमधील कायम जमाबंदी व मद्रासमधील जमीन-दारांचे संकेत या संबंधात सरकारी हस्तक्षेप सुरू झाल्यावर १८९३-च्या लाहोर काँग्रेसच्या दहाव्या ठरावात सरकारचा निषेध करण्यात आला. या ठरवावरही नागपूर प्रांताच्या वतीने श्री. केशवराव जोशी यांचे भाषण झालें. आपल्या भाषणात त्यांनी मध्यप्रांतातील शेतकऱ्यांच्या हलाखीच्या स्थितीचें वर्णन करून ते मोहाच्या फळावर कशी उपजीविका करीत त्याचें विदारक वर्णन केलें. सन १८९२-मध्ये इंडिया कौन्सिल ॲक्ट झाला. त्यात सुधारणा सुचविणारा ठराव या काँग्रेसमध्ये झाला.

या वेळेपर्यंत इंडिया कौन्सिलमध्ये नागपूर प्रांताचा एकही प्रतिनिधि नव्हता. दि. १९ एप्रिल १८९३-ला नागपूरला रावबहादूर नारायणस्वामी नायडू यांच्या अध्यक्षतेखाली एक सभा भरून प्रतिनिधीची मागणी करण्यात आली. लवकरच ही मागणी मान्य होऊन नागपूर प्रांताच्या वतीने कै. सर गंगाधरराव चिटनवीस हे प्रतिनिधि म्हणून व्हॉइसरॉयच्या कौन्सिलमध्ये नियुक्त करण्यात आले. सन. १८९४-मध्ये मद्रास येथे झालेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात व्हॉइसरॉय व सेक्रेटरी ऑफ स्टेट यांची भेट घेऊन त्यांना आपलीं गाऱ्हाणीं निवेदन करावयास्तव एक शिष्टमंडळ पाठवावयाचें ठरलें. या शिष्टमंडळात नागपूर प्रांताच्या वतीने सर गंगाधरराव चिटनवीस व श्री. सी. व्ही. नायडू यांना सभासद म्हणून घेण्यात आलें होतें.

सन १८९५-मध्ये पुण्याला झालेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात लीगल प्रॅक्टिशनर्स ॲक्ट संबंधी एक ठराव करण्यात आला. 'टाऊट्स्' वर नियंत्रण करण्याकरिता जे नियम करण्यात आले होते त्यांत वकिलीची सनद रद्द करण्याचा अधिकारही जिल्हा न्यायाधीशाला देण्यात आला होता, त्याविरुद्ध हा ठराव होता. या ठरावावर नागपूर प्रांताच्या वतीने लाला भगीरथ प्रसाद यांनी भाषण केलें. १८९६-मध्ये झालेल्या कलकत्ता काँग्रेसला नागपूर प्रांताच्या वतीने ३१ प्रतिनिधि गेले होते. १८९७-चें काँग्रेसचें अधिवेशन अमरावतीला झालें. त्या वर्षी

दुष्काळाचें स्वरूप भीषण होतें. या अधिवेशनात दुष्काळासंबंधी जो ठराव झाला त्यावर नागपूर प्रांताच्या वतीने प्रा. अच्युत सीताराम साठे यांनी भाषण केलें. या अधिवेशनाच्या काही दिवस आधी पुण्याच्या गणेश खिंडीत व्हिक्टोरिया राणीच्या जुबिलीचें पर्व साधून रँड व आयर्स्ट या दोन मत्तमहिषांचा, भारतीय क्रांतीचे अग्रदूत असणाऱ्या चाफेकर बंधूंनी बळी घेतल्यामुळे वातावरण क्षुब्ध झालें होतें. त्यामुळे काँग्रेसचें अधिवेशन होतें कीं नाही अशीच चिंता उत्पन्न झाली होती. काँग्रेस ही त्या वेळी सरकारधार्जिण्या लोकांच्या हातांत असल्यामुळे तिच्या वार्षिक अधिवेशनाला सरकारने अडथळा आणला नाही. पण प्रतिनिधींच्या उपस्थितीवर मात्र त्याचा अत्यंत अनिष्ट परिणाम झाला. या काँग्रेसमध्ये लोकमान्य टिळकांना झालेल्या शिक्षेबद्दल सहानुभूति व्यक्त करण्यात आली आणि भावी जहाल पक्ष काँग्रेसमध्येच प्रथम अंकुरित झाला असें डॉ. ॲनी बेझंट यांचें म्हणणें आहे. १८९८-मध्ये मद्रासला काँग्रेसचें अधिवेशन झालें. त्या वेळी देशातील वातावरण तापलेलें होतें. या काँग्रेसचे अध्यक्ष श्री. आनंद मोहन बोस यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात असे उद्गार काढले की, इंग्लंडच्या पार्लमेंटमध्ये आयर्लंडला जसें प्रतिनिधित्व आहे तसें तें हिंदुस्थानलाही असावें. महात्मा गांधींच्या आफ्रिकेतील कार्याचा या काँग्रेसमध्ये प्रथम गौरवपूर्वक उल्लेख करण्यात आला. १८९९-ची काँग्रेस लखनौ येथे झाली. श्री. रमेशचंद्र दत्त हे या काँग्रेसचे अध्यक्ष होते. या काँग्रेसमध्ये काँग्रेसच्या घटनेत सुधारणा करण्यात येऊन ऑल इंडिया काँग्रेस कमिटीवर प्रांतांना प्रमाणशीर प्रतिनिधित्व देण्यात आलें. तीत वऱ्हाड व नागपूर प्रांताला प्रत्येकी तीन प्रतिनिधींचा अधिकार लाभला. नागपूर प्रांताच्या वतीने श्री. बापूराव दादा किनखेडे, लाला भगीरथ प्रसाद व वर्ध्याचे श्री. एच्. व्ही. केळकर यांची प्रतिनिधि म्हणून निवड झाली होती. १८९९-च्या काँग्रेसच्या नव्या घटनेनुसार १९००-च्या न्यायमूर्ति नारायणराव चंदावरकर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या लाहोर येथील काँग्रेसच्या अधिवेशनाला मध्यप्रांत, सिकंदराबादच्या वतीने प्रतिनिधि गेले होते. त्या वेळी ऑल इंडिया काँग्रेस कमिटीवर या प्रांताच्या वतीने बापूराव दादा किनखेडे, कृष्णराव फाटक व रावजी गोविंद हे सभासद म्हणून निवडण्यात आले होते. शिक्षण समितीवर श्रीधर बळवंत गोखले व औद्योगिक समितीवर श्री. रावजी गोविंद यांची या प्रांताच्या वतीने नियुक्ति झाली होती.

या वेळी देशात विचारक्रांतीच्या युगाचीं पदचिन्हें दिसू लागलीं होतीं. एकीकडे सरकारला, स्वतःच सुरू केलेल्या पण आता लोकाभिमुख

झालेल्या काँग्रेसचें वाढतें महत्त्व त्रासदायक वाटू लागलें; तर दुसरीकडे काँग्रेसचाही सरकारच्या, दिलेलीं वचनें पाळण्यासंबंधातील वृत्तीचा संशय वाटू लागला. त्या वेळचे अरेराव व्हॉइसरॉय लॉर्ड कर्झन यांचें या प्रकारातील दायित्व मोठें आहे.

१९०१-च्या कलकत्ता काँग्रेसमध्ये न्यायखातें व अधिकार खातें यांना विलग करावें अशी मागणी करण्यात आली. त्या मागणीला नागपूर प्रांताच्या वतीने डॉ. गौर यांनी पाठिंबा दिला. दक्षिण आफ्रिकेतील एक लक्ष हिंदी बंधूंचा प्रतिनिधि या नात्याने महात्मा गांधी या काँग्रेसला प्रथम उपस्थित राहिले व तेथील हिंदी बांधवांसबंधीचा सहानुभूतीचा ठराव त्यांनी मांडला. या काँग्रेसला जोडून प्रथमतःच औद्योगिक प्रदर्शन भरविण्यात आलें होतें.

नागपूरच्या दृष्टीने महत्त्वाची घटना म्हणजे या काँग्रेसहून परतताना लोकमान्य टिळक नागपूरला उतरले. त्यांचा निवास श्री. म. कृ. पाध्ये यांच्या घरी होता. या वास्तव्यात राजाराम थिएटरमध्ये महामहोपाध्याय केशवरावजी ताम्हन यांच्या अध्यक्षतेखाली टिळकांचें व्याख्यान झालें. या व्याख्यानात टिळकांनी प्रथमच गीतेचा कर्मयोगपर अर्थ सांगितला. या घटनेचा निर्देश टिळकांनी गीतारहस्याला जोडलेल्या आपल्या प्रस्तावनेत केलेला आहे. गीतारहस्याच्या पहिल्या आविष्काराचा सन्मान नागपूरला मिळाला ही अभिमानाची गोष्ट आहे.

सन १९०२-ची काँग्रेस ही अहमदाबाद येथे झाली. या काँग्रेसमध्ये नागपूरप्रांताच्या वतीने श्री. म. कृ. पाध्ये, पोलिस कमिशनवरील हिंदी प्रतिनिधि अपुरे असल्यासंबंधीच्या ठरावावर बोलले. या काँग्रेसमध्येही तिला जोडून औद्योगिक प्रदर्शन भरलें होतें. या प्रदर्शनाचें उद्घाटन त्या तशा काळात बडोद्याचे अधिपति श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांनी केलें हें विशेष होय.

इ. स. १९०४-मध्ये डॉ. मुंजे यांनी राजकारणाच्या क्षेत्रात पदन्यास केला. त्या पूर्वीच्या नागपूर प्रांताच्या लोकजीवनाच्या प्रगतीचें हें चित्र आहे. यावरून हें स्पष्ट होतें की, डॉ. मुंजे यांच्या राजकारण प्रवेशापूर्वी नागपूरच्या लोकजीवनात सर्वांगीण जागृति झालेली असून राजकीय जीवनावर सुधारणावादी व सरकारधार्जिण्या मवाळांचा पगडा होता, तर समाजावर पुराणमतवादी लोकांचा प्रभाव होता. सन १८९१-ला काँग्रेसच्या अधिवेशनाच्या निमित्ताने व १९०१-च्या कलकत्ता काँग्रेसहून परतताना असे दोनदा लोकमान्य टिळक नागपूरला आले असले तरी टिळकपक्षीय राजकारणाचा अथवा जहाल मतवादी राजकारणाचा

उदय मात्र नागपूर प्रांतात झालेला नव्हता. विदर्भात कै. दादासाहेब खापर्डे हे एकच त्या राजकीय संप्रदायाचे आधार होते. सुधारणावादी मवाळांच्या या राजकीय वर्चस्वाला सन १९०४-च्या आगेमागे झालेल्या डॉ. मुंजे यांच्या राजकारण प्रवेशाने पहिला सुरुंग लावला व डॉ. मुंजे यांच्याच कर्तृत्वाने नागपूरच्या राजकीय जीवनावरील मवाळांच्या वर्चस्वाचा चार सहा वर्षांतच अस्त होऊन नागपूर प्रांत हा टिळकपक्षीय राजकारणाचा अभेद्य दुर्ग झाला. मुंजे यांच्या सार्वजनिक जीवनातील पहिल्या पदन्यासाचाच प्रारंभ मवाळांशी झालेल्या संघर्षातून आहे. त्याकडे पुढील प्रकरणात वळू.

✦ ✦ ✦

प्रकरण आठवें

# डॉ. मुंजे यांचा राजकारणात प्रवेश

इ. स. १९०१ ते १९०३ हीं व्यवसायाचीं पहिलीं तीन वर्षें डॉ. मुंजे यांनी केवळ स्वतःच्या व्यवसायाच्या स्थिरीकरणावरच केन्द्रित केलीं. या अवधीत नागपुरातील सर गंगाधरराव चिटनवीस, राजाराम-पंत दीक्षित, गोपाळराव बुटी, रावबहादुर वामनराव कोल्हटकर इत्यादि प्रथमश्रेणीच्या लोकांशी त्यांचें अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध उत्पन्न झाले. दिवसभर व्यवसाय करावा व संध्याकाळी क्लबमध्ये जाऊन टेनिस इत्यादि पाश्चिमात्य खेळ खेळावे हा त्यांचा क्रम असे. थाटदार पोशाखाची त्यांना अतिशय आवड असून तो नखशिखान्त साहेबी पद्धतीचा असे. डॉ. मुंजे यांच्या या पोशाखावर त्या वेळचे सार्वजनिक जीवनात नुकतेच पदार्पण केलेले तरुण वकील श्री. नारायणराव अळेकर यांनी त्या वेळी टिळकांच्या 'मराठा' या इंग्रजी पत्रात स्वतंत्र पत्र लिहून टीकाही केली होती. इ.स. १९०४-पर्यंत राजकारण व समाजकारण या विषयांत, कधीमधी प्रसंगोपात्त चर्चा करण्यापलीकडे डॉ. मुंजे यांनी कधी लक्षही घातलें नाही. त्यांचा पोशाख व राहणी यांवरून वामनराव कोल्हटकर इत्यादि मंडळी त्यांना आपल्याप्रमाणेच मवाळ व समाजसुधारक समजत असत. टिळकांचा उदय त्या वेळी डोळ्यांत भरण्याइतका झाला असला तरी तोवर टिळकपक्षीय राजकारण असें नागपूरला प्रत्यक्षात नव्हतेंच. आपण आपल्यापैकीच एक समजत असलेल्या डॉ. मुंजे यांच्या-सारख्या संपूर्ण साहेबी पद्धतीने राहणाऱ्या व्यक्तीकडून टिळकांच्या मतांचा आविष्कार व समर्थन कधी होईल असें नागपूरच्या मवाळा-ग्रणींना स्वप्नातही वाटलें नाही. पण मुंजे यांच्या मनात टिळकपक्ष व नेमस्तपक्ष यांच्या विचारप्रणालींची मीमांसा पुष्कळ दिवसांपासून चालू असावी. तिचा परिपाक म्हणून त्यांनी सन १९०४-च्या प्रारंभी 'Reformed Opinion on Hindu Social Reforms' या नांवाचा इंग्रजीत एक निबंध लिहिला. या निबंधात डॉ. मुंजे यांनी राजकीय सुधारणांना विरोध करणाऱ्या समाजसुधारकांच्या भूमिकेवर मर्मभेदी प्रहार करून, राष्ट्राची प्रगति पुनर्विवाहादि सुधारणांवाचून मुळीच अडलेली नसून राजकीय पारतंत्र्य हाच त्या प्रगतीच्या मार्गातील खरा अडथळा होय असें

प्रतिपादन केलें होतें. टिळकपक्षीय अथवा जहालपक्षीयांच्या विचार-प्रणालीचें हेंच वस्तुत: सार असून मवाळ व जहाल यांच्या मतभेदाचें हेंच स्वरूप होतें. निबंध छापून प्रकाशित करावा अशी डॉक्टरसाहेबांची इच्छा होती. त्याआधी तो आपल्याहून वडील व सामाजिक कार्यात प्रत्यक्ष भाग घेणाऱ्या एखाद्या प्रौढ व्यक्तीला दाखवावा म्हणून डॉक्टरसाहेबांनी तो निबंध रावबहादूर वामनराव कोल्हटकर यांना दाखविला. ती त्यांच्याच मतांवर व पक्षावर टीका होती. निबंध वाचून रावबहादूर संतापले. त्यांनी मुंजे यांची खरड काढली व तो न छापण्याविषयी त्यांना बजावून सांगितलें. त्यांना काही अधिकोत्तर न करता डॉ. मुंजे घरी आले. पण या क्षणापासून रावबहादुरांच्या मर्जीतून मात्र ते उतरले.

या घटनेनंतर याच वर्षी पुढे काँग्रेसचें अधिवेशन आलें. हें अधिवेशन ( सन १९०४ ) मुंबईला भरावयाचें होतें. मुंजे यांच्या मनाचा कल सार्वजनिक कार्याकडे वळू लागल्याचें त्यांचे मित्र कै. माधवरावजी पाध्ये ( नागपूरचे आद्य मराठी वृत्तपत्र ‘देशसेवक’ याचे संपादक ) यांच्या ध्यानात आलें होतें. माधवराव पाध्ये व डॉ. गौर यांच्या आग्रहावरून डॉ. मुंजे त्यांच्यासमवेत या काँग्रेसच्या अधिवेशनाला मुंबईला गेले.

काँग्रेस अथवा राष्ट्रीय सभेची या वेळपर्यंत अशी स्थिति असे की, तिच्या वार्षिक मेळाव्यात प्रतिष्ठित लोक एकत्र येऊन देशस्थिती-संबंधी विचारविनिमय, भाषणें व ठराव करीत; पण वर्षभर अंग मोडून काम करावयास कोणीही पुढारी सिद्ध नसे. अलाहाबादच्या ‘इंडियन ओपीनियन’ या पत्राने या प्रवृत्तीवर टीका करताना असें लिहिलें की, “ पुढारी अंग मोडून काम करीत नाहीत हेंच हिंदुस्थानातील राजकीय चळवळीला यश न येण्याचें खरें कारण होय.” राष्ट्रीय सभेचें काम करणें तर दूरच राहिलें; पण उलट तेलंग, चंदावरकर, तय्यबजी, सुब्रह्मण्यम् अय्यर, शंकरन् नायर इत्यादि राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनी वेळ येताच सरकारी नोकरी पत्करून स्वार्थसाधन मात्र केलें. १९०४-च्या राष्ट्रीय सभेच्या प्रारंभी हा एक चर्चेचा विषय झाला होता. राष्ट्रीय सभेत त्याला तोंड फुटावें या हेतूने तिच्या चारच दिवस आधी लोकमान्य टिळकांनी केसरीच्या दि. २० डिसेंबरच्या अंकात ‘ वेळ तर हीच आहे ’ असा मथळा घालून एक खास अग्रलेख लिहिला, व त्यात असें प्रतिपादन केलें की, “ सनदशीर चळवळ हवी तर तीच का होईना पण ती तरी कसून करा. विलायतेत चळवळ झाली पाहिजे व तीच खरी चळवळ असें तुमचें मत असेल तरीही ठीक आहे. पण ती करण्यास तरी

तुम्ही योग्य पुढारी हुडकून काढा आणि त्यांना विलायतेला पाठवा. विलायतेतील लिबरल पक्षाची कास धरावी असें तुम्हांला वाटत असेल तरी हरकत नाही. जा आणि पार्लमेंटच्या निवडणुकीत स्वत: भाग घेऊन त्या पक्षाच्या तत्त्वाबरोबर हिंदुस्थानचें घोडेंही दामटण्याचा प्रयत्न करा."

विसावी राष्ट्रीय .सभा दि. २४ डिसेंबर १९०४-ला मुंबईला भरली. तिचे स्वागताध्यक्ष सर फेरोजशहा मेथा व अध्यक्ष सर हेन्री कॉटन हे होते. त्यांच्या समवेत सर वुइल्यम् वेडरबर्न हेही आले होते. मुंबईला या दोघांचीही मोठ्या थाटाने मिरवणूक निघाली. हिंदुस्थानात व इंग्लंडमध्ये राष्ट्रीय सभेचें काम सतत व जोमाने चालणें कसें आवश्यक आहे या विषयाची चर्चा करण्यासाठी टिळकांनी या दोघांचीही भेट घेतली. काँग्रेसचे वजनदार पुढारी सर फेरोजशहा मेथा यांचें धोरण वर्षातून केवळ एक वेळ जमून ठराव संमत करणें येवढेंच काँग्रेसचें स्वरूप असावें असें होतें; तर टिळकांना ती सतत कार्य करणारी चैतन्यमय संस्था करावयाची होती. फेरोजशहा मेथा यांना राष्ट्रीय सभेला घटना असावी हेंही मान्य नव्हतें. या मुद्द्यावर काँग्रेसमध्ये लाला लजपतराय यांच्याशी विषयनियामक समितीच्या सभेत चांगली खडाजंगीही झाली होती. या काँग्रेसमध्ये जनमत टिळकांच्या व्यक्ति-महत्त्वाकडे आकर्षित होऊ लागल्याचीं चिन्हें दिसू लागलीं. या वर्षी टिळकांना मुंबई हायकोर्टाने फौजदारी खटल्यातून दोषमुक्त म्हणून सोडून दिलें होतें. त्यामुळे काँग्रेसच्या अधिवेशनात लोकांनी त्यांचें स्वयंस्फूर्तीने थाटाचें स्वागत केलें. त्यांचा हिंदु व मुसलमान या दोघांनीही जयजयकार केला.

या वेळी लॉर्ड कर्झन हे भारताचे व्हॉइसरॉय होते. त्यांनी विश्वविद्यालयें व शिक्षणखातें यांवर सरकारचा विशेष अधिकार असावा असें धोरण आखून तें कार्यवाहीत आणावयास प्रारंभ केला. त्याचा परिणाम म्हणून सन १९०४-चा विश्वविद्यालयाचा कायदा झाला. एका प्रसंगी कलकत्ता विश्वविद्यालयाचे कुलपति या नात्याने भाषण करताना त्यांनी हिंदु संस्कृतीविषयी प्रकटपणे हीन उद्गार काढून अनेकांचीं मनें दुखावलीं होतीं. सरकारच्या या धोरणाची प्रतिक्रिया म्हणून १९०४-च्या काँग्रेसमध्ये शिक्षणविषयक सरकारी धोरणावर टीका करणारा एक ठराव संमत करण्यात आला. या ठरावावर नागपूर प्रांताच्या वतीने डॉ. गौर यांचें भाषण झालें. या वेळी इंग्लंडमधील भारतमंत्र्याच्या कार्यालयावर चौतीस लक्ष रुपये खर्च करण्यात येत असत, व तो खर्च हिंदुस्थानच्या तिजोरीतून करण्यात येत असे. हा खर्च हिंदुस्थानवर न

लादता, वसाहतीच्या मंत्र्यांच्या कचेरीचा खर्च जसा त्यांना सोसावा न लागण्याची सूट आहे तशीच ती हिंदुस्थानलाही असावी अशी मागणी करणारा ठराव या राष्ट्रीय सभेत संमत करण्यात आला. या ठरावावर नागपूर प्रांताच्या वतीने श्री. माधवराव पाध्ये यांचें भाषण झालें. डॉ. मुंजे यांची राष्ट्रीय सभेला जाण्याची ही पहिलीच वेळ असल्यामुळे त्यांनी मात्र या अधिवेशनात प्रत्यक्ष कोणताच भाग न घेता प्रेक्षकाची भूमिका स्वीकारली. या अधिवेशनातील सुरेन्द्रनाथ बॅनर्जींची एक गंमत डॉ. मुंजे नेहमी सांगत असत. ती अशी : अधिवेशनाचे प्रतिनिधि येऊन मंडप भरला तरी नियोजित अध्यक्ष यावयाचे होते. अशा स्थितीत फेरोजशहा मेथा सुरेन्द्रनाथ बॅनर्जींना म्हणाले. The President is yet to come, My dear Banerji, you speak on! (अधिवेशनाचे अध्यक्ष अजून यावयाचे आहेत. प्रिय बॅनर्जी, तुम्ही तोंवर एखादें भाषण करा.) त्यावर बॅनर्जी म्हणाले, " But on what subject I should speak?" (पण मी कोणत्या विषयावर बोलू ? ) त्यावर फेरोजशहा मोठ्याने हसत उद्गारले ' Oh you speak for hours for nothing, Speak on ! " ( काही तात्पर्य नसताना तुम्ही तासन् तास बोलत राहता. बोला. )

या अधिवेशनाला जाताना डॉ. मुंजे यांनी आपल्या ' Reformed Opinion on Hindu Social Reforms ' या निबंधाचें हस्तलिखित बरोबर नेलें होतें. तें हस्तलिखित त्यांनी लोकमान्य टिळकांना दाखविलें. टिळकांना तो निबंध इतका आवडला की, त्यांनी डॉ. मुंजे यांना तो शक्य तितक्या लवकर छापून प्रसिद्ध करावयाची सूचना केली. लोकमान्यांना तो निबंध आवडला याचा डॉक्टरांना अतिशय आनंद झाला. नागपूरला येताच त्यांनी तो प्रकाशित केला. या निबंधाच्या प्रकाशनानंतर वामनराव कोल्हटकर प्रभृति सरकारधार्जिण्या समाजसुधारणावादी मवाळाग्रणींचा त्यांच्यावर अत्यंत रोष झाला. डॉ. मुंजे हे टिळकपंथीय म्हणून ओळखण्यात येऊ लागले. या निबंधाच्या प्रसिद्धीचा क्षण हाच वस्तुत नागरपुरातील टिळक संप्रदायाच्या अथवा जहाल पक्षाच्या राजकारणाच्या उदयाचा क्षण होय. डॉ. मुंजे यांच्याभोवती तरुणांचा एक अनुयायी वर्ग यानंतर निर्माण झाला, व मवाळ आणि जहाल असे दोन तट प्रकटपणे नागपूर प्रांताच्या राजकीय जीवनात पडले.

या राष्ट्रीय सभेहून नागपूरला परत आल्यावर श्री. माधवराव पाध्ये हे डॉ. मुंजे यांना म्हणाले की," डॉक्टर, आपण आपल्या प्रांतापुरती एक राजकीय परिषद भरवावी. लोकांच्या राजकीय जागृतीच्या दृष्टीने तिचा अतिशय उपयोग होईल." माधवराव पाध्ये यांची ही

सूचना डॉक्टरांना अतिशय आवडली. लवकरच तिची योजना ठरून ती पार पाडावयास्तव डॉ. मुंजे व त्यांचे नारायणराव अळेकर प्रभृति तरुण सहकारी झटू लागले. डॉ. मुंजे यांची क्रीडापटुता व त्यामुळे तरुणांच्या वेगवेगळ्या गटांशी असणारे त्यांचे संबंध ध्यानात घेऊन त्यांच्याकडे स्वयंसेवक विभागाच्या उभारणीचें काम देण्यात आलें होतें. डॉक्टरसाहेब सांगत असत की, "मला हॉकी खेळण्याचा नाद असल्यामुळे हिस्लॉप कॉलेजमधील विद्यार्थ्यांना हाताशी धरून मी एक जिमखाना काढला होता. या जिमखान्यात हिंदूंपेक्षा मुसलमान तरुणांचीच अधिक भरती झाली व रोजच्या खेळण्यामुळे माझे त्यांच्याशी जिव्हाळ्याचे संबंध उत्पन्न झाले. परिषदेची कल्पना निघताच तिच्यासाठी लागणारे स्वयंसेवक आपण याच मंडळीतून मिळवू अशी मला खात्री होती. पण मी परिषदेची गोष्ट काढताच या मंडळींनी माझ्याशी असलेले आपले संबंध पार तोडून टाकले, व जिमखान्यावर माझें वर्चस्व असल्यामुळे ते तेथे येईनासे झाले. मी काय समजावयाचें तें समजलो व हिंदु समाजातूनच आवश्यक ते स्वयंसेवक मिळवून मी परिषदेचें काम पार पाडलें." भवानी शंकर नियोगी हे या परिषदेच्या स्वयंसेवक दलाचे प्रमुख होते. डॉ. मुंजे यांच्या खटपटीने परिषदेच्या प्रतिनिधिनिवासासाठी हिस्लॉप कॉलेजचें तत्कालीन वसतिगृह मिळालें.

दि. २२ एप्रिल १९०५-ला नागपूरच्या टाऊन हॉलमध्ये ही प्रांतीय परिषद झाली. डॉ. मुंजे यांचा राजकीय क्षेत्रातला पहिला प्रकट पदन्यास या परिषदेच्या रूपाने झाला. डॉ. मुंजे यांच्या तरुण गटाच्या हाती या परिषदेचें सूत्रचालकत्व असल्यामुळे व मुख्यतः जहाल पक्षाच्या राजकारणाच्या प्रचारासाठीच ही प्रांतीय परिषद करावयाचें ठरल्यामुळे टिळक संप्रदायाच्या राजकारणाचे विदर्भातील आधारस्तंभ व टिळकांचे परम स्नेही श्रीमंत गणेश श्रीकृष्ण उपाख्य दादासाहेब खापर्डे यांना या परिषदेचे अध्यक्ष म्हणून निवडण्यात आलें होतें. नागपूरचे प्रथम श्रेणीचे नागरिक सर गंगाधरराव चिटनवीस हे या परिषदेचे स्वागताध्यक्ष होते. परिषदेच्या निमित्ताने दादासाहेब खापर्डे हे नागपूरला आले असता त्यांच्या मार्गदर्शनाचा जहाल पक्षाचें राजकारण प्रसृत करण्याच्या दृष्टीने डॉ. मुंजे यांनी आपल्या सहकाऱ्यांच्या समवेत उपयोग करून घेतला. या निमित्ताने नागपूरला झालेल्या आपल्या वास्तव्यासंबंधी कै. दादासाहेब खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात, "सकाळी (दि. २५-४-१९०५) पुष्कळसे स्वयंसेवक व विद्यार्थी घोळका करून आले व मी त्यांच्याशी बोलत बसलो. हे सर्व लोक फार चांगले

आहेत. अलोणीने संभाषणात प्रमुख भाग घेतला होता. त्याचप्रमाणे भवानी शंकर, देव आणि इतर लोकांनीही संभाषणात भाग घेतला. मुंजे आणि कुकडे हजर होते, आणि मी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करण्यास त्यांना सांगितलें."

—श्री. दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र पृ. २२३

दि. २२-ला झालेल्या या राजकीय परिषदेला जोडूनच दि.२४-ला श्री. अण्णासाहेब महाजनी यांच्या अध्यक्षतेखाली सामाजिक परिषद व त्याच दिवशी रावबहादूर मुधोळकर यांच्या अध्यक्षतेखाली औद्योगिक परिषद झाली. दादासाहेब खापर्डे यांनी सामाजिक परिषदेत भाग घेऊन भाषण केलें होतें.

दि. २२-च्या या परिषदेनंतर डॉ. मुंजे यांनी नागपूर प्रांतात लोकमान्य टिळकांचें राजकारण दृढमूल करण्याच्या दृष्टीने कसोशीचे प्रयत्न प्रारंभ केले. राष्ट्रजागृतीसाठी जीं जीं शिवाजी उत्सवासारखीं साधनें लोकमान्यांनी प्रवर्तित केलीं होतीं त्यांचें लोण अमरावतीपासून जपानपर्यंत १९०५-मध्ये पोहोचलेलें होतें. तरी नागपूर मवाळांचा बालेकिल्ला असल्यामुळे तेथे अजूनपर्यंत या उत्सवाने लोकजीवनात प्रवेश केला नव्हता. जपानमधील शिवाजी उत्सवासंबंधी कै. न. चिं. केळकर लिहितात, "१९०५-च्या मे महिन्यात जपानातील हिंदी विद्यार्थ्यांनी शिवाजी उत्सव मोठ्या प्रमाणावर केला. पूर्वीचे दोन उत्सव लहान प्रमाणावर झाले होते. टोकियोतील प्रमुख जपानी गृहस्थ, सयाम, कोरिया, चीन, फिलिपाईन देशचे काही विद्यार्थी, काही चिनी, जपानी स्त्रिया वगैरे मंडळी आली होती. बॅरन कांदा, इंडो-जपानी असोसिएशनचे व्हाइस प्रेसिडेंट, यांना सभापति निवडण्यात आलें. बाबू शाळिग्राम सिह, बाबू जगन्नाथ सहाय, बाबू सत्यसुंदर देव, नरेन्द्र मोहन गुप्त, गोविंदराव पोतदार वगैरे विद्यार्थ्यांनी भाषणें केलीं. बॅरन कांदा म्हणाले, "शिवाजीसारखे सत्पुरुष आपल्या उदाहरणाने आपल्या देशाचेंच नव्हे तर अखिल मानवजातीचें हित करतात." रूसो-जपानी युद्धात नुकताच जपानचा पूर्ण विजय झाला असल्यामुळे आशियाविरुद्ध यूरोप या भावनेचा ध्वनि प्रत्येकाच्या मनात घुमत होता. एका जपानी स्त्रीने पोर्टआर्थर जिंकल्याचें पद गाऊन दाखविलें. नंतर हिंदी विद्यार्थ्यांनी 'अइ भुवन मनमोहिनी, अइ निर्मल सूर्य करोज्वल धरणी जनकजननि मा-मा-मा' हें बंगाली राष्ट्रगीत गाऊन दाखविलें. 'वंदे मातरम्' हें बंगाली राष्ट्रगीत अजून मूर्धाभिषिक्त व्हावयाचें होतें."

—समग्र केळकर वाङमय, २ लोकमान्य खंड. पृ. ३१

इ. स. १९०५-च्या जूनमध्ये डॉ. मुंजे यांनी प्रथम महाराष्ट्रीय महोत्सव नागपूरला घेतला. या उत्सवानिमित्त दादासाहेब खापर्डे यांची दि. १७ व १८ जूनला दोन भाषणें झालीं. खापर्डे यांच्या या भेटीतही आपल्या तरुण मित्रांसह जहाल पक्षाचें राजकारण नागपुरात स्थिरपद व वृद्धिगत करण्याच्या दृष्टीने डॉ. मुंजे यांनी विचारविनिमय केल्याची नोंद खापर्डे यांच्या दैनंदिनीत आहे. मुंजे यांच्याबरोबर 'ए यंग ग्रॅज्युएट बोबडे' (नागपूरचे विख्यात ॲडव्होकेट कै. भय्यासाहेब बोबडे) व त्रिंबकराव पारधी हे असल्याचाही या दैनंदिनीत निर्देश आहे.

डॉ. मुंजे यांचा, मागे उल्लेखिलेल्या त्यांच्या निबंधापासून लोकमान्य टिळकांशी परिचय होताच. १९०४-च्या काँग्रेसनंतर त्यांनी नागपूर विभागात टिळक पक्षीय राजकारण दृढमूल करण्याची धुरा खांद्यावर घेतल्यानंतर स्वाभाविकपणेच, त्यांच्या पूर्वीच असलेल्या सामाजिक प्रतिष्ठेमुळे नागपूर प्रांतातील तरुण वर्गाचें राजकीय नेतृत्व त्यांच्याकडे आलें. खापर्डे यांना विश्वासू, तरुण व कर्तृत्ववान् सहकारी लाभला आणि मुंजे यांच्याकडे टिळकांचें लक्ष वेधून टिळकांच्या परिवारात त्यांना विश्वासू सहकाऱ्याचें महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें.

इ. स. १९०५ हें वर्ष भारताच्या इतिहासात सर्वंकष स्वरूपाच्या राजकीय जागृतीच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचें गणलें जातें. ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध एकमुखी असंतोषाची लाट या वर्षी व्यापक स्वरूपात उठली व तिने सारें भरतखंड व्यापिलें. लोकमान्य टिळकांनी या संधीचा पारतंत्र्यविरोधी शक्तींना जागृत व संघटित करण्याच्या दृष्टीने पूर्ण उपयोग करून घेतला व त्यातून क्रांतिकारक पक्षाचें सामर्थ्य वाढलें. या वर्षी दि. २० जुलैला भारताचे अरेराव व्हॉइसरॉय लॉर्ड कर्झन यांनी बंगालची फाळणी घोषित केली. या फाळणीविरुद्ध जी भारत-व्यापी चळवळ झाली तिचें मूल्यमापन करताना कै. न. चिं. केळकर लिहितात, "हिंदुस्थान देश इंग्रजांच्या अंमलाखाली गेल्यापासून अनेक चळवळी इकडे झाल्या. पण ज्याला बंगालच्या फाळणीची चळवळ म्हणतात तशी चळवळ आजवर केव्हाही झाली नाही. १८५७ साली बंड झालें तें उत्तर हिंदुस्थानातच झालें, व तें मुख्यत: शिपायांनीच केलें होतें. दुसऱ्या टोकाला असहकारितेची नि:शस्त्र चळवळ १९२१ साली झाली. ती सर्व हिंदुस्थान देशभर झाली. परंतु काही वर्ग त्यातून अलिप्त होता. बंगालची फाळणी ही एकच चळवळ अशी झाली की, जिच्यातून हिंदुस्थानचा एकही प्रांत सुटला नाही. बंगाल्यातच का होईना पण विद्यार्थ्यांपासून राजा महाराजांपर्यंतचे लोक या चळवळींत सामील होते."

—समग्र केळकर वाङ्मय, २ लोकमान्य खंड, पृ. ५६–५७

बंगाल प्रांत मोठा असल्यामुळे एकाच गव्हर्नरला एवढ्या मोठ्या प्रांताचा राज्यकारभार करणें सोईचें होत नाही; यास्तव त्या प्रांताचे दोन विभाग करावे व ते दोन गव्हर्नरांच्या शासनाखाली असावे असें लॉर्ड कर्झन यांचें म्हणणें होतें. हें म्हणणें चुकीचें नव्हतें. पण हें त्यांचें म्हणणें साळसूदपणाचें असून त्यांचे हेतु वेगळे होते. बंगाली भाषाभाषी लोकांचेच राज्यकारभाराच्या दृष्टीने सोय म्हणून दोन प्रांत करता येत होते. महाराजा ज्योतींद्र मोहन टागोर यांनी सरकारला तार पाठवून असें सुचविलें होतें की, "बंगाली भाषा बोलणारे लोक न विभागताही फाळणी करता येईल व आम्ही तशी योजना मांडतो." पण कर्झन यांना स्वराज्याच्या चळवळीला बंगालमध्ये येऊ पाहणारें बळ नष्ट करण्यासाठीच वंगभाषीयांचें विभाजन करावयाचें होतें. त्यांनी मूळ लहान असलेल्या आसाम प्रांताला चितगांव, नवखाली, टिपरा, फरीदपूर व बारिसाल हे जिल्हे जोडून वंग भाषीयांचा एकसंधपणा छिन्नविच्छिन्न केला, व हिंदु बहुसंख्याक व मुस्लिम बहुसंख्याक असें बंगालचें विभाजन करून हिंदु-मुसलमानांत संघर्ष पाडण्याच्या कुटिल धोरणाचा अवलंब केला. बंगाली लोकांनी हें आव्हान स्वीकारून फाळणी रद्द करण्याचा कृतनिश्चय केला. त्यांना टिळकांनी महाराष्ट्रातून साथ दिली व ब्रिटिशांविरुद्ध एकमुखी व्यापक असंतोष भडकून त्यातून स्वदेशी व बहिष्काराच्या टिळकांच्या चळवळीचा उदय व विकास झाला. व्ही. पी. मेनन या चळवळीच्या परिणामांचें व लॉर्ड कर्झनच्या कारकीर्दीचें फलित सांगताना लिहितात :

"सन १८९९-मध्ये लॉर्ड कर्झन हे गव्हर्नर-जनरल म्हणून हिंदुस्थानात आले. ग्लॅडस्टन यांनी असें म्हटलें आहे की, 'साम्राज्याच्या प्रतिनिधीने हें नेहमी लक्षात ठेविलें पाहिजे की, आपली हिंदुस्थानात सत्ता रहावी कीं न रहावी याचा अंतिम निर्णय शेवटी २४ कोटी भारतीयांच्या इच्छेवर अवलंबून आहे.' लॉड कर्झन यांना हें मत अमान्य होतें. उलट आपण साम्राज्याचे सर्व सत्ताधीश प्रतिनिधि असल्याच्या कैफात ते होते. त्यांच्या कारकिर्दीत शासनाने सुक्षमतेचा उच्चांक गाठला होता. कर्झन यांच्या पूर्वीच्या व नंतर कोणत्याही व्हॉइसरॉयने शासनाच्या इतक्या दूरगामी व विविध योजना कार्यवाहीत आणलेल्या नव्हत्या. त्यांतील काही योजनांविरुद्ध अत्यंत तीव्र स्वरूपाच्या प्रतिक्रिया उमटल्या व त्यांना उग्र विरोध झाले. विशेषत: त्यांनी केलेल्या बंगालच्या फाळणीला तीव्र विरोध झाला. लॉर्ड कर्झन यांनी बंगालच्या फाळणीचें असें समर्थन चालविलें की, "एवढ्या मोठ्या प्रांताचें शासन

एका गव्हर्नरच्या हाताखाली नीट रीतीने होऊ शकत नाही व मुक्षम शासनाच्या दृष्टीने बंगालची फाळणी करणें आवश्यक आहे. पण फाळणीची रेषा अशा रीतीने आखण्यात आली की, जातीय तत्त्वावर बंगालचे दोन तुकडे झाले. एका विभागात हिंदु बहुसंख्य होते; तर दुसऱ्या विभागात मुसलमानांचें वर्चस्व होतें. लॉर्ड कर्झन यांना बंगालचें होऊ लागलेलें नवें पुनरुत्थान या युक्तीने दडपून टाकावयाचें आहे असा याचा अन्वयार्थ लावण्यात आला, व या वेळी प्रथमच प्रार्थना, शिष्टमंडळें पाठविणें, ठरावांच्या रूपाने विरोध करणें या आजवरच्या चळवळीच्या रूढ मर्यादांना व संकेतांना झुगारून चळवळीने वेगळें वळण घेतलें. विरोधाचा नवा कार्यक्रम आखण्यात आला. ब्रिटिश मालावरील बहिष्कार त्या कार्यक्रमात अंतर्भूत होता."

राष्ट्रीय प्रवृत्तीच्या भारतीयांच्या उत्साहाला नवें भरतें यावें अशा जागतिक घटनाही घडत होत्या. त्यांनी आपलें काम केलें. विशेषत: या वेळी आशियाई राष्ट्र असलेल्या जपानने रशियाचा जो पराभव केला त्याची अविस्मरणीय मुद्रा सर्वत्र उमटलेली होती.

कॉंग्रेसमध्ये दादाभाई नौरोजी (पहिला भारतीय मनुष्य, कीं जो ब्रिटिश हाउस ऑफ कॉमन्सचा सदस्य झाला.), गोपाळ कृष्ण गोखले, सुरेन्द्रनाथ बॅनर्जी, व सर फेरोजशहा मेथा प्रभृतींचा जो जुना वर्ग होता त्याचें असें मत होतें की, हळूहळू व क्रमश: भारतीयांचा त्यांच्या देशाच्या शासनव्यवस्थेत शिरकाव व्हावा. पण भारतीयांचें लक्ष्य स्वराज्य (आपल्या देशाचें शासन आपण चालविणें) हें आहे असें म्हणणारा दुसरा वर्ग या वेळी उदय पावला होता. त्याचें स्फूर्तिकेन्द्र बाळ गंगाधर टिळक हे होते. या थोर महाराष्ट्रीय नेत्याला देशात पुष्कळ व परिणामकारक पाठिंबा होता.

वंगभंगाविरुद्धच्या या चळवळीतच श्री. अरविन्द घोषांच्या क्रांतिकारक नेतृत्वाचा बंगालला व भारताला लाभ झाला. बहिष्काराने इंग्रजी सत्तेविरुद्ध झगडण्याचें परिणामकारक साधन लोकांच्या हाती पडलें व बहुजन समाज राजकीय चळवळीशी सक्रियपणे स्वदेशी व बहिष्काराच्या साधनांच्या योगानेच समरस होऊ शकला.

भारतात वंगभंगाच्या चळवळीने सारें वातावरण तप्त असतानाच कॉंग्रेसच्या वतीने नामदार गोपाळ कृष्ण गोखले हे विलायतेस गेले. भारताचें गाऱ्हाणें इंग्लंडच्या वेशीवर टांगावें व तेथील राजकारणात हिंदुस्थानचें हित साधणारा पक्ष निर्माण करता आल्यास पहावा हा

गोखले यांना पाठविण्यातील हेतु होता. याच वेळी पंजाबकेसरी लाला लजपतराय हेही विलायतेस गेले होते. गोखले यांच्या प्रचाराच्या कामात त्यांना लजपतरायांचें मोठें साहाय्य झालें. गोखले यांनी भारताची बाजू व कर्झन यांच्या कुटिल राजनीतीचें स्वरूप विलायतेत इतक्या स्पष्ट-पणे, निर्भीडपणे व परिणामकारक रीतीने मांडलें की, टिळकांनी त्यांचें मुक्तकंठाने अभिनंदन केलें. त्यांनी बंगालमधील बहिष्काराच्या चळ-वळीचें समर्थन करताना आपल्या इंग्रज श्रोत्यांना असें सांगितलें की, "तुम्ही कदाचित् रागावाल; पण तुम्हांला राग आला तर तोच मला इष्ट आहे. इंग्लंडमध्ये गोखले यांनी स्वराज्याची (होमरूल) उघड मागणी केली. स्वदेशी चळवळीचें गोखले यांनी केवळ समर्थनच केलें नाही तर ते इंग्लंडमध्ये स्वत: स्वदेशी पोशाखानेच सभेला जात असत. एका भाषणात तर त्यांनी असें सांगितलें की, "हिंदी लोक राष्ट्रीय बुद्धीने एक होणार आहेत, व सरकारचा समाचार घ्यावयास्तव सिद्धता करीत आहेत. न्यायाने स्वराज्य न दिलें तर हिंदी लोक जुलमाला त्रासून आपल्या बलाने राज्य घेऊ पाहतील तर त्याला प्रतिकार करण्यासाठी विलायती सैन्य पाठविण्यात येऊ नये इतकी खबरदारी मात्र तुम्ही घ्या म्हणजे झालें!" मवाळ गोखल्यांचें वंगभंग व कर्झनशाहीने केलेलें हें केवढें विलक्षण परिवर्तन म्हटलें पाहिजे! जहाल तरी याहून अधिक काय बोलणार होते!

गोखल्यांच्या आधी लाला लजपतराय हिंदुस्थानात परत आले. त्यांनी असा संदेश दिला की स्वदेशी, विशेषत: बहिष्काराची चळवळ, उद्या वंगभंग रद्द झाला तरी इतर राजकीय हेतु साधण्यास्तव जोमाने पुढे चालविली पाहिजे. यंदाच्या राष्ट्रीय सभेने मुख्यत: स्वदेशीचाच विषय हाती घ्यावा.

सन १९०५-च्या डिसेंबरच्या प्रारंभी नामदार गोखले हिंदुस्थानात परत आले. त्यांचें पुण्याला मोठें स्वागत झालें. त्यांनी होऊन टिळकांची गाठ घेतली. त्यांच्या सत्कारसभेत टिळकाचें भाषण झालें. गोखल्यांच्या या कामगिरीबद्दल सन १९०५-च्या राष्ट्रीय सभेचें अध्यक्षपद त्यांना देण्यात आलें.

सन १९०५-ची राष्ट्रीय सभा वाराणशीला झाली. राष्ट्रीय सभेच्या या अधिवेशनाला नेमस्ताग्रणी व राष्ट्रीयपक्षाचे अभिमानी बहु-संख्येने उपस्थित होते. या दोन पक्षांच्या प्रतिनिधींची निवासस्थानेंही वेगवेगळीं होतीं. नागपूर प्रांताच्या वतीने टिळकांच्या राष्ट्रीय पक्षाचे

अध्वर्यु म्हणून डॉ. मुंजे व त्यांच्या समवेत डॉ. लिमये या अधिवेशनाला गेले होते. काशीच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष नामदार गोखले यांचें अध्यक्षीय भाषण मवाळांच्या परंपरेला अनुसरून न होता तें जहाल पक्षाच्या प्रवक्त्यासारखें झालें. वंगभंगाचा राग व कर्झनशाहीचा तिटकारा गोखल्यांना विलक्षण होता. त्याचें प्रतिबिंब त्यांच्या भाषणांत उमटलें. वंगभंगाच्या चळवळीचें समर्थन करताना ते म्हणाले की, "ही चळवळ राष्ट्राच्या इतिहासाला वेगळेंच स्वरूप देणारी अशी गोष्ट होय. या चळवळीने देशातील वाद हटून पूर्वी कधी झाली नव्हती इतकी एकी पुढाऱ्यांत झाली आहे. पूर आला असता पाणी वेड्यावाकड्या रीतीने कोठेही शिरतें त्याप्रमाणे अशा प्रचंड चळवळीत योग्य मर्यादेचें उल्लंघन क्वचित् होणारच. बंगाली लोकांची बेअब्रू झाली तर ती आमचीच होय. या भावनेने आपण सर्व मदत करू. एका विवक्षित हेतूने म्हणजे इंग्लंडच्या लोकांचें लक्ष वेधण्यासाठी बहिष्काराच्या शस्त्राचा उपयोग करण्यात आला आहे तो या प्रसंगी योग्य असून विलायतेत त्याचा परिणाम चांगला झाला आहे. स्वदेशीकरिता झीज सोसली पाहिजे. हिंदुस्थानाला वसाहतीचें स्वराज्य मिळालें पाहिजे." जहाल तरी याहून अधिक काय बोलणार ? नेमस्ताग्रणी गोखल्यांचे उद्गार सरकारला अनपेक्षित असले व झोंबले तर त्यात नवल नाही. टाईम्सने गोखल्यांच्या या भाषणावर स्वतःची प्रतिक्रिया व्यक्त करताना लिहिलें की, "गोखले यांनी नेमस्तपणा सोडला ही चूक झाली." पण गोखल्यांचें अध्यक्षीय भाषण सुस्पष्ट असलें तरी तेवढ्याने टिळक व जहालपक्ष यांचें समाधान होणारें नव्हतें. त्यांना केवळ स्वदेशीचा पुरस्कार नको होता; तर त्यांचा आग्रह ब्रिटिश मालावरील बहिष्काराचा आग्रह काँग्रेसने मान्य करावा असा होता. त्यावर जहाल नेमस्तांच्या विरोधाची ठिणगी उडाली व त्याला त्या वेळी भारतात झालेल्या युवराजाच्या आगमनाचें निमित्त कारण मिळालें.

लॉर्ड कर्झन यांच्या निमंत्रणावरून या वेळी भारतात इंग्लंडच्या युवराजांचें आगमन झालें होतें व नेमस्त पक्षाच्या लोकांचें असें म्हणणें होतें की, राष्ट्रीय सभेच्या या बैठकीत युवराजांच्या स्वागताचा ठराव करावा. त्याला टिळक, खापर्डे, लजपतराय प्रभृति जहाल पक्षीयांचा तीव्र विरोध होता. जर या स्वागताच्या ठरावाला विरोध नको असेल तर केवळ स्वदेशीचें तुणतुणें न वाजविता विलायती मालावरील बहिष्काराचा ठराव मान्य करा असा पेच जहालांनी नेमस्तांना घातला. विदर्भ व नागपूर प्रांताच्या तरुण गटाचे पुढारी डॉ मुंजे यांनी युवराजाच्या स्वागताच्या विरोधाचा व बहिष्काराच्या ठरावाचा पक्ष इतक्या जोमाने

उचलून धरला की, या संघर्षात नेमस्तांच्या रथी-महारथींचा नक्षा उतरला. खापर्डे यांच्यासारख्या ज्येष्ठ व श्रेष्ठ लोकाग्रणीने डॉ. मुंजे यांच्या काशी कॉंग्रेसमधील या कार्याचा गौरवपूर्ण निर्देश केलेला आहे. अत्यंत अल्पावधीत आपल्या कर्तृत्वाने व तेजाने भारतीय राजकारणात डॉ. मुंजे तळपू लागले होते हें यावरून दिसून येईल. दादासाहेब खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात, "आज सकाळी टिळक व वासुदेवराव जोशी आले. माझ्या शेजारच्याच खोलीत ते राहतात. त्यांना भेटायला खूप लोक आले. ते सर्व टिळकांना 'देव' मानतात, आणि तें योग्यच आहे. मिस निवेदिता आम्हांला भेटायला आली. लाला लजपतराय, बाबू भूपेंद्रनाथ सेन, आणि काही इतर प्रतिनिधींबरोबर आम्ही काही ठरावांसंबंधी ऊहापोह केला. मी, पाळेकर, ब्रह्म आणि डॉ. मुंजे बंगाली लोकांच्या कँपात गेलो. आणि पी. सी. रायने आम्हांला सांगितलें की, बंगाल स्वदेशीच्या ठरावाला पाठिंबा देईल." ( दि. २६ )

"काल रात्री आम्ही – मी व टिळक – बंगाल कँपमध्ये गेलो व त्या लोकांचीं मनें वळविलीं. (स्वदेशीच्या ठरावाला अनुकूल.) आम्ही बिहार कँपमध्येही गेलो. त्यांपैकी एकाने माझ्यासारखें मत दिलें. काही वेळापूर्वी बंगालच्या प्रतिनिधींनी आपली सभा भरवून स्वदेशी आणि बहिष्कार या दोन्ही ठरावांना पाठिंबा देण्याचें ठरविलें. मग आम्ही पंजाब कँपात गेलो. राजपुत्राचे आभार मानण्याच्या ठरावास विरोध करण्याचें त्यांनी ठरविलें. मध्यरात्रीनंतर आम्ही बिऱ्हाडी परत आलो. मी आज सकाळी फार लवकर उठलो आणि कॉंग्रेसच्या भर सभेमध्ये आम्ही राजपुत्राचे आभार मानण्याच्या ठरावाला विरोध करू आणि आमचा बहिष्काराचा ठराव आम्ही सभेपुढे मांडू असें मी पत्र लिहून कॉंग्रेसच्या अध्यक्षांना कळविलें. राजपुत्राच्या आभाराच्या ठरावाला उपसूचना मांडण्याकरिता मी कपडे घालून न जेवताच मंडपात गेलो. टिळकही माझ्या समागमे आले. श्री. दत्त यांनी आम्हा दोघांना बोलाविलें. आम्ही त्यांना सांगितलें की, आभाराच्या ठरावाला असलेला आमचा विरोध आम्ही परत घेणार नाही. मदन मोहन मालवीय यांनी इत्थंभूत खरी हकीकत सांगितली नव्हती असें आढळून आलें. डॉ. मुंजे त्या मुद्द्यावर ठाम कायम होते. दाजी आबाजी खऱ्यांनी मध्यस्थी केली, आणि गोखले स्वतः, मी माझा विरोधाचा ठराव परत घेतल्यास फार मोठी कृपा होईल असें म्हणाले. मी म्हटलें, आमचा बहिष्काराचा ठराव कॉंग्रेसने संमत केल्यास आम्ही आमचा राजपुत्राच्या आभाराचा विरोध परत घेऊ. ती गोष्ट त्यांनी मान्य केली. राजपुत्राच्या आभाराचा ठराव पास झाला.

पण एकमताने नाही. विषयनियामक समितीत बऱ्याच विरोधानंतर बहिष्काराचा ठराव पास झाला. वाच्छांची आणि माझी बोलाचाली झाली." (दि. २८) "आम्ही बनारस स्टेशनावर गेलो. आम्हांला रवाना करायला टिळक आले होते. आमची गाडी सकाळी ८ वाजता चालू झाली. गाडीमध्ये मागच्या आठवड्यात बनारस येथे झालेल्या गोष्टीविषयी विचार करावयाला मला पुष्कळ फुरसत मिळाली; मवाळ म्हणवून घेणाऱ्यांची सगळीकडे 'हार' झाली. सर फिरोजशहा मेथांची आज्ञा घेऊन वाच्छा, सेटलवाड आणि इतर काँग्रेसला आलेले यांचें काही चाललें नाही. नागपूरचे **डॉ. मुंजे** आणि **डॉ. लिमये** यांनी फार **खंबीरपणा** दाखविला आणि फार उपयोगी पडले. नागपूरचे एम्. के. पाध्ये हे तर मवाळांच्याही पाठीमागे राहिले."

डॉ. मुंजे यांना आग्रह करून सन १९०४-च्या राष्ट्रीय सभेला प्रथम नेणारे म्हणजेच पर्यायाने त्यांना राजकीय क्षेत्रात ओढावयास कारणीभूत झालेले श्री. माधवराव पाध्ये यांचें दादासाहेब खापर्डे यांनी केलेलें हें वर्णन आहे. विशेषत: पाध्ये यांनी लिहिलेल्या 'जपानचा इतिहास' या पुस्तकावर सरकारची वक्रदृष्टि झाल्यापासून तर ते फारच खचले.

सन १९०५-च्या काँग्रेसचें फलित सांगताना कै. न. चिं. केळकर आपल्या टिळक चरित्रात लिहितात, "काशीच्या राष्ट्रीय सभेत एकंदरीने काय झालें या प्रश्नाचें उत्तर असें होतें की, राष्ट्रीय सभा अजून जिवंत आहे व बदललेल्या परिस्थित्यनुरूप ही सभा आपली विचारपद्धति व कार्यपद्धति ठेवण्याला तयार आहे. या सभेत एक पाऊल पूर्वीपेक्षा खचित पुढे पडलें. कर्झनसाहेबांना उघडपणे औरंगजेब म्हणण्यात आलें. स्वदेशीची चळवळ व बहिष्कार या दोहोंचाही संमतिदर्शक उच्चार झाला. बहिष्काराची चळवळ इतर सर्व प्रांतांतले लोक आपलीशी करण्यास तयार नाहीत असें काही दिसलें, पण बंगाली लोकांना तरी निदान कोणी काही दोष दिला नाही. सर्व हिंदुस्थानने बहिष्काराचा मार्ग स्वीकारावा असा ठराव झाला नाही तरी बंगालने केलें तें योग्य केलें इतकें तरी सर्टिफिकेट नेमस्तांकडून मिळालें. टिळकांच्या मतें "हें नवें खाद्य ज्याच्या कोठ्याला पचेल तो तें खाईल. ज्याला पचणार नाही तो तें खाणार नाही. पण रोगाला औषध योग्य असा तरी निर्णय राष्ट्राने दिला ही काही लहान गोष्ट नाही."

"काशी येथील राष्ट्रीय सभेचा प्रसंग इतर कित्येक दृष्टींनीही फार चांगला झाला. राष्ट्रीय शिक्षण व हिंदु विद्यापीठ (बनारस हिंदु युनिव्हर्सिटी) यांचें कार्य तेथे जोराला लागलें. राष्ट्रीय सभेच्या मंडपात जाहीर सभा भरून काँग्रेसचा फायदा घेऊन नागरी प्रचारिणी सभेने आपले कार्यक्रम ठेवले होते. सभेच्या विद्यमाने टिळकांचें भाषण झालें. स्वदेशीचें कार्यही असेंच जोराला लागलें."

—समग्र केळकर वाङमय, २ लोकमान्य खंड, पृ. ५३ व ५४

काशीच्या काँग्रेसहून परत आल्यानंतर डॉ. मुंजे यांनी राजकारणाला आपल्या जीवनात अग्रस्थान देऊन टिळकांनी प्रवर्तित केलेल्या स्वदेशी व बहिष्काराच्या चळवळीच्या प्रसाराला स्वतःला वाहून घ्यावयाचें ठरविलें. राजकीय मतप्रदर्शनाची वार्षिक यात्रा एवढेंच राष्ट्रीय सभेचें स्वरूप असावें व प्रसंगी युक्तीने राजकीय प्रश्नांसंबंधीचें मत व्यक्त करणें एवढेंच राजकीय कार्याचें स्वरूप असावें हें नेमस्तांचें मत त्यांना अमान्य होतें. १९०४-मध्ये मुंबईला भरलेल्या राष्ट्रीयसभेच्या अधिवेशनात टिळकांचा व त्यांचा जो संबंध आला तेव्हापासूनच त्यांनी टिळकांना आपले गुरु मानलेले होते. राजकारण हा फुरसतीचा वेळ उपयोगात आणण्याचा मार्ग नसून परतंत्र राष्ट्रासाठी स्वदेशाच्या स्वातंत्र्यप्राप्तीचा मार्ग या नात्याने सर्वस्व पणाला लावावयाची ती जीवननिष्ठा होय हें तत्त्व टिळकांच्या व्यक्तिमत्त्वातून मुंजे यांनी उचललें, व तें त्यांनी इतक्या तन्मयतेने आत्मसात् केलें की, नागपूर व मध्य प्रांतातील जहाल राजकारणाचा प्रवर्तक, संवर्धक व शिल्पकार म्हणून लोकनायक बापूजी अणे यांच्यासारखे त्यांचे मित्र, व डॉ. खरे यांच्यासारखे, खालच्या असांस्कृतिक पातळीवरून त्यांचें शत्रुत्व करणारे प्रतिस्पर्धीही त्यांचा आदराने निर्देश करतात. वाढलेल्या व्यवसायाकडे दुर्लक्ष करून, मातृभूमीच्या बंधविमोचनासाठी टिळकांनी प्रवर्तित केलेल्या साधनेला यानंतर डॉ. मुंजे यांनी जें स्वतःला वाहून घेतलें त्याचें वृत्त पुढील प्रकरणात पाहू.

✦ ✦ ✦

प्रकरण नववें

# कलकत्ता काँग्रेस

काशीच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनावरून परत आल्यावर डॉ. मुंजे यांनी स्वतःला राजकारणाला वाहून घ्यावयाचा निश्चय केला. याचा निर्देश मागच्या प्रकरणात केलेलाच आहे. वंगभंगाचा घाव डॉ. मुंजे यांच्यासारख्या प्रखर स्वाभिमानी व तेजस्वी व्यक्तीला सहन होण्यासारखा नव्हता. वंगभंगातून निर्माण झालेल्या राजकीय जागृतीचें लोण मध्यप्रांतात सर्वत्र पोहोचवून स्वदेशी व बहिष्काराच्या निनादाने प्रांताचे दिक्कोन दुमदुमवावयाचे त्यांनी ठरविलें. त्यांच्या पुढारीपणाखाली अनेक समवयस्क मित्र व तरुण काम करावयास गोळा होऊ लागले. मध्यप्रांतातील नेमस्ताग्रणींनी या नव्या नेतृत्वाशी जरी नातें तोडलें होतें तरी त्यांना त्याचें अस्तित्व नाकारता न येण्याइतकें त्या नेतृत्वाचें सामर्थ्य असल्याचें त्यांना प्रत्ययास येत होतें. त्यामुळे सर गंगाधरराव चिटनवीस प्रभृति नेमस्ताग्रणींचे व डॉ. मुंजे यांचे संबंध वरून स्नेहाचे व आतून विरोधाचे होते. डॉ. मुंजे वडिलकीच्या नात्याने ज्यांना स्वतःचे पुढारी मानीत असे त्या वेळी संपूर्ण मध्यप्रांत व वऱ्हाडात एकच थोर पुरुष होते व ते म्हणजे अमरावतीचे श्रीमंत गणेश श्रीकृष्ण उपाख्य दादासाहेब खापर्डे हे होत.

दादासाहेब खापर्डे हे गांधीपूर्व भारतीय राजकारणातील एक असामान्य पुरुष होऊन गेले. स्वदेशाभिमान, प्रतिभा, बुद्धिमत्ता, कर्तृत्व, गर्भश्रीमंती, अभिजातता, रसिकता, त्याग, आध्यात्मिक धारणा, बहुश्रुतता, पांडित्य व शिबिकर्णासारखें दातृत्व आणि बृहस्पतीसारखें वक्तृत्व अशा दुर्लभ गुणांचा समन्वय असलेल्या या महापुरुषाने आपलें सर्वस्व लोकमान्य टिळकांना समर्पण केलें. लोकमान्य टिळक हे जर श्रीरामचंद्रासारखे जीवनादर्श असले तर दादासाहेब खापर्डे यांचें जीवन म्हणजे लक्ष्मणासारखी त्या जीवनादर्शाची एकान्तिक साधना होती. टिळकांना दादासाहेब हे आधार वाटत. टिळकांच्या कोषागारातील अमोघ अस्त्रांपैकी दादासाहेब हे महास्त्र होतें. लोकमान्य टिळकांसारख्या वज्रहृदयाच्या युगंधर पुरुषाने 'I cannot do without you' असें ज्याला मोकळ्या मनाने लिहिलें असे दादासाहेब हे एकच महापुरुष होत.

लोकमान्य टिळकांच्या राजकारणाची धुरा दादासाहेबांनी त्यागपूर्वक व तेजस्वीपणाने डॉ. मुंजे यांच्या जवळजवळ एक तप आधी आपल्या स्कंधावर घेतलेली होती. वयाने ते टिळकांपेक्षाही दोन वर्षांनी वडील होते. टिळकांना आपले राजकीय गुरु मानून त्यांच्या कार्याला जीवन समर्पण करावयाचा निश्चय केलेले तरुण डॉ. मुंजे हे दादासाहेब खापर्डे यांच्याकडे पुढारी या नात्याने आकृष्ट होणें स्वाभाविकच होतें. डॉ. मुंजे यांच्या खापर्डे यांच्याविषयीच्या भावना दि. २३ सप्टेंबर १९०८-ला त्यांनी माधवराव बोडस यांना लिहिलेल्या पत्रातून व्यक्त झालेल्या आहेत. या पत्रात डॉ. मुंजे लिहितात, " खापर्डे यांना आम्ही टिळकांखालोखाल मानतो हें तुम्हांला माहीत असेलच." सन १९०६-पासून डॉ. मुंजे यांनी खापर्डे यांच्या समवेत, त्यांचे विश्वासू सहकारी या नात्याने राजकीय चळवळीला प्रारंभ करणें हें यामुळेच स्वाभाविक ठरतें.

१९०६-च्या प्रारंभापासून डॉ. मुंजे यांनी स्वदेशी व बहिष्कार या लोकमान्य टिळकांच्या द्विसूत्रीच्या प्रचारकार्यास वेगाने चालना दिली. राजकीय जागृतीच्या दृष्टीने त्या वेळी मध्यप्रांतातील लोक किती सुस्त होते व साध्या साध्या गोष्टींना मोठमोठे लोकही कसे घाबरत असत त्याची कल्पना येण्यासाठी या वर्षीच्या एका परिषदेचें वृत्त येथे देतो.

दि. १३ व १४ एप्रिलला जबलपूरला मध्यप्रांतीय राजकीय परिषद झाली. या परिषदेचे सूत्रचालक नागपूरचे व मध्यप्रांतातील नेमस्ताग्रणी होते. जबलपूरच्या नेमस्ताग्रणींना दादासाहेब खापर्डे यांच्या जहाल मतवादाची यथार्थ कल्पना नसल्यामुळे व दादासाहेबांचें नांव व अभिजात मोठेपणा त्यांच्या कानांवर गेलेला असल्यामुळे त्यांनी दादासाहेबांना या परिषदेचे अध्यक्ष निवडलें. या परिषदेला सर गंगाधरराव चिटनवीस, रावबहादुर वामनराव कोल्हटकर प्रभृति नेमस्ताग्रणी गेले होते. तसेंच डॉ. मुंजे हेही स्वदेशी व बहिष्काराच्या त्रिसूत्रीच्या प्रचारासाठी या परिषदेचा उपयोग करून घ्यावा अशा हेतूने तेथे गेले होते. परिषदेच्या प्रारंभीच नेमस्त पुढारी व खापर्डे यांच्यातील भेद एका लहानशा प्रसंगाने स्पष्ट झाला. दादासाहेब खापर्डे दि. १२ एप्रिल १९०६-च्या आपल्या दैनंदिनीत लिहितात, " जबलपुरास माझें फार भव्य स्वागत झालें. स्वागत कमिटीचे अध्यक्ष व उपाध्यक्ष प्लॅटफॉर्मवर आले होते. वामनराव कोल्हटकरही होते. त्यांनी माझ्याकरिता एक बंगला तयार ठेवला होता. परंतु तेथे जाण्याचें मी नाकारलें. आणि हितकारिणी शाळेमध्ये इतर सभासद उतरले होते तेथे जाणेंच मला बरें वाटेल असें सांगितलें. "

यानंतर प्रत्यक्ष परिषदेत जें घडलें त्याचें वृत्त देताना दि. १३ एप्रिल १९०६-च्या दैनंदिनीत दादासाहेब लिहितात, " डॉ. मुंजे सकाळी आले. त्यांनी आणि ब्रह्म यांनी स्वदेशीच्या कार्याकरिता लोकांचीं मनें वळविण्याचा प्रयत्न केला. हितकारिणी शाळेच्या हॉलमध्ये विषयनियामक कमिटीची सभा भरली. तेथे आम्ही ( स्वदेशीवाले) बऱ्याच संख्येने उपस्थित होतो. येथे बरेचसे रावबहादूर आणि पदवीधर व श्रीमंत असे पुष्कळ लोक आहेत. मुख्य प्रश्नाकडे त्यांचें लक्षच नव्हतें. विषय नियामक कमिटीत प्रदीर्घ वादविवाद झाले. सरकारचे आभार मानण्याचा ठराव आणि याचनेच्या अर्ज विनंत्या यांचा नेहमीचा निरर्थक ठराव झाल्यानंतर मी स्वदेशीचा ठराव मांडला. स्वागत कमिटीचे अध्यक्ष आणि वामनराव कोल्हटकर यांच्या चेहेऱ्यावरती जे भाव उमटले ते पाहून मला फार गंमत वाटली. त्यांनी खाजगी संभाषणांनी, उघड बोलून, आणि वैयक्तिक प्रार्थना करून माझ्यावर ' दबाव ' (दाब) घालण्याचा यत्न केला. ते म्हणाले, " मी माझ्याबरोबर लोकांना नेईन हें खरें, परंतु राजा वल्लभदास व इतर लोक सभामंडप सोडून निघून जातील. मतें घेऊन या प्रश्नाचा निकाल करावा अशी माझी इच्छा होती. अखेरीस वामनराव कोल्हटकरांनी सार्वजनिक रीत्या मी माझा ठराव परत घ्यावा अशी विनंती केली आणि ब्रम्हांच्या सूचनेवरून मी माझा ठराव परत घेतला. संध्याकाळी सात वाजता शाळेच्या हॉलमध्ये माझें स्वदेशीवर व्याख्यान झालें. मुंजे अध्यक्ष होते आणि श्रोतृसमुदाय फार मोठा होता. "

दादासाहेबांच्या या वर्णनाचा निष्कर्ष काढताना श्री. बाबासाहेब खापर्डे लिहितात, " वरील उताऱ्यात व्यक्त होणारें स्वागत व विषय नियामक कमिटीतील प्रकार एकत्र वाचले म्हणजे जबलपूरच्या सरकारपक्षीय लोकांची दादासाहेबांना या परिषदेचे अध्यक्ष म्हणून बोलावण्यात गफलत व फसगत झाली असेंच म्हणावें लागतें. तसेंच स्वदेशीची सरकारी गोटात किती घृणा होती व सर्व साधारण जनतेत स्वदेशी कशी सर्वप्रिय होऊ लागली होती हेंही स्पष्टपणे लक्षात येतें, आणि सरकार व जनता यांच्या संघर्षाचा संधिकाळ मनश्चक्षूपुढे उभा राहतो. जबलपुरास दादासाहेबांनी स्वदेशीवर व्याख्यान दिलें. या व्याख्यानाचें अध्यक्षपद स्वीकारावयाला जबलपुरातील कोणीही सार्वजनिक कार्यकर्ता धजला नाही आणि म्हणून दादासाहेबांच्या समागमे आलेले डॉ. मुंजे यांना अध्यक्षपद शोभवावें लागलें. तत्कालीन राजकारणाचें हें गमक आहे. तसें म्हटलें तर दादासाहेबांच्या व्याख्यानाला अध्यक्ष होण्याचा डॉ. मुंजे यांना संकोच वाटण्याचा संभव आहे. परंतु उपाय नव्हता. ' स्वदेशी'च्या

व्याख्यानाला अध्यक्ष होणें कोल्हटकरांसुद्धा सर्वांना अनिष्ट व धोक्याचें वाटत होतें. ”

— श्री. दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र लेखक बा. ग. खापर्डे : पृष्ठ २४९.

या परिषदेनंतर अवघ्या एकच महिन्याने कलकत्त्याला जाण्याच्या निमित्ताने लोकमान्य टिळकांचें नागपूरला आगमन झालें. १९०६-च्या जून महिन्यात लोकमान्य टिळक शिवाजी उत्सवासाठी कलकत्त्याला गेले. लोकजागृतीचें एक अमोघ साधन म्हणून टिळकांनी प्रवर्तित केलेल्या शिवाजी उत्सवाचें लोण १९०३-पासूनच बंगालमध्ये पोहोचलेलें होतें. या उत्सवाचे प्रवर्तक व पुढारी कलकत्ता येथे स्थायिक झालेले विद्वान् गृहस्थ व वृत्तपत्रकार सखाराम गणेश देऊसकर हे होते. देऊसकर हे मूळचे महाराष्ट्रातील सातारा विभागातील राहणारे. दोनशे वर्षांपूर्वी त्यांचे पूर्वज बंगाल प्रांतात गेले व तेथेच स्थायिक झाले. इतकीं वर्षें हें घराणें बंगाल मध्येच राहिल्यामुळे देऊसकर हे बंगालीच वाटत व उलटे या बंगाली गृहस्थाचें देऊसकर हें आडनांव कसें याचेंच पुष्कळांना आश्चर्य वाटे असें कै. न. चिं. केळकर यांनी लिहिलें आहे. ते बंगाली भाषेचे भाषाप्रभु होते व त्यांचें ‘ देशेर कथा’ हें पुस्तक इतकें गाजलें की, त्या मूळ बंगाली भाषेतील पुस्तकाच्या आवृत्त्यांवर आवृत्त्या निघून त्याचीं अनेक भाषांतून भाषांतरें झालीं. हें पुस्तक त्याच्या तेजस्वितेमुळे लवकरच सरकारच्या अवकृपेस पात्र ठरून जप्त झालें. बंगाली वृत्तपत्रकार म्हणूनही देऊसकर गाजलेले होते. राष्ट्रभक्त देऊसकरांना टिळकांच्या शिवाजी उत्सवाची कल्पना इतकी आवडली की त्यांनी ती उचलून धरून बंगालमध्ये बंगाली बंधूंच्या साहाय्याने शिवाजी उत्सव प्रारंभ केला.

सन १९०६-मध्ये वंगभंगाच्या आन्दोलनाला विलक्षण जोर चढला होता. टिळकांच्या प्रयत्नाने महाराष्ट्राने या आंदोलनाला मनापासून व भरपूर पाठबळ दिलेलें होतें. अशा वेळी सर्वतोमुखी गाजलेल्या व राजकारणातील संघर्षप्रधान नवयुगाचे प्रवर्तक असणाऱ्या लोकमान्य टिळकांना कलकत्ता येथे बोलवावें व त्यांच्या नेतृत्वाखाली फार मोठ्या प्रमाणावर शिवाजी उत्सव करावा अशी कल्पना देऊसकरांच्या मनात आली. त्यांनी व त्यांच्या बंगाली सहकाऱ्यांनी टिळकांना उत्सवाचें निमंत्रण दिलें व टिळकांनीही तें मोठ्या आनंदाने स्वीकारलें. कलकत्त्याच्या या शिवाजी उत्सवाचे अध्यक्ष अमृतबझार पत्रिकेचे संपादक बाबू मोतीलाल घोष होते व मुख्य कार्यवाह बिपिनचंद्र पॉल हे होते हें ध्यानात घेतलें म्हणजे या उत्सवाच्या भव्यतेची खरी कल्पना येते.

कलकत्त्याला जाताना दि. ३ जून १९०६-ला लोकमान्य टिळक नागपूरला आले. डॉ. मुंजे व त्यांच्या सहकाऱ्यांनी गेल्या काही महिन्यांत

स्वदेशी व बहिष्काराच्या आंदोलनाला इतका वेग दिला होता की, राजकीय जागृति फार मोठ्या प्रमाणावर झालेली त्या वेळी दिसून आली. या जनजागृतीचें स्वरूप टिळकांच्या स्वागतासाठी नागपूर स्थानकावर जो जनसंमर्द लोटला होता त्यावरून दिसून येतें. दोन सहस्रांवर विद्यार्थी व इतर प्रतिष्ठित लोक टिळकांच्या स्वागतासाठी स्थानकावर जमले होते. 'वंदे मातरम्' व 'शिवाजी महाराज की जय' या गगनभेदी गर्जना टिळकांच्या गाडीने स्थानकात प्रवेश करताच आसमंतात् उमटल्या. दादासाहेब खापर्डे टिळकांच्या बरोबर पुण्यापासूनच होते. पुढे मीमांसक म्हणून प्रसिद्धीला आलेले पं. वामनशास्त्री किंजवडेकर हेही टिळकांच्याबरोबर या प्रवासात होते. लोकमान्यांचें स्थानकावर स्वागत केल्यानंतर डॉ. मुंजे त्याच गाडीने त्यांच्याबरोबर कलकत्त्याला जावयास निघाले. नागपूर ते कलकत्ता या वाटेवर डोंगरगड, बिलासपूर व रायपूर या स्थानकांवरही टिळकांचें यथोचित स्वागत झालें.

दि. ४ जूनला टिळक, खापर्डे व मुंजे या आपल्या परिवारातील लोकांसह कलकत्त्याला जाऊन पोहोचले. तेथे त्यांचें जें भव्य स्वागत झालें त्याचें वर्णन करताना कै. दादासाहेब खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात, "आमच्या स्वागताची येथे फार मोठ्या प्रमाणावर जय्यत तयारी दिसली. तरुण मुलें सर्वत्र जमलीं होतीं, आणि वडील माणसें इतस्ततः धावताना दिसत होतीं. हौरा स्टेशनचा प्लॅटफॉर्म माणसांनी इतका गच्च भरला होता की, मुंगीलासुद्धा रीघ मिळाली नसती! मला आणि टिळकांना लोकांनी आमच्या डब्यातून जवळजवळ उचलूनच नेलें. मला जर दुसऱ्यांनी साहाय्य केलें नसतें तर बराच वेळ मला स्टेशनच्या बाहेर पडता आलें नसतें. युरोपियन प्रवासी व इतर प्रवासी आपापल्या डब्यांत कोंडले गेले होते. आमच्याकरिता आणलेल्या गाडीपर्यंत मी, टिळक, वामनशास्त्री आणि मुंजे कसेतरी धडपड करून पोहोचलो. बाबू बिपिनचंद्र पाल आमच्यापुढे चालत होते. 'वंदे मातरम्' आणि 'शिवाजी महाराज की जय' अशा घोषणांनी कानठळ्या बसल्या. पताका, वाजविण्याचे ड्रम्स आणि सैन्यातील इतर अवजारांप्रमाणे दिसणारें सामान होतें. सर्व लोक मोठ्या शिस्तीने चालले होते आणि त्यांनी आमची गाडी वेढली होती. त्यांनी गाडीचे घोडे सोडले. गाडी ओढली आणि मला आणि टिळकांना गाडी हाकणाऱ्या माणसाच्या जागी बसावयास सांगितलें. आम्हांला तें करणें भाग पडलें. ही मिरवणूक भयंकर लांब होती, आणि स्टेशनपासून हौरा रस्त्याच्या मध्यापर्यंत पसरली होती. साहजिकच आमची गति फार मंद होती.

आम्हांला उत्सवाच्या जागी घेऊन गेले. मंडपामध्ये लोक खच्चून भरले होते. मोतीबाबू आले आणि त्यांच्या विनंतीवरून टिळकांनी प्रदर्शन उघडलें आणि शिवाजी उत्सव चालू झाल्याचें जाहीर केलें. आम्हांला राहण्याकरिता खोल्यांचा एक संच दिला आहे. आणि सर्व व्यवस्था पूर्ण आहे. संध्याकाळी खेळ झाले व ते आम्ही पाहिले. (दुसऱ्या दिवशी) सकाळी मी, टिळक आणि मुंजे मोतीबाबूंकडे गेलो. आणि त्यांचे वडील बंधू शिशिरबाबू यांना भेटलो. त्यांनी आपल्या चालत्या काळात फार शौर्याने व धैर्याने सरकारशी लढा दिला होता, आणि लोकांच्या सन्मानाला पूर्णपणे पात्र होऊन सेवानिवृत्त झाले होते. त्यांच्याविषयी सर्वांना फार आदर आहे आणि महर्षि म्हणून ते प्रसिद्ध आहेत. मग आम्ही संध्याकाळी ६ वाजता आमच्या आवारात शिवाजी उत्सवाची सभा झाली तेथे उपस्थित होतो. लोकांची उपस्थिति दहा हजारांवर होती." (दि. ५ जून १९०६)

दि. ५ जून १९०६-ला झालेल्या या सभेचें अध्यक्षस्थान बाबू अश्विनीकुमार दत्त यांनी मंडित केलें होतें. प्रथम या सभेत शिवाजी महाराजांवरील कवितांचें गायन झालें. त्यात विश्वकवि रवींद्रनाथ ठाकूर यांच्या शिवाजीमहाराजांवरील कविता श्यामसुंदर चक्रवर्ती यांनी गाऊन दाखविल्या. हे श्यामसुंदर चक्रवर्त्ती पुढे क्रांतिकारक म्हणून गाजले. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे निर्माते डॉक्टर हेडगेवार यांचे श्यामसुंदर चक्रवर्ती हे क्रांतिजीवनातील मित्र होते. असो. इतर बंगाली पदें राजकुमार यांनी म्हटलीं. सोलापूरचे गानविशारद काडगावकर यांनी मराठी पदें गाऊन दाखविलीं. स्वागताध्यक्ष बाबू मोतीलाल घोष यांचें भाषण बॅरिस्टर चौधरी यांनी वाचून दाखविलें. त्यानंतर इंग्रजीतून टिळकांचें मुख्य भाषण झालें. आपल्या भाषणात टिळकांनी शिवछत्रपतींची योग्यता, त्यांचें कार्य, परधर्मीयांविषयी त्यांनी दाखविलेलें दाक्षिण्य, त्यांचा रजपूत घराण्यातील जन्म व त्यांच्या राष्ट्रीय पराक्रमाचें मर्म समजावून सांगितलें. शेवटी टिळक म्हणाले, "ज्या भवानीची पूजा तुम्ही लोक बंगालमध्ये करता त्याच भवानीने तरवारीच्या रूपाने शिवाजीच्या हातून राष्ट्रकार्य करविलें." भावना-प्रधान बंगाली मनावर लोकमान्यांच्या या वाक्याचा केवढा विलक्षण परिणाम झाला असेल ! टिळकांच्यानंतर दादासाहेब खापर्डे यांचें विनोद-प्रचुर भाषण झालें. या भाषणात दादासाहेब खापर्डे म्हणाले की, पूर्वी मराठ्यांनी बंगालवर स्वारी केली असेल; पण आज बंगाल शिवाजीने केवळ आपल्या स्मरणाने स्वाधीन करून घेतला आहे." या

महत्त्वाच्या सभेत लोकमान्यांच्या सूचनेवरून तरुण डॉ. मुंजे यांचें इंग्रजीतून भाषण झालें. इतर अनेक कार्यांबरोबर भावी नेतृवर्ग तयार करण्याकडे टिळकांचें कसें लक्ष असे हें यावरून दिसून येईल.

दि. ६-ला उत्सवाच्या जागी वेगवेगळे खेळ झाले. या उत्सवाच्या निमित्ताने तेथे स्वदेशी वस्तूंचें प्रदर्शनही भरविण्यात आलें होतें. याच जागी लोकमान्य टिळकांच्या अध्यक्षतेखाली स्वदेशी चळवळीच्या प्रचाराची सभा झाली. या सभेला प्रचंड गर्दी झाली होती. या सभेला दहा सहस्र लोक उपस्थित असावेत असें दादासाहेब खापर्डे यांचें अनुमान आहे. या सभेत दादासाहेब खापर्डे व डॉ. मुंजे यांचीं स्वदेशी व बहिष्कारयोगावर भाषणें झाल्यावर लोकमान्यांनी समारोप केला. सभेत स्वदेशी व बहिष्काराच्या शपथा घेण्यात आल्या.

टिळकांच्या या मुक्कामात मेमनसिंगचे महाराज त्यांना भेटायला आले होते. दि. ७-ला बंगालच्या वतीने लोकमान्य टिळकांचा त्यांच्या सहकाऱ्यांसह प्रकट सत्कार करण्यात आला. या सत्कार सभेचे अध्यक्ष सुरेन्द्रनाथ बॅनर्जी हे होते. प्रथम सभेत सुरेन्द्रनाथ बॅनर्जी यांनी टिळक व त्यांचे सहकारी यांच्या सत्काराचा ठराव मांडला. या ठरावाला सत्येंद्रनाथ टागोर (हे पूर्वी महाराष्ट्रात सेशन्स जज्ज होते) यांनी अनुमोदन दिलें. त्यानंतर एक लहानसें स्वागत मंडळ टिळकांना आणायला त्यांच्या बिऱ्हाडी गेलें. त्यांच्या समवेत सर्व पाहुणे मंडळी सभास्थानी आली. सभेचे अध्यक्ष बाबू सुरेन्द्रनाथ बॅनर्जी यांनी टिळकांच्या गळयात हार घालून त्यांना आलिंगन दिलें. सत्काराला उत्तर देताना लोकमान्य टिळकांनी प्रचलित राजकारणाची चर्चा करणारें भाषण केलें. त्यांनी सांगितलें की, "दिवसेंदिवस इंग्रजांचा राज्यकारभार अनुदार व जुलमी होत चालला आहे. यास्तव आपण सहानुभूतीच्या पोकळ वचनांना भुलून न जाता स्वावलंबनपूर्वक आपणांमध्ये असेल ती शक्ति प्रकट केली पाहिजे. औरंगजेबाचा जुलूम झाला तेव्हा त्याची सेवा पत्करलेल्या रजपूत सरदारांनीही त्याला विरोध केला हें उदाहरण आपल्या लोकांनी डोळयांपुढे ठेविलें पाहिजे. शिवाजी आज कोठे प्रत्यक्ष अवतीर्ण न झाला तर परिस्थितीप्रमाणे तो निराळया रूपाने अवतरून कदाचित् कार्य सिद्धीस नेईल." टिळकांच्या या भाषणानंतर डॉ. मुंजे यांनी सत्काराला उत्तर देताना प्रचलित राजकीय स्थितीवर अतिशय कडक भाषण केलें. दादासाहेब खापर्डे यांचें या सभेतील भाषण त्यांच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे विनोदी तर होतेंच; पण अत्यंत मर्मभेदक होतें. त्यांनी सांगितलें की, "आम्ही भारतवासी लोक इंग्रजी साम्राज्यात

भागीदार आहो असें आम्हांला सांगण्यात येतें. पण ही भागिदारी कशी? तर मांसभक्षकाच्या मेजवानीसारखी ! मेजवानीत जेवणारा यजमान, वाढणारा नोकर व खाद्यभूत मांस हे तिघेही आपापल्या परीने भागीदार असतात. यांपैकी शेवटच्या दोन भागीदारांसारखी या साम्राज्यात आमची भागीदारी आहे. हिंदुस्थानने आपलें वित्त व शक्ति यांचें मांस आपल्या हाताने कापून साम्राज्यरूपी यजमानाला वाढावयाचें व त्याला पुष्ट करावयाचें हा मेजवानीतील भाग आपणांकडे आहे."

दि. ८-ला अँटी सरक्युलर सोसायटीच्या वतीने कॉलेज स्क्वेअर-मध्ये विद्यार्थ्यांची मोठी सभा झाली. ही सत्कारसभाच होती. या सभेत उत्तर म्हणून केलेल्या भाषणात टिळकांनी सांगितलें की, 'वंगभंग सर-कारने केला तरी बंगाली राष्ट्राने मनात आणलें तर तें अभंगच राहू शकेल. शरीरभंग फार तर होऊ शकतो; पण आत्मा हा अभंग आहे असाच आमच्या हिंदी तत्त्वज्ञानाचा सिद्धान्त आहे." या सभेत भाषण करताना दादासाहेब खापर्डे म्हणाले की, "पूर्वी ग्रीस देशात रोमन लोकांचें राज्य असताना एका विद्वानाने आपला अर्ज मॅजिस्ट्रेटच्या कानावर न घालता तो पायावर ठेवला. कोणी विचारलें अर्ज पायावर कां ठेवला? तेव्हा तो ग्रीक म्हणाला की, " अधिकाऱ्याचे कान जाग्यावर असतील म्हणून प्रथम तोंडी विनंती करून पाहिली. पण त्यांचे कान लांब होऊन पायापर्यंत आले असें कळलें. तेव्हा अर्ज पायावर ठेवला. हल्ली इंग्रजांचे कान जाग्यावर नसून ते पोटात आहेत. यास्तव बहि-ष्काराचा चिमटा पोटाला बसेल तेव्हा आमची विनंती सरकार ऐकेल."

दि. ९-ला टिळकांना व त्यांच्या सहकाऱ्यांना ब्राह्मणसभेच्या वतीने पानसुपारी झाली. पंडित शिवचंद्र समभूषण हे अध्यक्षस्थानी होते. माताजी महाराणी तपस्विनी या सभेला आल्या होत्या. भारतातील क्रांतिकारकांना या माताजींचें मोठें साहाय्य झालें असून पुढे टिळकांना नेपाळात शस्त्रांचा कारखाना काढण्यची स्फूर्ति यांच्यापासूनच मिळाली. या माताजी स्वतःला झाशीची संग्रामदेवता महाराणी लक्ष्मीबाई यांची भाची म्हणवीत. यांची विशेष माहिती आम्ही आमच्या 'भारतीय स्वातंत्र्य-समर– १८५७ ते सुभाष' या ग्रंथात दिली आहे. असो. ब्राह्मण सभेच्या स्वागताच्या वेळी टिळक–खापर्डे यांनी चातुर्वर्ण्यावर भाषण करून प्रचलित परिस्थितीत सर्व वर्गांच्या परस्परसहकारितेची आवश्यकता प्रतिपादन केली. याच दिवशी रात्री भवानीपूरला प्रचंड सभा झाली. तिचें वर्णन करताना दादासाहेब खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात, "तेथून सर्व मंडळी रेल्वेने भवानीपूरला गेली. समागमे स्वयंसेवकांचा

मेळावा होता व 'वंदेमातरम्'चा जयघोष सारखा चालू होता. भवानी-पूरची सभा फार मोठी होती. जनसमुदाय पंधरा हजारांच्यावर असावा. टिळक व डॉ. मुंजे यांचीं भाषणें झालीं. सभा संपल्यानंतर लोकांनी मोठी मिरवणूक काढली व आम्हांला कालीच्या दर्शनाला नेलें. मिरवणूक दोन तास चालली होती." ( दि. ९ जून १९०६ )

दि. १० जूनला टिळकांनी गंगास्नान केलें. तो एक मोठा समारंभच झाला. अनेक भजनी मंडळें आपापल्या सांप्रदायिक ध्वजांसह टिळकांना वेढून चालत होती. भजनीवाल्यांचा गजर होत होता. ही गर्दी वाढत वाढत हॅरिसन रोडला येईपर्यंत टिळकांच्या मागे पंचवीस सहस्रांहून अधिक संख्या झाली. दादासाहेब खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात, "तो देखावा अपूर्व होता आणि त्या लोकांनी टिळकांची देवासारखी पूजा केली. त्या पूजेचा काही अंश आमच्याकडेही आला. त्यांनी आमच्या पायाची धूळ आपल्या मस्तकी लावली. आणि त्यांनी आणखी काय काय केलें नाही ! त्यांनी आपल्या हातावरून अक्षरशः चालण्यासाठी रस्ता केला आणि आमच्याबरोबर हजारो लोकांनी गंगेत उड्या घेतल्या. स्नान झाल्यानंतर मी, टिळक व मुंजे आपल्या बिऱ्हाडी निघून गेलो." रात्री वैश्य सभेच्या वतीने टिळकांना पानसुपारी झाली. त्या वेळी केलेल्या भाषणात लोकमान्य टिळकांनी असें सांगितलें की, "मारवाडी व व्यापारी लोकांना विलायतेत जाऊन व धर्म राखून व्यापार करणें शक्य आहे. तेथे आपल्या व्यापारी संस्था निघाल्या तर मोठें कार्य होणार आहे." दि. ११-ला बाबू सुबोधचंद्र मलिक यांच्या बागेत टिळकांना त्यांच्या सहकाऱ्यांसमवेत अल्पोपहार देण्यात आला. टिळकांच्या या वास्तव्यात त्यांना राणा प्रतापादित्य, सुराजुद्दौला इत्यादि नाटकांच्या प्रयोगांनाही, लोकसंग्रहास्तव उपस्थित रहावें लागलें.

याप्रमाणे संपूर्ण आठ दिवस कलकत्त्याला राहून दि. १२-ला टिळक आपल्या सहकाऱ्यांसमवेत खरगपूरला आले. तेथे ग्रंथालयात लोकमान्य टिळकांचें भाषण झालें. दि. १२-लाच टिळकांनी खरगपूर सोडलें व बंगालचा निरोप घेतला. टिळकांच्या या बंगालच्या दौऱ्याचें फलित वर्णन करताना कै. दादासाहेब खापर्डे लिहितात,

"कलकत्त्याला तीन पक्ष आहेत. एकाचे पुढारी सुरेन्द्रनाथ बॅनर्जी हे आहेत. हा पक्ष मवाळांचा. मोतीबाबूंचा स्वतंत्र पक्ष आहे. तिसऱ्या पक्षाचे पुढारी बिपिनचंद्र पाल हे असून त्यांचा पक्ष पुण्यातील टिळक पक्षाप्रमाणे सर्वाधिक लोकप्रिय पक्ष आहे. आमच्या या वास्तव्याने

या तिन्ही पक्षांतील मतभेद बरेचसे मिटून ते जवळ आले. एका विशिष्ट मर्यादेपर्यंत त्यांची निश्चित एकी झाली. आम्ही मारवाड्यांचीं मनें वळविलीं. या मारवाड्यांशी कसें बोलावें हें बंगालमधील वकील वर्गाला माहीत नसावें असें दिसतें. आमच्या तेथील वास्तव्याचा असा निश्चित लाभ झाल्यामुळे आम्हांला अतिशय आनंद झाला.

दि. १२-ला खरगपूरहून निघून दि. १३-ला लोकमान्य टिळकांना घेऊन डॉ. मुंजे व खापर्डे नागपूरला आले. नागपूरला लोकमान्यांचें दोन दिवस वास्तव्य होतें. या दोन दिवसांचें दादासाहेब खापर्डे यांनी आपल्या दैनंदिनीत हृदयंगम शब्दचित्र रेखाटलें आहे. दादासाहेब लिहितात, "खरगपूरहून निघाल्यापासून नागपूरला येईपर्यंत प्रत्येक स्टेशनवर टिळकांना पाहण्याकरिता अतोनात गर्दी जमत असे. नागपूरच्या स्टेशनवर गाडी आली तेव्हा तेथे भयंकर गर्दी होती. त्यात विद्यार्थी फार मोठ्या संख्येने उपस्थित होते. स्टेशनाचें सर्व आवार माणसांनी गच्च भरलें होतें. लोकांनी गाडीचे घोडे सोडून गाडी महाजनांच्या घरापर्यंत ओढीत आणली. (या वेळी टिळकांचा नागपूरला मुक्काम अॅड्व्होकेट बळवंतराव महाजन यांचे घरी होता) गाडी श्री. बुटी यांची होती. सर गंगाधरराव (चिटनवीस) यांची गाडी आली होती, पण आम्ही तिचा उपयोग केला नाही. डॉ. लिमये फार झटून अंग मोडून काम करीत होते. पाध्ये लपत छपत फिरत होते. डॉ. गद्रे व गोखले उघडपणे व निर्भयपणे वावरत होते. सायंकाळी ५ वाजता आम्ही व्यंकटेश थिएटरमध्ये जायला निघालो. गंगूबाई नांवाच्या एका बाईने आमचे फोटो घेतले. मार्गात अनेक ठिकाणी पानसुपाऱ्या झाल्या. स्त्रियांनी आपापल्या घराच्या सज्जांतून आमच्यावर पुष्पवृष्टि केली ! थिएटरमध्ये माणसें मावेनात म्हणून मागच्या मैदानात सभा केली. टिळकांनी अत्यंत प्रभावी भाषण केलें. माझी बोलण्याची इच्छा नव्हती. पण लोकांनी मला बोलणें भाग पाडलें. थोडें बोललों. श्रोतृसमुदाय अजमासे सात हजारांवर असावा. (दि. १३ जून १९०६)

टिळकांचें हें भाषण अर्थातच स्वदेशी व बहिष्काराच्या चळवळीच्या प्रचाराचें होतें. या भाषणाचें वृत्त देताना कै. न. चिं. केळकर लिहितात, "त्यांचें (टिळकांचें) म्हणणें असें होतें की, स्वदेशी माल वापरा असें सांगितलें म्हणजे परदेशी माल वापरू नका असें सांगावें लागतच नाही. कारण 'स्वयोषिति रतिः' ह्या वचनाचा आधार घेतल्यास स्वदेशीच्या उपदेशापासून बहिष्काराचा उपदेश आपोआप अभिन्न ठरतो."

—समग्र केळकर वाङ्मय, २ लोकमान्य खंड. पृ. ३८

दि. १४ जून १९०६-च्या दैनंदिनीत खापर्डे लिहितात, " दुसऱ्या दिवशी बॅ. दीक्षितांकडे सकाळचा चहा झाला. तेथून गावात बालाजीच्या मंदिरात ( गंगाजमनावरून इतवारी स्टेशनकडे जाताना हें भव्य मंदिर लागतें.) गेलो. तेथे सभा होती. व्यापाऱ्यांना उद्देशून टिळकांनी फार उत्तम भाषण केलें. रामकृष्ण पुरींनी टिळकांना पोषाखाचा अहेर केला व एक सोन्याची अंगठी दिली. कार्यक्रमभर वंदे मातरम्‌चा फार मोठा घोष चालू होता. विद्यार्थ्यांनी गाडीचे घोडे सोडले व त्यांनी आमची गाडी एका देवळापर्यंत ओढीत नेली. पुनः घोडे जुंपून देण्याकरिता त्यांचें मन फार कष्टाने वळवावें लागलें. भास्करराव पंडित, बोबडे, जैन मंदिर व पोफळे यांच्या दुकानी आम्हांला पानसुपाऱ्या झाल्या. घरी परत आल्यावर दाजीसाहेब बुटी यांच्याकडे जेवण झालें. त्यानंतर टिळकांच्याकडे पुष्कळ व्यापारी आले व स्वदेशीचा प्रचार कसा करावा या संबंधी त्यांनी विचारणा केली. अनेक पानसुपाऱ्या झाल्या. बुटींच्या वाड्यात रामचंद्रबुवांच्या (काशीचे मागच्या पिढीतील सुविख्यात कीर्तनकार ह. भ. प. कीर्तनाचार्य रामचंद्रबुवा चांदवडकर ) कीर्तनाला आम्ही गेलो. रात्री वाशिमकर कंपनीचें ' प्रेमबंध ' नाटक पाहिलें. गोरक्षण सभेने टिळकांना मानपत्र दिलें."

दि. १५ जून १९०६-ला श्री. गोपाळराव बुटींच्या महालाच्या पुढील मोकळ्या जागेत विद्यार्थ्यांची सभा झाली. या सभेला टिळक, खापर्डे व डॉ. मुंजे उपस्थित होते. सभेत टिळकांनी एक तास भाषण करून स्वदेशीसंबंधी विद्यार्थ्यांचें काय कर्तव्य आहे तें समजावून सांगितलें. त्याच दिवशी टिळकांनी नागपूरकरांचा निरोप घेतला. स्वागताच्या वेळेप्रमाणे त्यांना निरोप देण्याच्या वेळीही नागपूर स्थानकावर अतोनात गर्दी झाली होती."

वस्तुतः मवाळांचा बालेकिल्ला म्हणून असलेल्या नागपूरचें वातावरण या वर्षाच्या प्रारंभीच्या पहिल्या सहामाहीत, प्रतिकूल परिस्थितीशी टक्कर देत डॉ. मुंजे यांनी कसें बदलून टाकलें होतें याची कल्पना लोकमान्य टिळकांच्या नागपूर भेटीच्या प्रसंगाच्या उपर्युक्त वर्णनावरून येते. मुंजे यांचें त्यांच्या व्यावसायिक जीवनातील स्थान, सार्वजनिक क्षेत्रातील त्यांचें कर्तृत्व व स्वतःचा अनुयायी वर्ग निर्माण करून जहाल राजकारण मध्यप्रांतांत दृढमूल करण्यासंबंधात त्यांना येत चाललेलें यश पाहून लोकमान्य टिळकांसारख्या धुरंधर पुरुषाने त्यांना हाताशी कसें धरलें व कलकत्त्याच्या या अभूतपूर्व दौऱ्याच्या वेळी सतत स्वतःबरोबर त्यांना वागवून व प्रत्येक वेळी आपल्याबरोबर त्यांना बोलावयास भाग

पाडून अखिल भारतीय राजकारणाचें क्षेत्र त्यांना कसें उपलब्ध करून दिलें याचीही कल्पना येते. स्वतःच्या राजकारणाचा व राष्ट्राच्या राजकारणाचा वारसा चालविण्यासाठी लोकमान्य टिळक योग्य माणसें निवडून व त्यांना संस्कारित करण्यासाठी व नवा नेतृवर्ग निर्माण करण्यासाठी कसा प्रयत्न करीत याचें हें निदर्शनच होय. टिळक व गांधी या दोन्ही महापुरुषांच्या ठिकाणी परंपरा निर्माण करण्याचा हा महान् गुण होता. म्हणूनच त्यांच्या मागे त्यांच्या राजकीय सम्प्रदायात अनेक थोर पुरुष निर्माण होऊन त्यांचे सम्प्रदाय टिकले. परलोकवासी पं. जवाहरलाल नेहरूंच्या व्यक्तिमत्त्वात हा गुण नसल्यामुळे त्यांना नेतृत्वाची कोणतीही परंपरा निर्माणच करता आली नाही.

असो. टिळक, खापर्डे व मुंजे यांच्या बंगालच्या या दौऱ्याला श्रीशिवाजी महाराजांच्या उत्सवाचें निमित्त कारणीभूत झालें असलें तरी वस्तुतः हा दौरा टिळकप्रणीत (१) स्वदेशी (२) बहिष्कार (३) राष्ट्रीय शिक्षण व (४) स्वराज्य या चतुःसूत्रीच्या झंझावाती प्रचारासाठीच होता. या दौऱ्यात जनजागृतीचें, जनतेच्या लोकमान्यांवरील असलेल्या उत्कट प्रेमाचें व सरकारवरील रोषाचें जें अभूतपूर्व दर्शन घडलें त्यामुळे सरकारचा टिळकांवर आधीच असलेला राग दुणावला. पण त्यात आश्चर्य नव्हतें. केवळ हेंच नव्हे तर टिळकांनी आपल्या अपूर्व कौशल्यामुळे मवाळ व जहाल यांना एकत्र आणून बंगालमध्ये सरकारच्या विरुद्ध असंतोषाची जी संयुक्त आघाडी निर्माण केली तें तर सरकारच्या दृष्टीनें अधिक भयावह व म्हणूनच अधिक रोषाचें कारण होतें. टिळकांप्रमाणेच खापर्डे व डॉ. मुंजे यांच्यावरही बंगालच्या या दौऱ्यानंतर सरकारची वक्रदृष्टि वळली. दादासाहेब खापर्डे यांच्यावर वळलेल्या या सरकारी वक्रदृष्टीचें वर्णन करताना श्री. बाबासाहेब खापर्डे लिहितात, "तेव्हापासून (बंगालच्या दौऱ्यापासून) नोकरशाहीचा दादासाहेबांवर विशेष रोष झाला व तो दिवसेंदिवस वाढतच गेला. खरोखरी याचा प्रारंभ फार वर्षांपूर्वीच झाला होता. परंतु बंगालच्या दौऱ्यापर्यंत नोकरशाहीच्या मनःस्थितीस केवळ निराशेचें स्वरूप होतें. खापर्डे आपल्याला जितके उपयोगी पडतील असें त्यांना वाटत होतें तितके उपयोगी पडण्याची नोकरशाहीची आशा दुरावत चालली होती. इतकेंच त्या निराशेचें तोपर्यंत स्वरूप होतें. आणि खापर्ड्यांना पदवीदानाच्या आमिषाने अगर अन्य तऱ्हेने पुन्हा आपल्याकडे आकर्षित करून घेऊ ही अधिकाऱ्यांची आशा या बंगालच्या दौऱ्यापर्यंत नष्ट झाली नव्हती. ती आता नष्ट झाली. तुम्ही टिळकांना मदत करता म्हणून तुम्हाला पदवी दिली

गेली नाही असें एका बड्या ऑफिसरने प्रत्यक्ष बोलून दाखविलेंच होतें. पण या बंगालच्या दौऱ्यानंतर नोकरशाहीच्या निराशेला क्रोधाचें व नंतर हळूहळू सुडाचें स्वरूप प्राप्त होत गेलें. दादासाहेबांनी लोकशाहीचा पक्ष धरून नोकरशाहीच्या विरुद्ध बोलण्यास व प्रचार करण्यास उघड सुरवात केली. एवढेंच नाही तर अधिकाऱ्यांच्या रागालोभाची पर्वा न करता त्यागपूर्वक प्रत्यक्ष कामाला प्रारंभही केला. तेव्हा अधिकाऱ्यांना होणाऱ्या पार्टीचें व तत्सम इतर प्रसंगांचें त्यांना बोलावणें येईनासें झालें."

—श्री. दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र. लेखक : बा. ग. खापर्डे पृ. २६९

खापर्डे यांच्याप्रमाणेच नव्या पिढीतील डॉ. मुंजे हेही सरकारच्या डोळ्यांत सलू लागले यात नवल नाही. त्यांनी आपल्या राजकीय जीवनाला मवाळाग्रणींच्या व सरकारच्या विरोधापासूनच प्रारंभ केला होता.

लोकमान्य नागपूरहून पुण्याला गेल्यानंतर आगामी काँग्रेसच्या कामासंबंधी व ठरावासंबंधी खापर्डे यांनी एक पत्रक प्रसिद्ध केलें. तें दादासाहेबांच्या चरित्रकारांनाही त्यांच्या कागदपत्रात कोठे सांपडलेलें नाही. पण या पत्रकात स्वदेशी व बहिष्काराच्या चळवळीचा राष्ट्रीय सभेने पुरस्कार करावा असें प्रतिपादन असलें पाहिजे. कारण या पत्रकावर टाइम्स ऑफ इंडियाने बरेंच प्रतिकूल लिहून खरपूस टीका केली होती.

आगामी काँग्रेसमध्ये स्वदेशी व बहिष्काराचा ठराव संमत करून घ्यावयाचा असें टिळकपक्षीयांनी या वेळी ठरविलें होतें. त्यासाठी जनमताचा दाब काँग्रेसवर आणणें व या दृष्टीने जनजागृति करून जनमत तयार करणें आवश्यक होतें. नागपूरला लोकमान्य येऊन गेल्यानंतर स्वदेशी व बहिष्काराची चळवळ चालू ठेवल्यास, त्यांच्या आगमनाने जागृत झालेलें जनमत सुस्थिर करता येईल असें डॉ. मुंजे यांनी ठरविलें व त्या दृष्टीने त्यांनी आपल्या सहकाऱ्यांसमवेत हें संपूर्ण वर्ष स्वदेशी व व बहिष्काराच्या कार्याच्या सर्वतोमुखी प्रचारात खर्ची घातलें. मवाळ या कार्यक्रमातील बहिष्काराच्या विरोधी होते; पण स्वदेशीच्या विरुद्ध नव्हते. स्वदेशी ही गोष्ट अशी आहे की, तिच्या प्रचाराचें प्रत्यक्ष आचरणात पर्यवसान होतें, व त्यासाठी स्वदेशी वस्तु मिळणारीं केन्द्रस्थानें निर्माण करणें आवश्यक असतें. या वर्षीच्या जुलै महिन्यात डॉ. मुंजे यांनी नागपूरला दोन स्वदेशी दुकानें उघडलीं व तीं समारंभपूर्वक उघडावयाचीं म्हणून दादासाहेब खापर्डे यांना हेतुतः अमरावतीहून नागपूरला बोलाविलें. या समारंभासंबंधी दादासाहेब आपल्या दैनंदिनीत लिहितात की, "मी आणि डॉ. लिमये मुसळधार पाऊस पडत असताना तेथे

(दुकानच्या जागी) गेलो. डॉ. मुंजे यांनी जागा ठरवून ठेवली होती आणि तेथे स्वदेशी दुकान उघडावयाचें होतें. लोकांची गर्दी झाली होती. त्यांनी विनंती केल्यावरून मी गणपतिपूजन केलें. गंगाधरराव चिटनवीस पानसुपारीसाठी आले होते. विद्यार्थ्यांनी वंदेमातरम्‌चा मोठा जयघोष केला आणि चिटणीस व फाटे तेथून निघून गेले. तेथून आम्ही रामकृष्ण पुरींच्या दुकानी गेलो. त्यानंतर दुसरें एक स्वदेशी दुकान उघडलें. तेथे ही पुष्कळ लोक जमले होते. त्यांच्या विनंतीवरून मी भूमिपूजन केलें. मी व डॉ. मुंजे चारच्या सुमारास बर्डीच्या मुलींच्या शाळेत गेलो."

नागपूरला स्थापन झालेल्या या स्वदेशी दुकानांचें लोण हळूहळू पसरू लागलें. अनेकांनी त्या वेळी केवळ स्वदेशी माल घेण्याच्या शपथा घेतल्या असें नाही, तर त्याबरोबरच परदेशी म्हणजे विलायती मालावरील बहिष्काराच्याही शपथा घेतल्या, वंगभंगाच्या चळवळीने बंकिम चंद्रांच्या 'आनंदमठ' या कादंबरीतील 'वंदेमातरम्' गीताला राष्ट्रगीताचें स्थान प्राप्त झालें होतें. अनेक देशभक्तांच्या रक्तसिंचनाने या गीताला ती प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. जहाल विचारप्रणालि व विशुद्ध स्वराज्याच्या ध्येयवादाचें 'वंदे मातरम्'ची गर्जना हें प्रतीक ठरलें. सरकार त्या गर्जनेने क्रुद्ध होऊ लागलें. त्यामुळे सरकारधार्जिणे मवाळाग्रणी त्या गीताच्या अथवा गर्जनेच्या नादाचा विटाळ मानू लागले! खापर्डे यांच्या दैनंदिनीतील उपर्युक्त उतारा हें त्याचें प्रतीकच होय. स्वदेशी दुकानात पानसुपारीला येणें संमत असल्यामुळे सर गंगाधरराव चिटनवीस व रावसाहेब फाटे समारंभाला आले; पण वंदेमातरम्‌चा घोष ऐकल्यावर मात्र ही आपली जागा नव्हे असें मानून त्यांनी काढता पाय घेतला! भित्रेपणा तरी किती असावा?

स्वदेशीइतकाच बहिष्काराच्या चळवळीचा टिळकांनी इतका पाठपुरावा केला की, त्यामुळे चेतलेल्या क्रांतिकारक अंतःकरणांतून परदेशी कापडाच्या होळीचो कल्पना निघाली. प्रथम बंगालमध्ये कलकत्ता इत्यादि मोठ्या शहरांतून विलायती कापडाच्या होळ्या झाल्या व तें लोण महाराष्ट्रात येऊनत्या निमित्ताने पुढे क्रांतिकारकांचें अग्रणी म्हणून त्रिखंडात गाजलेल्या स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या तेजाचा महाराष्ट्राला पहिला परिचय झाला. दि. २२ ऑगस्ट १९०६-ला पुण्याच्या सार्वजनिक सभेच्या जागेत विद्यार्थ्यांची एक प्रचंड सभा झाली. फर्ग्युसन कॉलेजमध्ये असलेले सावरकर या विद्यार्थ्यांचे पुढारी होते. या सभेचे अध्यक्ष लोकमान्य टिळक हे होते. या सभेत स्वदेशी कापड वापरण्याची शपथ

घेण्यात आली व दुसऱ्याच दिवशी सावरकरांच्या नेतृत्वाखाली समारंभपूर्वक विलायती कापडाची होळी करण्यात आली. या होळीच्या प्रसंगी लोकमान्य टिळक व काळकर्ते शिवरामपंत परांजपे उपस्थित होते. त्या दोघांची होळीसमोर भाषणेंही झालीं. होळीचें हें लोग महाराष्ट्रात सर्वत्र पसरलें.

या घटनेनंतर स्वाभाविकपणेच क्रांतिकारक पक्षाचा संवर्धकपक्ष म्हणून जहाल पक्षाच्या सर्वच पुढाऱ्यांकडे सरकारी अधिकारी सावध व अधिक वक्र दृष्टीने पाहू लागले. नोकरशाहीच्या अंतःकरणात जहाल पक्षाच्या पुढाऱ्यांविषयी केवढी तीव्र कटुता होती याचें प्रत्यंतर दादासाहेब खापर्डे यांच्या दैनंदिनीतील वृत्तावरून येतें. सन १९०६-च्या ऑगस्ट महिन्यात दादासाहेब खापर्डे अतिशय आजारी झाले. दि. १३ सप्टेंबर १९०६-च्या दैनंदिनीत दादासाहेब लिहितात, " डॉ. मुंजे व डॉ. लिमये यांच्याशी मी संध्याकाळपर्यंत बोलत बसलो. डॉ. मुंजे म्हणाले की, मि. इस्मे हे मुंज्यांशी बोलताना असें म्हणाले की माझ्या आजारासंबंधाने ऐकल्यानंतर मी मेलो असतो तर बरें असें ते म्हणाले. काय भयंकर मत्सर ! "

यावर भाष्य करताना बाबासाहेब खापर्डे लिहितात, " या आजाराची गोष्ट डॉ. मुंजे सहानुभूतीने बोलले असावेत व त्यानंतर इस्मे साहेबांनी वर लिहिल्याप्रमाणे आपली सदिच्छा (!) प्रकट केली. नीचपणाच्या अधिक पराकोटीची कल्पना करवत नाही. "

—दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र पृ. २५९ लेखक : बा. ग. खापर्डे

स्वदेशी व बहिष्काराच्या चळवळीने जनतेच्या हृदयावर प्रभाव गाजविल्याचीं चिन्हें दिसू लागताच टिळकांनी सन १९०६-च्या राष्ट्रीय सभेत या विषयावर राष्ट्रीय सभेच्या संमतीची मुद्रा स्वतंत्र ठरावाच्या रूपाने घ्यावयाची असें ठरविलें. त्या दृष्टीने या वर्षीच्या जुलै महिन्यात दादासाहेब खापर्डे यांनी एक प्रकट विनंतीपत्र काढलें व त्यात राष्ट्रीय सभेचें सरकारधार्जिणें धोरण बदलून ती लोकाभिमुख करणें कसें आवश्यक आहे हा विषय सोपपत्तिक रीत्या मांडला. मद्रासच्या प्रांतिक सभेचे अध्यक्ष व तेथील विख्यात पुढारी श्री. कृष्णस्वामी अय्यर यांनीही हाच उपदेश आपल्या प्रांतातील लोकांना केला होता. पण खापर्डे यांच्या जहाल पक्षातील स्थानामुळे त्यांच्या पत्रकाला विशेष महत्त्व प्राप्त झालें. टाइम्स ऑफ इंडिया या पत्राने खापर्डे यांच्या पत्रकावर सडकून टीका केली व लोकांना असा इषारा दिला की, " खापर्डे हे तुम्हांला खड्ड्यात

घालू पाहतात तरी जुने नेमस्त पुढारी गोखले, मेथा, कॉटन यांना तुम्ही सोडू नका. " खापर्डे यांच्या या विनंतीपत्रकातील प्रतिपादनाचेंच पुढचें पाऊल म्हणून राष्ट्रीय सभेचें या वर्षीचें अध्यक्षपद कोणाला द्यावें या विषयाची चर्चा त्यांनी वृत्तपत्रातून प्रकटपणे प्रारंभ केली. या वर्षीची राष्ट्रीय सभा कलकत्त्यास व्हावयाची होती. टिळकांच्या तेथील मध्यंतरीच्या वास्तव्याने व वंगभंगाच्या आघाताची प्रतिक्रिया म्हणून उदयास आलेल्या चळवळींनी बंगालचें वातावरण जहाल अथवा राष्ट्रीय पक्षाला सर्वस्वी अनुकूल होतें. त्याचा राष्ट्रीय सभेचें अपेक्षित स्वरूप परिवर्तित करण्याच्या दृष्टीने लाभ घ्यावा असें खापर्डे यांना वाटलें. त्यांना मनातून टिळकांचेंच नांव राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदासाठी सुचवावयाचें होतें पण महाराष्ट्रीय असलेल्या टिळकांचें नांव महाराष्ट्रातूनच व तेंही आपण प्रथम सुचविणें योग्य नाही असें त्यांना वाटलें असलें पाहिजे. म्हणून त्यांनी पंजाबचे लाला लजपतराय यांचें नांव राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदासाठी सुचविलें. लजपतराय हे टिळकांइतकेच जहाल असल्यामुळे टिळकांच्या अध्यक्ष होण्यामुळे जें साधणार होतें तेंच लजपतरायांच्या अध्यक्ष होण्यामुळेही साधणार होतें. खापर्डे यांच्या उलट बिपिन चंद्रपाल प्रभृति बंगालच्या लोकप्रिय पुढाऱ्यांनी या वर्षीच्या कलकत्ता येथील राष्ट्रीय सभेचे अध्यक्षपद टिळकांनाच द्यावें असा प्रचार सुरू केला. कॉंग्रेस कलकत्ता येथे भरणार असल्यामुळे बंगालच्या पुढाऱ्यांच्या मताला अर्थातच सर्वाधिक महत्त्व होतें. लजपतराय व टिळक हीं नांवें राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदासाठी पुढे येऊ लागताच नेमस्ताग्रणी राष्ट्रीय सभा हातची जाईल अशा कल्पनेने भयभीत झाले तर अँग्लोइंडियन पत्रकारांची माथीं ठणठणलीं. शेवटी टिळक व लजपतराय या लोकप्रिय नांवांना साधा विरोध करून उपयोग नाही असें दिसून आल्यामुळे भारतीय राजकारणाचे भीष्म पितामह दादाभाई नौरोजी यांनाच कॉंग्रेसचें अध्यक्षपद द्यावयाचें नेमस्ताग्रणींनी घोषित केलें. या प्रकरणावर भाष्य करताना कै. न. चि. केळकर लिहितात, " चार दोन आठवडे या गोष्टीचा खल होऊन शेवटी अशी तोड निघाली की, दादाभाई नौरोजी यांना तार करून विलायतेतून बोलवावें म्हणजे आजोबा दुकानाच्या गादीवर येऊन बसण्याला पुढे आले म्हणजे नातू सहजच मागे सरतील. टिळक व लजपतराय यांच्या अस्त्रांवर दादाभाई नौरोजी हें ब्रह्मास्त्र वाटणें योग्यच होतें. कारण त्यांच्या नांवापुढे तरी कोणतेंही नांव बाजूला झालेंच पाहिजे. पण ही गोष्ट जहालांना भूषणास्पद होती. कारण ब्रह्मास्त्राच्या उपयोगाशिवाय अध्यक्षपद जहालपक्ष सोडीत नाही अशी ही एक

प्रकारे कबुलीच होती. बरे, ज्यांनी सोशिॲलिस्ट पक्षाला मिळून हाइन्डमन साहेबांचें समर्थन केलें ते हिंदुस्थानात आल्यावर नेमस्तांची भाषा वापरतील कीं काय ? कधीही नाही. आणि टिळक व लजपतराय यांनी अध्यक्षपदावरून अशी भाषा वापरण्यापेक्षा दादाभाईंनी ती वापरली तर तो फारच मोठा विजय होय ! कोणाही व्यक्तीच्या मोठेपणाचा हा प्रश्न नव्हता तर राष्ट्रीय सभेच्या इभ्रतीचाच होता."

—समग्र केळकर वाङमय २ लोकमान्य खंड पृ. ९२

लोकमान्य टिळक व दादाभाई नौरोजी यांचा एकमेकांना पूर्ण ओळखण्याइतका परस्परसंबंध होता. इ.स. १९०४-मध्ये टिळक हे काँग्रेसमध्ये फूट पाडण्याचें व तिला हानि पोहोचविण्याचें काम करीत आहेत अशी कागाळी नेमस्ताग्रणींनी दादाभाईंच्याकडे केली. पण त्यामुळे न रागावता त्यांनी टिळकांना वडिलकीच्या नात्याने पुढील पत्र पाठविलें.

लंडन, २ नोव्हेंबर १९०४

मी जें लिहिणार आहे तें केवळ स्नेहभावाचें आहे असें समजा. पूर्वी न्यू इंग्लिश स्कूल काढण्याचे वेळी तुमचें माझें भाषण झालें तें मला चांगलें स्मरतें. तेथपासून पुढे तुमचें कामही फार चांगलें झालें आहे. तुम्ही छळही पुष्कळ सोसला. मी आज पत्र लिहितो त्याचें कारण असें : पुढील राजकारणाच्या क्षेत्रात युद्ध करण्याचें राष्ट्रीय सभा हें एक आपलें शस्त्र झालें आहे. आज ती सर्वगुणपूर्ण नाही. पण हळूहळू तिला आम्ही अधिक बळकट करू इच्छितो. केसरीतून तुम्ही तिला ओढीत आहा असें कळतें, आणि अशा रीतीने जर ती एकदा निर्बल झाली व तिला इजा पोचली तर याची दुरुस्ती करण्यालाच आम्हांला पुष्कळ काळ लागेल. सरकारशी भांडताना आम्ही सर्व एक दिलाचे असले पाहिजे. टीका करावयाची तर ती स्नेहभावाची व उत्तेजनकारक असावी. काँग्रेस आज मोडली तर तें हिंदुस्थानाला मोठें संकट व अँग्लो-इंडियन लोकांचा तो एक मोठा जय होईल. तुम्ही मुंबईस हजर राहून विषय मंडळात सूचना मांडा व बहुमताने निकाल होईल तो सर्वांनी मान्य करावा. राष्ट्रीय कार्याकरिता तुम्हांला फार कष्ट सोसावे लागले म्हणून तुमच्या प्रयत्नांना सहजच वजन येईल. याकरिता तुमच्या नेहमीच्या उत्साहाने राष्ट्रीय सभेला बळकटी आणण्याचा तुम्ही प्रयत्न करा. आम्हांला ऐक्यवृद्धि संपादून काम वाढेल व कामाला माणसें अधिक मिळतील असेंच करावयाचें आहे. तुमचीं दोन वर्तमानपत्रें व स्वतः तुम्ही यांच्याकडून देशहिताचें असें किती तरी काम होईल. मी लिहितो तें स्नेहभावाचें समजा. "

तात्पर्य अध्यक्षपद दादाभाईंना देण्यात राष्ट्रीय पक्षाचाच लाभ होईल असें टिळकांचें अनुमान होतें व तें अचूक खरें ठरलें.

दि. २६ व २७ डिसेंबरला कलकत्ता येथे दादाभाईंच्या अध्यक्षतेखाली काँग्रेसचें अधिवेशन झालें. या अधिवेशनासाठी दि. १९-ला पुण्याहून निघून दि. २०-ला टिळक अमरावतीस आले. दि. २१-ला ते खापर्डे यांच्या समवेत नागपूरला आले. त्या दिवशी नागपूरला त्यांचें वास्तव्य कै. गोपाळराव बुटी यांच्याकडे होतें. दि. २२-ला सकाळच्या मेलने ते कलकत्त्याला गेले. जाताना नागपूरहून टिळकांनी आपल्या समवेत डॉ. मुंजे यांना नेलें. रस्तोरस्ती टिळकांच्या झालेल्या स्वागतासंबंधी दादासाहेब खापर्डे यांनी लिहिलें आहे की, "People worshipped Tilak as an incarnation and there is no doubt, he fully deserved the honour."

कलकत्त्याला टिळकांचें स्थानकावर भव्य स्वागत झालें. त्यांचें वास्तव्य देशबंधू बॅरि. चित्तरंजन दास यांच्या घरी होतें. आल्या क्षणापासूनच टिळकांनी अनेक पुढाऱ्यांच्या गाठीभेटी घेऊन काँग्रेसमध्ये स्वदेशी व बहिष्काराचे ठराव संमत व्हावे यासाठी त्यांचीं मनें वळविण्याचा प्रयत्न प्रारंभ केला. कलकत्ता काँग्रेसचें वातावरण टिळकांना अनुकूल होतें. दादासाहेब खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात,

"२४ तारखेनंतर मी कलकत्त्याला इतका गुंतलो होतो की, मला माझी दैनंदिनी लिहावयास वेळच सापडला नाही. म्हणून आता स्मरणशक्तीच्या भरंवशावर वृत्त लिहीत आहे. हा संपूर्ण काळ सभा, परिषदा, खाजगी व सार्वजनिक चर्चा-प्रतिचर्चा यातच गेला. या चर्चा-प्रतिचर्चांत प्रत्येक गोष्टीचें इतकें तपशीलवार परीक्षण झालें की, त्यांच्या समग्र वर्णनाला ग्रंथ पुरायचा नाही. दि. २५-ला सकाळी आमच्या निवासस्थानी प्रतिनिधींची पुनश्च एक सभा झाली. राष्ट्रीयसभेच्या विषयनियामक समितीने तयार केलेल्या ठरावांची आम्ही एक नक्कल मिळविली. त्यावरून मागच्या काँग्रेसच्या एक पाऊल पुढेच पडत आहे असें दिसलें. येथे आम्ही निर्विवाद बहुसंख्येने असल्यामुळे आणि स्थानिक लोकांचा आम्हांला आधार असल्यामुळे हे ठराव (स्वदेशी व बहिष्कार) जितके पुढे रेटता येतील तितके रेटावयाचे असें आम्ही ठरविलें.)

या राष्ट्रीय सभेसंबंधीची नेमस्ताग्रणींची सर्व कल्पना चुकीची ठरली. टिळक व लजपतराय यांना डावलण्यासाठी त्यांनी दादाभाई नौरोजींना राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष केलें. पण टिळक व लजपतराय यांनी करावें त्याहूनही दादाभाईंचें अध्यक्षीय भाषण अधिक सडेतोड, निर्भीड

व स्पष्टोक्तिपूर्ण झालें. या भाषणात त्यांनी स्वराज्याच्या ध्येयाची स्पष्ट शब्दांत, स्वराज्य हा संस्कृत शब्द वापरूनच घोषणा केली. इतकेंच नव्हे तर राष्ट्रीय शिक्षण, स्वदेशी व बहिष्कार या स्वावलंबनाच्या मार्गांचा उघड पुरस्कार केला. दादाभाईंचीं काही वाक्येंच पहा.

"In 1853, when I made my first little speech at the inauguration of the Bombay Association, in perfect innocence of heart influenced by my English education into great admiration for the character, instincts and struggles for liberty of the British people, I expressed my faith and confidence in the British rulers."

"Since my early efforts, I must say that I have felt so many disappointments as would be sufficient to break any heart and lead one to dispair, and even, I am afraid, to rebel."

"My disappointments have not been of the ordinary kind, but far worse and keener. Ordinarily a person fights— and if he fails he is disappointed; but I fought and won on several occasions, but the Executtive did not let us have the fruits of those victories— disappointment quite enough, as I said, to break one's heart."

"We, in India, claim that the administration in all services, departments and details should be in the hands of the people themselves of India."

"We do not ask for any favours. We want only justice. Instead of going into any further divisions or details of our rights as British citizens, the whole matter can be compromised in one word 'Self-Government' or 'Swarajya'.

"It is only when Self-Government is attained that India will be free from its present evils and consequent sufferings. 'Swadeshi' is not a thing of today. It has existed in Bombay as far as I know for many years past. I am a free-trader, I am a member of Parliament and in the Executive Committee of the Cobden Club for 20 years, and yet I say that Swadeshi is a forced necessity for India in its unnatural economic muddle. As long as the economic condition remains unnatural and impoverishing, by the necessity of supplying every year some 20 crores of Rupees for the salary, pensions etc. of the children of the foreign country at the expense and impoverishment of the children of India to

talk of applying economic laws to the condition of India is adding insult to injury."

"I say, be united, persevere and achieve Self-Government so that the millions now perishing by poverty, famine and plague, and the scores of millions that are starving on scanty subsistence may be saved."

—(Some extracts from the Congress Presidential Address Calcutta 1906 of Dadabhai Naoroji. Dadabhai Naoroji's Speeches and Writings. P. 65 to 96)

" इ.स. १८५३-ची घटना आहे. त्या वेळी बॉंबे असोसिएशनच्या उद्‌घाटनप्रसंगी मी माझें पहिलेंच छोटेंसें सार्वजनिक भाषण केलें. त्या वेळी माझ्या प्रांजल हृदयावर इंग्रजी शिक्षणाचा पूर्ण प्रभाव होता. इंग्रजांचें चारित्र्य, स्वातंत्र्यासाठी ब्रिटिशांनी दिलेला लढा व त्यांचा स्वातंत्र्यप्रियतेचा स्थायी भाव यांच्याविषयी माझ्या मनात अत्यंत आदर होता. मी त्या भाषणात इंग्रजी राज्यकर्त्यांविषयी माझ्या मनात असलेली श्रद्धा व विश्वास उत्कटतेने व्यक्त केला."

"त्यानंतर अनेक प्रकारचे प्रयत्न केल्यावर मला अनेक वेळा दारुण आशाभंग सहन करावा लागला आहे. इतका दारुण आशाभंग की अन्य कुणाचेंही हृदय भग्न होऊन त्याचा संयम सुटला असता व तो निश्चितपणे ब्रिटिश राज्याविरुद्ध बंड करावयास उभा ठाकला असता."

"माझा आशाभंग हा सर्वसामान्य आशाभंगासारखा नाही. तर तो अधिक खोलवर परिणाम करणारा व अत्यंत वाईट स्वरूपाचा आहे. सामान्यपणे मनुष्य आपल्या ध्येयसिद्धीसाठी झगडा करतो व त्यात त्याला अपयश आलें तर त्याचा आशाभंग होतो. पण माझ्या अपेक्षाभंगाचें स्वरूप वेगळें आहे मी अनेक वेळा झगडलो व त्यांपैकी कित्येक प्रसंगी मी विजय मिळविला आहे. पण ब्रिटिश शासनयंत्रणेने त्या विजयाचीं फळें कधीही पदरात पडू दिलीं नाहीत. हें इतक्या वेळा घडलेलें आहे की या स्वरूपाचा अपेक्षाभंग कोणाचेंही हृदय भग्न करावयास पुरेसा आहे."

"नोकरशाहीच्या अंतर्गत असणारी सर्व शासनयंत्रणा, राज्यशासनयंत्रणेचे सर्व विभाग व तपशील हे सर्वस्वी भारतीयांच्याच हातात असले पाहिजेत असा आम्हा भारतीयांचा दावा आहे."

"आम्ही कसल्याही प्रकारचें कृपादान मागत नाही. आम्हांला न्याय हवा. ब्रिटिश नागरिक या नात्याने आमच्या असलेल्या अधिकारांच्या अधिक तपशिलात न शिरता एका शब्दात आम्हांला काय

हवें तें सांगतो. आम्हांला स्वतःच्या देशात स्वतःचें राज्य हवें. आम्हांला स्व-राज्य हवें."

"आम्हांला आमच्या देशात ज्या क्षणी स्वराज्याचा लाभ होईल त्या वेळीच सध्याच्या दुरवस्थेतून व दुःखातून आमची मुक्तता होईल."

"स्वदेशीची चळवळ काही आजची व नवी नाही. माझ्या माहिती-प्रमाणे मुंबई प्रांतात ती फार पूर्वी प्रारंभ झाली आहे. मी खुला व्यापार करणारा मनुष्य आहे. मी ब्रिटिश पार्लमेंटचा सभासद आहे. गेल्या वीस-वर्षांपासून मी कॉबडन् क्लबच्या कार्यकारी मंडळावर आहे. पण तरीही मी असें म्हणतो की, सध्याच्या आमच्या अस्वाभाविक आर्थिक दुरवस्थेवर आमच्यावर परिस्थितीनेच लादलेला स्वदेशी हाच एकमात्र तोडगा आहे. जोवर भारताची अर्थव्यवस्था आहे अशीच अस्वाभाविक व शोषणपूर्ण आहे, जोवर भारतीयांना लुबाडून व त्यांच्यावरच खर्चाचा बोजा लादून प्रत्येक वर्षी परक्या देशातील लोकांना वेतन, पेन्शन, श्रमाचा मोबदला इत्यादि नांवाखाली प्रतिवर्षी २० कोटी रुपयांचा मलिदा चारणें नियमितपणे चालू आहे तोवर अर्थशास्त्रातील नियमांची परिभाषा हिंदुस्थानला लागू करण्याची भाषा बोलणें म्हणजे जखमेवर मीठ चोळणेंच होय."

"मला असें सांगावयाचें आहे की, संघटित व्हा व प्रयत्न करून स्वराज्य मिळवा. स्वराज्यप्राप्तीमुळेच दारिद्र्य, दुष्काळ, प्लेग व उपास-मार यांच्या संकटातून लक्षावधि भारतपुत्रांची मुक्तता होऊ शकेल."

दादाभाई नौरोजींच्या अध्यक्षीय भाषणाने सोनाराने कान टोचावे तशी नेमस्तांची अवस्था झाली. अध्यक्षीय भाषणाने कोलमडलेल्या नेमस्ताग्रणींनी विषयनियामक समितीत तरी आपली बाजू सावरली जावी म्हणून राष्ट्रीय पक्षाच्या स्वदेशी व बहिष्काराच्या ठरावाला विरोध कर-ण्याचे अटीतटीचे प्रयत्न केले. पण त्यांचा काही एक उपयोग न होता स्वदेशी व बहिष्काराचा ठराव राष्ट्रीय सभेत संमत होऊन मवाळाचा संपूर्ण पराभव झाला. या ठरावाचे एक शिल्पकार कै. दादासाहेब खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात, "विषयनियामक कमेटीत ६०० सभासदांचा समावेश होता. सब्जेक्ट्स् कमेटीत खूप घोटाळा माजला. फेरोजशहा मेथांना अध्यक्षांच्या जवळ बसावयाचें होतें. पण त्याला लोकांनी हरकत घेतली. फेरोजशहा मेथांनी लोकांना व्याख्यान देण्यास सुरवात केली. पण लोक ऐकेनात. लोकांनी त्यांना वारंवार 'बसा बसा' म्हटलें. अध्यक्षांना देखील त्यांना नियमबाह्य वागल्याबद्दल थांबवावें लागलें.

मदन मोहन मालवीय यांनी आपलें अगदीच प्रदर्शन करून घेतलें. गोखले इकडे तिकडे फिरून कुरकुरणाऱ्या बाईप्रमाणे बोलत होते. स्वदेशी आणि बहिष्कार व घटना या मुद्द्यावर खरें रण माजलें. बंगालच्या फाळणीच्या ठरावापासून वादाला सुरवात झाली. आमच्या पक्षातील लोकांच्या मनाला ती फाळणी बरीच जाचली होती. यावर फार कडाक्याची चर्चा झाली. आणि फेरोजशहा मेथांना पुन्हा अनपेक्षित बक्षीस मिळालें. स्वदेशी-संबंधीचा ठराव जेव्हा सभेपुढे आला तेव्हा दोन्ही पक्षांकडून भवति न भवति झाली, दुसऱ्या दिवशी आम्ही आमच्या उपसूचना अध्यक्षांकडे पाठविल्या. आम्ही मंडपांत गेलो ते आमच्या उपसूचना सभेपुढे मांडण्याच्या तयारीनेच गेलो. बाकीच्या आवश्यक गोष्टींची सर्व तयारी होती. दाजी आबाजी खरे फार विचारात पडल्यासारखे दिसले. ते, टिळक, मेथा, आणि काही इतर मिळून शेजारच्या खोलीत गेले. मला बोलावलें पण मी गेलो नाही. त्यांनी माझ्या उपसूचना मान्य केल्या. परंतु त्यावर मला बोलू न देण्याची त्यांची फार खटपट दिसली. टिळकांनी आपलें म्हणणें पक्कें धरून ठेवलें होतें. टिळकांनी उपसूचना सुचविली होती त्यात त्यांनी फार कुशलतेने बहिष्काराचीं सर्व अंगें नमूद केलीं होतीं व बहिष्काराचें तें खरोखरी रूपांतरच होतें. मेथांना हें फार जाणवलें आणि ते म्हणाले, तुम्हांला मला मुंबईस अशा रीतीने वागवता आलें नसतें. व तसें तुम्ही केलेंही नसतें. टिळक म्हणाले, 'तुम्ही प्रसंगच आणला तर आम्ही तुम्हांला मुंबईसही याचा मासला दाखवू.'

"शेवटी तडजोड ठरली. टिळकांचे मुद्दे मान्य केले; पण बहिष्कार शब्दाच्या रूपांतराला थोडी पुष्टि जोडली. याप्रमाणे वादाचा मुद्दा मिटला आणि आम्ही काँग्रेसच्या मंडपामध्ये परत आलो. बाबू बिपिनचंद्र पाल यांनी या बहिष्काराच्या ठरावाला दुजोरा दिला. खऱ्या दृष्टीने पाहिलें असता तो दिवस त्यांनीच गाजविला ! बिपिनचंद्र पाल बोलत असता सभेकडून टाळ्यांचा प्रचंड गजर झाला. आणि मदन मोहन, गोखले आणि त्यांच्यासारखे इतर मवाळ इतके घाबरले की, बिपिनचंद्रांनी सभेपुढे मांडलेल्या विचारांशी आपण सहमत नाही असें दाखविण्याची त्यांना घाई झाली. हें सर्व होत असताना बडोद्याचे गायकवाड महाराज (सयाजीराव) उपस्थित होते. टिळकांचें भाषण फारच चांगलें झालें. याप्रमाणे **स्वदेशी व बहिष्कार** हे दोन्ही ठराव पास झाले. माझ्या मनावरचें फार मोठें ओझें उतरल्यासारखें झालें. दुसऱ्या दिवशी काँग्रेसची बैठक संपताना अध्यक्षांनी लहानसेंच पण अतिशय सुंदर भाषण केलें. ते म्हणाले की, स्वराज्य हें आमचें ध्येय आहे. आणि सर्व तरुणांनी त्याकरिता झटून

काम केलें पाहिजे. त्यांचें भाषण मवाळांना आवडणें शक्य नव्हतें. जागच्या जागी ते अस्वस्थ झाले होते हें मला दिसतच होतें."

—श्री. दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र, पृ. २६५–२६८

उघडपणे स्वराज्याची घोषणा करून अर्जाऐवजी अडवणुकीच्या मार्गावर आलेली कलकत्त्याची ही राष्ट्रीय सभा नव्या क्रांतियुगाची प्रातिनिधिक ठरली. दि. ८ जानेवारी १९०७-च्या केसरीत या राष्ट्रीय सभेचें फलित सांगताना लोकमान्य टिळक लिहितात, "राष्ट्रीय सभा आणि स्वराज्याचा हक्क यांचा, सभा वयात आल्यानंतर वृद्ध महर्षि दादाभाई यांच्याकडून जो सशास्त्र विवाहसंबंध लावण्यात आला आहे तो राष्ट्रीय सभेशी पितृत्वाचें नातें जोडणाऱ्या कित्येक गृहस्थांस जरी पूर्ण पसंत नसला तरी तो तोडणें किंवा त्यात यत्किंचितही व्यत्यय आणणें आता अशक्य आहे. नव्या तरुण पक्षाचीं मतें देशास दिवसेदिवस अधिकाधिक पटणें हें राजकीय प्रगतीचें लक्षण असून ही स्थिति आता क्रमप्राप्तच आहे."

कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेतील स्वदेशीच्या पुरस्काराचा प्रभाव तिला जोडून झालेल्या औद्योगिक, सामाजिक व महिला या तिन्ही परिषदांवर पडला. औद्योगिक परिषदेचे अध्यक्ष विठ्ठलदास ठाकरसी हे होते व प्रास्तविक भाषण बडोदा संस्थानचे अधिपति सयाजीराव महाराज गायकवाड यांनी केलें. अध्यक्ष ठाकरसी यांनी या परिषदेत स्वदेशीचा पुरस्कार औद्योगिक क्रांतीसाठी आवश्यक असल्याचें आपल्या अध्यक्षीय भाषणातून सांगितलें.

सामाजिक परिषदेचे अध्यक्ष न्यायमूर्ति चंद्र माधव बोस हे होते. त्यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात असें सांगितलें की, सुधारणेचा अर्थ हिंदु समाजाच्या धारणामूल्यांचें निर्मूलन नसून नवीन परिस्थितीत त्याच्या संजीवनासाठी आवश्यक तें वातावरण निर्माण करणें हा आहे. अध्यक्षांनी जुन्या पक्षाचीं मतें व मनोवृत्ति न दुखविणारी ठरावांची भाषा असावी असा खाजगी रीतीने आग्रह धरला. टिळक पक्षाचा हा विजयच होता.

दि. २९ डिसेंबरला कुचबिहारच्या महाराणी साहेबांच्या अध्यक्षतेखाली महिला परिषद झाली. या परिषदेला एक सहस्र महिलांची उल्लेखनीय उपस्थिति होती. या सभेत बडोद्याच्या महाराणी साहेबांनी भाषण करून बंगाली स्त्रियांनी स्वदेशीचें आन्दोलन उत्कृष्ट रीतीने चालविल्याबद्दल त्यांचें प्रकट रीतीने अभिनंदन केलें.

राष्ट्रीय सभेच्या मंडपातच पहिलें स्वदेशी सम्मेलन भरलें. या सभेचे अध्यक्ष, म्हैसूरच्या हैदरअल्ली व सुलतान टिपूचे वंशज नबाब सय्यद महमूद बहादूर हे होते. या सभेत टिळकांनी प्रांतशः स्वदेशी समित्या स्थापन करून ती चळवळ देशव्यापी करण्याची योजना ठरावाच्या रूपाने मांडली व ती सर्वसंमत झाली.

राष्ट्रीय सभेचें अधिवेशन संपल्यावर कलकत्त्याहून परतण्यापूर्वी कलकत्ता कॉलेज स्क्वेअरमध्ये बिपिनचंद्र पाल यांच्या अध्यक्षतेखाली 'नवा पक्ष व त्याचे मार्ग' या विषयावर लोकमान्य टिळकांचें भाषण झालें. या भाषणात टिळकांनी असें प्रतिपादन केलें की 'जहाल' व 'मवाळ' हे जे नवीन शब्द निघाले आहेत ते सापेक्ष समजावे. कारण प्रगतीचा नियमच असा आहे की, आजचा जहाल उद्याचा मवाळ ठरणार. केवळ काही विशिष्ट हेतूने विशिष्ट भेद दर्शविण्याकरिता हे शब्द योजावयाचे असतात. जुन्या पिढीचा अनुभव नव्या पिढीने घेऊन पुढे जावयाचें आहे. डिग्बी, दादाभाई यांनी जन्मभर अभ्यास करून जे शोध लावले ते जमेस धरून पुढे पाऊल टाकलें पाहिजे. म्हणूनच यापुढे अर्ज व विनंत्या हा जुन्या पक्षाचा कार्यक्रम टाकाऊ ठरतो. मोर्ले वगैरे उदार मुत्सद्द्यांवर अवलंबून बसण्यात अर्थ नाही. हिंदुस्थानची निकृष्ट दशा झाली आहे हें आम्हांला कळतें, तसें ब्रिटिश मुत्सद्द्यांना कळत नाही असें थोडेंच आहे! अर्ज व विनंत्यांनी ती गोष्ट त्यांना पटवून थोडीच द्यावयाची आहे? ती त्यांना सहज दिसतेच आहे. पण स्वार्थाकरिता ते तिकडे दुर्लक्ष करावयास तयार झाले आहेत. म्हणून स्वराज्य मिळेपर्यंत आपण सरकारची अडवणूक चालू ठेवली पाहिजे. बंगालची फाळणी हें एक दुःख आहे. पण स्वराज्याचा अभाव हें खरें रोगनिदान आहे व त्याला अडवणूक हेंच एक शस्त्र आहे."

याप्रमाणे १९०६-ची कलकत्ता काँग्रेस भारताच्या भावजीवनातील नव्या क्रांतियुगाची प्रातिनिधिक ठरली व टिळक हे त्या क्रांतियुगाचे नेते आहेत हें सिद्ध झालें.

या युगंधर नेतृत्वाला काँग्रेसमध्ये निष्प्रभ करून तिला पुनश्च जुन्या अर्जविनंत्यांच्या मार्गावर स्थिर करावयाचा नेमस्ताग्रणींनी निश्चय केला, व त्या दृष्टीने तिचें पुढचें अधिवेशन नेमस्तांनी आपल्या बालेकिल्ल्यात भरवावयाचें ठरविलें. नागपूर त्या वेळी नेमस्तांचा बालेकिल्ला समजण्यात येत असे. तेथे हें अधिवेशन घ्यावयाचें नेमस्तांनी ठरविलें. पण कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेपासून नवी स्फूर्ति घेतलेल्या तरुण

डॉ. मुंजे यांनी अवघ्या काही महिन्यांतच नागपूर व मध्य प्रांतात स्वतःच्या कर्तृत्वाने अशी स्फोटक परिस्थिति निर्माण केली की, नागपूरला राष्ट्रीय सभेचें अधिवेशन व्हावयाचें तर तें टिळकांच्याच अध्यक्षतेखाली व्हावें. शेवटी भयभीत नेमस्तांनी नागपूरहून सुरतेला पलायन केलें. पण तेथेही राष्ट्रीय सभेची बेसुरत व्हावयाची ती झाली. डॉ. मुंजे यांच्या जीवनांतील या महत्त्वाच्या पर्वाकडे पुढील प्रकरणात वळू

✦ ✦ ✦

प्रकरण दहावें

# सन १९०७-चा संघर्ष

कलकत्ता येथील राष्ट्रीयसभेनंतर वस्तुत: लाहोरने राष्ट्रीयसभेला पुढील वर्षीच्या अधिवेशनाचें निमंत्रण दिलें होतें. पण पंजाबचें वातावरण प्रथमपासूनच जहाल व क्रांतिकारक विचारांच्या नेत्यांनी प्रभावित केलेलें असल्यामुळे लाला लजपतरायांसारख्या क्रांतिकारक नेत्याच्या गुहेत राष्ट्रीय सभा न्यावयाची नाही असा नेमस्तांनी निर्णय घेतला. कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेमध्ये टिळकांच्या विचारांचा जो प्रभाव दिसून आला त्यामुळे लाहोरचें निमंत्रण स्वीकारल्यास अध्यक्षपद टिळकांनाच द्यावें लागेल हें उघड होतें. कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात पराभूत झालेल्या नेमस्तांना पुढील गोष्टी साधावयाच्या होत्या. (१) दादाभाई नौरोजी यांनी उच्चारलेला Self-Government अथवा स्वराज्य याच्या अर्थाला वेगळी कलाटणी द्यावयाची. (२) स्वदेशी व बहिष्काराचे राष्ट्रीय सभेत संमत झालेले ठराव बदलवून घ्यावयाचे व (३) कोणत्याही परिस्थितीत टिळकांना राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होऊ द्यावयाचें नाही. हें सर्व व्हावयाचें तर तें आपल्या बालेकिल्ल्यातच शक्य आहे हें नेमस्तांना दिसत होतें. ते नागपूरला आपला बालेकिल्ला समजत होते, व म्हणून नागपूरच्या वतीने त्यांनी राष्ट्रीयसभेला निमंत्रण दिलें. बाबासाहेब खापर्डे लिहितात, "नागपूरला काँग्रेस बोलावण्यात रा. ब. मुधोळकर (अमरावतीचे) व रा. ब. पंडित (नागपूरचे) यांचा पुढाकार होता. मुधोळकर वऱ्हाडतर्फे बोलले आणि पंडित नागपूरतर्फे. याच वेळी म्हणजे कलकत्त्यासच, काय वाटेल तें झालें तरी पुढच्या काँग्रेसचें अध्यक्षपद टिळकांना घेऊ द्यावयाचें नाही असा त्यांनी चंग बांधला होता व तसें मुधोळकरांनी तर सार्वजनिक रीत्या अगदी उघड बोलूनही दाखविलें होतें. नेमस्त म्हणजे मवाळ पक्ष नागपूरला प्रबळ होता. सर गंगाधरराव चिटनविसांसारखीं घरंदाज, श्रीमंत, मवाळांचे साथी आणि अभिमानी माणसें होतीं. सरकारच्या सहानुभूतीच्या जोरावर व त्यांच्या टिळकांविषयीच्या रोषावर अवलंबून येत्या काँग्रेसचें काम नागपूरास सहज निभवून नेता येईल अशी नागपूर, वऱ्हाडकर नेमस्तांची कल्पना होती. खापर्डे हे आपल्यापरी मोठे असले तरी अखेर वऱ्हाडचे. नागपूरच्या आपल्या बालेकिल्ल्यात त्यांचा प्रभाव चालणार नाही

अशीही त्यांची कल्पना होतीच. तेव्हा पुढच्या काँग्रेसविषयी हा मवाळ अथवा नेमस्तपक्ष निश्चित होता आणि स्वतःच्या शक्तीचा व भोवतालच्या मंडळींच्या कर्तबगारीचा त्यांना भरंवसा होता."

—दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र, पृ. २७२

तरुण डॉ. मुंजे यांनी मवाळांचें हें आव्हान स्वीकारावयाचें असें कलकत्त्याहून येताच ठरविलें. काँग्रेस नागपूरलाच भरवावयाची व टिळकांनाच तिचे अध्यक्ष करावयाचें असा त्यांनी निर्णय घेतला. दादाभाई नौरोजी यांच्या अध्यक्षतेखाली राष्ट्रीयसभेचा जो क्रांतिकारक कायापालट झाला तो सुस्थिर करून तिला स्वराज्यप्राप्तीला आवश्यक त्या क्रांतिकारक विचारांचें वाहक बनवावयाचें तर टिळकांनी तिचे अध्यक्ष होणें हेंच उचित व क्रमप्राप्त होतें. ही गोष्ट घडवून आणावयास आवश्यक तें बळ डॉ. मुंजे यांनी निर्माण केलें होतें. प्रत्यक्ष बहुजन-समाजाच्या परिसरात न वावरणाऱ्या नागपुरातील नेमस्ताग्रणींना या बळाची कल्पना नव्हती. परतंत्र देशात परकीय अत्याचारांनी सर्व-सामान्य लोक दबलेले दिसले तरी त्यांचा स्थायीभाव परकीय राज्य-कर्त्यांच्या विरोधाचा असतो. या विरोधाचा प्रकट आविष्कार करणारें नेतृत्व लोकांना स्वाभाविकपणेच मनातून आवडत असतें. कारण तें लोकांच्या आकांक्षांचें प्रतिनिधि असतें. टिळकांच्या व्यक्तिमत्त्वात हें प्रतिनिधित्व दिसून आल्यामुळे भारतातील तत्कालीन जनमानसाचें टिळक हे पूजास्थान झाले. नागपूर व मध्यप्रांतात टिळकांचीच भूमिका डॉ. मुंजे यांनी स्वीकारलेली असल्यामुळे या प्रांतातील व विशेषतः नागपुरातील नव्या उत्साहाच्या तरुण पिढीचें डॉ. मुंजे हे महान् आकर्षणकेन्द्र झाले होते. ३५-३६ वर्षांच्या डॉ. मुंजे यांच्यासारख्या तरुण नेत्याचें आकर्षण वाटणारे अनेक प्रौढ व तरुण त्यांच्याभोवती गोळा झाले व त्यांतून निवड करून त्यांनी राष्ट्रीयमंडळ या नांवाची संस्था निर्माण केली. राष्ट्रीय मंडळ म्हणजे राष्ट्रजागृतीच्या कार्यासाठी डॉ. मुंजे यांनी निर्माण केलेली समानविचारांच्या तरुण मित्रांची समिति होती. डॉ. ल. वा. परांजपे, धुंडिराजपंत ठेंगडी, डॉ. चोळकर, डॉ. लिमये, डॉ. गद्रे, अच्युतराव कोल्हटकर, माधवराव सप्रे, राम नारायण राठी, बॅ. चक्रवर्ती इत्यादि लोक या राष्ट्रीय मंडळात असून या मंडळाच्या द्वारे विविध मार्गांनी राष्ट्रीय विचार जनतेत पसरविण्याचें कार्य मुंजे यांनी उत्साहाने प्रारंभ केलें. त्यामुळे मुंजे यांच्या भोवती अनेक तरुण गोळा होऊ लागले. या मंडळाने शिवाजी व गणेशोत्सवाच्या द्वारा राष्ट्रीय शिक्षण व स्वदेशीचा प्रचार प्रारंभ केला. श्री. अच्युतराव

कोल्हटकर या वेळी देशसेवक पत्राचे संपादक झाले होते. जहालपंथीय राजकारणाचा प्रचार करण्याचें देशसेवक हें प्रभावी साधन झालें. दि. १७ एप्रिल १९०७-ला माधवराव सप्रे यांनी हिंदकेसरी काढला. हें वृत्तपत्र इतकें लोकप्रिय झालें की काही महिन्यांतच त्याचा खप ६००० वर गेला. मुंजे यांना सरकारविरोधी जनमत निर्माण करावयाचें होतें. त्या उद्दिष्टाच्या परिपूर्तीसाठी उपयोगाचे ठरतील असे सर्व मार्ग डॉ. मुंजे यांना मान्य होते. त्यामुळेच त्यांच्या बैठकीत नैर्बंधिक मर्यादांत राहून कार्य करणाऱ्या व्यक्तीपासून तर बॉंब व पिस्तुलांच्या शस्त्राचारी मार्गाचा अवलंब करणाऱ्या क्रांतिकारकांपर्यंत सर्वांचाच समावेश असे. वंगभंगाच्या विरोधी आन्दोलनातून बंगाल व महाराष्ट्रात जी क्रांतिकारक चळवळ वाढीस लागली तिचें लोण नागपूरपर्यंत आलेंच होतें. क्रांतिकारक विचारांच्या तरुण विद्यार्थ्यांचा एक मोठा प्रभावी गट डॉ. मुंजे यांच्याभोवती असून केशवराव हेडगेवार, भय्यासाहेब बोबडे, बळवंतराव मंडलेकर, भाऊजी कावरे, डॉ. खानखोजे हे त्यांतील प्रमुख होते. या विद्यार्थ्यांच्या अनेक गुप्त सभा होत व त्यांतून होणाऱ्या व्याख्यानांतून क्रांतीच्या व जहाल राष्ट्रवादी विचारांच्या प्रसाराचें कार्य होई. टिळकांची चतुःसूत्री प्रसृत करण्यासाठी या तरुणांनी आर्यबांधववीथिका या नांवाची एक संस्था काढली होती. तिच्या वतीने स्वदेशी वस्तूंची विक्री व प्रसार करण्यात येई. या वस्तूंवर पांच शस्त्रांचें चिन्ह असे. हें ध्यानात घेतलें म्हणजे या तरुण विद्यार्थ्यांच्या क्रांतिप्रवण मनोवृत्तीची कल्पना येईल. संपूर्ण वेळ या राष्ट्रजागृतीच्याच कार्याला देऊन या प्रांतात टिळकांना अध्यक्षपद देण्यासाठी जनमत तयार करण्याच्या कामाला स्वतःला वाहून घेण्याचा मुंजे यांनी निर्धार केला. राष्ट्रीयसभेचा क्रांतिकारक कायापालट करण्याच्या या कार्याचा प्रारंभ आपल्या विचारांच्या, पण सामाजिक प्रतिष्ठेच्या दृष्टीने मवाळांनीही ज्यांना वचकून असावें अशा पुढाऱ्याच्या हस्ते व्हावा म्हणून मुंजे यांनी दादासाहेब खापर्डे यांना आवाहन केलें. कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेहून परत आल्याबरोबर १९०७-च्या जानेवारी महिन्यापासूनच खापर्डे यांचा स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य या चतुःसूत्रीच्या प्रचारासाठी नागपूरपासून दौरा प्रारंभ झाला. या दौऱ्यात दादासाहेबांच्या बरोबर बाबासाहेब खापर्डे होते. ते लिहितात, " दि. २४ जानेवारी (१९०७) या दिवशी दादासाहेब अकोल्याहून सरळ नागपूरला आले. नागपुरास श्री. गोपाळराव बुटींच्याकडे उतरण्याचा त्यांचा प्रघात होता. डॉ. मुंजे, डॉ. लिमये, डॉ. परांजपे, ठेंगडी वगैरे मंडळींच्या

गाठीभेटी होऊन कार्यक्रमाचा आराखडा तयार झाला. त्याच दिवशी मी, दादासाहेब, दोन चाकर भंडारा येथे जावयास निघालो. मुक्काम श्री. केळकर (सिव्हिल जज्ज) यांच्याकडे होता. सरकारी नोकरीत असून केळकरांनी दादासाहेबांना आग्रहपूर्वक आपल्या घरी उतरून घेतलें, याचें आम्हांला कौतुक वाटलें.

"दुसऱ्या दिवशी सकाळी दादासाहेब, मी व डॉ. लिमये थिऑसफीच्या लॉजमध्ये गेलो. तेथे दादासाहेबांचें व्याख्यान झालें. भोजनानंतर ३ वाजता दादासाहेबांचें तेथील हायस्कूलमध्ये व्याख्यान झालें तें 'राजकारण' या विषयावर. श्रोतृसमुदाय फार मोठ्या संख्येने उपस्थित होता. व्याख्यान चालू असताना वारंवार टाळ्या होत होत्या व सरकारावर केलेली टीका लोक मोठ्या रुचीने ऐकत होते. दादासाहेब दीडतास बोलले. त्यानंतर 'यंग मेन्स असोसिएशन्' मध्ये दादासाहेबांचें दुसरें व्याख्यान झालें. तेंही 'स्वदेशी' या विषयावरच होतें. दुसऱ्या दिवशी दि. २६-ला मंडळी नागपूरला परत आली. त्याच दिवशी तिसऱ्या प्रहरी बालाजीच्या मंदिरांत 'काँग्रेस' या विषयावर दादासाहेबांचें एक व्याख्यान झालें व त्यानंतर पुन: सायंकाळी टाऊन हॉलमध्ये दुसरें. या व्याख्यानाला बॅरि. पंडित (काँग्रेसचे एक आमंत्रक) उपस्थित होते. त्यांनी मधूनमधून व्याख्यानाला अडथळा आणण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यामुळे उलट व्याख्यानाला रंगच चढला. धुंडिराज ठेंगडी व बॅरिस्टरसाहेब यांची शाब्दिक सलामी झाली. त्यात धुंडिराजांनी मात केली. दादासाहेबांचें भाषण दोन तास झालें. दादासाहेब लिहितात It appears God is on our side and is helping us. देव आमचा कैवारी आहे आणि तो आम्हांला साहाय्य करतो असें दिसतें."

—दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र, पृ. २७२-२७३

यानंतर फेब्रुवारी महिन्यात खापर्डे यांनी कोकणचा दौरा केला व मार्चमध्ये पुनश्च वऱ्हाड व मध्यप्रांतात त्यांचा दौरा झाला. वऱ्हाड नागपूरकडील नेमस्ताग्रणी मार्चपर्यंत निर्धास्त होते. पण मार्च महिन्यात रायपूरला झालेल्या घटनेने नागपूरची भूमि आपण समजतो तशी टणक नसून भुसभुशीत झाली आहे याची त्यांना प्रथम जाणीव झाली.

मार्च महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात नेमस्त पक्षाच्या लोकांनी डॉ. गौर यांच्या अध्यक्षतेखाली रायपुरला वऱ्हाड व मध्यप्रांताच्या वतीने प्रांतीय परिषद घेतली. या परिषदेला वऱ्हाड व मध्यप्रांतातून मराठी व हिंदी भाषिक प्रतिनिधि मोठ्या संख्येने उपस्थित होते. भावी

राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात, टिळकांच्या खटपटीने कलकत्त्याला राष्ट्रीय सभेने जें वळण घेतलें तें मोडून काढावयाचें हा विचार लोकांच्या मनात रुजविण्यासाठी नेमस्ताग्रणींनी परिषदेचें हें आयोजन केलें होतें. परिषदेच्या मंडपाच्या प्रवेशद्वारावर "माडरेशन इज अवर वॉचवर्ड" (नेमस्तपणा हें आमचें ब्रीद आहे.) हें वाक्य ठळक अक्षरांनी लिहिलें होतें. 'वंदे मातरम्' राष्ट्रगीत म्हणण्याची बंदी घालण्यात आली होती व स्वयंसेवकांना 'वंदे मातरम्' असा जयघोष न करण्याच्या कडक सूचना देण्यात आल्या होत्या. परिषदेला डॉ. मुंजे, डॉ. लिमये, बापूसाहेब बुटी व भाऊसाहेब खापर्डे यांच्या समवेत दादासाहेब स्वत: गेले होते. परिषदेच्या चालकांनी जहाल पक्षीय लोकांचा प्रभाव पडतो आहे असें पाहून त्यांना इतकी वाईट वागणूक दिली की, डॉ. मुंजे व दादासाहेब खापर्डे सभात्याग करून परिषदेच्या मंडपातून निघून गेले. रायपूर येथील तरुण विद्यार्थ्यांनी परिषदेच्या मंडपात स्वदेशी या विषयावर दादासाहेब खापर्डे यांचें व्याख्यान ठरविलें, तेव्हा डेप्युटी कमिशनर रागावतील या सबबीवर परिषदेच्या सूत्रचालकांनी या व्याख्यानासाठी मंडप देण्याचें नाकारलें.

पण अशा गोष्टींनी गतिमान् आन्दोलनें कधी थांबतात काय ? उघड्यावर तेथील हनुमंताच्या देवळासमोर सहस्रावधि श्रोत्यांसमोर जहाल पक्षाचे अध्वर्यु खापर्डे यांचें स्वदेशीवर भाषण झालें व या सभेत नेमस्तांच्या नेभळट धोरणाची प्रतिक्रिया म्हणून वंदे मातरम्चा एवढा जयघोष झाला की, जमलेल्या नेमस्ताग्रणींचीं हृदयें जनमताचा तो कौल पाहून विदीर्ण झालीं. यानंतर जहालपक्षीय लोकांची बाहेर प्रकट भाषणें गाजू लागलीं. मवाळांच्या देखत जहालपक्षीय लोकांच्या पुढाऱ्यांच्या प्रचंड मिरवणुकी निघाल्या व रावसाहेब रावबहादुरांचा जनतेकडून इतका उपहास झाला की नागपूरच्या भावी राष्ट्रीय सभेच्या भवितव्याची नेमस्ताग्रणींना प्रथमच कल्पना आली.

दि. १० एप्रिलला रायपूरहून मवाळ व जहाल एकदमच परतले. गाडीत मुधोळकर, वामनराव कोल्हटकर प्रभृति नेमस्ताग्रणींनी उगवत्या जहालपक्षाशी तडजोड करून नागपूरच्या राष्ट्रीय सभेचें सुकाणू आपल्या हातातच राहण्याच्या दृष्टीने प्रयत्न करावयाचें ठरविलें. परिषदेत मुंजे खापर्डे प्रभृतींना अपमानित करून काढून लावणाऱ्या नेमस्ताग्रणींना हा विचार सुचला यावरूनच रायपूरच्या प्रकाराची नेमस्ताग्रणींनी केवढी धास्ती घेतली होती याची कल्पना येते. गाडी बिलासपूर स्टेशनवर थांबली असता गाडीतच मवाळांच्या प्रेरणेने मवाळ व जहाल पक्षांच्या

पुढाऱ्यांची एकत्र बैठक झाली. या बैठकीत मुधोळकर, देवराव विनायक, दादासाहेब खापर्डे, डॉ. मुंजे, महाजनी, जकातदार, नारायणराव अळेकर, डॉ. लिमये, जकाते, शामराव, माधवराव पाध्ये प्रभृति नेते एकत्र बसले. तडजोडीसंबंधात बरीच लांबलचक चर्चा झाली. पण तत्त्वतः मूलभूत मतभेद असल्यामुळे या बैठकीतून काहीच निष्पन्न न होता मंडळी आपापल्या डब्यात परत गेली. दादासाहेब आपल्या दैनंदिनीत लिहितात,

"रायपूरच्या या घटनेने जनतेत ब्रिटिशांच्या राज्याविषयी वाढती अप्रीति दिसून आली. स्वराज्याच्या मागणीला जनमताचा कौल अनुकूल दिसून आला. त्यामुळे नेमस्ताग्रणींचा निर्धास्तपणा जसा नष्ट झाला तसाच डॉ. मुंजे प्रभृति तरुण लोकनेत्यांचा काँग्रेसला क्रांतिप्रवण करण्या-संबंधीचा आशावाद बळावला."

"रायपूरच्या या घटनेनंतर डॉ. मुंजे यांनी तापलेल्या लोकमताला राष्ट्रीय विचारांचें वळण देण्यासाठी सर्व शक्ति पणाला लावावयाचें ठरविलें. त्यांनी स्वतःच्या वाढत्या व्यवसायाचा पसारा बंद करून खापर्डे यांच्यासह मध्यप्रांत वऱ्हाडच्या तुफानी दौऱ्याला भर मे महिन्याच्या उन्हाळयात प्रारंभ केला. मुंजे व खापर्डे यांच्या तेजस्वी विचारापेक्षाही मुंजे यांनी व्यवसाय बंद करून व राष्ट्रवादी विचारांच्या प्रसाराला स्वतःला वाहून घेऊन जो त्यागाचा व कष्टाचा आदर्श निर्माण केला त्याचा जनमानसावर अत्यंत खोलवर परिणाम झाला. मुंजे यांच्या पूर्वी मध्य-प्रांतात आपला वाढता व्यवसाय बंद करून राजकारणाला जीवनसर्वस्व वाहून देणारा कोणी लोकनेता झाला नाही. त्यांनी या प्रांतात हा जो राष्ट्रकार्यार्थ जीवनसर्वस्व वेचण्याचा नवा त्यागमय आदर्श निर्माण केला तो अनेक तरुणांना नवी प्रेरणा देणारा ठरला.

मुंजे व खापर्डे यांचा संयुक्त दौरा मे महिन्यात वर्ध्यापासून प्रारंभ झाला. या दौऱ्यात जहाल पक्षाचा होणारा प्रचार पुढे आपल्याला नडेल अशा कल्पनेने नेमस्ताग्रणींनीही आपल्या प्रकट विरोधाला वर्ध्यापासूनच प्रारंभ केला. अर्थातच लोकांच्या मनातून ते उतरले असल्याचा प्रत्ययही वर्ध्यापासूनच त्यांना उत्कटतेने येऊ लागला. नागपूर, वर्धा, हिंगणघाट, छिंदवाडा, शिवनी, जबलपूर, सागर, बिना, हुशंगाबाद, इटारसी, हर्दा, टिमारनी, खांडवा व बऱ्हाणपूर असा ३ मे ते ३ जूनपर्यंत मुंजे व खापर्डे यांचा एक महिन्याचा संयुक्त दौरा झाला. या दौऱ्यात ठिकठिकाणी मवाळांची दाणादाण उडून जहाल पक्षाच्या मतप्रणालीने लोकांचीं मनें आपल्याकडे आकर्षून घेतलीं.

वर्ध्याला माधवराव पाध्ये व दामोदरपंत खरे वकील यांनी नेमस्त पक्षाची बाजू घेऊन विरोध करण्याचा प्रयत्न केला. पण त्यात त्यांचाच जनतेकडून सार्वजनिक रीत्या उपहास झाला. मवाळ जीं जीं छिंदवाड्यासारखीं गांवें स्वतःचा खास दुर्ग म्हणून समजत होते त्या त्या प्रत्येक ठिकाणी मुंजे–खापर्डे यांचें जनतेकडून कल्पनातीत उत्साहाने स्वागत झालें. जहाल विचारप्रणालीच्या विरोधासंबंधात नेमस्त व सरकार यांचीही त्या वेळी हातमिळवणी झाली होती असें दिसतें. लोकांना भिववून जहाल पक्षाच्या या प्रचाराला अडथळा करण्याचाही सरकारने काही ठिकाणी प्रयत्न केला. दि. १५ मेच्या जबलपूरच्या वास्तव्याचें वर्णन करताना दादासाहेब खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात, "आमच्या फाटकावर पोलिसांचा पहारा बसला आहे. भेटीला येणाऱ्यांचीं नांवें तो लिहून घेतो. पुष्कळ लोक आमच्या भेटीला आले. अशा रितीने न भिणारे काही लोक आहेतच. थिएटरमध्ये व्याख्यान झालें. डी. एस्. पी. बंबवाले व सहा डिटेक्टिव्ह व्याख्यानाला उपस्थित होते. प्रथम प्रथम त्यांनी काही टिपणें केलीं. पण व्याख्यान जसजसें रंगत गेलें तसतसें इतरांबरोबर तेही मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणे ऐकत बसले. टिपणें करावयाचे विसरले."

सागरला तर डॉ. मुंजे व खापर्डे यांना अटक होणार असल्याची वार्ता सर्वत्र पसरली. दि. १९ मेच्या दैनंदिनीत दादासाहेब खापर्डे सागरचें वृत्त लिहितात, "रात्री श्री. नाखरे सांगत आले की, मला आणि डॉ. मुंजे यांना पोलिस कैद करणार आहेत. माझा या बातमीवर भरंवसा बसत नाही. तथापि सरकारच्या हल्लीच्या वेडेपणाच्या, निर्बुद्धतेच्या आणि सूडघेऊ नीतीच्या संमिश्र मनःस्थितीत कांहीही शक्य आहे."

एका बाजूला सरकार जसें या दौऱ्यात अडथळा आणण्याचा प्रयत्न करीत होतें तसेंच दुसऱ्या बाजूला ठिकठिकाणचे मवाळ पुढारी आपल्या गावी मुंजे व खापर्डे यांनी येऊ नये अशी खटपटही करीत होते. त्यांच्या पायाखालची वाळू घसरत चालल्याचेंच तें निदर्शक होतें. हुशंगाबादचें वृत्त दि. २२-च्या दैनंदिनीत दादासाहेब लिहितात, "येथे सर्व मंडळी सकाळी ९ वाजता पोहोचली. स्टेशनवर स्वागताकरिता कोणीही नव्हतें. हुशंगाबादचे वकील श्री. रावजी गोविंद यांनी डॉ. मुंजे यांना पत्र पाठविलें होतें की, हुशंगाबादला तुम्ही आल्यास सहानुभूति मिळणार नाही. सबब येऊ नये. पण या पत्रामुळेच आम्ही हुशंगाबादला जाण्याचा निश्चय पक्का केला. अत्यंत मागासलेल्या गावी काम करून त्यांना तयार करावयाचें असा मी निश्चय केला आहे. म्हणून हुशंगाबादला

जाण्याचेंच ठरविलें. जानकी शेठाणीच्या घाटावरील धर्मशाळेत सर्व मंडळी भाड्याच्या टांग्याने जाऊन उतरली. आम्ही जेवण मागविलें. अन्न चांगलें नव्हतें, पण पोटात भूक होती. भूपेन्द्रनाथ चौधरी बॅरिस्टर यांनी अत्यंत आग्रह करून सर्वांना आपल्या घरी नेलें. पुष्कळ प्रमुख मंडळी भेटीस आली. स्वदेशीसंबंधी येथे फार आस्था व उल्हास आहे. रावजी गोविंदाने डॉ. मुंजे यांना जें लिहिलें होतें तें खोटें ठरलें. रावजींनी येण्याविरुद्ध लिहिलें असताही आम्ही हुशंगाबाद येथे गेलो याचा त्यांना फार राग आला असें कळलें. आम्ही त्यांच्या आज्ञेत रहावें अशी त्यांची अपेक्षा आहे काय? ते म्हणाले, (पत्र लिहिण्यापूर्वी) त्यांनी येथील आपल्या मित्रांना विचारलें होतें. आम्ही ज्यांना ज्यांना भेटलो त्यांनी त्यांनी रावजींनी आम्हांला कधी विचारलें नव्हतें असें सांगितलें. सर्व दिवस सर्वांच्या भेटीगाठी घेण्यात गेला. दि. २३-ला सकाळी खूप लोक जमा झाले आम्ही त्यांना 'वंदे मातरम्' गाणें म्हणायला शिकविलें."

हुशंगाबादला सरकारजमा मनोवृत्तीच्या लोकांनी आपल्या क्षुद्रतेचें प्रदर्शनच केलें. तेथील विद्यार्थ्यांच्या वसतिगृहाच्या सुपरिंटेंडटने अशी नोटीस काढली की, खापर्डे व मुंजे यांना भेटायला जाणाऱ्या विद्यार्थ्यांना दोन रु. दंड होईल. या मुक्कामात शेवटी त्या रावजी गोविंदाने लाजेकाजेस्तव खापर्डे व मुंजे यांना जेवायला बोलावलें. या प्रवासात हरद्याच्या मुक्कामात तर स्थानिक अधिकारी भाषणबंदी करण्याची अफवा पसरल्यामुळे मुंजे व खापर्डे यांना उतरवून घेणारा यजमानच घाबरला. दादासाहेब लिहितात, "आम्ही हरदा स्टेशनवर आलो तेव्हा एका पोलिस अधिकाऱ्याने आमच्याशी भांडण उकरून काढण्याचा प्रयत्न केला. पण आम्ही त्याचा डाव ओळखला व तो खजील झाला." खांडवा येथील प्रकारासंबंधी दादासाहेब लिहितात, "येथे आमच्या भोवती तरुण व उत्साही लोक जमले आहेत. परंतु गावात भीतीचें इतकें दाट वातावरण पसरलें आहे की, व्याख्यानासाठी जागा मिळेना. म्युनिसिपल कमेटीने जागा देण्याचें नाकारलें. लायब्ररी सरकारी नोकरांच्या स्वाधीन आहे. देवळात देखील जागा मिळेना. अखेर नवलाची गोष्ट की, एका मुसलमानाने एका पार्श्याचें मन वळविलें व त्याने आपल्या आवारात आम्हांला व्याख्यानाला जागा दिली." याप्रमाणे सरकारी अधिकारी व सरकारजमा मवाळाग्रणी यांनी ठिकठिकाणी नाना प्रकारे अडथळे आणण्याचा प्रयत्न केला तरी मुंजे व खापर्डे यांचा मध्यप्रांतांतील हा पहिलाच प्रचाराचा दौरा अत्यंत यशस्वी झाला. जनतेने ठिकठिकाणी त्यांच्या वतीने कौल दिले. लोक केवळ त्यांच्या सभांना बहुसंख्येने

उपस्थित राहिले, इतकेंच नव्हे तर त्यांनी आपल्या अंतःकरणातील त्यांच्याविषयीचा आदर, पुष्पांचा, सत्कारांचा व मिरवणुकीचा त्यांच्यावर वर्षाव करून, व्यक्त केला. कारण की ते जनतेचें अंतःकरण बोलत होते.

या वेळी भारतात सरकारविरुद्ध जनमत खवळून उठावें अशी प्रक्षुब्ध परिस्थिति सरकारनेच आपल्या विचित्र कृत्यांनी निर्माण केली होती. भारतीय प्रजाजनांच्या जीविताची, वित्ताची व प्रतिष्ठेची विटंबना राज्यकर्त्यांच्या जमातीकडून झाली तर त्यांच्यासंबंधात ब्रिटिश न्यायदेवता जुन्या इस्लामी राजवटीप्रमाणेच अंध बनते हें सिद्ध करणारी उदाहरणें या काळात घडू लागलीं. युरोपिअन सोजिरांनी आपल्या गोळीने कोणत्याही भारतीयाला टिपावें व तो मेला तरी युरोपिअन ज्यूरीने या सोजिरांना दोषमुक्त करून सोडावें हे प्रकार प्रत्यही घडत. पण १९०७-मध्ये याहून अधिक हृदयस्पर्शी उदाहरण घडलें व तें गाजलें. वीरनवाली या नांवाची सतरा अठरा वर्षांची एक तरुण पंजाबी मुलगी रावळपिंडीला आपल्या भावाकडे जाण्याच्या हेतूने रात्री गाडीतून एकटीच प्रवास करीत होती. मध्यरात्री गाडी स्टेशनवर आल्यामुळे उजाडण्याची वाट पहात ती स्थानकावर स्त्रियांच्या विश्रामगृहात बसून राहिली. ती एकटी आहे असें पाहून पूर नांवाच्या गोऱ्या स्टेशन मास्तरने आपली पापी दृष्टि तिच्याकडे वळविली व धमक्या देऊन त्याने तिला आपल्या खोलीत नेऊन तिच्यावर बलात्कार केला. त्यानंतर फाजलउद्दीन नांवाच्या पूरच्या मुसलमान नोकरानेही तिच्यावर अत्याचार केला. या दोन आरोपींवर रीतसर खटला होऊन पुराव्यानिशी त्यांच्यावरील आरोप सिद्ध झाले तरी ज्यूरीतील ९ गोऱ्या लोकांनी आरोपी निर्दोष आहेत असें मत व्यक्त केलें व युरोपियन न्यायाधीशाने या नराधमांना सोडून दिलें. बिचाऱ्या वीरनवालीलाच गोऱ्या न्यायदेवतेने आपल्या कामांध स्वजातीयांची कातडी बचावण्यासाठी वाईट चालीची असल्याचें, केवळ आरोपींच्या मतलबी कांगाव्याला प्रमाण मानून ठरविलें.

वीरनवालीने या अपमानाने व दुःखाने, निर्णयानंतर दुसऱ्याच आठवड्यात आत्महत्त्या केली. तिची ही हृदयद्रावक कथा टिळकांना ज्या वेळी कळली त्या वेळी ते प्रवासात होते. कर्नाटककेसरी कै. गंगाधरराव देशपांडे यांनी आपल्या आठवणीत असा निर्देश केला आहे की, हें वृत्त ऐकून राग, दुःख व त्वेष यांनी लोकमान्यांना रात्रभर झोप आली नाही. लोकमान्यांनी केसरीमध्ये लिहिलें आहे की, "अमेरिकेसारख्या देशात असला प्रकार झाला असता तर लोकांनी चौकशीची

वाट न पाहता गुन्हेगाराचे हालहाल करून त्यास जिवंत जाळलें असतें. एका मडमेची अब्रू घेण्याचा प्रयत्न केल्याबद्दल एका हिंदी माणसास वीस वर्षें सक्तमजुरीची शिक्षा होते आणि वीरनवालीच्या जन्माचा सत्यनाश करणारे गुन्हेगार अजिबात दोषमुक्त होतात हा न्यायदेवतेचा उपमर्द नव्हे, प्रत्यक्ष खून आहे. नेटिव्ह पुरुषांच्या अंगी अँग्लोइंडियनांपासून आपल्या बायकांची अब्रू राखण्याचें सामर्थ्य नाही असें आढळून आल्यावर वीरनवाली आपल्या खटल्याचें अपील परमेश्वराच्या न्यायासनापुढे सादर करण्यास गेली आहे ! ”

परकीय सत्ता म्हटली की ती कितीही न्यायी असली तरी सामान्य जनमताचा कल तिच्या विरुद्धच असतो. त्यातून ती सत्ता प्रजाजनांच्या अब्रूचे जर असे धिंडवडे काढू लागली तर प्रजाजनांचीं अंतःकरणें राजसत्तेविरुद्ध अतिशयच क्षुब्ध होत असतात. या लोकक्षोभाला या वर्षी सरकारने आणखी इंधन पुरविलें. तें इंधन म्हणजे लाला लजपतराय यांची हद्दपारी हें होय. दि. १० मे १९०७-ला १८१८-च्या तिसऱ्या कलमाप्रमाणे सरकारने लाला लजपतराय यांना अटक करून सीमापार केलें. त्यांच्यावर बजाविण्यात आलेलें वॉरंट कोणा सामान्य व्यक्तीचें नसून प्रत्यक्ष लॉर्ड मिंटो यांच्या सहीचें होतें. त्यात तुम्हांला मोकळें ठेविल्यास दंगेधोपे होऊन सार्वजनिक शांततेचा भंग होईल असें कारण देण्यात आलें होतें. सरकारचा लजपतरायांच्याविषयी असा संशय होता की, अफगाणिस्थानचे अमीर हिदुस्थानात आले असता लालाजींनी त्यांना भेटून भारतातील प्रस्थापित इंग्रजी राज्याविरुद्ध तें उलथून पाडण्यासाठीं कटाची योजना आखली. लालाजींच्यावरील हा आरोप सिद्ध करण्यासाठी सरकार उघड न्यायालयीन चौकशी करावयास मात्र सिद्ध नव्हतें. लजपतरायांच्या वरील या अन्यायाने साऱ्या भारतात असंतोषाची लाट उसळली. कलकत्ता, मद्रास, महाराष्ट्र या प्रांतांतील जनमताच्या क्षुब्धतेचा प्रकट आविष्कार होऊ लागला व फिरोजपूर, सियालकोट, पेशावर, रावळपिंडी या लालाजींच्या प्रांतांतील महत्त्वाच्या शहरांतून दंगे झाले. हिंदुस्थानात अनेक ठिकाणी प्रकट सभांतून सरकारचा धिक्कार करण्यात आला. नागपूरही त्यात होतेंच. दडपशाहीचा परिणाम लोकक्षोभात, तर लोकक्षोभ दडपण्यासाठी वाढती दडपशाही असें द्वंद्व जनता व सरकार यांच्यांत प्रारंभ झालें. लोकांच्या हृदयांतील क्षुब्ध विचारांचें प्रतिबिंब लोकनेते लोकमान्य टिळक यांच्या केसरीतील लेखांतून दिसून येतें. त्यांचीं काही वाक्येंच पहा :– “इंग्रजी राजसत्तेचे जर कोणी खरे शत्रु असतील तर ते सनदशीर चळवळीस अडथळा आणणारे हे गोरे अधि-

कारीच होत. मुसलमानी बादशहांची कारकीर्द यांच्यापेक्षा शतपट चांगली; कारण औरंगजेब झाला तरी तो विनाचौकशीने एखाद्यास तुरुंगात डांबून वर 'सनदशीर चळवळ आपणांस मान्य आहे' असा डौल तरी मारीत नसे. सनदशीर हक्कासाठी चळवळ आणि बंड हीं या राज्यात इतउत्तर एकाच शिक्क्याच्या मापाने मापलीं जाणार. राज्यकर्त्यांनी जर रशियन पद्धत उचलली तर हिंदुस्थानातील प्रजेलाही रशियातील प्रजेचेंच अनुकरण करणें भाग पडेल." "हा सूर्य आणि हा जयद्रथ असें दाखवून पुरावा पुढे मांडण्यास सरकारने सिद्ध व्हावें; नाहीतर आपला आरोप परत घ्यावा. लजपतराय यांची उघड चौकशी होऊन व आरोप सिद्ध होऊन बंडखोरीबद्दल लजपतराय यांस सरकारने फाशी दिलें तर त्याबद्दल कोणासच काही म्हणता यावयाचें नाही. पण लालाजी सनदशीर हक्काकरिता भांडतात व चळवळ करतात एवढ्यामुळेच जर ते सरकारास अप्रिय ठरत असतील तर मात्र ही चळवळ कधी बंद पडावयाची नाही असें आम्ही बजावून सांगतो."

वाढत्या निषेधसभा पाहून चिडलेल्या सरकारने सभाबंदीची आज्ञा घोषित केली. त्यावर टिळकांनी प्रकटपणे लोकांना उद्देशून असें लिहिलें की, "आज वाणीने तर उद्या कृतीने तुम्हांस हा हुकूम तोडावा लागेल."

सरकारधार्जिण्या हिंदी संस्थानांनी तर मोराचें लांडोराने करावें तसें दडपशाही संबंधात सवाई अनुकरण चालविलें. हें सवाई अनुकरण किती मूर्खपणाचें होतें याची कल्पना येण्यासाठी एकच उदाहरण येथे देतो. धार संस्थानातील शिवाजी उत्सवास स्वदेशी माल वापरण्याचा उपदेश करण्याच्या व वंदेमातरम् म्हणण्याच्या अपराधासाठी शारंगपाणी नांवाच्या गृहस्थांना तत्काळ संस्थान सोडून जाण्याची शिक्षा करण्यात आली व रायकर नांवाच्या विद्यार्थ्याला शाळेबाहेर काढण्यात आलें. ज्या मंदिराने आपलें स्थान शिवाजी उत्सवाला दिलें त्याचें इनाम जप्त करण्यात आलें. जे नोकर उत्सवाला गेले त्यांच्या नोकऱ्या व जे पेन्शनदार सभेला गेले त्यांचीं पेन्शनें खालसा करण्यात आलीं. यावर केसरीने लिहिलें, "शिवाजीमहाराजांनी स्वातंत्र्याचा झेंडा उभारण्यापूर्वी कित्येक शतकें म्हणजे भोजराजाच्या वेळी धारानगर हें हिंदुस्थानातील स्वराज्याचें मुख्य पीठ होतें. अशा पवित्र ठिकाणी मराठी संस्थानिकांच्या अमलात शिवाजी महाराजांचा उत्सव करणाऱ्यांचा छळ व्हावा ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे. स्वतःच्या कुळाशीं अगर स्वधर्माशी बेइमान होऊन पोलिटिकल एजंटास खूष करण्याकरिता या गोष्टी होऊ लागतात

तेव्हा खेद व आश्चर्य वाटल्यावाचून राहत नाही. उद्या पोलिटिकल एजंट रागवले तर हे संस्थानिक बापाचें श्राद्ध करण्याचें किंवा त्याचें नांव आपल्या नांवापुढे लावण्याचें सोडून देतील काय ? "

या दडपशाहीला आणखी रिस्ले सर्क्युलरची १९०७-च्या जुल महिन्यात भर पडली. टिळकांच्या चतु:सूत्रीतील प्रत्येक सूत्र सरकारला कसें बोचत होतें याचें रिस्ले सर्क्युलर हें उदाहरणच होय. इंग्रजी शिक्षितांची पिढी स्वातंत्र्यप्रिय होत चाललेली पाहून तें शिक्षण प्रचलित करणाऱ्या इंग्रज सत्ताधाऱ्यांचा पहिला उत्साह मावळून त्याऐवजी लॉर्ड कर्झन अशा मताचे झाले होते की, पाश्चिमात्य शिक्षणक्रम अधिक मर्यादित करावा. कोणत्याही तेजस्वी अशा नवीन चळवळीचा खरा आधारस्तंभ विद्यार्थिवर्गच असतो. टिळक जीं मतें प्रतिपादन करीत त्यांचा विद्यार्थिवर्गावर झालेला परिणाम सशस्त्रक्रांतीच्या मार्गाकडे विद्यार्थ्यांना वळविण्यात झालेला सरकारला उघड दिसून येत होता. महाराष्ट्रात सावरकरांच्या नेतृत्वाखाली चाललेल्या मित्रमेळ्यासारख्या संस्थांच्या वतीने चाललेल्या क्रांतिकार्याचा विकास सरकार लक्षपूर्वक पाहत होतें. वऱ्हाड व मध्यप्रांतात खापर्डे व मुंजे यांच्या प्रभावी प्रचाराने त्यांच्या सभोवार जें लोकमत गोळा झालें त्यातील विद्यार्थिवर्गातून क्रांतिकारक चळवळीचा उदय झाला. डॉ. पांडुरंग सदाशिव खानखोजे, डॉ. केशवरावजी हेडगेवार, भाऊजी कावरे, धुंडिराजपंत ठेंगडी हे क्रांतिनेते याच काळात उदय पावत होते. वयाच्या त्या विद्यार्थिदशेपासूनच या तरुणांच्या मागे गुप्तचरांचा ससेमिरा लागला होता. विद्यार्थिवर्गाच्या या वाढत्या क्रांतिप्रवणतेला दडपून टाकण्यासाठीच रिस्लेसाहेबांनी एक परिपत्रक काढलें. तें रिस्ले सर्क्युलर या नांवाने कुविख्यात आहे. या परिपत्रकानुसार विद्यार्थ्यांना वंदे मातरम्‌चा उद्घोष करण्यास व सभा-मिरवणुकांतून भाग घेण्यास बंदी करण्यात आली होती. इतकेंच नव्हे तर या पत्रकात विद्यार्थ्यांवर करडी दृष्टि ठेवण्याविषयी शिक्षकांना विशेष सूचना असून सभांतून भाग घेणाऱ्या विद्यार्थ्यांचीं नांवें सरकारला कळविण्याची आज्ञा होती. परिपत्रकातील निर्बंध केवळ शिस्त निर्माण करण्यासाठी आहेत असा जरी सरकारने प्रारंभी कांगावा केला तरी रिस्ले महाशयांनी आपल्या एका वक्तव्याने त्यावर बोळा फिरविला. त्यांनी त्यात लिहिलें की, "युनिव्हर्सिटीच्या नवीन कायद्याप्रमाणे जे नियम करावयाचे ते विद्यार्थ्यांनी राजकीय चळवळीत पडू नये अशा हेतूने त्यांजवर शाळेत आणि बाहेर नजर ठेवण्याकरिता करावयाचे आहेत; आणि ते केले म्हणजे खाजगी शाळांसंबंधाने

दुसऱ्या तजविजी करण्याची आवश्यकता नाही. केवळ ग्रँटच्या चतकोर तुकड्यासाठी खाजगी शाळांच्या संचालकांनीही या परिपत्रकाची कडक अंमलबजावणी करण्याचें ठरविलें. तिचा परिणाम मात्र विद्यार्थिवर्ग अधिक जहाल व क्रांतिप्रवण होण्यात झाला व राष्ट्रीय पक्षाचें म्हणजे टिळकपक्षाचें लोकमताच्या पाठिंब्याचें बळ अधिक वाढलें. सरकारच्या विद्यार्थिवर्गासंबंधीच्या या धोरणाविषयी टिळक लिहितात, "सरकारने जी ही दांडगाई व जुलूम मांडला आहे हा आम्ही मुकाट्याने कां सहन करावा? मुलांवर खरी सत्ता म्हटली म्हणजे आईबापांची किंवा पालकांची होय. आपलीं मुलें फी भरून चार पांच तास शिकण्याकरिता सरकारी शाळेत पाठविलीं म्हणजे त्यांनी काही गुन्हा केला काय? आम्ही आपलीं मुलें शिकण्याकरिता सरकारी शाळांत पाठविलीं म्हणजे तीं काही सरकारास विकलीं नाहीत, किंवा शाळेबाहेर मुलांच्या वर्तनावर देखरेख करण्याचा हक्क सरकाराकडे सोपविला नाही हें सरकारने लक्षात ठेवलें पाहिजे. आईबापांनी आपली मुलगी देवास वाहून मुरळी केली तरी तिजवरील आईबापांचे पालकत्वाचे हक्क कमी होत नाहीत, तर मुलें सरकारी शाळांत शिकतात म्हणून शाळांबाहेरही विद्यार्थ्यांच्या वर्तनावर देखरेख ठेवण्याचा आईबापांस हक्क नाही म्हणून सरकार ठरवतें हें आश्चर्य नाही काय? उत्सवास, व्याख्यानास किंवा कीर्तनास आम्ही आपलीं मुलें पाठवावयाचीं नाहीत म्हणजे काय? आणि तीं पाठवू नयेत म्हणणारें सरकार कोण? आणि त्यात चोंबडे पोलीस हवे कशाला? सरकारला अलीकडील राजकीय चळवळ अत्यंत अप्रिय झाली आहे. परंतु ही सर्व चळवळ बेकायदेशीर ठरवून बंद करण्याचें धैर्य त्यांना नाही म्हणून जी गोष्ट प्रत्यक्ष करता येत नाही ती परोक्ष किंवा चोरट्या रीतीने करण्याचा सरकारने डाव मांडला आहे.

रिस्ले सर्क्युलरचा पहिला परिणाम फर्ग्युसन् कॉलेजचे तत्कालीन प्राचार्य रँग्लर परांजपे यांच्यावर दिसून आला. स्वदेशीच्या सार्वजनिक प्रचारात भाग घेऊन परदेशी कापडाची होळी केल्याबद्दल त्या वेळी त्या कॉलेजचे विद्यार्थी असणाऱ्या स्वातंत्र्यवीर सावरकरांना परांजपे यांनी दहा रुपये दंड ठोठावून फर्ग्युसन कॉलेजच्या वसतिगृहातून काढून दिलें. त्यावर ' हे आमचे गुरुच नव्हेत ' असे टिळकांनी केसरीतून लिहिलें. या प्रकरणाचा आढावा घेऊन लो. टिळक लिहितात, " फर्ग्युसन कॉलेजची ही सरकारी कॉलेजांवरील ताण पाहून कपाळास हात लावल्याखेरीज रहावत नाही. ! प्रो. गोखले हे एकीकडे मँचेस्टरमध्ये जाऊन बहिष्कारांचें समर्थन करितात आणि इकडे त्यांच्याच कॉलेजातील एका

विद्यार्थ्यास स्वदेशी चळवळीत पडल्याबद्दल दंड होत आहे ! शिस्तीच्या नांवाखाली हा जुलूम चालला आहे. गुरुशिष्यांमधील धर्म फार नाजूक आहे हें आम्ही जाणून आहो, व त्यात कोणत्याही रीतीने बिघाड करण्याची आमची इच्छा नाही. पण विद्यार्थ्यांस आज्ञा मोडण्यास जर कोणी शिकवीत असेल तर तो अशा शिक्षकांचा आचरटपणाच होय. "

इंग्रज सरकार आपल्या या दुष्कृत्यांनी जनतेच्या मनात टिळक चेतवीत असलेल्या स्वातंत्र्याकांक्षेच्या अग्नीला जणू इंधन पुरवीत होते. त्याचा लाभ खापर्डे व डॉ. मुंजे हे आपापल्या क्षेत्रात पदरात पाडून घेतल्याविना कसे राहतील ? खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात, " दि. ४ ऑगस्टला बेरार एज्युकेशन सोसायटीची श्रीमंत तात्यासाहेब मुधोळकर यांच्या बंगल्यावर सभा झाली. या सभेत ' रिस्ले सर्क्युलर ' संबंधी वाटाघाट झाली. पुष्कळ वाटाघाट झाल्यानंतर आमचा असा निर्णय ठरला की, या सर्क्युलरची अंमलबजावणी करणें शक्य नाही. तत्कालीन शासनाविरुद्ध चळवळ करायला व बोलायला हें एक नवें शस्त्र लाभलें. "

सरकारच्या दुष्कृत्यांचें स्वरूपच इतकें असमर्थनीय होतें की,मवाळांनाही त्यांचें समर्थन करणें अशक्य होतें. मुंजे व खापर्डे यांनी लोकांच्या असंतोषाला आपल्या दौऱ्यात वाचा फोडली व सक्रिय प्रतिकाराचा मार्ग स्वदेशी व बहिष्काराच्या रूपाने दाखवून दिला. स्वाभाविकपणेच ते लोकप्रियतेच्या शिखरावर आरूढ झाले, व मवाळांच्या पायाखालची वाळू मध्यप्रांत वऱ्हाडात घसरू लागली. नागपूरला होणाऱ्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष टिळक व्हावेत ही आता जनतेचीच मागणी होती. टिळक पक्षाच्या वाढत्या लोकप्रियतेमुळे सरकार चिडलें व त्याने वऱ्हाड मध्यप्रांतातील देशभक्तांवर आपलें हत्यार उपसलें. प्रथम अमरावतीचे जयराम पाटील व यवतमाळचे शामराव दादा देशपांडे यांना सार्वजनिक ठिकाणीं ' वंदे मातरम्'चा घोष केल्याबद्दल अटक करण्यात येऊन त्यांच्यावर खटला भरण्यात आला. श्री. दादासाहेब खापर्डे यांनी स्वतः वकीलपत्र घेऊन खटला लढविला. या दोघांचीही थोड्याशा दंडावर सुटका झाली. यामागोमाग यवतमाळच्या ' हरिकिशोर ' पत्राचे संपादक पृथ्वीगीर हरिगीर गोसावी यांना दि. १३ ऑगस्टला अटक करून त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरण्यात आला. लाला लजपतराय यांच्या अटकेसंबंधी 'हरिकिशोर'मध्ये प्रसिद्ध झालेल्या तीन संपादकीय लेखांवर हा खटला आधारलेला होता. या खटल्याचें वकीलपत्रही दादासाहेब खापर्डे यांनीच घेतलें. या प्रकरणी सरकारी धोरण पूर्वीच ठरलेलें असल्या-

मुळे खापर्डे यांनी अपार परिश्रम घेऊनही त्यांना यश आलें नाही. दि. ३० ऑगस्टला पृथ्वीगीर गोसावी यांना दोन वर्षे सश्रम कारावास व एक सहस्र रुपये दंडाची शिक्षा ठोठावण्यात आली. सरकारी दमननीतीची चक्रें जितकीं उग्रतेने फिरू लागतात तितकी त्यांची प्रतिक्रिया म्हणून पिळवणूक होत असलेल्या लोकांचाही क्षोभ वाढत जाऊन त्यातूनच क्रांतिपक्षाचा जन्म होत असतो. दमनाची प्रतिक्रिया म्हणजे उग्र क्रांति होय, हें कोणत्याही सरकारला आरंभी कधीच पटत नाही व ज्या वेळी तें पटतें त्या वेळी त्याचा विशेष उपयोग नसतो. विदर्भ मध्यप्रांतात अशीच प्रतिक्रिया या वेळी सुरू झाली होती. नागपूरला भाऊसाहेब काळीकर, डॉ. केशवरावजी हेडगेवार, डॉ. पांडुरंगपंत खानखोजे, श्री. बळवंतराव मंडलेकर प्रभृति विद्यार्थ्यांचा व श्री. मनोहरपंत बोबडे, धुंडिराजपंत ठेंगडी, भाऊजी कावरे प्रभृति तरुणांचा क्रांतिवादाकडे झुकलेला कल स्वाभाविकपणेच गुप्तपणे क्रांतिसंघटनेचीं कार्यें करण्यासाठी वेगवेगळ्या स्वरूपाच्या योजना व्यवहारात आणीत होता. या तरुणांनी व विद्यार्थ्यांनी स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या मित्रमेळ्याच्या धर्तीवर साप्ताहिक बैठक व चर्चामंडळही चालविलें होतें. या लोकांच्या गुप्त बैठकी पुष्कळदा डॉ. मुंजे यांच्या घरीच भरत. पुढे राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या महान् संघटनेचे निर्माते म्हणून वर्तमान भारताच्या इतिहासात चिरंजीव झालेले कै. डॉ. केशवरावजी हेडगेवार हे डॉ. मुंजे यांच्या प्रभावळीतील तरुण वर्गात तेजस्वितेच्या दृष्टीने अग्रगण्य असून त्यांच्यावर डॉ. मुंजे यांचें पुत्रनिर्विशेष प्रेम होतें. घरच्या गरीब व प्रतिकूल परिस्थितीमुळे डॉ. हेडगेवार हे डॉ. मुंजे यांच्याकडेच रहात असत. या वर्षी डॉ. हेडगेवारांनी प्रत्यक्ष सभांतून भाषणें द्यावयास प्रारंभ केला होता. हेडगेवारांचे नात्याने दूरचे पण संबंधाने अत्यंत जवळचे असे चुलते मोरेश्वर श्रीधर उपाख्य आबाजी हेडगेवार हे रामपायलीला रेव्हेन्यू इन्स्पेक्टर होते. दसऱ्याच्या सणानिमित्ताने विद्यार्थिदशेत असलेले केशवराव तेथे गेले असता त्यांनी रिस्ले सर्क्युलरची माहिती असताही खड्या आवाजात वन्देमातरम् गीत गाऊन व सर्वांकडून वन्दे मातरम्‌चा घोष करवून खरें रावण मारणें म्हणजे काय या विषयावर अत्यंत जहाल भाषण केलें. त्याचा परिणाम म्हणून केशवरावांचे मित्र डबीर व भगोरे यांना रामपायलीच्या शाळेतून काढून देण्यात आलें व या तिन्ही विद्यार्थ्यांवर राजद्रोहाचा खटला भरण्याच्या दृष्टीने सरकारी हालचाली सुरू झाल्या. त्या वेळी भंडाऱ्याचे श्री. पुरुषोत्तम सीताराम देव वकील यांनी तेथील जिल्हाधिकारी रुस्तुमजी यांची मनधरणी केल्यामुळे हा प्रसंग टळला. पण त्याचे काही

परिणाम सर्वांनाच भोगावे लागले. केशवरावांचे चुलते आबाजी यांची रामपायलीहून उचलबांगडी करण्याचें सरकारने ठरविल्यामुळे त्यांनी आपल्या जागेचें त्यागपत्र दिलें व केशवरावांच्या मागे या प्रकरणापासून गुप्तचरांचा ससेमिरा लागला. अशा गोष्टीमुळे या विद्यार्थ्यांच्या मनात रिस्ले सर्क्युलरची विटंबना करण्याचे विचार पक्के झाले. डॉ. हेडगेवार हे त्या वेळी नील सिटी प्रशाळेत (आजचें धनवटे नगर विद्यालय) शिकत होते. त्यांचे शिक्षक वझलवार, सोमण, बाकरे प्रभृति होते. हे शिक्षक मनातून राष्ट्रीय वृत्तीचे व स्वदेशी आंदोलनाचे पुरस्कर्ते होते. पण सरकारी नियमानुसार रिस्ले सर्क्युलर संबंधात त्यांना अंमलबजावणी करणें क्रमप्राप्त होतें. एकदा या शाळेत सरकारी पर्यवेक्षक यावयाचा होता. या पर्यवेक्षकाच्या भेटीच्या वेळीच रिस्ले सर्क्युलर विरुद्धची विद्यार्थ्यांची प्रतिक्रिया व्यक्त करावयाचें केशवरावांच्या सूचनेवरून विद्यार्थि-संघटनेने ठरविलें. ठरलेल्या दिवशी शाळेचे मुख्याध्यापक श्री. जनार्दन विनायक ओक हे मुसलमान पर्यवेक्षकासमवेत आत येताच प्रथम त्यांनी मॅट्रिकच्या वर्गातच पहिला पदन्यास केला. त्यासरशी केशवरावांच्या नेतृत्वाखाली सारा वर्ग ' वंदे मातरम् ' म्हणून गर्जून उठला. संतप्त पर्यवेक्षक मुख्याध्यापकांना तंबी देऊन निघून गेला. तो गेल्यावर मुख्याध्यापकांनी व अन्य शिक्षकांनी या प्रकाराच्या मूळ उत्पादकांचा शोध घेण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण कोणी आपल्या संप्रेरकाचें नांव सांगितलें नाही. शेवटी ज्या दोन वर्गांतील विद्यार्थ्यांनी वंदे मातरम्चा घोष केला होता त्यांना शाळेबाहेर काढून देण्यात आलें. येथपर्यंत पाळी आल्यावर स्वाभाविकपणेच केशवराव हेडगेवारांनी डॉ. मुंजे यांचें मार्गदर्शन घेतलें. डॉक्टरांनी त्यांना, शाळा विनाअट विद्यार्थ्यांना परत शाळेत घेईपर्यंत विद्यार्थ्यांनी शाळेवरच बहिष्कार घालावा असें सुचविलें. विद्यार्थ्यांनी त्या बहिष्काराचें लोण शाळेत सर्वत्र पसरविलें. दीड महिना हा बहिष्कारयोग चालू होता. डॉ. मुंजे यांचे त्या काळातील तरुण सहकारी अच्युतराव कोल्हटकर व लक्ष्मणराव उपाख्य डॉ. बाळासाहेब परांजपे यांनी या काळात विद्यार्थिवर्गाला धीर देऊन व अच्युतरावांनी तर त्यांच्या सभांतून भाषणें करून त्यांचें धैर्य अभंग राखलें. हा विद्यार्थ्यांचा संप फार गाजला. जे विद्यार्थी शाळेत जाण्याचा प्रयत्न करीत त्यांना बांगड्या दाखवून इतर विद्यार्थी त्यांचा इतका उपहास करीत की, त्यांना परावृत्त व्हावें लागे. त्या वेळी सर बिपिन कृष्ण बोस हे शिक्षण संस्थेचे कार्यवाह या नात्याने शाळेत विद्यार्थ्यांना समजाविण्यासाठी आले असता विद्यार्थ्यांनी इतका गोंगाट केला की, त्यामुळे त्रस्त झालेल्या बोस बाबूंनी

आपलें डोकें चक्क नळाखाली धरलें. शेवटी अशी तडजोड ठरली की, केवळ मान हलवून जो विद्यार्थी चूक झाल्यासंबंधी मूक संमति देईल त्याला शाळेत प्रवेश द्यावा. ज्या बाणेदार विद्यार्थ्यांनी हेंही करण्याचें नाकारलें त्यांत केशवराव हेडगेवार होते.

या वर्षी नागपूरला विद्यार्थ्यांनी राजकीय निदर्शनात व्यापक प्रमाणावर महत्त्वपूर्ण भाग घेतला. टिळक, लजपतराय, अरविंद घोष व बिपिनचंद्र पाल यांच्या छायाचित्रांच्या प्रचंड मिरवणुकी काढून विद्यार्थ्यांनी ' वंदे मातरम् ' च्या जयघोषाने वातावरण दुमदुमवून टाकलें. नील सिटी हायस्कूलमध्ये हेडगेवार यांच्या नेतृत्वाखाली घडलेल्या घटनेचा निर्देश वर केलाच आहे. नागपूरच्या मॉरिस कॉलेज या सरकारी कॉलेजमध्ये (हल्लीचें नागपूर महाविद्यालय) तेथील युरोपियन प्राध्यापक वर्गात येताच विद्यार्थ्यांनी ' वंदे मातरम् ' च्या गर्जितांनी वातावरण दणाणून टाकलें. या प्रकाराबद्दल तीस विद्यार्थ्यांना अटक करण्यात आली. नागपूरच्या तत्कालीन राष्ट्रीय मंडळाचे एक महत्त्वाचे सदस्य डॉ. सर भवानीशंकर नियोगी हे आपल्या आठवणीत लिहितात,

" वंगभंगाच्या वातावरणाचा परिणाम बंगालमध्ये अराजकाची चळवळ उत्पन्न होण्यात झाला, व नागपूरमधील शाला-प्रशालांतील व महाविद्यालयीन तरुण विद्यार्थ्यांच्या जीवनातूनही त्याची प्रतिक्रिया उमटली. या दिवसांत नागपूरच्या जुन्या मॉरिस कॉलेजचे प्रिन्सिपॉल मि. जोन्स हे घोड्यावर बसून व भरलेलें पिस्तूल हातात घेऊन कॉलेजमध्ये कसे जात असत याचें चित्र आजही माझ्या स्मृतीत आहे. "

राष्ट्रीय मंडळाच्या कार्याला अनुकूल व मवाळांच्या राजकीय धोरणाला प्रतिकूल असें वातावरण या वेळी वरच्या पातळीवरील राजकीय क्षेत्रातही उत्पन्न झालें. इंग्लंडच्या मंत्रिमंडळात या वेळी महत्त्वाचें परिवर्तन झालें. लॉर्ड कर्झन यांच्या नंतर बॉलफोर यांच्या नेतृत्वाखाली असलेल्या कॉन्झर्वेटिव्ह् पक्षाच्या सरकारने लॉर्ड मिंटो यांची हिंदुस्थानचे व्हॉइसरॉय म्हणून नियुक्ति केली. पण थोड्याच दिवसांत कॉन्झर्वेटिव्ह सरकार पदच्युत झालें व सन १९०६-च्या फेब्रुवारी महिन्यात लिबरल पक्षाचें सरकार आलें. कँपबेल बॅनरमन हे इंग्लंडचे पंतप्रधान झाले व जॉन मोर्ले (पुढे लॉर्ड मोर्ले) हे भारतमंत्री झाले. मोर्ले हे एक तत्त्वज्ञ, पंडित, बुद्धिवादी लेखक, मिल्ल व स्पेन्सर यांच्यासारख्या तत्त्वज्ञांचे शिष्य व बर्क आणि ग्लॅडस्टन यांचे चरित्रकार. तेव्हा ते भारतमंत्री पदावर आरूढ होताच काही विशेष प्रकारच्या सुधारणा करतील असें जों

नेमस्ताग्रणी समजत आहेत—व ते तसा प्रचारही करीत—तोंच मोर्ले यांनी भारतमंत्री या नात्याने केलेल्या पहिल्याच भाषणात वंगभंग फिरविता येत नाही असें सांगून नेमस्तांना पहिला फटकारा दिला. टिळक केसरीत लिहितात, " बाब्या काय बोलणार याबद्दल लोकांस उत्कंठा होती. ती एकदा लवकर बोलून मोर्लेसाहेबांनी पुरी केली. बरें झालें ! मोर्लेसाहेबांस मूर्ख म्हणण्यापेक्षा त्यांच्यावर विसंबून राहणाऱ्या असल्या मंडळींसच पहिल्याने मूर्खांच्या कोटीत ढकललें पाहिजे." तत्त्वज्ञ मोर्ले व भारतमंत्री मोर्ले यांच्यातील भेद न ओळखता नामदार गोखले यांना मवाळ पक्षाने वंगभंग रद्द करावयाची राजकीय शिष्टाई करण्यासाठी इंग्लंडमध्ये पाठविलें. गोखले यांच्याशी झालेल्या पहिल्याच भेटीत मोर्ले यांनी स्पष्ट सांगितलें की " बंगालची विभागणी ही आता होऊन गेलेली गोष्ट आहे. तिच्यात बदल घडवून आणणें आता शक्य नाही." गोखले यांनी त्यांच्याशी कॅनडाच्या धर्तीवरील वसाहतीच्या स्वराज्यासंबंधात बोलणीं प्रारंभ करताच मोर्ले हसून म्हणाले, " कॅनडाच्या राज्यघटनेची चौकट हिंदुस्थानच्या ऐतिहासिक, सांस्कृतिक आणि मानसिक प्रकृतीला मानवणार नाही." सन १९०७-च्या उत्तरार्धात बजेटाच्या वेळी केलेल्या भाषणात तर मोर्ले यांनी अशीं मुक्ताफळें उधळलीं की, " हिंदुस्थानातील गोऱ्या अधिकाऱ्यांची सत्ता यत्किंचित् कमी झाली तर तेथे बंडाळी माजेल म्हणून ती अधिकाधिक वाढविली पाहिजे. हिंदी सुशिक्षित वर्ग हा अधिकार हाती देण्यास सर्वस्वी अयोग्य असून साम्राज्याचा शत्रु आहे. यास्तव भारतातील प्रजेच्या भाषण-स्वातंत्र्यास आणि सभास्वातंत्र्यास आळा घालणेंच आवश्यक आहे."

सुधारणेचा पहिला हप्ता म्हणून भारतमंत्री मोर्ले यांनी मोठें शतकृत्य जें काय केलें तें इतकेंच की, दोन हिंदी गृहस्थांची नेमणूक त्यांनी इंडियन कौन्सिलमध्ये केली. त्याने समाधान पावण्यासारखा हिंदी सुशिक्षित वर्ग अर्थातच मूर्ख नव्हता. टिळक लिहितात, " शेवटी भरंवशाच्या म्हशीस टोणगाच झाला. याच्या आचळातून दूध कसचें निघणार ?"

नेमस्ताग्रणींचे मोर्ले यांना वळविण्याचे सर्व प्रयत्न वांझोटे ठरले. भारतमंत्रिपदावर येताच मोर्ले यांच्यातील तत्त्वज्ञ मरून त्या जागी कट्टर साम्राज्यवादी निर्माण झालेला होता. उदारमतवादी तत्त्वज्ञाचें हें पर्यवसान जितकें दु:खपूर्ण तितकेंच नेमस्तांना धक्का देणारेंही होतें. लॉर्ड मिंटो व भारतमंत्री यांची तुलना करताना त्या वेळच्या एका राजकीय निरीक्षकाने पुढीलप्रमाणे यथार्थ उद्गार काढले आहेत : " टोरी पक्षाचे

व विचाराचे व्हॉइसरॉय हे प्रगतिवादी स्टेट सेक्रेटरीच्यापेक्षा अनेक प्रसंगी अधिक प्रागतिक असल्याचें दिसून येतें."

असो. मोर्ले यांच्या म्हणजेच ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या या वर्तनानंतर नेमस्तांनी सावध होणें अवश्य होतें. पण अत्याचारी सत्तेच्या या वर्तनापासून बोध घेऊन स्वतःच्या धोरणात परिवर्तन करण्याऐवजी त्यांनी सरकारचें शय्यामैत्रक करून राष्ट्रीय सभेला बटीक म्हणून राबवावयाचें व राष्ट्रीय पक्षाला राष्ट्रीय सभेतून सीमापार करण्याचें धोरण आखलें. मोठ्या युक्तीने त्यांनी असें सुचविलें की उगाच भांडणें माजविण्यापेक्षा नव्या राष्ट्रीय पक्षाने आपली स्वतंत्र दुसरी काँग्रेस भरवावी. यातील कावा न ओळखण्याइतकें टिळक भोळे व दुधखुळे नव्हते. ते लिहितात, "पक्षापक्षांचीं भांडणें होतात म्हणून वेगळी काँग्रेस भरवा हें म्हणणें मूर्खपणाचें आहे. ज्यांना राष्ट्रीय सभेसारख्या सार्वजनिक संस्थेत आपलीच वतनदारी कायम ठेवावयाची आहे त्यांचाच हा खरा कावा आहे. लोकमत आपल्या बाजूस वळवून काँग्रेसमध्ये बहुमत करून घेणें हाच सनदशीर व कायदेशीर मार्ग होय व हा मार्ग दोन्ही पक्षांस खुला आहे."

कलकत्ता काँग्रेसनंतर नागपूरला वातावरण आपणांस अनुकूल आहे ही मवाळांची कल्पना कशी व कां फोल होत चालली होती हें आतापर्यंत दर्शविलेंच आहे. प्रत्यक्ष नागपुरातील नेमस्ताग्रणींचे व त्यामागोमाग सर फेरोजशहा मेथा, गोखले प्रभृतींचेही डोळे उघडण्याचा प्रसंग लवकरच उद्‌भवला. राष्ट्रीय सभेचा अध्यक्ष प्रांतवार, प्रांतिक कमिटयांनी मतें देऊन निवडावा व प्रातिनिधिक स्वरूपाच्या तत्त्वाच्या दृष्टीने हेंच योग्य आहे असें टिळक प्रतिपादन करीत होते. पण कलकत्त्याला आलेलें अपयश पुढच्या काँग्रेसमध्ये धुऊन काढावयाचा निश्चय केलेल्या नेमस्ताग्रणींनी असा विचित्र प्रस्ताव कलकत्त्यास पारित करून घेतला की, जेथे काँग्रेस भरावयाची असेल तेथील स्वागतमंडळाने अध्यक्ष निवडावा, इतकेंच नव्हे तर तो सभासदांच्या तीन चतुर्थांश इतक्या बहुमताने निवडण्यात आला पाहिजे. या नियमानुसार निश्चित असलेल्या नेमस्ताग्रणींना स्वागत सभासद नोंदणीच्या पहिल्याच फेरीत तरुण नेते डॉ. मुंजे यांनी पहिलाच फटका असा जोराचा दिला की, नागपूरचे नेमस्ताग्रणी हादरलेच. आगामी राष्ट्रीय सभेच्या स्वागतसभासदत्वाची वर्गणी २५रु. ठेवण्यात आली होती. सप्टेंबर महिन्यात ही यादी पूर्ण झाली. नेमस्तांनी आठशे स्वागत सभासद नोंदविले व त्यांची वर्गणी वीस सहस्र रुपये जमली

याच्या उलट राष्ट्रीय पक्षाने अठराशे सभासद नोंदविले व त्यांची वर्गणी पंचेचाळीस सहस्र रुपये जमली. निर्विवादपणे राष्ट्रीय पक्षाचा अध्यक्ष निवडून यावयास ६०,००० रुपये जमविणें अवश्य होतें. राष्ट्रीय पक्षाचे दोन तृतीयांश बहुमत उघडच होतें; पण तें तीन चतुर्थांश होणें आवश्यक होतें. पैसे पूर्ण कसे होतील ही राष्ट्रीय पक्षास विवंचना होती, तर उघड उघड राष्ट्रीय पक्षाकडे बहुमत असल्याचें सिद्धच झाल्यामुळे राष्ट्रीय पक्षाचाच म्हणजे टिळकच अध्यक्ष होणार म्हणून नेमस्ताग्रणींच्या पोटात गोळा उभा राहिला होता. शेवटी मवाळांनी या संकटातून सुटण्या-साठी वाम मार्गाचा अवलंब करावयाचें ठरविलें.

स्वागत सभेत राष्ट्रीय पक्षाचें बहुमत पाहून नागपूरच्या नेमस्ता-ग्रणींनी कार्यकारी मंडळाची पुनर्घटना करून तें सर्वस्वी आपल्या बाजूचें करण्याचा घाट घातला. प्रथम स्वागतसमितीत उभय पक्षांचे लोक घेण्यात आले होते. आता त्यातून बहुमताच्या राष्ट्रीय पक्षास गुपचूप काढून टाकण्यासाठी, कोणाला रीतसर न कळविताच दि. २२ सप्टेंबरला नागपूरच्या टाऊन हॉलमध्ये नेमस्ताग्रणींनी स्वागत मंडळाची म्हणून सभा बोलाविली. नागपूरचे नेमस्ताग्रणी नामदार सर गंगाधरराव उपाख्य दादासाहेब चिटनवीस हे या सभेचे आमंत्रक व अध्यक्ष होते. त्यांना कोणत्याही प्रकारचा अधिकार नसता त्यांनी कार्यकारी मंडळाला न विचा-रताच ही सभा बोलाविली होती. डॉ. मुंजे व डॉ. परांजपे प्रभृति त्यांचे सहकारी यांनी नेमस्ताग्रणींचा हा कुटिल डाव ओळखून ' शठे शाठ्यम् ' या नात्याने त्यांचा डाव हाणून पाडावयाचें ठरविलें. सभेच्या प्रारंभीच ती वैध आहे की अवैध या विषयावर रण प्रारंभ झालें. बाहेर राष्ट्रीय पक्षाचे स्वागत सभासद व अन्यलोक यांची तोबा गर्दी उसळून राहिली होती. स्वागत सभासदांनाच, ते राष्ट्रीय पक्षाचे म्हणून आत शिरण्याची बंदी केल्याकारणाने तीन चार तास बाहेर उन्हात उभें रहावें लागलें. त्यामुळे ते चिडून गेले. अखेर या मवाळांच्या अरेरावीचा परिणाम त्यांनाच भोगावा लागला. बाहेरचे लोक आत घुसले व तुंबळ रण होऊन कोणी तरी रावबहादूर वामनराव कोल्हटकरांची पगडीच उडवून दिली. सर गंगाधरराव चिटनवीस व सर माणेकजी दादाभाई यांना टाऊन हॉलच्या बाहेर जाणें कठीण झालें. शेवटी सभा अवैध आहे हें नामदार गंगाधरराव चिटनवीस यांना उघड घोषित करावें लागलें. सभा मोडली व त्यानंतर नामदार चिटनवीस यांनी स्वागतकारिणीच्या सदस्यत्वाचा राजि-नामाही पाठवून दिला. बाबासाहेब खापर्डे लिहितात, " ही सभा नागपूरच्या टाऊन हॉलमध्ये भरली होती. सभेत खूप गोंधळ माजला. तो इतका की,

गोंधळयांच्याही तो आटोक्याबाहेर गेला. डॉ. बाळासाहेब परांजपे, डॉ. मुंजे व डॉ. ठेंगडी ह्यांनी सभा 'काबीज' केली व त्यामुळे कामकाज होऊ शकलें नाही. व्यवस्था करण्याच्या यत्नापायी अव्यवस्था माजली होती. डॉ. बाळासाहेब परांजपे अध्यक्षांच्या खुर्चीवर जबरदस्तीने जाऊन बसले व मी अध्यक्ष झालो अशा घोषणा त्यांनी सुरू केल्या. लोकांनी संमतिदर्शक टाळ्या वाजविल्या ! आणि सभेचें काम पुढे चालणें दुरापास्त झालें. मारामारीपर्यंत प्रसंग आला; काणि थोडाबहुत मारा झालाही ! त्यापायी सभेचें विसर्जन झालें. मवाळांचे अध्वर्यु आपल्या संभावितीच्या कक्षेतून बाहेर न येता जागच्या जागीच बसून धक्काबुक्की टाळण्याचा प्रयत्न करीत होते. काय चाललें आहे हें प्रथम त्यांच्या लक्षातच आलें नाही. मंडळी जेव्हा सभा सोडून जाऊ लागली, तेव्हा सभेच्या विसर्जनाची त्यांना कल्पना आली. नागपूरला टिळक पक्ष आपणांला सुखाने नांदू देणार नाही आणि काँग्रेसचें अधिवेशन निर्विघ्नपणे आपल्याला पार पाडता येणार नाही, कारण या परिस्थितीत नेमस्त अध्यक्ष एक तर निवडता येणारच नाही आणि निवडलाच तर त्याला आपली मात्रा उगाळता येणार नाही अशी या सभेने त्यांची खात्री करून दिली. एवढेच नाही, तर नागपूरला अधिवेशन झाल्यास टिळक अध्यक्ष होणें अटळ आहे असेंही त्यांना पूर्णपणे कळून चुकलें. तेव्हा काँग्रेस नागपूरच्या खाईतून काढून निवांत सुखरूप ठिकाणी नेण्याचा नेमस्तांनी संकल्प केला."

—दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र, पृ. २९८ व २९९

नागपुरातील या सभेनंतर मुंबईचे नेमस्तपक्षाचे अध्वर्यु सर फरोजशहा मेथा यांना स्थानिक नेमस्ताग्रणींनी नागपूरला काँग्रेस भरविणें धोक्याचें होईल असें कळविलें. या वेळी नेमस्त व राष्ट्रीय हे दोन्ही पक्ष अडचणीत होते. नेमस्तांना बहुमत नव्हतें. व राष्ट्रीय पक्षाला तीन चतुर्थांश बहुमत असण्यासाठी आणखी १५००० रु. होतील इतके स्वागत सभासद करणें आवश्यक होतें. राष्ट्रीय पक्ष हा श्रीमंतांचा पक्ष नव्हता. प्रत्येकी रु. २५ देणारे १८०० लोक डॉ. मुंजे व त्यांच्या सहकाऱ्यांनी मिळविले हेंच वस्तुतः आश्चर्य होतें. कोणाचीच बाजू याप्रमाणे निर्णायक न झाल्यामुळे दोन्ही पक्ष आपापले पैसे स्वागत कारिणीत न भरता आपल्या हातीच राखून होते.

या सभेत तरुण वर्गाची सरकारविरोधाची जी उग्र धारणा दिसून आली त्यामुळे राष्ट्रीय मंडळाला सरकार क्रांतिकारक समजू लागलें व या मंडळाचें बळ विद्यार्थिवर्ग आहे हें ओळखून नागपूरचे त्या वेळचे चीफ कमिशनर सर रेजिनाल्ड क्रॅडॉक हे बेभान झाले. त्यांनी दि. २२

ऑक्टोबर १९०७-ला पोलिसांच्या इन्स्पेक्टर जनरलला पुढील आशयाचें कडक परिपत्रक पाठविलें.

"नागपुरांतील विद्यार्थ्यांच्या गुंडगिरीसंबंधात पोलिसांनी जें वर्तन केलें आहे तें मुळीच समाधानकारक नाही. जर चालू आहे असेंच चालत राहिलें तर सार्वजनिक जीवनातील सन्माननीय अशा सर्व गृहस्थांना भयभीत होऊन नागपूर सोडावें लागेल. यापुढें ही गुंडगिरी नष्ट करण्याचा मी निश्चय केला आहे. मी कमिशनरला असें सांगितलें आहे की सर्व कॉलेजच्या प्राचार्यांची व शाला-प्रशालांच्या मुख्याध्यापकांची एक बैठक बोलवावी व या बैठकीत विद्यार्थ्यांवर शिस्त लादण्यासंबंधी चर्चा करावी. पण आम्ही विद्यार्थ्यांपर्यंत नीटपणे पोहोचण्याआधीच पोलिसांनी गुंडगिरी करणाऱ्या विद्यार्थ्यांना पकडलें पाहिजे. सतत चालत असलेल्या अशा प्रकारामुळे सार्वजनिक वृत्तपत्रांतून नागपूरची अपकीर्ति होत आहे. हे प्रकार थांबलेच पाहिजेत. राजद्रोही चळवळयांच्या हातातील खेळणें बनलेल्या विद्यार्थ्यांचें नागपूर हें विहारस्थान होणें यापुढे थांबलेंच पाहिजे."

या वेळी इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस सी. आर्. क्लीव्हलंड हे होते. क्लीव्हलंड अरेराव प्रवृत्तीचे व पोलादी शिस्तीचे अधिकारी म्हणून प्रसिद्ध असून कडकपणाविषयी ते कुविख्यात होते. त्यांनी डिस्ट्रिक्ट सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिसला दि. २४ ऑक्टोबरला एक परिपत्रक पाठविलें. सरकारी दमननीति कोणत्या थरापर्यंत गेली होती याची कल्पना यावी यास्तव तें परिपत्रक येथे उद्धृत करतो. आपल्या या परिपत्रकात क्लीव्हलँड लिहितात :

"माझ्या असें ध्यानात आलें आहे की नागपुरातील विद्यार्थ्यांनी व अन्य लोकांनी काही आदरणीय व्यक्तींसंबंधी अपमानकारक व गुंडगिरीचें वर्तन पुष्कळ दिवसांपासून चालविलें आहे. हे विद्यार्थी व त्यांचे सल्लागार यांना संमत नसलेल्या पद्धतीचें या व्यक्तींचें कॉंग्रेसविषयक व राजकारणविषयक धोरण आहे एवढेंच त्याचें कारण आहे.

"अशा पद्धतीचीं जीं प्रकरणें असतील त्या संबंधात राजकारण अथवा चळवळ करणें हें सर्वसामान्य कायदा मोडण्याचें कारण असू शकत नाही हें लक्षांत ठेवूनच पोलिसांनी वागलें पाहिजे.

"पोलिस ॲक्टच्या ३४-व्या कलमाप्रमाणे तो कायदा जेवढ्या प्रदेशावर चालतो त्या प्रदेशातील गावांत वाईट वर्तणुकीविरुद्ध पाऊल उचलण्यासाठी आवश्यक ते सर्व अधिकार पोलिसांना आहेत अशी माझी

कल्पना आहे. या कलमानुसार (६ वा विभाग पहा) पोलिसांना वॉरंट न दाखवितांही कोणत्याही गुंडगिरी करणाऱ्या माणसाला अटक करता येईल. मग तो मनुष्य कोणत्याही रस्त्यावर, मोकळ्या जागेत, राजमार्गावर असो. या मनुष्याकडून तेथील लोकांना अडचण होत असेल, त्रास होत असेल, तर त्याला अटक करावी. अशा मनुष्याला न्यायाधीशांसमोर उभे केल्यावर त्याला पन्नास रुपयांपर्यंत दंड अथवा आठ दिवसांची शिक्षा देता येते. या शब्दांतील 'गुंडगिरी करणारा' या शब्दांचा अर्थ इंडियन पीनल कोडातील 'गुंडगिरी' या शब्दाच्या कायद्यातील परिभाषेनुसार असणाऱ्या अर्थानुसारच तंतोतंत घेतला पाहिजे असें नाही. हा इंग्रजी शब्द आहे व भारतातील कायद्याच्या पुस्तकापेक्षा साध्या इंग्रजी शब्दकोशानुसारच त्याचा अर्थ घ्यावा. नागरिक अथवा रस्त्याने जाणारे येणारे जे लोक आहेत त्यांच्याकडे पाहून 'वंदेमातरम्'चा गिल्ला करणारे व त्यायोगे त्यांना उपद्रव देणारे अथवा त्यांचा अपमान करणारे, याच स्वरूपाच्या क्षोभकारक व अपमानकारक शब्दांचा उच्चार करणारे, त्यांच्यावर चिखलफेक करणारे अथवा त्यांना धमक्या देणारे विद्यार्थी व अन्य लोक हे गुंडगिरी करणारे आहेत असें माझें मत आहे. आणि त्यांना तत्काळ अटक करून त्यांच्यावर खटला भरलाच पाहिजे. पोलिस ॲक्टच्या ३१-व्या कलमाप्रमाणे सार्वजनिक रस्ते व मार्ग येथे सुव्यवस्थेचें संरक्षण करणें हें पोलिसांचें कर्तव्य होय. याचाच अर्थ असा आहे की, अव्यवस्थेचे प्रकार थांबविणें हें त्यांचें कर्तव्य ठरतें. नागपूरच्या पोलिसांनी कायदा व सुव्यवस्था यांचें काटेकोरपणाने संरक्षण करण्याची आता वेळ आलेली आहे, आणि माझी तुम्हांला अशी विनंती आहे की तुम्ही त्यांच्यावरील उत्तरदायित्व व त्यांचे अधिकार ते योग्य प्रकारे पार पाडतील असें करावें.

"जर तुम्हांला असें वाटलें की विशिष्ट प्रकारची अव्यवस्था थांबविण्याच्या दृष्टीने पोलिस ॲक्टने व फौजदारी कायद्याने पोलिसांना दिलेले अधिकार पर्याप्त नाहीत तर त्या संबंधातील पुढील सूचनात्मक मार्गदर्शनासाठी तुम्ही तत्काळ मला कळवावें.

"धमक्या, आक्रमण, शिवीगाळ, अथवा प्रक्षोभक निदर्शने करून ज्या सभ्य नागरिकांचा अपमान करण्यात आलेला आहे व ज्यांना उपद्रव देण्यात आलेला आहे त्या नागरिकांना त्या संबंधी पोलिसांच्याकडे कागाळ्या करण्यास उत्तेजन द्यावें व त्यांच्या कागाळ्यासंबंधात सहानुभूतीने पुढील कारवाई करावी.

"आपल्या घराच्या खिडक्यांमध्ये उभे राहून रस्त्यावरून जाणाऱ्या नागरिकांविरुद्ध कोणी निदर्शनें केलीं तर पोलिसांनी तो अपराध सार्वजनिक रस्त्यावर केलेल्या निदर्शनांसारखाच शिक्षार्ह समजावा.

"तुमच्या सामान्य व खास अशा राखीव पोलिसदलापैकी काही पोलिस, साध्या वेशात, निवडक अधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखाली, जेथे अव्यवस्थेचा व बेकायदेशीर कृत्यांचा संभव वाटेल अशा घरांवर दृष्टि ठेवण्यासाठी व रस्त्यांवर टेहळणी करण्यासाठी नियुक्त करावे. त्यांनी गुंडगिरी करणाऱ्या लोकांसंबंधात तत्काळ व परिणामकारक पाऊल उचलावें.

"प्रारंभीच तुम्ही पोलिसांच्या करड्या दृष्टीचा असा उग्र परिचय करून द्या की, नागपूरच्या जनतेला बेकायदेशीर कृत्यें करण्याचें मनात आणताना पोलिसांच्या दृष्टीचें भय वाटेल. पोलिसी गणवेश प्रत्यक्षात दिसो वा न दिसो, पण आपल्या वर सतत पोलिसांची करडी दृष्टि आहे हें नागपूरला वाटलें पाहिजे."

नागपूर प्रांतात परकीय राज्यकर्त्यांच्या दमननीतीचें स्वरूप किती उग्र झालें होतें याची जशी ॠॅडॉक व क्लीव्हलंड यांच्या उपर्युक्त परिपत्रकांवरून कल्पना येते, त्याचप्रमाणे नागपूरचे नेमस्त पुढारी जनतेच्या तिरस्काराचा कसा विषय बनले होते व परकीय राज्यकर्त्यांशी त्यांची कशी हातमिळवणी झाली होती याचीही यावरून कल्पना येते. दि. २२ सप्टेंबरच्या सभेनंतर नागपूरची काँग्रेस मवाळांऐवजी मुंजे यांच्या राष्ट्रीय पक्षाच्या हातात जाणार म्हणून सरकार किती खवळलें होतें याची यावरून कल्पना येईल. नागपूरचा तरुण विद्यार्थिवर्ग क्रांतिकारक विचाराकडे वळलेला आहे याची सरकारी अधिकाऱ्यांना पूर्ण कल्पना होती असें या दोन परिपत्रकांवरून स्पष्ट दिसतें. मुंजे यांच्या राष्ट्रीय मंडळाचे सदस्य न्यायमूर्ति सर भवानी शंकर नियोगी हे आपल्या आठवणीत लिहितात :

"डॉ. मुंजे यांच्या प्रेरणेने विद्यार्थ्यांच्या मध्ये राजकीय जागृति करण्यासाठी विद्यार्थिसमाज या नांवाची संस्था निर्माण झाली होती. मी तिचा अध्यक्ष होतो व कै. दाजी नागेश आपटे (हे स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या अभिनव भारत या क्रांतिकारक संस्थेचे सदस्य होते. पुढे ते विद्वान् संशोधक म्हणून प्रसिद्धीस आले. ते पुढे बडोद्याला स्थायिक झाले ) हे तिचे कार्यवाह होते. आमच्यावर पोलिसांची वक्रदृष्टि होती. बंगालमधल्या अराजक चळवळीशी आमचा गुप्त संबंध आहे असाही

पोलिसांना संशय होता. बंगालमधील गुप्त क्रांतिकारक संस्थांचे काही प्रचारक नागपुरातील विद्यार्थिवर्गाचीं मनें वळवून त्यांना क्रांतिकारक विचारसरणीने प्रभावित करण्यासाठी नागपूरला येत असत हें काही खोटें नाही. विद्यार्थिवर्ग संपूर्णपणे जरी त्यांच्या जाळ्यात अडकला नाही तरी बाळकृष्ण हरि काणे त्यात सापडले व सुप्रसिद्ध माणिकतोळा बॉंब खटल्यात गोवले गेले. खालच्या कोर्टात त्यांना शिक्षा झाली; पण अपील केल्यावर कलकत्ता हायकोर्टाने त्यांची सुटका केली. नागपूरला पोलिसांची माझ्यावर सतत दृष्टि होती व ते वारंवार मला भंडावून सोडीत. त्यांचा माझ्यावर दोन कारणांस्तव संशय होता. एक म्हणजे बंगालच्या क्रांतिकारक संस्थांचा व माझा गुप्त संबंध आहे असें त्यांना वाटत होतें व दुसरें म्हणजे पांडुरंग सदाशिव खानखोजे यांच्याशी असलेले माझे संबंध. समर्थ शिवराय समाज या नांवाच्या त्यांच्या छोटयाशा संस्थेत मी असल्याने हा संशय होता. पुढे ते नाटयमय पद्धतीने त्यांच्या विवाहाच्या वाटाघाटी चालू असतानाच भारतातून गुप्त झाले. पुढे असें कळलें की अमेरिकेत सॅन फ्रान्सिस्को येथे गदर पक्षात ते समाविष्ट झाले. काही काळपर्यंत माझें नांव पोलिसांच्या काळ्या यादीत होतें. मला हें योगायोगाने कळलें. एकदा मी भंडारा स्टेशनवर गाडीत चढलो. साध्या वेषातील एक पोलीस माझ्याकडे आला व माझी चौकशी करू लागला. तो मोकळेपणाने वागत होता. त्याने आपली वही मला दाखविली. त्यात 'स्वदेशीसे मेल रखता है' अशा शीर्षकाच्या रकान्यात माझें नांव होतें."

नागपूरच्या नेमस्त पक्षाचे अग्रणी सर गंगाधरराव चिटनवीस, रा. ब. वामनराव कोल्हटकर व रा. ब. बापूराव दादा किनखेडे हे होते. लोक त्यांना उपहासाने 'चि.को.बा. कंपनी म्हणत. या तप्त वातावरणात काँग्रेस जहाल तरुणांच्या हाती जाणार म्हणून नागपूरच्या नेमस्तांनी मुंबईला सर फेरोजशहा मेथा यांच्याकडे धाव घेतली व त्यांनी राष्ट्रीय सभा हातची जाऊ नये म्हणून पलायनाच्या रणनीतीचा अवलंब केला. त्या इतिहासाकडे पुढील प्रकरणात वळू.

✦ ✦ ✦



डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे

प्रकरण अकरावें

# सुरत काँग्रेस

मागच्या प्रकरणाच्या शेवटी सांगितल्याप्रमाणे नागपूरच्या टाऊन हॉलच्या सभेत नेमस्तांची फटफजिती होऊन राष्ट्रीय पक्षाचें निर्विवाद बहुमत आहे हें सिद्ध झाल्यावरही येथील वामनराव कोल्हटकर प्रभृति नेमस्ताग्रणींचा आडमुठेपणा काही गेला नाही. त्यांनी समेटासाठी अशी अट घातली की, राष्ट्रीय पक्षाने जमविलेल्या पंचेचाळीस सहस्र रुपयांपैकी पंधरा सहस्र रुपये स्वागत समितीच्या स्वाधीन करावे व नेमस्त पक्षाच्या अध्यक्षाला मान्यता द्यावी. यावर तरुण गटाचे पुढारी डॉ. मुंजे यांनी त्यांना असें सांगितलें की, आमच्या पक्षाचा पुढारीच अध्यक्ष म्हणून निवडण्यात येईल या अटीवरच आम्ही लोकांकडून पैसे घेतले आहेत. त्यामुळे तो पैसा आम्ही तुम्हांला देऊ शकत नाही. हवें तर ज्याचा त्याला आम्ही परत करू. तुम्ही स्वतःच्या पक्षाची काँग्रेस खुशाल बनवावी. हा पैसा सोडून इतर साह्य आम्ही आपणांस देऊ. तुम्हांला तेवढेंही साह्य नको असलें व आमचा पक्ष स्वागतकारिणीतही नको असला तर आम्ही घरी स्वस्थ बसावयास तयार आहोत. तुमच्या अंगी काँग्रेस स्वतंत्रपणे भरविण्याची हिंमत नसेल तर आमचा नवा पक्ष स्वतःच्या हिंमतीवर ती भरविण्यास तयार आहे. मग अध्यक्ष मात्र तुमच्या पक्षाचा राहणार नाही. ज्याचे पैसे त्याचा अध्यक्ष हें ठरलेलें आहे, तेव्हा व्यर्थ कुरकूर करण्यात अर्थ नाही. तुम्हांला पैसाही द्या व अध्यक्षही तुमचा मान्य करा हें कोण ऐकेल ?

मुंजे यांच्या या म्हणण्यानंतर नागपूरला काँग्रेस भरवावयाची झाल्यास टिळकांच्या अध्यक्षपदाची कडू गोळी गिळावीच लागेल हें मवाळांना उघडपणे दिसून आलें. त्यांनी मुंबईला सर फेरोजशहा मेथा यांना तसें कळविलें. ज्या टिळकांच्या संबंधाने हा वाद चालू होता ते स्वतःच्या अध्यक्षपदासंबंधी पूर्णपणे उदासीन होते. दि. ८ ऑक्टोबरच्या केसरीत टिळक लिहितात, "अध्यक्षाच्या निवडणुकीचा वाद आहे पण तो काही वादाचा मुख्य प्रश्न नव्हे. कलकत्त्यास दादाभाई यांनी घालून दिलेलें नवीन वळण राष्ट्रीय सभा केवळ आपल्या बंगल्यापुरतेंच नव्हे तर सर्व देशाकरता मंजूर करते कीं नाही हा वादाचा प्रश्न आहे.

टिळकांनी अध्यक्ष होण्याचें नाकबूल केलें किंवा उद्या ते मेले तरी दोन पक्षांचा झगडा मिटावयाचा नाही हें आम्ही सर्वांस निक्षून सांगतो. प्रश्न व्यक्तीचा नाही, मतांचा आहे. राष्ट्रीय सभा दोघांनाही पाहिजे आहे. मतभेदाचा निकाल सभा मोडल्याने व्हावयाचा नाही अगर दोन निरनिराळ्या सभा केल्यानेही व्हावयाचा नाही. आज नाही उद्या नव्या पक्षाचें राष्ट्रीय सभेत हटकून बहुमत होणार असें आम्ही निश्चयाने सांगतो.

वस्तुत: मवाळ पक्षाचे पण लोकप्रिय असलेले सुरेंद्रनाथ बानर्जी यांना अध्यक्षपद द्यावें असेंही सुचविण्यात आलें. कारण डॉ. मुंजे यांना टिळकच अध्यक्ष हवे होते तरी तुटेपर्यंत ताणावयाचें नव्हतें. कारण या गोंधळात आयत्या वेळी राष्ट्रीय सभा जर नागपूरला न भरली तर त्यात केवळ राष्ट्रीय सभेचाच नव्हे तर नागपूर शहराचाही दुर्लौकिक होणार होता. नागपूरच्या नव्या पक्षाला हें दि. २९ ऑक्टोबरच्या केसरीत लोकमान्य टिळकांनी आपल्या संपादकीयात पुढीलप्रमाणे सुचविलें आहे. "नेमस्तपक्ष तडजोडीस तयार नसेल तर नव्या पक्षाने हें वृत्त ऑ. इं. कॉं. कमिटीस कळवून स्वागत कमिटीतून अंग काढून स्वस्थ बसण्यासही आपण तयार आहों असें कळवावें. कॉंग्रेस नागपुरात भरविण्याचें न ठरलें तर कॉंग्रेसचाच नव्हे तर नागपूर शहराचाही बदलौकिक आहे. दोन्ही पक्षांतील लोक तयार नसल्यास शहरचे लोक तयार आहेत असेंही ऑ.इं.कॉं. कमिटीस कळवावें. पाध्ये यांची नागपुरात टरउडाली म्हणून सुरेन्द्रनाथ यांचीही ते टर उडवितील अशी शंका घेणें पोरकटपणाचें किंबहुना मूर्खपणाचें आहे."

सर फेरोजशहा मेथा यांना नागपुरातील नेमस्तांची अवस्था कळताच त्यांनी नागपुरातून कॉंग्रेसचीच उचलबांगडी करावयाचें ठरविलें व उगाच देखावा म्हणून नागपुरातील नेमस्त व राष्ट्रीय अशा दोन्ही पक्षांतील लोकांना तडजोडीसाठी म्हणून मुंबईला बोलाविलें. मवाळ पक्षाच्या वतीने रा. ब. वामनराव कोल्हटकर, गोकुळदास पारेख व पाध्ये होते तर डॉ. मुंजे व श्री. नारायणराव अळेकर हे राष्ट्रीय पक्षाच्या वतीने आले. तडजोडीच्या वाटाघाटींच्या पहिल्याच बैठकीत तरुण डॉ. मुंजे व सर फेरोजशहा मेथा यांची चकमक उडाली. सर मेथा यांनी मुंजे यांना नागपूरच्या राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षासंबंधी विचारताच मुंजे यांनी स्पष्ट शब्दांत सांगितलें, "टिळकांनाच अध्यक्ष करावें असें नागपूरच्या लोकांचें मत आहे पण नियमबाह्य रीतीने त्यांना अध्यक्ष करावें असें आमचें म्हणणें नाही. बॅलट पद्धतीने मतें घ्यावीं. अशीं मतें घेतल्यावर जर टिळक

निवडून न आले तर आम्ही जो कोणी येईल तो दुसरा अध्यक्ष मान्य करू." सर फेरोजशहा मेथा यांनी पैशाच्या अडचणींनी मुंजे यांना घाबरविण्याचा प्रयत्न केला. त्यांनी असें विचारलें की, "जमलेला पैसा स्वागत मंडळाने तुमच्या स्वाधीन न केला तर काय कराल ?" पण मुंजे अशा धमकावणीला दाद देणारे नव्हते. त्यांनी फेरोजशहांना सांगितलें की, "प्रसंगच पडला तर टिळकांच्या करिता आम्ही भीक मागून पैसा उभारू. पण काँग्रेस यशस्वी करूनच दाखवू." मुंजे यांचा हा निर्धार पाहून मेथा यांनी रागावून विचारलें की, "तुम्हांला टिळकच अध्यक्ष कां हवेत ? डॉ. रासबिहारी घोष कां नकोत ?" त्यावर डॉ. मुंजे यांनी त्यांना खडखडीतपणे सांगितलें की, "हा आमच्या पसंतीचा प्रश्न आहे." मेथा यांना हें सरळ उत्तर वर्मी झोंबलें. आमच्या ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या बैठकीत या प्रश्नाचा रीतसर विचार करण्यात येईल असें म्हणून त्यांनी ती बैठक संपविली.

दि. १० नोव्हेंबरला सर फेरोजशहा मेथा यांच्या बंगल्यावर ऑ. इं. काँ. कमिटीची बैठक भरली. अनेक प्रांतांचे प्रतिनिधि अनुपस्थित होते. त्यांनी काँग्रेस नागपूरलाच भरवावी असें आपलें लेखी मत मात्र कळविलें होतें. नागपूरसंबंधीचाच वाद असल्यामुळे उत्तरें देणें सोयीचें व्हावें म्हणून या बैठकीच्या वेळी डॉ. मुंजे हे नारायणराव अळेकर यांच्या सह बैठकीच्या वेळी मेथा यांच्या बंगल्याच्या व्हरांड्यात आले. पण मेथा यांच्या शिपायाने त्यांना बंगल्याबाहेर जाण्यास सांगितलें. दादासाहेब खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात :

"तिथे सभेला मी, टिळक, दाजी, गोखले, सर पी. एम्. मेथा, मि. जिना, वाच्छा, मुधोळकर, कोल्हटकर, अंबालाल आणि गोकुळदास इतकेजण होतो. डॉ मुंजे आणि इतर लोकांना तेथे मज्जाव केला होता. बराच वेळ लांबलचक वादविवाद झाला. कोणत्याही परिस्थितीत नवीन पक्षाशी (टिळकांशी) आपण सहकार्य करणार नाही असें कोल्हटकरांनी जाहीर केलें. असें दिसतें की, सर फेरोजशहा मेथांनी काळजीपूर्वक काँग्रेस सुरतला पाठविण्याची व्यवस्था केली होती. त्यांच्या घरात एक शिष्टमंडळ येऊन वाट पहात बसलेंच होतें. त्यांना आत आणलें. त्यांनी काँग्रेस मागितली व ती त्यांना दिली गेली. त्यानंतर मी व टिळक परत आलो."

नेमस्ताग्रणींच्या या कुटिल डावाचें नागपूरच्या नेत्यांना अत्यंत दुःख झालें. लोकमान्य टिळकांच्या सूचनेवरून त्यांनी शेवटचा प्रयत्न करून पाहिला. डॉ. मुंजे यांनी काँग्रेसचे सेक्रेटरी नामदार गोपाळ कृष्ण गोखले व सर दिनशा वाच्छा यांना एक पत्र पाठवून नागपूरची अब्रू घेऊ

नये म्हणून प्रार्थना केली व रकमेची हमी पटविण्यासाठी पत्रासहित दहा सहस्र रुपयांच्या प्रॉमिसरी नोटा पाठविल्या. पत्रात ऑल इंडिया काँग्रेस कमिटीने आपल्यास हवी तशी स्वागतकारिणीची रचना करावी. राष्ट्रीयपक्ष सर्व प्रकारचें साह्य करील, पण काँग्रेस नागपूरलाच भरवावी असें लिहिलें होतें. पण दिनशा वाच्छा यांनी पैसे परत पाठविले व पत्राचा विचार करावयास अवधि नाही असें कळविलें. दिनशा वाच्छा व फेरोजशहा मेथा यांच्या या निर्णयामुळे डॉ. मुंजे व त्यांचे सहकारी यांना अत्यंत दुःख झालें. लोकमान्य टिळकांनी मात्र हें आव्हान स्वीकारावयाचें व कलकत्त्याला प्रगतीचा पदन्यास केलेल्या राष्ट्रीय सभेला पुनश्च अनुनयवादी राजकारणाची बटीक होऊ द्यावयाची नाही असें ठरविलें. त्यांनी या बैठकीच्या निर्णयावर प्रतिकूल टीका करताना केसरीत लिहिलें की," सर फेरोजशहा मेथा जिकडे काँग्रेस भरवितील तिकडे राष्ट्रीय पक्षाने सध्या गेलें पाहिजे ! कारण काँग्रेस न भरावी किंवा मोडावी हा राष्ट्रीय पक्षाचा बिलकुल हेतु नाही. पण हा तंटा एवढ्याने भागला असें मात्र सर फेरोजशहा यांनी समजू नये. नव्या जुन्या पक्षांचा तंटा नव्या पक्षाचा विजय होईपर्यंत एकसारखा चालावयाचा आहे. यंदाच्या साली एक सुरत सापडली म्हणजे पुढच्या साली तशी एखादी दुसरी सुरक्षित जागा सापडते असें कोणी समजू नये. किंबहुना सुरत तरी सुरक्षित आहे कीं नाहीं हा प्रश्नच आहे ! "

फेरोजशहा यांनी काँग्रेस तर सुरतला नेलीच; पण तिचा अध्यक्ष कोण नियुक्त करावयाचा हेंही त्यांनी सुरतेच्या लोकांना न विचारताच ठरवूनही टाकलें. बंगालचे रासबिहारी घोष हे सरकारधार्जिणे मवाळाग्रणी या काँग्रेसचे अध्यक्ष व्हावयाचे होते. त्यावर टिळक लिहितात, " नागपूरच्या लोकांना तुम्ही विचारलें नाही. पण आता अध्यक्षाच्या बाबतीत सुरतेच्याही लोकांचें मत न घेणारे एवढे डुढ्ढाचार्य तुम्ही कोण? राष्ट्रीय सभा तुम्हीच भरवावी असा काही नेमस्तास कोणी ताम्रपट दिलेला नाही. "

तत्कालीन काँग्रेसच्या घटनेप्रमाणे काँग्रेसचा अध्यक्ष निवडण्याचा अंतिम अधिकार सुरतेच्या स्वागतकारिणीला होता. काही झालें तरी काँग्रेस लढाऊ नेतृत्वाच्या हाती देणें हाच राजकीय प्रगतीच्या दृष्टीने एकमात्र मार्ग होता. टिळकांनी तसा निश्चयच केला होता. नाही टिळक तर दुसरा कोणी तसाच पुरुष तेथे नियुक्त होणें आवश्यक होतें. दि. १० नोव्हेंबर १९०७-ला सुरतला काँग्रेस नेण्याचा प्रस्ताव मेथा यांच्या बंगल्यावरील उपर्युक्त बैठकीत संमत झाला व दि. ११-ला लाला लजपतराय

यांची बंदीतून मुक्तता झाली. लोकमान्यांनी लालाजींचें लोकप्रिय नांव अध्यक्षपदासाठी पुढे करून नेमस्तांना शह द्यावयाचें निश्चित केलें. यासाठी टिळक व दादासाहेब खापर्डे यांची एक महत्त्वपूर्ण बैठकही झाली असें दिसतें. श्री. बाबासाहेब खापर्डे लिहितात, "दि. २० नोव्हेंबरच्या रोजनिशीत 'आज महत्त्वाचीं पत्रें आलीं' एवढाच उल्लेख आहे. त्याच दिवशी दादासाहेब मुंबईस रवाना झाले. हें महत्त्वाचें पत्र कोणाचें व त्यात काय मजकूर होता हें डायरीत लिहिलेलें नाही. तसेंच आपण मुंबईस कशाकरिता जात आहो याचाही उल्लेख नाही. मुंबईस गेल्यावर ज्यांच्या गाठी भेटी घेतल्या त्यांचीं नांवें दिलेलीं नाहीत. मुंबईस दोन दिवस मुक्काम होता. दादासाहेब उमरावतीला दि. २३-च्या रात्री परत आले. दि. २४-ला इंद्रभुवन थिएटरमध्ये विराट् सार्वजनिक सभा झाली व येत्या काँग्रेसचे लाला लजपतराय हे अध्यक्ष निवडावे असा एकमताने ठराव करण्यात आला. दि. २०-चें महत्त्वाचें पत्र, मुंबईची खेप व तेथून आल्याबरोबर ही सार्वजनिक सभा व हा ठराव यांचा विचार करता असा तर्क होतो की, सुरतच्या काँग्रेसमध्ये नेमस्तांना शह देण्याकरिता लाला लजपतराय यांचें तत्कालीन लोकप्रिय नांव पुढे करून काही कारस्थान रचलें जात असावें. पण हा तर्क आहे. अत्यंत महत्त्वाच्या गोष्टी गुप्त ठेवण्याच्या उद्देशाने त्या संबंधाने डायरीत न लिहिण्याचा दादासाहेबांचा जो प्रघात होता त्याला अनुसरून कदाचित् या कारस्थानाचा उल्लेख टाळला असण्याचा संभव आहे. माझ्या तर्काप्रमाणे दि. २०-चें पत्र टिळकांचें असावें. लजपतरायांचें नांव अध्यक्षपदासाठी सुचवा व मुंबईस त्या कामी काही विशिष्ट वाटाघाटी करावयास या असा टिळकांच्या पत्रात मजकूर असावा, असा तर्क साधारण सयुक्तिक वाटतो."

—दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र, पृष्ठ ३०० व ३०१

लाला लजपतराय यांच्यावर हद्दपारीचा प्रसंग नुकताच येऊन गेला असल्यामुळे व त्यांच्यावर अपराधाचा कोणताही आरोप सिद्ध करता न आल्यामुळे त्यागी व निरपवाद देशभक्त या नात्याने भारतीय जनमानसात त्यांना विशेष स्थान प्राप्त झालेलें होतें. त्यांच्या अध्यक्षपदाचा एकवार उच्चार होताच ठिकठिकाणी त्यांच्या मुक्ततेप्रीत्यर्थ आनंदप्रदर्शक सभा होऊ लागल्या व जिकडून तिकडून लजपतरायांनाच अध्यक्ष करा म्हणून सुरतच्या स्वागतकारिणीवर तारा व पत्रांचा वर्षाव होऊ लागला. मुंबईला ही वार्ता येऊन थडकताच सर फेरोजशहा मेथा मनातून चरकले व लोकमताच्या प्रभावाने प्रभावित होऊन सुरतच्या

स्वागतकारिणीने भलते (?) काही करू नये म्हणून त्यांनी नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांना बरोबर निवडक मंडळी देऊन प्रचारासाठी सुरतेस पाठविलें. सुरतला स्वागतकारिणीतही नेमस्त व राष्ट्रीय असे दोन गट होतेच. नेमस्त बहुमतात असल्यामुळेच मेथा यांनी सुरतेला राष्ट्रीय सभा नेली. गोखले यांनी स्वागतकारिणीतील तरुण गटापुढे पुढीलप्रमाणे गोड पण फसवा युक्तिवाद केला. "लजपतराय यांना हद्दपार केल्याबद्दल सरकारचा निषेध करणारा सणसणीत ठराव करावयाचा आहे ना? मग लालाजींना अध्यक्ष करून कसें चालेल? शिवाय अध्यक्षाला गेल्या वर्षातील राज्यकारभारावर टीका करावी लागते. लजपतरायांचें प्रकरण त्यातच येतें. स्वतःबद्दलच बोलणें लजपतरायांना अवघड वाटणार नाही काय?" पण या फसव्या युक्तिवादाने तरुण गट फसेना. त्या गटाने गोखल्यांना उलट असें सांगितलें की, निषेधाचा ठराव न केला व अध्यक्षीय भाषणात स्वतःबद्दल निर्देश न केला तरी लालाजींना केवळ अध्यक्ष करण्यानेच सरकारला शंभर ठरावांहून अधिक चांगलें उत्तर मिळणारें आहे. शेवटी निरुत्तर झाल्यामुळे खरें तें गोखल्यांच्याच तोंडून बाहेर पडलें. त्यांनी सांगितलें की, आजच्या परिस्थितीत लजपतरायांना अध्यक्ष करणें म्हणजे सरकारला चिडविण्यासारखें आहे आणि चिडलेलें सरकार आपल्या संस्थेला व चळवळीला क्षणात नामशेष करील."

नामदार गोखले यांच्या या युक्तिवादाने कोणाचेंच समाधान होणारें नव्हतें. शेवटी तडजोड अशक्य आहे असें दिसून आल्यावर अंबालाल साकरलाल यांनी असा धाक घातला की, "विनाकारण लजपतराय यांच्या सूचनेचा ठराव पुढे मांडून त्यांना हास्यास्पद कां करिता? ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी आमच्या ताब्यात आहे हें लक्षात ठेवा." तेव्हा सर्व देशातून लजपतरायांच्या अध्यक्षपदासाठी आलेल्या तारा व पत्रें न वाचताच बाजूला ठेवून देण्यात आलीं. याप्रमाणे दडपेगिरी करून लजपतरायांचें नांव वगळण्यात आलेलें पाहून तरुणांच्या राष्ट्रीय पक्षाने निषेधासाठी सभात्याग केला. पण त्याकडे मुळीच लक्ष न देता मेथागटाने पूर्वीच ठरलेले डॉ. रासबिहारी घोष यांचें नांव अध्यक्षपदासाठी सुचवून तें तथाकथित एकमताने संमत करून घेतलें.

नेमस्तांचा हा वाममार्ग पाहून टिळक दि. ३ डिसेंबरच्या केसरीत लिहितात, "यंदाच्या राष्ट्रीय सभेस 'तेविसावी' हें उपपद न जोडता यंदाची राष्ट्रीय सभा 'मेथा आणि को.' ची मुंबईस भरणारी मजलस आहे असें म्हणणें सयुक्तिक आहे! सर्वच गोष्टी अरेरावीने चालल्या

आहेत. लोकमताची पर्वा न करता ज्यांना ना. मेथा यांच्या पाठीमागून एडीकँपप्रमाणे नाचावयाचें असेल त्यांनी खुशाल तसें करावें. गोऱ्या अधिकारीवर्गाप्रमाणेच राष्ट्रीय सभेत बेबंदशाही व अरेरावीपणा अनियंत्रित चालावा हें राष्ट्रीय सभेचें दुर्भाग्य होय. अशा अरेरावीचा परिणाम अखेर काय होतो, याचा प्रत्यय मेथा यांस मुंबईच्या म्युनिसिपालिटीत आलाच आहे व आज नाही पण उद्या राष्ट्रीय सभेतही हाच अनुभव त्यांच्या प्रत्ययास आल्याशिवाय राहणार नाही.

खऱ्या लोकमताला त्या वेळच्या कॉंग्रेसच्या घटनेत वावच नसल्यामुळे कॉंग्रेसचा मिरासदार अधिकारी वर्ग व देशातील लोकमत यांच्यानच या वेळी विचित्र संघर्ष निर्माण झाला होता. कलकत्ता कॉंग्रेसमध्ये कॉंग्रेसचें पुढे पडलेलें राजकीय पाऊल मागे घ्यावयास राष्ट्रीय पक्ष सिद्ध नव्हता. ती देशाच्याच अकल्याणाची गोष्ट होती. अशा स्थितीत लोकमताचा कौल मान्य करून नियोजित अध्यक्ष डॉ. रासबिहारी घोष यांनी औदार्याने व शहाणपणाने आपलें नांव मागे घेणें व लाला लजपतराय यांच्यासाठी स्थान मोकळें करून देणें हा एकच तडजोडीचा खरा मार्ग होता. देशाच्या राजकीय प्रगतीला खीळ घालणाऱ्या लोकांपुढे नमतें तरी किती घ्यावें? बंगालचे वयोवृद्ध नेते बाबू मोतीलाल घोष यांना लिहिलेल्या एका पत्रात लो. टिळक लिहितात, "वाटल्यास तत्त्वाकरिता म्हणून घोष यांच्या पाया पडून मी त्यांना विनंती करावयास तयार आहे. काय वाटेल तें करा, पण लजपतराय यांचेकरिता रास बिहारी यांनी आपलें नांव पाठीमागे घ्यावें असें त्यांना सांगा." दि. १० डिसेंबरच्या केसरीतील अग्रलेखात टिळक लिहितात, "स्वार्थत्याग व देशाकरिता झीज व कष्ट सोसणें या दृष्टीने डॉ. घोष यांच्यापेक्षा लजपतराय यांची योग्यता शंभर पटीने अधिक आहे. गोखले यांनी लजपतराय यांच्याविरुद्ध जी सुरतेस खटपट केली ती व्यक्तिद्वेषामुळे केली असें आमचें म्हणणें नाही. पण त्यांची सध्याची कृति व उद्योग राष्ट्रीय सभेच्या पदरी खोटया व अपायकारक समजुती बांधण्याच्या दृष्टीने झाला आहे. राष्ट्रीय सभा ही सर्व हिंदुस्थानच्या वतीने सरकारजवळ हक्क मागण्याकरिता, भांडण्याकरिता निर्माण झाली आहे. सरकारास किंवा सरकारी अधिकाऱ्यास रुचेल अगर ते चिडले जाणार नाहीत अशा रीतीने राष्ट्रीय सभेचे काम चालावयाचें असेल तर ही सभा हवी तरी कशाला? या प्रसंगी काही तडजोड न निघाली व ती काढणें सर्वस्वी डॉ. रासबिहारी यांच्या हातात आहे, तर यंदा सुरतेस अध्यक्षाच्या निवडणुकीच्या वेळीच अनेक प्रतिसूचना व

उपसूचना येऊन निदान घोटाळा माजविल्याखेरीज लोक राहणार नाहीत अशी आमची मनोदेवता आम्हांस साक्ष देत आहे."

कोणत्याही परिस्थितीत सुरतेला मवाळांच्या अरेरावीला उत्तर देऊन सरकारविरोधी संघर्षाचें प्रभावी हत्यार म्हणून राष्ट्रीय सभेचें रूपांतर करावयाचें असें टिळकांनी ठरविलें होतें. पंजाब त्यांना पूर्णपणे अनुकूल होता. लाला हरकिसनलाल व लाला लजपतराय हे क्रांतिवादी मनोवृत्तीकडे झुकलेले नेते हेच पंजाबचे त्या वेळी वास्तविक पुढारी होते. संयुक्तप्रांतात त्या वेळी पं. मोतीलाल नेहरू हे राजकारणात फारसा भाग घेत नव्हतेच. तेथील खरे पुढारी पं. मालवीय हे होते व ते मवाळ पक्षाचे होते. नागपूर प्रांतातील नेमस्ताग्रणींनी टाऊन हॉलच्या सभेत झालेल्या फजितीचा इतका धसका घेतला होता की, त्यांपैकी कोणीही सुरत काँग्रेसला जाणारच नव्हते. नागपूरचे तरुण नेते डॉ. मुंजे व त्यांचे सहकारी, मेथा यांनी केलेल्या अपमानामुळे व नागपूरच्या प्रतिष्ठेवर त्यांनी केलेल्या वारामुळे आधीच चिडलेले होते व सुरतेला मवाळांच्या खास बालेकिल्ल्यात जाऊन राष्ट्रीय पक्षाचा कार्यक्रम विजयी करण्याच्या कोणत्याही योजनेत ते सहभागी व्हावयास उत्सुकच होते. मद्रास प्रांतातील नवा पक्ष टिळकांना अनुकूल होता व तेथेही जुना पक्ष निस्तेज होत चालला होता. सुरतेचा अध्यक्ष बंगालचा असला तरी बंगालचें जनमत टिळकांच्या बाजूचेंच होतें. कारण की, टिळकांच्या स्वराज्याच्या साधनचतुष्टयीचा जन्म वंगभंगातूनच मुख्यतः झाला होता. त्यामुळे हा लढा द्यावयाचें निश्चित झालें. डॉ. घोष यांना तुम्ही माघार घ्या अशी विनंती करणाऱ्या शेकडो तारा गेल्या तरी त्यांनी माघार घेतली नाही. याच्या उलट माघार घेऊ नका अशा अनेक तारा लजपतरायांना जाऊनही मेथा व गोखले यांच्या भिडेसाठी त्यांनी माघार घेऊन आपल्या उदार हृदयाचा परिचय दिला. ज्यांच्या शब्दासाठी लजपतराय यांनी माघार घेतली त्या नेमस्तांनी मात्र आपल्या क्षुद्र हृदयाचा त्यानंतरही परिचय दिलाच.

सुरतेच्या राष्ट्रीय सभेच्या आधी दोन आठवडे लजपतराय मुंबईला आले तेव्हा मुंबईच्या नेमस्त पुढाऱ्यांनी अथवा त्यांच्या प्रेसिडेन्सी असोसिएशनने त्यांचा सत्कार केला नाही. लजपतराय स्टेशनवर आले असता नेमस्त पुढाऱ्यांपैकी एकही उपस्थित नव्हता. टिळक मात्र तेवढ्यासाठी पुण्याहून मुंबईला गेले. राष्ट्रीय पक्षाच्या नॅशनल युनियनने स्टेशनवर त्यांचा मोठा सत्कार करून त्यांचा मुंबईत संपूर्ण पाहुणचार केला. आपल्या शब्दासाठी लजपतरायांनी माघार घेतली यास्तव त्यांचें

यथोचित स्वागत करणें हें आपलें कर्तव्य होय ही गोष्ट नेमस्ताग्रणी विसरले. ते येणार हें माहीत असूनही गोखले सुरतेला निघून गेले. इतकेंच नव्हे तर तेथे जाऊन त्यांनी ठरावासंबंधीचे स्वागत सभेचे अधिकार स्वतः एकटयाकडेच घेऊन आपल्या अवैध वर्तनावर कळसच चढविला.

याप्रमाणे सुरतेस लढा द्यावयाचें निश्चित झाल्यावर व मवाळांचा अपप्रचार आधी सुरू झाल्यावर राष्ट्रीय सभेच्या एक आठवडा आधी टिळक पक्षाचा तळ सुरतेला देण्यात आला व प्रचाराचें ब्रह्मास्त्र म्हणून दादासाहेब खापर्डे यांची योजना झाली. दादासाहेब उत्कृष्ट गुजराथी बोलत असत. त्यांच्या तोडीचा समयज्ञ, प्रभावशाली, विनोदी व प्रसादपूर्ण वाणीचा वक्ता नेमस्तांजवळ एकसुद्धा नव्हता. खापर्ड्यांनी येताच प्रतिदिनी प्रकट सभा घेऊन गुजराथी श्रोतृवृंदाला आपल्या प्रभावशाली वाणीने भारून टाकावयास प्रारंभ केला. दादासाहेबांची सुरतेस जेथे भाषणें होत त्याला बालाजी टेकडा असें नांव होतें. दोनतीन दिवसांतच दादासाहेबांच्या श्रोत्यांची संख्या तीन सहस्रांवर गेली. नागपूर व वऱ्हाड प्रांतांतील अनेक प्रतिनिधि सुरतेस गेले होते. त्यांच्या उपस्थितीमुळे दादासाहेबांच्या वास्तव्याला एखाद्या मराठा सरदाराच्या छावणीचें स्वरूप आलें होतें. स्वतः लोकमान्य टिळक दि. २३ डिसेंबरला सुरतेला गेले. नेमस्तांच्या हाती असलेल्या स्वागतकारिणीने त्यांच्या स्वागताची कोणतीही व्यवस्था केलेली नव्हती. पण टिळकांच्या स्वतःच्या कीर्तीने व दादासाहेबांच्या प्रचाराच्या प्रभावाने प्रतिपक्षीयांचीं मनें करपून जावीं येवढें मोठें टिळकांचें स्वागत झालें. दादासाहेब खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात, "सात वाजता सकाळी टिळक आले. त्यांचें फार मोठ्याने टाळ्या वाजवून लोकांनी सहर्ष स्वागत केलें. त्यांची गाडी मुलांनी ओढीत नेण्याचा हट्ट केला आणि त्यांना महीधरपूर येथे आणलें. त्यांना खूपशा लोकांनी पुष्पमाला घातल्या. हजारो लोक रस्त्याने दुतर्फा उभे राहिले होते. टिळक आणि मी एकाच ठिकाणी उतरलो आहो. एन्. सी. केळकर, डॉ. मुंजे आणि इतर पुष्कळ लोक आले. आम्ही मोतीबाबूंना येण्याविषयी तार केली. आल्यासरशी पहिल्याच दिवशी टिळकांचें भाषण झालें. त्याला पांच सहस्रांवर लोक होते. टिळकांचें भाषण इंग्रजीतून झालें व त्याचा अनुवाद खापर्डे यांनी गुजराथीतून सांगितला. दि. २४-ला टिळकांनी आपल्या द्विदल कार्यपद्धतीला प्रारंभ केला. एका बाजूला राष्ट्रीय सभा न मोडता तडजोड घडवून आणावी म्हणून ते सर्व प्रकारच्या मवाळ पक्षाच्या पुढाऱ्यांच्या

भेटी घेत होते तर दुसऱ्या बाजूला तेथे राष्ट्रीय पक्षाची परिषद अरविंद घोष यांच्या अध्यक्षतेखाली घेऊन त्यांनी आपलें बळ संघटित करण्याचेंही कार्य चालविलें होतें. दि. २४-लाच सकाळी लाला लजपतराय आले. नेमस्तांनी त्यांचेंही स्वागत केलें नाही. लोकांनी मात्र त्यांचें इतकें उत्स्फूर्त स्वागत केलें की, नियोजित अध्यक्ष डॉ. रासबिहारी घोष व नेमस्तांचे अधिनायक सर फेरोजशहा मेथा यांचीं स्वागतकारिणीने केलेलीं स्वागतें त्यांच्यासमोर थिटीं पडलीं. लालाजींच्या गाडीचे घोडे सोडून लोकांनी रस्त्यातून ती ओढून नेली. पुष्पवृष्टि व हारांचा खच पडला. हा प्रकार पाहताच स्वतः फेरोजशहा मेथा व त्यांचे अनुयायी यांनाही धाक वाटून त्यांनी स्वतः हालचालींना आरंभ केला. तेथील दैनंदिन वृत्त खापर्डे यांच्या दैनंदिनीत अधिकृत पहावयास मिळतें, व त्यावरून टिळकांच्या द्विदल कार्यपद्धतीची नीट कल्पना येते. दादासाहेब खापर्डे लिहितात, "दि. २४——आजचा दिवस फार कामात गेला. आमच्या राष्ट्रीय कॉन्फरन्सची आम्हांला व्यवस्था बघावयाची होती. सर्व सकाळभर प्रतिनिधींचा लोंढा सारखा येत होता. बंगाल, मद्रास, बेळगाव, धारवाड, वऱ्हाड, सी. पी. आणि देशाच्या इतर सर्व भागांतून राष्ट्रीय पक्षाचे लोक येथे बहुसंख्येने जमले आहेत. घी खातवाडीमध्ये आमच्या राष्ट्रीय पक्षाची सभा झाली. आमच्या परिषदेत टिळकांनी अत्यंत स्पष्ट व जोरदारपणे आपलें मत सांगितलें. मग आम्ही आमच्या टेकडी सभेला गेलो. पूर्वीच्या सर्व सभांपेक्षा ही सभा मोठी होती. अंदाजे दहा हजार लोक उपस्थित होते.

दि. २५—— तडजोड घडवून आणण्याकरिता टिळक सकाळीच बाहेर पडले. पहिल्यापासूनच माझें मन याविषयी फार साशंक होतें. सर फेरोजशहा मेथा हे उद्धट व गर्विष्ठ आहेत, ते कधीही नमतें घेणार नाहीत. गोखल्यांना स्वतंत्र मत नाही. अंबालालचें मत घोटाळ्यात आहे, आणि आमच्याविषयी ते उदास आहेत. तडजोड घडवून आणण्याची टिळक आपल्याकडून शिकस्त करीत आहेत. आमच्या पक्षामध्ये फार मोठी शिस्त आहे. दुपारी पुन्हा आमची कॉन्फरन्स भरली. अरविंद बाबू अध्यक्ष होते. टिळकांनी पुन्हा आपलें अत्यंत स्पष्ट असें व सर्वांना पटणारें भाषण केलें. हा एकच पुरुष असा आहे की, जो इतकें सुंदर भाषण करू शकतो. लाला लजपतराय आम्हांला भेटावयाला आले. मोतीबाबू आज कलकत्त्याहून आले. आम्ही दोघेजण फार वेळ बोलत बसलो, रात्रभर खरोखरी झोप नाही. आमच्या संख्येत भर पाडण्याची सारखी खटपट चालू आहे. पुष्कळ लोकांनी पैसे देऊन आपलीं नांवें नोंदविलीं.

दि. २६–हा काँग्रेसच्या बैठकीचा पहिला दिवस. मी सकाळी फार लवकर उठलो, टिळकही त्याचप्रमाणे उठले. आम्ही दोघे सकाळी ८ वाजता प्रो. गज्जरच्या बंगल्याकडे गेलो. बंगला काँग्रेसच्या आवाराच्या फार जवळ आहे. आम्ही आमची दिशा बदलली आणि सुरेन्द्रनाथांच्या बंगल्यावर गेलो. मोतीबाबू आणि अरविन्द समागमे होते. मुंजे मागाहून आले. टिळकांनी तडजोडीसंबंधी सूत उवाच केले. ए. चौधराणी, जे. चौधरी, अंबिका चरणबाबू हे तेथे होते. कलकत्यास झालेले ठराव फिरविणार नाही असें सुरेन्द्रनाथ बाबू वचन देईनात आणि खरोखरी ते तसें वचन देऊही शकत नव्हते. पण त्यासंबंधाने आपण मेथांशी चर्चा करू असें ते म्हणाले. आम्ही मग स्वागत समितीच्या अध्यक्षांकडे गेलो. पण ते त्या वेळेस पूजेअर्चेत गुंतले होते. मी काँग्रेसच्या आवारातच थांबलो व टिळक आणि इतर मंडळी जेवणाकरिता परत बिऱ्हाडी गेली. डॉ. मुंजे माझ्या समागमे होते. स्वागत कमिटीच्या अध्यक्षांना भेटण्याचा आम्ही यत्न केला, पण ते आमची भेट घेईनात. त्यांच्या अंगी इतकें मोठेपण आलें आहे की ते कोणाला भेटू शकत नाहीत असें उघड दिसलें. २॥ वाजता काँग्रेसची बैठक सुरू झाली. त्यापूर्वी काही मिनिटें स्वागत कमेटीच्या अध्यक्षांना भेटण्याकरिता मला व टिळकांना बोलाविलें. आम्ही तंबूत बसून राहिलो. पण थोड्या वेळाने निरोप आला की, मंडपात जाण्याकरिता मिरवणुकीची तयारी होत आहे, आणि ते (स्वागत समितीचे अध्यक्ष) आम्हांला भेटू शकत नाहीत. तेव्हा आम्ही मंडपात परत आलो. टिळकांना आणि मला व्यासपीठावर बसायला जागा दिल्या होत्या. स्वागताध्यक्षांचें भाषण नेहमीपेक्षा निराळ्या प्रकारचें होतें. आणि त्यात रासबिहारी घोष यांना स्वागत समितीने अध्यक्ष नेमल्याचें सांगितलें. अंबालाल यांची वागणूक चुकली आणि बाबू सुरेन्द्रनाथ (बॅनर्जी) हे त्या सूचनेला पाठिंबा देण्याकरिता उभे राहिले. पण त्यांचें कोणी ऐकून घेईना. सर्वांनी त्यांना गप्प रहा असें म्हटलें; व ओरडा इतका झाला की शेवटी सभेचें काम स्थगित झालें. सर फेरोजशहा मेथा फार रागावले. त्याचप्रमाणे गोखलेही रागावले. संध्याकाळी आमच्याकडे तडजोडीच्या पुष्कळ सूचना आल्या. पण ह्या सूचना अधिकृत नसून आमचे मित्र म्हणविणाऱ्या मंडळींकडून आल्या होत्या. चुनीलाल सरैय्या व त्यांच्या बरोबर दोन गृहस्थ आले. मिस्टर रे आणि विजयचंद्र चॅटर्जी हेही आले. तडजोडीची त्यांच्या काखोटीस एक योजना होती. संध्याकाळभर व रात्रभर या लोकांचा त्रास झाला. घी खातवाडीत आमची सभा झाली. टिळकांनी अत्यंत महत्त्वपूर्ण असें भाषण केलें, आणि कमेटीला पुन्हा एकदा तडजोडीचें बोलणें करण्याचा अधिकार दिला. "

या एकंदर प्रकारावरून राष्ट्रीय सभेची प्रतिष्ठा जाऊ नये व समेट व्हावा म्हणून टिळकांनी नमतें घेऊन कसोशीचा प्रयत्न चालविला होता असें दिसतें. नागपूरहून या काँग्रेसला म. म. कृष्णशास्त्री घुले हे गेले होते. ते सांगत असत की, नागपूरच्या डॉ. मुंजे प्रभृति मंडळींनी टिळकांना इतकें नमतें घेऊ नये म्हणून सुचविलें. पण टिळकांनी सतत प्रयत्न चालूच ठेविले. नेमस्तांनी मात्र परक्या राज्यकर्त्यांशी नेमस्तपणा व स्वकीयांशी अरेरावीपणा असें धोरण आखलें होतें. टिळकांसारख्या पुरुषाची भेटसुद्धा घेण्याइतकें सौजन्य स्वागताध्यक्ष मालवी यांनी दाखविलें नाही. पहिल्या दिवशीचें अधिवेशन अर्ध्यांत स्थगित करावें लागून सुरेन्द्रनाथ बॅनर्जीसारख्या व्यक्तीचें भाषणही होणें अशक्य ठरण्याइतका जो जनक्षोभ झाला तो या विशिष्ट वर्तणुकीचाच परिपाक होता. तरीही रात्रभर टिळकांनी समेटाचे सर्व प्रकारचे प्रयत्न केले. कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेत मत झालेल्या ठरावांत परिवर्तन करू नये व राष्ट्रीय सभेचें पुढे पडलेलें पाऊल मागे घेऊ नये असा टिळकांचा आग्रह होता. पण नेमस्त पुढारी त्यासाठी असे चंग बांधून होते की, ते कोणाचें ऐकेनात, कोणाची गाठ घेईनात व ठरावात फिरवाफिरव होणार नाही असें वचनही देईनात. उलट टिळकांविरुद्ध गुजराथी लोकांचा क्षोभ वाढवून दंगल करून त्यांना भयभीत करण्याचीं कारस्थानें सुरू झालीं. दि. २६ रात्री गुजराथी भाषेत एक निनांवी पत्रक काढून तें वाटण्यात येत होतें. त्यात लिहिलें होतें की, "सुरतचे गुजराथी नागरिक हो! उठा, जागे व्हा. कर्तव्य बजावण्याची वेळ आली आहे. तुमच्या तोंडाला टिळकांनी काळें फासलें तें धुवून काढा. टिळकांनी आपल्या पत्रातून सुरतच्या लोकांना नेभळट व नपुंसक म्हटलें आहे. पूर्वी शिवाजी दोन वेळा येऊन सुरत लुटून गेला, तेव्हा तो म्हणूनच गेला की आणखी एकदा येऊन सुरत लुटून जाईन. त्याप्रमाणे शिवाजी जरी येथे पुन्हा येऊ शकला नाही तरी आज टिळक येऊन तुमचें नाक कान कापून घेऊन जात आहेत. तरी उठा, जागे व्हा."

शुक्रवार दि. २७-ला आधल्या दिवशीच्या अनुभवावरून काहीच धडा न घेता नेमस्तांच्या सुरत येथील कंपूने टिळकांनाच धडा शिकवावयाचें ठरविलें. उलट टिळकांनीही समेटाचे सारे प्रयत्न वांझोटे ठरलेले पाहून राष्ट्रीय सभेच्या राजकीय प्रगतीसाठी या अरेरावीला स्वतःच चोख उत्तर द्यावयाचें ठरविलें. सकाळपासून स्वागत सभेने हिंदु खलाशी व मुसलमान गुंड आणून मंडपात ठिकठिकाणी पेरून ठेवले. स्वयंसेवकांपैकी अनेकांना टिळकांचे पक्षपाती असल्याच्या संशयावरून मंडपात शिरण्यास

आयत्या वेळी बंदी करण्यात आली. लोकांनी मंडपात काठ्या घेऊनच प्रवेश केला होता व पोलिसांनाही कळवून ठेवण्यांत आलें होतें.

दुपारी १ वाजता अधिवेशन सुरू झालें. सुरेन्द्रनाथ बॅनर्जीनी आदल्या दिवशीचें त्यांचें भाषण पूर्ण केलें. यानंतर अध्यक्षांच्या सूचनेला दुजोरा मिळून ती सभेपुढे मताला टाकण्याची वेळ आल्याबरोबर आपली पूर्वीच कळविलेली उपसूचना मांडण्यासाठी टिळक सभापीठावर चढू लागले. स्वयंसेवकांनी त्यांना अडविलें. पण त्यांना बाजूला करून टिळक पायऱ्या चढून वर गेले. या नाट्यमय प्रसंगाचें वर्णन करताना इंग्लंडमधील एक प्रगतिशील पत्रकार हेन्री नेव्हिन्सन लिहितात :–

"आभाळात काळे ढग येऊन वीज कडाडावी आणि वादळ व्हावें त्याप्रमाणे टिळक थेट समोरून येऊन अध्यक्षाच्या खुर्चीपुढे उभे राहिले. ते कागाळी करीत होते, निषेध करीत होते, हरकत सांगत होते. पण हें सर्व काम त्यांच्या शांत व निश्चयी स्वभावाप्रमाणे सुरू होतें. त्यांचा तो आवाज ऐकून वाटे की, हा मनुष्य भवितव्यतेलाही तुच्छ मानीत आहे."

मालवी (स्वागताध्यक्ष) म्हणाले, "तुम्हांला तहकुबीची सूचना आणता येत नाही." टिळक म्हणाले "तुम्ही कोण? तुम्ही काही अध्यक्ष नाही." यावर डॉ. घोष म्हणाले, "मीही तुम्हांला तेंच सांगतो." त्यावर टिळक म्हणाले "तुमची निवडणूकच मुळी झालेली नाही. मी प्रतिनिधींना उद्देशून बोलत आहे." यापुढचें भाषण आरडा-ओरडीत कोणाला ऐकूच गेलें नाही. टिळक छातीवर हात आडवे घेऊन उभे होते. दोन्ही बाजूला नेमस्त पक्षातील तरुण लोक पायावर खडे उभे राहिले आणि थांबा, आता याचा सूड काढू असें म्हटल्याप्रमाणे ते हातवारे करीत होते! त्यांच्या मुठी वळलेल्या होत्या आणि वर तोंडें करून ते किंकाळत होते. सभापीठाच्या खाली टिळकांना ढकलून द्या असेंही कोणी ओरडत होते. टिळकांच्या पाठीमागे डॉ. घोष टेबलावर चढले. कर्कश व गलबल्याच्या आवाजात ते निषेधपर शब्द बोलत होते, पण वादळात ऐकू कोणास जाणार! ते घंटा वाजवीत. पण ती वाजविलेली दिसे मात्र. गोखल्यांचा स्वभाव शांत. ते शांत व्हा, शांत व्हा म्हणून नेमस्तांचा राग आवरीत होते, आणि दोन्ही हात पसरून टिळकांचा बचाव करण्याकरिता त्यांच्याजवळ जाऊन उभे राहिले. पण टिळकांना कोणाच्या संरक्षणाची गरज किंवा परवा नव्हती. त्यांचे ते छातीवर दुमडलेले हात आणि बिनदिक्कत मुद्रा पाहून वाटे की, हा मनुष्य अत्याचार व रक्तपात याला आव्हान करून म्हणतो, "ये, तुला काय माझें डोकेंबिकें मारावयाचें तें मार पाहू."

एरवी कोणी काय वाटेल तें केलें, वाटेल तें दिलें, कोणी स्वर्ग अथवा कोणी नरक आणून पुढे केला तरी मी पाऊलही हलविणार नाही.

पांढरा सफेद पोशाख केलेला समोरचा श्रोतृवृंद एखाद्या भरतीच्या समुद्राप्रमाणे गर्जत होता. इतक्यात हवेत एक जोडा उडाला व तो सुरेन्द्रबाबूंच्या गालाला चाटून पडला. त्याचें कातडें तांबूस, टोक अणकुचीदार आणि तळाला नाल मारलेलें होतें. तो पाहताच इषारा मिळाल्याप्रमाणे पांढऱ्या फेट्यांचे लोक लाटेप्रमाणे एकामागून एक प्लॅटफॉर्मवर चढले. ते लांब काठ्या परजीत होते. तोंडाने रागाचे फुस्कार टाकीत होते आणि दिसेल त्या नेमस्तावर काठ्या उगारीत होते. झालें, राष्ट्रीय सभा एका क्षणात समाप्त झाली. हिरवें कापड लावलेल्या टेबलावर उभे राहिलेल्या एका माणसाच्या पायांच्या फटीतून राष्ट्रीय सभा नाशाच्या कर्दमात हळू हळू रुतून बुडलेली मी पाहिली. बामीच्या लढाईत कवि गटे हजर होता. ती संपताच तो म्हणाला, "आज खरोखर एका नव्या मनूचा उदय झाला. आणि माझें सुदैव हें की, मी तो आपल्या डोळ्यांनी पाहिला." हिंदुस्थानासंबंधाने मला देखील हेच शब्द म्हणता येण्यासारखे होते."

—समग्र केळकर वाङ्मय, २ लोकमान्य खंड, पृ. २०९-२१०

दि. २७ चें वृत्त दादासाहेब खापर्डे यांनी आपल्या दैनंदिनीत पुढीलप्रमाणे लिहिलें आहे :

"दि. २७ – सकाळी मी, टिळक आणि डॉ. मुंजे प्रो. गज्जरच्या बंगल्यावर गेलो. मि. चुनीलाल म्हणाले की, मी सर पी. एम्. मेथांना आणि डॉ. रुदरफोर्ड यांना घेऊन येतो. पण ते निराश होऊन परत आले. त्यांनी आम्हांला मंडपात वाट पाहायला सांगितलें आणि आम्ही तेथे बसून राहिलो. परंतु त्यांच्याकडून जें उत्तर आलें तें निराशाजनक होतें. आम्हांला असें आढळून आलें की, मंडपामध्ये काही बदमाष लोक आणले होते. आणि ते कॉंग्रेसचे कार्यकर्ते आहेत असें दिसावें म्हणून त्यांना कॉंग्रेसचीं चिन्हें (बॅजेस) दिलीं होतीं. डॉ. गद्रे यांना ही गोष्ट कळली व त्यांनी ती उघडकीस आणली. आमचे सर्व लोक नेहमीप्रमाणे बसले होते. पण मी आणि टिळक मद्रास आणि संयुक्त प्रांताच्या प्रतिनिधींमध्ये बसलो होतो. काहीही तडजोड व्हावयाची नव्हती. कॉंग्रेसचें अधिवेशन जेव्हा पुन्हा सुरू झालें, तेव्हा सुरेन्द्रनाथबाबूंनी आपलें आघल्या दिवशीचें भाषण पुढे चालू केलें. त्यांचें म्हणणें लोकांनी थोडें बहुत ऐकून घेतलें. नंतर टिळकांनी पूर्वीच अध्यक्षांच्या ठरावाला उपसूचना दिली होती, ती सभेपुढे मांडण्याकरिता ते व्यासपीठावर चढले.

अध्यक्षांनी ही सूचना नियमबाह्य ठरविली. सर्व प्रतिनिधींच्या पुढे या मुद्द्याचा निर्णय करण्याकरिता आपलें म्हणणें काय आहे तें सांगावें अशी टिळकांची इच्छा होती. अध्यक्ष व मवाळ लोक याला परवानगी देईनात. कोण्या एका मवाळाने मला वाटतें अंबालालने टिळकांच्याकडे खुर्ची फेकली. त्यामुळे आमच्या पार्टीच्या सर्व लोकांना अत्यंत राग आला. टिळकांना एका मवाळाने जोडा फेकून मारला. तो प्रथम सुरेन्द्रनाथांच्या पाठीत बसला, व सर फेरोजशहा मेथांच्या गालाला चाटून गेला. सर्व मंडपात भयंकर गोंगाट झाला. आणि पुष्कळ तरुण मुलें व्यासपीठावर आली. मग मुक्त हस्ताने मारामारी झाली. डॉ. गद्रे यांना थोडें लागलें. भगत, डॉ. मुंजे आणि ठेंगडी आणि इतर बरेच लोक यांनी टिळकांचें रक्षण केलें. आणि त्यांना मंडपाबाहेर सुखरूप आणलें. मीही बाहेर आलो. आम्ही सर्वजण सी. पी. ( सेंट्रल प्रॉव्हिन्सेस) टेंटमध्ये बसलो. पोलिसांनी मंडप आपल्या ताब्यात घेतला. नेमस्तांनी हें वादळ आपल्या अंगावर ओढून घेतलें आणि त्यांच्यापैकी काहींना धक्के-बुक्के खावे लागले. मी आणि टिळक एका गाडीत बसून परत आलो. मलकापूरचे सावजी आमच्या समागमे बसले. आणि भगत गाडी चालविण्याच्या जागी जाऊन बसला. आमच्या पाठोपाठ पुष्कळ लोक येत होते आणि जयजयकार करीत होते. त्याला एका लहानशा मिरवणुकीचेंच स्वरूप आलें. त्या दिवशी दुपारी आणि संध्याकाळी हजारो लोक टिळकांना भेटायला आले. आणि त्यांच्या (प्रकृती) विषयी त्यांनी चौकशी केली. घरात माणसें मावेनात इतकी गर्दी झाली. आणि टिळकांचें दर्शन घेतल्यावाचून त्यांना शांत करता येईना. रात्री बराच वेळ प्रदीर्घ सल्ला मसलत झाली."

कै. दादासाहेब खापर्डे यांच्या या वर्णनावरून भारतीय राजकारणातील क्रांतिक्षण समजण्यात येणाऱ्या या सुरतेच्या महत्त्वाच्या पत्रात डॉ. मुंजे व राष्ट्रीय मंडळाने नागपूरच्या वतीने केवढा महत्त्वाचा भाग घेतला होता व टिळकांच्या परिसरात डॉ. मुंजे यांना केवढें महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें होतें याची कल्पना येते. केवळ लोकमान्यांच्या संरक्षणाचें दायित्वच त्यांनी पार पाडलें असें नाही, तर समेटाच्या वाटाघाटीत टिळकांनी डॉ. मुंजे यांना आपल्याबरोबर सतत घेतलेलें आहे.

असो. राष्ट्रीय सभा सुरतेला मोडली व ती सांधण्याचे टिळकांनी केलेले प्रयत्न यशस्वी झाले नाहीत. सर फेरोजशहा मेथा यांना समेट व राष्ट्रीय पक्षाशी हातमिळवणी मुळीच नको होती. नेमस्तांपैकी एक पुढारी सर चिमणलाल सेटलवाड आपल्या आठवणीत लिहितात :

"त्या दिवशी संध्याकाळी फेरोजशहा मेथा, वाच्छा, मी व नेव्हिन्सन जेथे रहात होतो त्या बंगल्यात पुष्कळ प्रतिनिधि एकत्रित आले. तेथे असें ठरलें की, कॉंग्रेसला आलेल्या प्रतिनिधींचें एक कन्व्हेन्शन् दुसऱ्या दिवशी भरवावें. मात्र त्यात ज्यांना वसाहतीच्या स्वराज्याचें ध्येय मान्य आहे व तेंही सनदशीर मार्गानेच मिळवावयाचें ज्यांना मान्य आहे अशांचेंच केवळ हें कन्व्हेन्शन् असावें. प्रमुख पुढाऱ्यांनी सह्या केलेला जाहीरनामा तदनुसार काढण्यात आला. दि. २८-ला हें कन्व्हेन्शन् भरलें. ज्यांच्याजवळ पास असेल त्यांनाच केवळ तेथे प्रवेश होता. तेथे कॉंग्रेसच्या घटनेत नव्या ध्येय व धोरणांनुसार बदल करण्याचें ठरलें. नवी घटना तयार करण्यासाठी एक समिति नेमण्यात आली. सन १९०८-च्या एप्रिल महिन्यात या समितीची बैठक अलाहाबादला भरली, व नवें ध्येय आणि धोरण मान्य असणाऱ्यांनाच कॉंग्रेसचें प्रतिनिधित्व असावें असा निर्णय घेण्यात आला. या नव्या घटनेनुसार कॉंग्रेसचे प्रतिनिधि निवडण्याचा अधिकार केवळ कॉंग्रेस कमिटयांना व कॉंग्रेसशी संबद्ध असणाऱ्या संस्थांनाच असून अन्य संस्थांना अथवा सार्वजनिक सभांना नव्हता. याचें पर्यवसान जहालपक्षाला कॉंग्रेसमधून बाहेर काढण्यात आपोआपच झालें. १९१५-मध्ये समेट होईपर्यंत टिळक व त्यांचे अनुयायी कॉंग्रेसच्या बाहेर राहिले.

"सुरतेच्या घटनेनंतर आपली चूक झाल्याचें ध्यानात घेऊन जहाल पक्षाने तडजोडीचे व कॉंग्रेसमध्ये येण्याचे पुष्कळ प्रयत्न केले. फेरोजशहा मेथांना त्यांच्या पुष्कळ मित्रांनी दडपण आणून तडजोड करण्याचा आग्रह केला. पण मेथांनी त्यांना नाउमेद केलें. एका जवळच्या मित्राने त्यांना असा आग्रह चालविला असता त्याला नकार देत ते म्हणाले, "मला असें म्हणणें भाग आहे की वाटेल तें करून तडजोड करण्याची भाषा हास्यास्पद भावनावशतेची आहे."

मेथा यांना वाटेल तें करून सरकारशी नमतें घेणें चालत होतें; पण राष्ट्रीय पक्षाशी संधि करणें चालत नव्हतें. परतंत्र देशात जो स्वातंत्र्याचें जनयुद्ध पुढे चालवील तोच राजकारणाचा नेता असतो. टिळकांचें हें नेतृत्व स्वयंभू होतें. त्यामुळे ते व त्यांचा पक्ष राष्ट्रीय सभेच्या बाहेर येताच तिला मवाळांच्या मजलसीपलीकडे स्वरूप व महत्त्व उरलें नाही. राष्ट्रातील बहुजन समाज जिला आपली म्हणेल व जी बहुजनसमाजाचें स्वातंत्र्याच्या लढ्यात प्रतिनिधित्व करील तीच राष्ट्रीय सभा. टिळक, अरविन्द प्रभृतींनी आपला पक्ष संघटित केला व एका बाजूला कलकत्त्याला ठरलेल्या कार्यक्रमांना जनमानसात स्थिरपद करावयाचें व

दुसऱ्या बाजूला मवाळांशी तडजोडीच्या वाटाघाटी करीत राहून राष्ट्रीय सभेच्या पुनरुज्जीवनाचा प्रयत्न करावयाचा असा त्यांचा प्रकट कार्यक्रम प्रारंभ झाला.

सुरतच्या संग्रामाने भारतीय राजकारणात नव्या युगाचा उदय झाला. राजकीय जागृतीचें लोण मूठभर सुशिक्षितांऐवजी जनतेत पसरलें व जनतेच्या आन्दोलनाचें पर्व भारतीय राजकारणात प्रारंभ झालें.



प्रकरण बारावें

# चळवळ, दडपशाही व हिंसा

१९०७-च्या भारतातील राजकीय वातावरणाचें वर्णन "चळवळ, दडपशाही व हिंसा" या तीन शब्दांत करता येईल. बंगालच्या फाळणीच्या रूपाने जो असंतोष लार्ड कर्झन यांनी चेतविला त्याचे प्रतिक्रियेच्या रूपाने उमटणारे परिणाम दडपून टाकण्याचें धोरण कर्झन यांच्या वारसदारांनी अवलंबिलें. स्वाभाविकपणेच त्याची प्रतिक्रिया अधिक उग्र होऊन "केला जरी पोत बळेंचि खाले। ज्वाला तरी ते वरती उफाळे॥" या न्यायाने लोकमत सरकारविरुद्ध खवळून गेलें. अत्याचार, अपमान बेपर्वाईच्या सरकारकडून सतत येणाऱ्या अनुभवामुळे जनमत सरकारविरुद्ध इतकें खवळलें होतें की, त्याचेंच पर्यवसान शेवटी काँग्रेससारख्या सनदशीर संस्थेतही दोन तट पडून ती सुरत येथे मोडली. वस्तुतः मवाळ व जहाल यांच्यात शब्दांच्या परिभाषेपलीकडे विशेष काय फरक होता? पण मवाळांचा शाब्दिक नरमपणा सुद्धा लोकांना मानवत नव्हता व जहालांच्या शाब्दिक गरमपणावर ते प्रसन्न होते. पण लोकक्षोभ एवढ्यावर थांबला नाही. सरकारची दमननीति जसजशी अधिक उग्रता धारण करू लागली तसतसा लोकांचा क्रोध वाढून 'जशास तसे' या न्यायाने अत्याचाराला शस्त्राचाराने म्हणजेच प्रत्यक्ष क्रियेने उत्तर देणाऱ्या क्रांतिकारक पक्षाचा उदय झाला. 'भारतीय स्वातंत्र्यसमर' या आमच्या ग्रंथात भारतातील शस्त्रक्रांतीच्या उदयास्ताचें संपूर्ण व सविस्तर समालोचन आम्ही केलेलें असल्यामुळे, तो ग्रंथ मुळातून पहावा असें वाचकांना सुचवून, आम्ही येथे त्याचा विस्तार करीत नाही. इतकेंच उल्लेखितो की, स्वातंत्र्यवीर सावरकरांनी महाराष्ट्रात गुप्तमंडळयाचें जाळें विणून या वेळी लंडनला प्रयाण केलें होतें व श्री. अरविन्द घोषांचे बंधु बारींद्रकुमार घोष यांच्या नेतृत्वाखाली बंगालमध्ये सशस्त्र क्रांतिकारक आन्दोलन प्रारंभ होऊन गुप्त समित्यांचें जाळें विणलें जात होतें. सुरत काँग्रेसला बारींद्र घोष आले होते व जाताना महाराष्ट्रीय क्रांतिकारकांशी आपले संबंध प्रस्थापित करून ते गेले. लोकमान्य टिळक, अरविन्द घोष व लाला लजपतराय या नेत्यांची क्रांतिकारक पक्षाला सहानुभूति व गुप्त साहाय्य होतें. "रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळेना। असा

भूतकालीन सिद्धान्त जाणा ।। स्वराज्येच्छुने पाहिजे युद्ध केलें । रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळालें? ।। " हा क्रांतिकारक पक्षाचा सिद्धान्त या थोर नेत्यांना संमत होता. किंबहुना या नेत्यांच्या प्रकट चळवळी भावी स्वातंत्र्ययुद्धाची पायाभरणी, जनमताची अनुकूलता साधून करीत होत्या असें म्हटलें तरी चालेल. म्हणूनच क्रांतिकारकांचे मुकुटमणि स्वातंत्र्यवीर सावरकर एकदा प्रकट सभेत टिळकांना श्रद्धांजलि समर्पण करताना असें म्हणाले होते की, " दिवसा लोकमान्य टिळक तुमचे गुरु असतील; पण रात्री ते आमचे गुरु होते. "

असो. सुरत काँग्रेसहून परतताना लोकमान्य टिळकांनी श्री. अरविन्द घोष यांना पुण्याला येण्याची विनंती केली. तदनुसार अरविन्द बाबू प्रथम पुण्याला आले. पुण्याला अरविन्द घोषांचा निवास गायकवाड वाड्यातच होता. तेथे त्यांचीं भाषणें झालीं. याच सुमारास हेमचंद्रदास व सेनापति बापट यांनी वीर सावरकरांच्या प्रेरणेने बाँब मॅन्युअल भारतात आणलें होतें. त्या मॅन्युअलमधील प्रक्रियेच्या अनुसार चित्रशाळा प्रेसच्या माडीवर लोकमान्य टिळक व अरविन्द घोष यांना बाँबचें प्रात्यक्षिक करून दाखविण्यात आलें.

पुण्याहून श्री. अरविन्द घोष अमरावतीस गेले. दि. २८ व २९ जानेवारीला त्यांचें अमरावतीला दादासाहेब खापर्डे यांच्याकडे वास्तव्य होतें. दि. ३०-ला अरविन्द घोष नागपूरला आले.

सुरतच्या संघर्षानंतर नागपूरच्या नेमस्तपक्षाचा राजकारणातील प्रभाव नष्ट व्हावयाच्या पंथास लागून राष्ट्रीय मंडळाचा प्रभाव, तेज आणि बळ वाढत चाललें होतें. यापूर्वी सुरतेला जाताना दि. २२ डिसेंबर १९०७-ला अरविन्द घोष नागपूरला एक दिवसासाठी थांबले होते. त्या वेळी रघुवीर थिएटरमध्ये ( हल्लीची नरसिंग टॉकीजची जागा ) त्यांचें एक भाषणही झालें होतें. या जानेवारी महिन्यात नागपूरला त्यांनी अधिक काळ वास्तव्य केलें व काँग्रेसमधील आपल्या राष्ट्रीय पक्षाच्या ध्येय व धोरणावर प्रकाश टाकणारीं काही भाषणें केलीं. या भाषणांतून एक जीवननिष्ठा म्हणून स्वदेशीच्या व्रताचा अंगीकार करावा असा त्यांनी उपदेश केला. ब्रिटिश कारखानदारांनी व व्यापाऱ्यांनी भारताच्या व्यापाराचा विनाश करून कशी आर्थिक नागवणूक केलेली आहे याचें विदारक चित्र त्यांनी आपल्या भाषणात रंगविलें. नागपूरला या वेळी अच्युतराव कोल्हटकर यांचें देशसेवक या नांवाचें पत्र निघत होतें याचा उल्लेख मागे केलाच आहे. देशसेवकने अरविन्दांच्या भाषणाचे समग्र वृत्तान्त प्रकाशित केले. त्याचा, संपादक अच्युतराव

कोल्हटकर यांना केवढा भुर्दंड सोसावा लागला याचें वर्णन पुढे करू. अरविन्द घोषांच्या या वास्तव्याने नागपूरच्या राष्ट्रीय पक्षाच्या कार्याला फार जोराची चालना मिळाली. नागपूरहून पबना येथील बंगाल प्रांतिक परिषदेला उपस्थित राहण्यासाठी अरविन्द घोष कलकत्त्याला गेले.

सावरकरांनी पाठविलेल्या बाँब मॅन्युअलचा प्रभाव लवकरच दिसून आला. बंगालमधील स्वदेशी आन्दोलनाला चिरडून टाकण्यासाठी सरकारने पशुवृत्तीचें त्या वेळी थैमान घातलें होतें. स्वदेशी आन्दोलनात भाग घेतल्याच्या अपराधावरून बंगालमधील घरंदाज तरुणांना पकडून भर रस्त्यावर अमानुषपणे फटके मारण्यात येत. या पशुत्वाचा सर्वांत भीषण आविष्कार मॅजिस्ट्रेट किंग्जफोर्ड याच्या वर्तनात दिसून आला. केवळ ' वंदे मातरम्'च्या उद्घोषासाठी त्याने अनेकांना अमानुष शिक्षा दिल्या. बाँबचें नवें साधनयंत्र हाती आलेल्या तरुण क्रांतिकारकांचा संताप त्यामुळे वाढून ३१ मार्च १९०८-ला त्याचा रौद्र आविष्कार बंगालच्या तप्त भूमीवर झाला. खुदिराम बोस नांवाच्या तरुणाने या दिवशी किंग्जफोर्डची गाडी असें समजून युरोपियन क्लबच्या जागेतून बाहेर पडणाऱ्या एका गाडीवर अग्निगोलक टाकला. त्याच्या दुर्दैवाने त्या गाडीत किंग्जफोर्ड नसून मि. केनेडी यांच्या कुटुंबातील दोन स्त्रिया होत्या. त्या मृत्युमुखी पडल्या. दुर्दैवी बिचारे मि. प्रिंगल केनेडी. त्यांची बायको व मुलगी ठार झाली. केनेडी हे काँग्रेसच्या चळवळीशी सहानुभूति राखणारे गृहस्थ असून काँग्रेसच्या काही अधिवेशनांना ते उपस्थितही होते. खुदिराम गीता हातात घेऊन हसत हसत फासावर चढले. त्यांचें उद्दिष्ट ध्यानात घेऊन लोकांनी त्यांची मनोमन पूजाच बांधली.

मुजफ्फरपूर येथे फुटलेल्या बाँबच्या धडधडाटाने नव्या क्रांतियुगाची प्रभात उजाडली. सरकार घाबरलें व पिसाळलेंही. जुन्या अत्याचारी कायद्यांना उजळा देण्यात येऊन नवे आवश्यक वाटले ते निर्माण करण्यात आले. स्फोटक पदार्थांसंबंधीचा कायदा व राजद्रोही सभांना बंदी घालणारा कायदा या वेळी नवा करण्यात आला. सरकारला वाटेल त्या माणसाला राजद्रोही म्हणून पकडण्यात येऊन पोलीस चौक्यांच्या व चौकशी तुरुंगाच्या यातनागृहात त्यांचे अमानुष छळ करण्यात येऊ लागले. सरकारच्या कोशागारात आजवर उपयोगात न आणलेलें एक ब्रह्मास्त्र तसेंच पडलेलें होतें. तें ब्रह्मास्त्र म्हणजे १८१८-चा रेग्युलेशन क्रमांक तीन होय. या रेग्युलेशनप्रमाणे सरकारला, नुसत्या संशयावरून कोणालाही, कारण न देता व खटला न भरता हद्दपार करता येत होतें.

या कायद्याचा सरकारने या वेळी उपयोग करावयाचें ठरविलें. या कायद्याने केवळ भारतीयच नव्हे तर सरकारच्या डोळ्यांत खुपणाऱ्या काही इंग्रज लोकांनाही अटकवून ठेवण्यात आलें व काहींना हद्दपारही करण्यात आलें. याच कायद्याने लाला लजपतराय व सरदार भगतसिगांचे चुलते सरदार अजितसिंग यांना पकडून पंजाब प्रांतातून हद्दपार करण्यात आलें होतें.

बंगाल व महाराष्ट्राप्रमाणेच नागपूर प्रांतावरही या वेळी सरकारची करडी दृष्टि होती. लहान-सहान गोष्टींतही सरकारला अनुशासनाचा भंग दिसे व तें पिसाळल्यासारखें करी. बंगालमध्ये खुदिरामच्या फाशीनंतर माणिकतोळा खटल्याच्या वेळी एकाहून एक ज्या क्रांतिकारक घटना घडू लागल्या त्यामुळे सर्वच प्रांतांतील सरकारी अधिकारी भयभीत होऊन पिसाळल्यासारखे झाले होते. नागपूर प्रांताचे चीफ कमिशनर सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक हे किंग्जफोर्डचाच दुसरा अवतार होते असें म्हटलें तरी चालेल. राष्ट्रीय पक्षाचे नागपूर वऱ्हाडातील वाढतें बळ पाहून त्यांच्या अंगाचा संताप होई. अशा स्थितीत या वर्षीच्या मे महिन्यात शिवाजी उत्सवानिमित्त लोकमान्यांचें अकोल्याला आगमन झालें. २ मे ते ६ मे टिळकांचें या प्रांतात वास्तव्य होतें. अकोला, खामगाव व मलकापूर या तीन स्थानांना त्यांनी भेटी दिल्या. टिळकांच्या या वास्तव्याचा मध्यप्रांत व वऱ्हाडातील लोकजागृतीच्या दृष्टीने अतिशय उपयोग झाला.

बंगालमधील बाँबच्या प्रस्फोटानंतर 'काळ' व 'केसरी' या पत्रांनी या नव्या युगाचा जो अन्वयार्थ आपल्या पत्रांतून विशद करून सांगितला त्याचें निमित्त करून सरकारने दि. ११ जूनला प्रथम काळकर्ते शिवराम महादेव परांजपे यांना अटक केली व त्यानंतर बरोबर बारा दिवसांनी दि. २३ जून १९०८-ला लोकमान्य टिळकांना अटक करण्यात आली. टिळकांना अटक करण्यात मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क (नंतरचे लॉर्ड सिडनहॅम) यांचाच खरा पुढाकार होता. चाफेकर प्रकरणापासूनच क्रांतिकारकांचे पाठिराखे म्हणून टिळकांवर मुंबई सरकारचा राग होता. भारतातील असंतोषाचे व नव्या क्रांतियुगाचे टिळक हेच आधारस्तंभ असून पुरावा असला वा नसला तरी त्यांना पकडून प्रदीर्घ शिक्षा दिली म्हणजे सरकारविरोधाची उचंबळलेली लाट आपोआप विराम पावेल अशी सर जॉर्ज क्लार्क यांची धारणा होती. आपल्या आत्मचरित्रपर पुस्तकात ते लिहितात, "टिळकांचें वर्चस्व कसें वाढत आहे ही गोष्ट मी काळजीपूर्वक पाहिली. परंतु टिळकांची क्रांतिकारक

चळवळ थांबविणें जरूर आहे असें मला वाटलें तेव्हा मी पुढे सरसावलो. अशा खटल्यात मुख्य गोष्ट लक्षात घ्यावी लागते ती ही की, खरोखर गुन्हा शाबीत न झाला व आरोपीला शिक्षा न झाली तर त्याचें लोकांत वजन वाढतें व लोक तें एक मोठें गाऱ्हाणें करून बसतात. अर्थात् या गोष्टीत धोका आहे. पण मी व माझ्या बरोबरीचे कौन्सिलर यांनी हा धोकाही पत्करण्याचें ठरविलें. "

वस्तुत: त्या वेळचे सेक्रेटरी ऑफ स्टेट लॉर्ड मोर्ले हे टिळकांवर हा खटला करण्याच्या पूर्णपणे विरुद्ध होते. पण मुंबईच्या गव्हर्नरने स्वत:च्या हेक्याने हा खटला चालविला व सरकारी प्रतिष्ठेचा प्रश्न उपस्थित झाल्याने मोर्ले यांना त्याला विरोध करणें अशक्य ठरलें. दि. १३ जुलैला लोकमान्यांच्या वरील खटला प्रारंभ झाला व दि. २२ जुलैला रात्री १०॥ वाजता त्यांना सहा वर्षे काळें पाणी व एक सहस्र रुपये दंडाची शिक्षा सांगण्यात आली. या गंभीर घटनेच्या वेळी लोकमान्य टिळकांनी जे उद्गार काढले ते साहित्यात अमर झाले असून स्वतंत्र भारतात, ज्या खोलीत त्यांना ही शिक्षा सुनावण्यात आली तेथे (मुंबई हायकोर्ट) ते टंकित करण्यात आले आहेत. ते अमर उद्गार पुढीलप्रमाणे :

" ज्यूरीने मला दोषी ठरविलें तर खुशाल ठरवो; पण मी गुन्हेगार नाही. लौकिक गोष्टींचें नियंत्रण करणारी अशीही एक शक्ति न्यायपीठाहूनही वरिष्ठ आहे. कदाचित् ईश्वराची इच्छाच अशी असेल की, मला शिक्षा व्हावी, आणि मी शिक्षा भोगल्याच्या कारणानेच मी अंगीकारलेल्या कार्याला ऊर्जित दशा यावी. "

लॉर्ड मोर्ले यांना सर जॉर्ज क्लार्क अथवा लार्ड सिडनहॅम यांचें हें कृत्य संपूर्णपणे खुनशीपणाचें व चुकीचें वाटत होतें. उदाहरणार्थ, या शिक्षेनंतर पुढच्याच महिन्यात त्यांनी लॉर्ड सिडनहॅम यांना पाठविलेलीं पत्रें पहा. दि. ३१ जुलैला पाठविलेल्या पत्रात मोर्ले लिहितात :–

मला या टिळक प्रकरणाविषयी पुन्हा चर्चा करण्याची इच्छा नाही. तथापि मी असें म्हणतो की, मला अगर तुमचे कायदेपंडित यांना योग्य मान देऊन त्यांचा व माझा सल्ला घेतला असता तर तो अशाच अर्थाचा मिळाला असता की टिळकांना तुम्ही हात लावू नये. टिळकांना झालेल्या शिक्षेच्या योगाने जे अनिष्ट परिणाम होतील त्या मानाने स्वत: टिळकांनी केलेल्या अनिष्ट गोष्टींचे परिणाम कमी घातक ठरले असते. पण दूध तर लवंडलें. आता हळूहळून काय उपयोग ?

पुनश्च दि. ७ ऑगस्टला लिहिलेल्या पत्रात मोर्ले लिहितात :

"टिळकांवरील खटल्याचें तुम्ही मोठेंच समर्थन केलें. तरी त्यामुळे माझें मत बदलू शकत नाही. कायदा व नीति यांच्या दृष्टीने तुमचें करणें बरोबर असेल. त्यापासून तात्पुरता फायदा होईल. परंतु अंतिम परिणाम ताजव्यात घालून जोखले तर कोणतें पारडें खाली व कोणतें वर जाईल हाच राजकारणाच्या दृष्टीने मुख्य मुद्दा आहे. सर्व गोष्टी कालाने कळून येतीलच."

मुंबईचे हे गव्हर्नर फार हट्टी असून तामसी होते. अहंकार व टिळकांविषयीचा विद्वेष यांनी त्यांना इतकें पछाडलेलें होतें की, त्यांनी आपल्या आत्मचरित्रात मोर्ले यांच्यावर पुढीलप्रमाणे आग पाखडली आहे.

"मोर्ले यांना आपल्या बुद्धिमत्तेची फार घमेंड म्हणून टिळकांवरील खटल्याचें मर्म माझ्यापेक्षा आपल्याला अधिक समजतें असें त्यांच्या मनाने घेतलें हें स्वाभाविकच आहे. पण जाग्यावर मी उभा, मलाच त्यांच्यापेक्षा खरें मर्म माहीत असणार. मी तें कागदावर परोपरीने यथार्थ कसें कळवू शकणार? मी दूर होतो आणि इतर सल्लागार त्यांना हाताशी होते."

—समग्र केळकर वाङ्मय, २ लोकमान्य खंड, पृ. २९८

असो. मुंबई प्रांताच्या गव्हर्नरांच्या या द्वेषपूर्ण वागण्याचे परिणाम चांगले होणार नाहीत हें ध्यानात आल्यामुळे मोर्ले यांनी पुढे दि. १ जुलै १९१०-ला अशी आज्ञा घोषित केली की, यापुढे स्थानिक सरकारांनी राजकीय खटले भरताना तीं प्रकरणें आधी भारत सरकारला कळविलीं पाहिजेत.

असो. टिळकांना सरकारने ही जी दारुण शिक्षा केली ती अशा समजुतीने केली की, वृद्ध व मधुमेहाच्या दुर्धर रोगाने पोखरलेले टिळक बहुधा जिवंत परत येणार नाहीत. अँग्लो-इंडियन वृत्तपत्रांनी तर या शिक्षेवर याच स्वरूपाचे दुष्ट अभिप्रायही व्यक्त केले होते. टिळकांना शिक्षा झाल्यावर भारतातील त्यासंबंधीचा जनक्षोभ तीव्रतेने तर अनेक ठिकाणी दंग्या-धोप्यांच्या रौद्र स्वरूपात व्यक्त झाला. मुंबईला संप झाला व सरकारने दंगा मोडण्यासाठी जो गोळीबार केला त्यांत ७५ लोक ठार झाले.

टिळकांच्या अटकेची वार्ता त्याच दिवशी दूरध्वनीच्या साहाय्याने नागपूरला कळविण्यात आली. वातावरण स्वाभाविकपणेच अत्यंत क्षुब्ध झालें. दुसऱ्या दिवशी संपूर्ण नागपूर शहरात कडकडीत हरताळ पडला. विद्यार्थिवर्गात तर हा क्षोभ अतिशय तीव्र होता. शाळा व कॉलेजें ओस पाडून विद्यार्थ्यांची मोठी मिरवणूक सरकारच्या धिक्का-

राच्या गर्जना करीत निघाली. या मिरवणुकीच्या मार्गावरून मॉरिस कॉलेज्चे त्या वेळचे प्रिन्सिपॉल मि. जोन्स हे आपल्या टांग्यातून जात असता रागाने विद्यार्थ्यांनी त्यांच्या अंगावर दगड फेकावयास सुरवात केली. शेवटी जोन्सला खास पोलिसांच्या संरक्षणाखाली आपला बंगला कसाबसा गाठावा लागला. संध्याकाळी टिळकांच्या अटकेच्या निषेधार्थ चिटनवीस पार्कच्या मैदानात लोकांचे थवेच्या थवे जमू लागले. मुंबईच्या गव्हर्नराच्याच मनोवृत्तीचे असणारे नागपूरचे चीफ कमिशनर सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक यांनी संतापून या लोकांची पांगापांग करण्यासाठी त्यांच्यावर लष्कर घातलें व सभाबंदीची आज्ञा काढली. यानंतर वातावरण थोडेसें निवळल्यावर डॉ. मुंजे यांच्या नेतृत्वाखाली दि. १९ ऑगस्ट १९०८-ला व्यंकटेश थिएटरसमोर एक प्रचंड सभा होऊन त्या सभेत लोकमान्य टिळकांच्या तत्काळ सुटकेची एकमुखी मागणी करण्यात आली. दुसरा महत्त्वपूर्ण ठराव असा करण्यात आला की, " ज्या अर्थी लोकनेत्यांना अन्यायाने व बळजोरीने तुरुंगात डांबण्यात आलें आहे त्या अर्थी सरकारने दिलेल्या या आव्हानाला उत्तर देण्यासाठी व वस्तुस्थितीकडे ब्रिटिश राज्यकर्त्यांचें लक्ष वेधावें यास्तव ही सभा हिंदुस्थानवासीयांना अशी विनंती करते की, त्यांनी ब्रिटिश मालावर संपूर्णपणे व कडकडीत बहिष्कार घालावा." याच स्वरूपाच्या सभा राष्ट्रीय मंडळाच्या प्रेरणेने सर्व प्रांतभर घेण्यात येऊन हा ठराव सर्वत्र संमत करण्यात आला. हा ठराव म्हणजे केवळ नेत्यांवरील आपत्तीबद्दलचें दुःख प्रदर्शन नसून नेत्याने दिलेल्या परिणामकारक कार्यक्रमाचा प्रत्यक्ष क्रियाशील पुरस्कारच होता. वाढत्या सरकारी दडपशाहीला उद्देशून या वेळी माधवराव सप्रे यांनी आपल्या हिंद केसरीत "तुम्ही आम्हांला रडूही देणार नाही काय?" अशा शीर्षकाचें संपादकीय लिहिलें होतें. डॉ. मुंजे यांनी टिळकांच्या शिक्षेने निर्माण झालेल्या लोकक्षोभाला विधायक वळण दिलें. त्यांच्या प्रेरणेने साऱ्या प्रांतातून झालेल्या सभांतून स्वदेशीच्या व्रताच्या व ब्रिटिश मालावरील बहिष्काराच्या सामुदायिक शपथांचा कार्यक्रम करण्यात आला. हें आन्दोलन सरकारला इतकें दुस्सह झालें की, शेवटी वऱ्हाडचे कमिशनर सर फ्रँक स्लाय यांनी यवतमाळला राष्ट्रीयपक्षाच्या सर्व पुढाऱ्यांना एकत्रित करून त्यांना असा दम भरला की, हें स्वदेशी-बहिष्काराचें आन्दोलन तत्काळ थांबवावें. अन्यथा सरकार या संबंधात अत्यंत कडक धोरण अवलंबील. प्रत्येक ठिकाणी प्युनिटिव्ह पोलिस नियुक्त करून साऱ्या बेकायदेशीर कृत्यांना खणून काढण्यात येईल."

सरकारी अधिकाऱ्यांकडून येणाऱ्या या धमक्या पोकळ नव्हत्या. नागपूर व वऱ्हाडात सरकारी दडपशाहीचा वरवंटा फिरू लागलाच होता. यवतमाळचे हरिकिशोर व नागपूरचीं देशसेवक आणि हिंद-केसरी हीं राष्ट्रीय पक्षाचीं वृत्तपत्रें चिरडून टाकण्याचें सरकारने ठरवून त्या दृष्टीने पाऊल उचललें. पृथ्वीगीर हरिगीर गोसावी यांच्यानंतरचे हरिकिशोरचे संपादक श्री. नरहर विठ्ठल भावे यांच्यावर खटला भरून सरकारने त्यांना पांच वर्षें सश्रम कारावासाची शिक्षा ठोठावली व छापखाना एकदम जप्त करून त्याला टाळें ठोकलें. दि. २१ ऑगस्ट १९०८-ला हिंदी केसरीचे संपादक श्री. माधवराव सप्रे हे आपल्या कार्यालयात असतानाच त्यांना अटक करण्यात आली. त्यांच्या घराची व कार्यालयाची कसून झडती घेण्यात आली. ते आजारी असून व त्यांच्यासाठी जामीन रहावयास अनेक लोक पुढे आले असूनही त्यांना तुरुंगात कोंबण्यात आलें. देशसेवकचे संपादक श्री. अच्युतराव कोल्हटकर हे त्याच दिवशी कलकत्ता मेलने नागपूरला आले. ते नागपूर स्टेशनवर आले तोंच त्यांना स्टेशनवरच अटक करण्यात आली. स्वत: डॉ. मुंजे त्यांच्यासाठी जामीन रहावयास तयार असूनही त्यांची मध्यवर्ती तुरुंगात रवानगी करण्यात आली. श्री. माधवराव सप्रे यांचा आजार तुरुंगात वाढीस लागल्यामुळे त्यांच्या मित्रांनी व नातलगांनी त्यांच्यावर अतिशय दडपण आणलें व शेवटी त्याला बळी पडून त्यांनी आपल्या लेखांबद्दल सरकारची लेखी माफी मागितली, व त्यांची सुटका झाली. अच्युतराव कोल्हटकरांच्यावरील खटला सरकारने आकसाने चालविला. या खटल्यात मागे उल्लेखिलेले श्री. अरविन्द घोषांच्या भाषणाचे वृत्तान्त पुरावा म्हणून दाखल करण्यात आले. अच्युतरावांना अठरा महिन्यांच्या सश्रम अशा कठोर कारावासाची शिक्षा ठोठावण्यात आली. श्री. रामलाल बाजपेयी यांनी देशसेवकमध्ये परदेशी साखरेच्या भारतातील आयातीसंबंधी व विक्रीसंबंधी या वेळी एक कडक लेख लिहिला होता. त्याबद्दल त्यांच्यावरही खटला भरण्यात आला. त्यांच्या वतीने बाबू पुरुषोत्तमदास टंडन यांनी वकीलपत्र घेतलें व खटला लढविला. हायकोर्टाने रामलाल बाजपेयींना निर्दोष म्हणून सोडून दिलें. रामलाल बाजपेयी पुढे क्रांतिकारकांचे अग्रणी झाले व अमेरिकेत स्थायिक झाले.

केवळ वृत्तपत्रांच्या संपादकांवरच नव्हे तर समाजातील सर्वच थरांवर या वेळी सरकारने आपली क्रुद्ध दृष्टि रोखली होती. भंडारा जिल्ह्यातील रामपायलीला शिवराजसिंग या नांवाचा एक पेन्शनर तहसीलदार रहात होता. टिळकांच्या अटकेसंबंधी शोक व सहानुभूति

व्यक्त करण्यासाठी रामपायलीला एक मिरवणूक निघाली होती. या मिरवणुकीत भाग घेण्याच्या अपराधावरून त्यांचें पेन्शन जप्त करण्यात आलें. मोहगावच्या बालाजी नारायण या नांवाच्या एका शिक्षकाने राजकीय सभेत उपस्थित राहण्याचें पातक केल्यामुळे त्याला नोकरीवरून काढून देण्यात आलें. वीर वामनराव जोशी हे त्या वेळी शिवाजी राष्ट्रीय विद्यालयात अध्यापक होते. त्यांनी नागपूरच्या गणेशोत्सवात केलेलें एक भाषण राजद्रोही आहे असें सरकारने ठरविलें. त्यांना पांचशे रुपयांची एक अशा चार जामिनक्या व एक सहस्र रुपयांचा पर्सनल बाँड मागण्यात आला. वामनराव जोशी यांनी जामिनकी देण्याचें नाकारल्यामुळे त्यांना एक वर्षाची कैदेची शिक्षा देण्यात आली.

सन १९०८-च्या नोव्हेंबर महिन्यात नागपूरला कस्तुरचंद पार्कमध्ये सरकारच्या वतीने एक औद्योगिक प्रदर्शन भरविण्यात आलें. या प्रदर्शनाला चीफ कमिशनर क्रॅडॉक यांनी स्वत: देणगी दिली होती. या प्रदर्शनाला मवाळांनी संपूर्ण पाठिंबा दिला तर राष्ट्रीय पक्षाच्या लोकांनी अलिप्तता पाळली. या प्रदर्शनाच्या उद्घाटनानंतर लवकरच असें उघडकीस आलें की, जवळच असलेल्या महाराज बागेतील राणी व्हिक्टोरियाच्या पुतळ्याच्या तोंडाला डांबर फासून त्याची विटंबना करण्यात आली आहे. हा अर्थातच भयंकर स्वरूपाचा अपराध होता व अपराधी शोधून काढण्यासाठी पिसाळलेल्या चीफ कमिशनरने पोलिसांना शोधाचे सर्वाधिकार दिले. या विशिष्ट जागेपासून जवळच ॲग्रिकल्चरल कॉलेजचें वसतिगृह होतें. पोलिसांनी संशयावरून या वसतिगृहाचे सुपरिंटेंडेंट श्री. नारायणराव परांजपे, दोन ओव्हरसीयर्स व वसतिगृहात राहणारा एक विद्यार्थी यांना अटक केली. खालच्या न्यायालयात या लोकांवरील आरोप सिद्ध न होऊ शकल्यामुळे सरकारने हायकोर्टाकडे धाव घेतली. पण तेथेही सरकारच्या पदरी अपयश येऊन हे लोक निर्दोषी ठरले. तरीही श्री. परांजपे यांच्या नोकरीवर गदा यायची ती आलीच. शेवटी अपराधी सापडत नाही असें पाहून अपराधी पकडून देणाऱ्यास अथवा त्यांच्यासंबंधी माहिती सांगणाऱ्यास सरकारने एक सहस्र रुपयांचें पारितोषिक घोषित केलें. तरीही अपराध्यासंबंधी काही सुगावा लागला नाही व माहिती सांगावयास कोणीही पुढे आला नाही. इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस मि. क्लीव्हलँड यांनी राष्ट्रीय पक्षाच्या डॉ. मुंजे प्रभृति सर्व पुढाऱ्यांना एकएकटे भेटीला बोलावून त्यांची उलट तपासणी केली, पण त्यापासून काही एक निष्पन्न झालें नाही. सरकारी अधिकाऱ्यांची प्रत्येक प्रकरणाकडे पाहण्याची

दृष्टि कशी विकृत व संशयी झाली होती याचें एक प्रमाण येथे देता येण्यासारखें आहे. सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक हे आपल्या आठवणीत लिहितात,

"ज्या वेळी मी राणीच्या पुतळ्याच्या विटंबनेच्या प्रकाराची चौकशी करण्यासाठी नोव्हेंबरच्या शेवटी शेतकी कॉलेजच्या वसतिगृहात गेलो त्या वेळी मला तेथील कित्येक विद्यार्थी व मुलें यांची वागणूक अत्यंत उद्धट व चीड आणणारी दिसली. या गोष्टीचा निर्देश करण्याची आवश्यकता आहे की, यानंतर थोड्याच दिवसांनी शोध केल्यावर मला असें आढळून आलें की, या वसतिगृहात विकृत स्वरूपाच्या देशभक्तिपर वाङ्मयाचा मोठा साठा असून त्याच्या प्रसाराच्या कार्यात या वसतिगृहाच्या चालकांनी महत्त्वाचा भाग घेतलेला आहे."

विद्यार्थ्यांनी वसतिगृहात स्वदेशासंबंधी काही वाचणें व स्वाभिमानाने मान ताठ करून वावरणें हें देखील अधिकाऱ्यांना क्रांतिकारक पक्षाच्या अस्तित्वाचें चिन्ह वाटावें इतके हे अधिकारी त्या वेळी विकृत दृष्टीचे व हळव्या मनाचे झाले होते असाच याचा अर्थ नाही काय ?

या वेळी सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक यांनी लॉर्ड मिन्टो यांच्यापासून स्फूर्ति घेऊन हिंदूंना राजद्रोही समजून खड्यासारखे दूर फेकण्याचा व मुसलमानांना गोंजारून आणि दोन समाजांत तेढ वाढवून स्वातंत्र्यवादी पक्षाचें बळ खच्ची करण्याचा उपक्रम प्रारंभ केला. ब्रिटिश सरकारने भारतातील स्वातंत्र्यवादी पक्षाला उत्तर म्हणून इ. स. १९०६-पासून हें धोरण प्रारंभ केलें होतें. १९०६-च्या ऑक्टोबर महिन्यात सरकारी प्रेरणेवरून आगाखान ह्यांच्या नेतृत्वाखाली मुसलमानांचें एक शिष्टमंडळ सिमल्याला लॉर्ड मिन्टो यांना भेटलें. या मंडळाने मुसलमानांचा इतिहास व ते करीत असलेली साम्राज्याची सेवा लक्षात घेता त्यांना स्वतंत्र प्रतिनिधिकत्व असावें अशी मागणी केली. व्हॉइसरायांनी या मागणीला आशीर्वाद दिला. मिन्टो यांच्या या कृत्यासंबंधी लेडी मिन्टोने आपल्या डायरीत असा अभिप्राय व्यक्त केला आहे की, "Nothing less than the pulling back of sixty two millions of people from joining the ranks of the seditious opposition." ( सहा कोटि लोकांना राजद्रोहीं चळवळीपासून बाजूस ओढून काढण्याचें हें कार्य होतें. )

मिन्टो यांच्या आश्वासनाच्या भरंवशावर ऑल इंडिया मुस्लिम लीगची स्थापना झाली. तिचें पहिलें अधिवेशन १९०६-च्या डिसेंबरमध्ये झालें. सन १९०८-च्या सेक्रेटरी ऑफ स्टेटला पाठविलेल्या प्रतिवृत्तात हिंदुस्थान सरकारनें मुसलमानांना स्वतंत्र मतदारसंघ द्यावे असें सुचविलें होतें. त्या प्रतिवृत्तात हिंदुस्थान सरकारने आपला असा अभिप्राय व्यक्त केला होता की, हिंदुस्थानातील मुसलमान म्हणजे एक धार्मिक

संघटन आहे. ती एक स्वतंत्र जाति असून विवाह, अन्न, चालीरिती इत्यादि सर्व बाबतीत ते हिंदूहून इतके भिन्न आहेत की, हिंदु व मुसलमान यांना एक समजणें चुकीचें आहे. यानंतर मोर्ले-मिन्टो सुधारणेच्याद्वारे या भेदनीतीचा पाया घातला गेला. सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक हे मध्यप्रदेशात याच सूत्राचा अवलंब करून मुंजे प्रभृतींनी निर्माण केलेले राष्ट्रीय पक्षाचें बळ खच्ची करण्याचा प्रयत्न करीत होते. १९०८-पूर्वी नागपुरातील व मराठी मध्यप्रांतातील हिंदु-मुसलमानांच्या संबंधात कोणताही बिघाड झालेला नव्हता. सन १८९१-च्या शिरगणतीप्रमाणें मध्यप्रांताच्या ८८ लक्ष लोकसंख्येत केवळ दोन लक्ष मुसलमान होते. त्यानंतर वऱ्हाडचा अंतर्भाव मध्यप्रदेशात झाला. तरीसुद्धा प्रतिशत चारच्या पलीकडे त्यांच्या संख्येची वाढ झाली नाही. बाकीच्या प्रांतांप्रमाणे मध्यप्रांतातही मुसलमान समाज असा काँग्रेसमध्ये शिरला नाही, व त्याच्यावर राष्ट्रीय आंदोलनाचा प्रभावही पडला नाही. काही उल्लेखनीय मुसलमान पुढारी सार्वजनिक कार्यात भाग घेत; पण त्यांच्यात हिंदूविषयी दुजाभाव नसून ते राष्ट्रीय मनोवृत्तीच्या हिंदु पुढाऱ्यांच्या खांद्याला खांदा लावून एकोप्याने काम करीत असत. याची काही उदाहरणें पाहण्यासारखीं आहेत. सन, १८९९-मध्ये "यंगमेन्स महॉमेडन् सोसायटी" या नांवाची एक संस्था स्थापन झाली. या संस्थेचें उद्घाटन राष्ट्रीय पक्षाचे अध्वर्यु दादासाहेब खापर्डे यांनी केलें. इतकेंच नव्हे तर दादासाहेबांना या संस्थेचे आजीवन अध्यक्ष करण्यात आलें. मि. अबदुल रझाक झकीर हे मुसलमान गृहस्थ या संस्थेचे कार्यवाह होते. शिवनीचे महम्मद मूर्तिझाखान हे नागपूरच्या गोरक्षण सभेचे निष्ठावंत साहायक असून नागपूरचे खानबहादुर मलक यांनी तर गोमांस भक्षणाविरुद्ध मोठी चळवळच केली होती.

सर रेजिनाल्ड क्रॅडॉक यांनी सन १९०६-पासूनच या वातावरणात भेदनीतीचें विष कालवावयास प्रारंभ केला. १२ नोव्हेंबर १९०६-ला त्यांनी उमरावतीला भेट दिली असताना तेथील मुसलमान समाजाने त्यांना मानपत्र दिलें. या मानपत्राला उत्तर देताना त्यांनी मुसलमानांच्या राजनिष्ठेची प्रशंसा करून काँग्रेसच्या उपद्व्यापी चळवळीपासून दूर राहण्यातच त्यांचें कल्याण व त्यांच्या हितसंबंधांचें संरक्षण होईल असें सांगितलें. शिक्षण, पोलीस, जंगलखातें, न्यायखातें, व अंमलबजावणी खातें या राज्यकारभाराच्या सर्व खात्यांतून त्यांनी अलीगडी मुसलमानांची भरती केली व भेदनीतीच्या त्यांच्या कारस्थानाला यश येऊ लागलें. क्रॅडॉक यांच्या कारभारापूर्वी नागपुरात मुसलमानांची संख्या नगण्य असताही

नागपूर नगरपालिकेच्या पंचवीस सभासदांत आठ मुसलमान सभासद निवडून आले होते. पण क्रॅडॉक यांच्या धोरणामुळे पुढे या दोन समाजांत इतका दुजाभाव निर्माण झाला की, सन १९०६-च्या निवडणुकीत नगरपालिकेच्या बावन सभासदांत केवळ तीन मुस्लिम सभासद निवडून येऊ शकले. १९०८-च्या स्वदेशी आंदोलनाला दडपून टाकण्याच्या प्रयत्नात सर क्रॅडॉक यांनी नागपूरच्या अंजुमन हायस्कूलला भेट दिली. व तेथील मुसलमान संचालकांना त्यांनी आपल्या विद्यार्थ्यांना राष्ट्रीय चळवळीपासून दूर राखण्याचें शतकृत्य केल्याबद्दल धन्यवाद दिले. सर रेजिनाल्ड क्रॅडॉक यांची नागपूरच्या सामाजिक जीवनाला देणगी म्हणजे नागपूरच्या हिंदु-मुसलमानांतील वाढती तेढ होय. हिंदु-मुस्लिम समस्या यानंतर या प्रांतात वाढतच गेली. एके काळी गोरक्षण सभेचे काम करणारे खानबहादुर मलिक सन १९०९-मध्ये दिल्लीला आगाखान यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या मुस्लिम लीगच्या अधिवेशनाला उपस्थित राहिले. त्यांनी मध्यप्रांतात मुस्लिम लीगच्या स्थापनेचें कार्य अंगावर घेऊन लीगचें अधिवेशन नागपूरला बोलावलें. दिल्लीचे महम्मद यूसफखान यांना प्रचारासाठी नागपूरला बोलावण्यात आलें. या गृहस्थानें सर्व प्रांतभर दौरा करून मुस्लिम जनमत लीगच्या बाजूला वळविलें. पांच महिने या गृहस्थाचा दौरा चालू होता. मध्यप्रांतातील नामवंत असे मुस्लिम समाजाचे नेते लीगला मिळाले. दि. ३० डिसेंबर १९१०-ला नागपूरला जें मुस्लिम लीगचें अधिवेशन झालें त्यात मुस्लिम समाजाचा अपूर्व उत्साह प्रत्ययास आला. बॅरिस्टर सय्यद नबीबुल्ला हे या अधिवेशनाचे अध्यक्ष होते व खानबहादूर मलिक हे स्वागताध्यक्ष होते. या अधिवेशनातून लाळघोटेपणाच्या भूमिकेवरून ब्रिटिशांविषयी राजनिष्ठा व्यक्त करण्यात आली. लॉर्ड सिन्हा यांच्या जागी व्हॉइसरायच्या कार्यकारी मंडळात सय्यद अली इमाम यांची नियुक्ति करण्यात आल्याबद्दल लॉर्ड मोर्ले व मिन्टो यांचें अभिनंदन या अधिवेशनात करण्यात आलें व मुसलमानाला गव्हर्नर करण्यात यावें अशीही मागणी करण्यात आली. विशेष म्हणजे चीफ कमिशनर क्रॅडॉक हे मुसलमानांना देत असलेल्या साहाय्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करून उर्दू भाषेला सर्व प्रकारे साह्य करण्यात यावें अशी मागणी करण्यात आली. एका ठरावाच्या द्वारे अशी मागणी करण्यात आली की मध्यप्रांत व वऱ्हाडसाठी लेजिस्लेटिव्ह कौन्सिल निर्माण करून त्यांत मुसलमानांना योग्य प्रतिनिधित्व देण्यात यावें. सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक हे या अधिवेशनातील मुस्लिम शिक्षण परिषदेला स्वतः उपस्थित राहिले व तेथे केलेल्या भाषणात त्यांनी असें

सांगितलें की, सरकार उर्दू संबंधात सौहार्दपूर्ण दृष्टिकोन ठेवील. यानंतर मध्यप्रांत सरकारने मुस्लिम लोकसंख्येच्या प्रमाणाहून कितीतरी अधिक संख्येने मुसलमान अधिकाऱ्यांची निवड केली व राष्ट्रीय पक्षाचे जें जें सामर्थ्यकेन्द्र वाटलें तेथे तेथे या अधिकाऱ्यांची बुद्धिपुरस्सर नियुक्ति करण्यात आली. यानंतर हिंदुमुसलमानांची तेढ विकोपास जाऊन प्रति-वर्षी दंगे वाढत गेले व त्या प्रत्येक वेळी सरकारी धोरण मुसलमानांना प्रोत्साहनाचें राहिलें. या धोरणाची खरी सुरवात जरी १९०६-पासून असली तरी सन १९०८-मध्ये त्याचीं पावलें स्पष्ट दिसू लागलीं होतीं.

एका बाजूला सरकारी दडपशाही व दुसऱ्या बाजूला भेदनीति यांना तोंड देत डॉ. मुंजे यांच्या नेतृत्वाखाली राष्ट्रीय मंडळ या प्रांताचें राजकारण कुशलतेने चालवीत होतें. स्वदेशी व बहिष्काराबरोबरच मद्यपाननिषेधाचीही चळवळ राष्ट्रीय मंडळाने आपल्या हाती घेतली. मद्यविक्रीच्या दुकानावरील निरोधन हा त्यांतीलच एक कार्यक्रम होता. मद्यपान केवळ सामाजिक दोष म्हणूनच नव्हे तर परक्या मद्याच्या द्वारे परदेशाचे खिसे भरण्याचें एक साधन म्हणूनही राष्ट्रभक्तांच्या दृष्टीने निषेधार्ह होतें. स्वदेशीच्या आंदोलनाने भारलेल्या तरुणवर्गाने अनेक लोकांकडून दारूबंदीच्या शपथा घेवविल्या. दारूच्या दुष्परिणामांचें विदा-रक चित्र रंगवून तिच्या विरुद्ध जनमत बनविण्याच्या दृष्टीने प्रबल उठाव झाला. ठिकठिकाणी पंचायत सभा स्थापन झाल्या व त्यांच्याद्वारे जे दारू पितील त्यांच्यावर सामाजिक बहिष्कार पडू लागला. बंगाल, मुंबई व मध्यप्रांत येथे या आंदोलनाने जें उग्र स्वरूप धारण केलें त्यामुळे सरकारच्या रागात अधिकच भर पडली. मद्यविक्रीच्या दुकानांवर निरोधन करणारे लोक सरकारच्या रोषाचा विषय ठरले. मद्यपानाविरुद्ध प्रचार अगर निरोधन करणें हें सभ्यपणाचा बुरखा पांघरलेल्या सरका-रला दंडार्ह अपराध ठरविता येत नव्हतें. तरीपण या ना त्या निमित्ताने अशा लोकांना सरकार अटक करी व त्यांच्या जवळून 'या चळवळीत भाग घेणार नाही' अशी कबुली घेण्याचा प्रयत्न करी. वरवर सरकार असें म्हणत असे की, जर त्या त्या विभागातील लोकांनी दारूचें दुकान नको असें सांगितलें तर आम्ही तें दुकान बंद करू. पण प्रत्यक्षात मात्र त्या त्या विभागातील लोकांनी अशी उठावणी केली तरी दुकान बंद करण्याऐवजी पोलीस चळवळ करणाऱ्या लोकांच्याच मागे हात धुवून लागत. इ. स. १९०७ व १९०८-मध्ये या मद्यपान निरोधनाच्या आंदोलनाने नागपूरला चांगलेंच बाळसें धरलें. विशेषतः गिरणी काम-गारवर्गाच्या क्षेत्रात या आंदोलनाचा भर अधिक होता. प्रो. भगीरथ

प्रसाद यांनी या आंदोलनात भरीव कार्य केलें. खवळलेल्या सरकारी अधिकाऱ्यांनी याविरुद्ध कसे बेताल तारे तोडावयास सुरवात केली होती याचें उदाहरण येथे देण्यासारखें आहे. दि. १३ जून १९०८-च्या हिंदी केसरीत नागपूरजवळच्या टाकळी गावात घडलेल्या घटनेचें वृत्त पुढीलप्रमाणे प्रसिद्ध झालें आहे.

"येथे तहसिलदाराने येऊन खेडुतांना एकत्रित केलें. त्यांच्यासमोर भाषण करताना त्याने असें सांगितलें की, जर कोणी येऊन त्यांना तुम्ही दारू पिऊ नका असें सांगितलें तर त्यांनी त्याचें मुळीच ऐकू नये. कारण दारू पिणें ही त्यांची परंपरागत रूढी असून ती मोडू नये. थकलेल्या माणसाला पुन्हा उत्साह यावयास दारू पिणें अत्यंत आवश्यक आहे, म्हणून तुम्ही दारू सोडू नका."

सरकारी अधिकाऱ्यांच्या या प्रचाराचा काहीही परिणाम न होता औद्योगिक क्षेत्रात ही चळवळ वाढतच गेली. दि. २६ एप्रिल १९०८-ला नागपूरच्या रघुवीर थिएटरमध्ये गिरणी कामगारांची एक मोठी सभा भरली. भास्करराव पंडित हे या सभेचे अध्यक्ष होते. या सभेत डॉ. मुंजे व स्वामी शंकरानंद यांचीं भाषणें झालीं. डॉ. मुंजे यांनी आपल्या भाषणात गिरणी कामगारांना असा सल्ला दिला की, त्यांनी विलायती दारूत व्यर्थ पैसे उधळण्याऐवजी मुष्टिफंड व पैसाफंड यांना हेच पैसे दान म्हणून दिले तर त्याचा राष्ट्रकार्यासाठी मोठा उपयोग होईल. टिळकांच्या अटकेनंतर उत्पन्न झालेल्या वातावरणाचा लाभ घेऊन डॉ. मुंजे यांनी ही मद्यपाननिषेधाची चळवळही स्वदेशी व बहिष्काराच्या चळवळीसमवेतच अधिक वेगाने चालविली होती तिचा परिणाम राष्ट्रीय मंडळाचें बळ वाढण्यात झाला. या प्रकारांनी चिडून जाऊन सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक यांचे मुख्य हस्तक व प्रांतातील पोलिस दलाचे मुख्य अधिकारी सर चार्लस क्लीव्हलँड यांनी मध्यप्रांतातील चळवळीचें मुख्य केन्द्र असणाऱ्या डॉ. मुंजे यांना दि. २९ नोव्हेंबर १९०८-ला आपल्या बंगल्यावर भेटीला बोलावलें व त्यांना धमकाविण्याचा प्रयत्न केला. डॉ. मुंजे असल्या धमक्यांनी भिणारे नव्हते. तीन तास दोघांचें वाग्युद्ध चालू होतें. क्लीव्हलंड यांनी प्रांतात क्रांतिकारी चळवळ मूळ धरू लागली असून या हिंसात्मक चळवळीचा उगम तुम्ही चालविलेल्या बहिष्काराच्या आंदोलनात आहे असें मुंजे यांना सांगितलें. त्यावर डॉ. मुंजे यांनी त्यांना बहिष्काराच्या चळवळीचें उद्दिष्ट व स्वरूप समजावून सांगितलें व काँग्रेस आणि राष्ट्रीय पक्ष यांचें धोरण हिंसेचें नसून कसें सनदशीरपणाचें आहे हें समजावून दिलें. डॉ. मुंजे म्हणाले की, "गुप्त क्रांतिकारक संस्था या

प्रांतात आहेत किंवा नाहीत याची माहिती मला नाही, ती तुम्हांलाच खरी असू शकेल. पण राष्ट्रीय पक्षाशी माझा प्रथमपासून संबंध असल्यामुळे मी असें निश्चयपूर्वक सांगू शकतो की, त्या पक्षाच्या सर्व चळवळी उघडचा असून त्याची कोणतीही गुप्त संघटना नाही. या पक्षाला समाजातील सर्व थरांचें पूर्ण साह्य आहे. केवळ मुसलमान समाजाचाच काय तो अपवाद म्हणता येईल. केवळ मद्यपानच नव्हे, तर सर्व प्रकारच्या परदेशी वस्तूंवरील बहिष्कार राष्ट्रीय पक्षाला अभिप्रेत आहे. " चर्चेच्या ओघात क्लीव्हलंड म्हणाले, " पैसाफंड व मुष्टिफंड यातील पैसा गुप्त चळवळींच्या पोषणासाठी खर्च करण्यात येतो. त्याचा तीव्र निषेध करून डॉ. मुंजे यांनी सांगितलें की, या दोन्ही चळवळी सनदशीर मार्गाने जाणाऱ्या राष्ट्रीय पक्षाने काढल्या असून स्वदेशीच्या उघडचा आंदोलनाला विधायक स्वरूप देण्यासाठीच या पैशांचा उपयोग होतो." क्लीव्हलंडसाहेब यावर उसळून म्हणाले की, " टिळकांच्या अटकेनंतर विद्यार्थ्यांनी व लोकांनी ज्या दंगली केल्या व जी सरकारविरोधी उग्र निदर्शनें केलीं त्याला राष्ट्रीय पक्षाशिवाय कोण जबाबदार आहे ? " त्यावर थंडपणाने डॉ. मुंजे उत्तरले, "याला तुम्ही आणि तुमच्या पक्षाचें अन्याय्य व दडपशाहीचें धोरण जबाबदार आहे. लोकमान्य टिळकांना देण्यात आलेली अन्याय्य शिक्षा व हद्दपारी आणि अरविन्द घोषांच्यावर भरण्यात आलेला अन्याय्य खटला यांमुळे लोकांनी क्षुब्ध होणें स्वाभाविक आहे. तुम्ही लोकक्षोभावर चिडता पण त्याचीं कारणें तुम्हीच पुरविता याचा तुम्ही नीट विचार करीत नाही. राष्ट्रीय पक्षाने अन्यायाला अन्याय म्हणणें चुकीचें नाही. त्यासाठी आपण उत्पन्न केलेल्या लोकक्षोभाची जबाबदारी त्या पक्षावर टाकणें चुकीचें आहे. " डॉ. मुंजे यांनी या चर्चेत विद्यार्थ्यांच्या आन्दोलनाचें समर्थन केलें. पण अत्याचारी व हिंसक मार्गांचें मात्र समर्थन केलें नाही. क्लीव्हलँड साहेबांना मुंजे यांचें म्हणणें मुळीच पटलें नाही. कारण पटवून घ्यावयाच्या भूमिकेनें त्यांनी मुंजे यांना बोलाविलेंच नव्हतें. त्यांनी केलेला धमकाविण्याचा प्रयत्न मात्र निरुत्तर व्हावें लागल्यामुळे फसला. पण या प्रदीर्घ चर्चेचा परिणाम मात्र मुंजे यांच्या, ते आखीत असलेल्या एका मोठ्या राजकीय योजनेला भोवला.

सुरत येथे मवाळ व जहाल यांच्यात दुफळी झाल्यावर नेमस्तपक्षाने आपला वेगळा मार्ग आखून व तदनुसार काँग्रेसच्या भोवती नव्या घटनेचें कुंपण घालून काँग्रेसमध्ये जहालांना प्रवेश न मिळू देण्याचें धोरण आखलें याचा निर्देश मागे केलाच आहे. लोकमान्य टिळकांना अटक



डॉ. बा. शि. मुंजे

होईपर्यंत प्रथम काही दिवस सुरतेला झालेल्या दुफळीसंबंधी कोणाला दोष द्यावा व देऊ नये यासंबंधीच्या सार्वजनिक वादात गेलें. त्यानंतर मवाळांनी राष्ट्रीय सभेची घटना आपल्या इच्छेनुसार बदलवून राष्ट्रीय पक्षाला आत न येऊ देण्याची पूर्ण दक्षता घेतल्यावर पुढे राष्ट्रीय सभे-संबंधाने काय धोरण ठेवावें असा प्रश्न राष्ट्रीय पक्षासमोर उभा राहिला. टिळकांची इच्छा राष्ट्रीय सभा जरी मोडली तरी पुन्हा जोडावी अशीच होती. टिळकांचे शिष्योत्तम कै. न. चिं. केळकर यांनी पुढील शब्दांत टिळकांची भूमिका विशद केली आहे. "आम्ही भांडू पण मोडणार नाही आणि तुम्ही मोडलें तरी आम्ही पुन्हा जोडू, अशी टिळकांची भूमिका होती. उलट नेमस्तांची खरी वृत्ति आम्ही तर सभा फोडणारच; तुम्ही ती कशी जोडणार जोडा पाहू, अशी होती. त्यांचे काही अनुयायी व प्रतिपक्षी म्हणत, टिळक लोचट आहेत; नेमस्तांनी झाडून टाकण्याचा प्रयत्न केला तरी पुन्हा ते त्यांना चिकटू पाहतात; इतर काही अनुयायी म्हणत, आपण स्वतंत्र राहू आणि आपल्या कार्यक्रमात नेमस्तापेक्षा अधिक तेज आहे असें सरकारला व जगालाही दाखवू. आमचें आच्छादन त्यांच्यावर घालून त्यांना उगाच देशभक्तीचे खोटे वाटेकरी कां करा ? "

—समग्र केळकर वाङ्मय खंड २, लोकमान्य खंड, पृष्ठ २२७

अशा रीतीने अनुयायी व प्रतिपक्षी काहीही म्हणत असले तरी टिळकांना मात्र राष्ट्रीय सभा ही हिंदुस्थानात एकच असावी असें पक्केपणाने वाटत होतें. तशी खटपट करण्यासाठी धुळें येथे झालेल्या परिषदेत चिंतामणराव वैद्य, न. चिं. केळकर, व डी. के. देसाई यांची मुंबई इलाख्यात एक समिति नेमण्यात येऊन तिचे कार्यवाह म्हणून माधवराव बोडस यांना नेमण्यात आलें.

हा समेट घडवून आणण्याच्या कामात जे खरे अग्रेसर होते त्या टिळकांना शिक्षा झाल्यावर त्यांच्यावाचून काम करण्याचें दायित्व या समितीवर आलें. समितीचे कार्यवाह माधवराव बोडस यांनी दि. १५ ऑगस्टला एक परिपत्रक काढून तें भारतवर्षभर विखुरलेल्या राष्ट्रीय पक्षाच्या सर्व धुरीणांकडे पाठविलें. तें असें : " समेटाचे प्रयत्न आजवर अनेक झाले; पण ते फुकट गेले. धुळयाच्या प्रांतिक परिषदेतही एक कन्सीलिएशन कमिटी नेमली गेली. पण चोहोकडे दडपशाही सुरू आणि नेमस्तांच्या हटवादीपणामुळे काहीच करता आलें नाही. तरी आता आपण खटपटीला लागलें पाहिजे. कन्व्हेन्शनवाल्यांनी आपला एक

मार्ग अनुसरला तसा आपला आपणही अनुसरला पाहिजे. म्हणून खालील प्रश्न मी आपणांकडे पाठवीत आहे. काँग्रेस कमिटया, राजकीय संस्था म्हणजे प्रायः काँग्रेसचे मतदारसंघ या सर्वांकडे मी हें प्रश्न पाठवीत आहे. त्यांचीं उत्तरें आलीं म्हणजे त्यांचा सारांश काढून आमच्या कमिटीपुढे ठेवू; मग कमिटी योग्य तो निर्णय करील. ते पांच प्रश्न असे :

(१) सर्व राजकीय पक्षांची मिळून एक राष्ट्रीय सभा असावी की ती प्रत्येक पक्षाची वेगळी असावी.

(२) एखादें क्रीड किंवा प्रतिज्ञालेख तयार करून त्यावर सही केल्याशिवाय कोणाला काँग्रेस डेलिगेट होताच येऊ नये असा निर्बंध घालावा कीं काय ?

(३) सुरतेस जें काम झालें तेथे तेविसावी राष्ट्रीय सभा मोडली व अधिवेशन संपलें असें मानावें किंवा काम असें काही झालेंच नाही म्हणून ती सभा पुढे चालू करावी ? अर्थात पुढे भरणाऱ्या राष्ट्रीय सभेला तेविसावी म्हणावें कीं चोविसावी म्हणावें ?

(४) सन १९०६-मध्ये कलकत्ता येथे जी ऑल इंडिया काँग्रेस कमिटी नेमली गेली तिचा अधिकार संपला असें समजावें की पुढील काँग्रेसपर्यंत तिचा अधिकार चालूच आहे असें समजावें ?

(५) कोणत्याही रीतीने हीं ऑल इंडिया काँग्रेस कमिटी उपयोगी पडत नाही असें ठरलें तर पुढील राष्ट्रीय सभा बोलाविण्याची खटपट कोणी व कोणाच्या नांवाने करावी ?

उत्तरें कृपापूर्वक ३१ ऑगस्टपर्यंत पाठवावींत. ”

श्री. माधवराव बोडस यांच्या या परिपत्रकाला उत्तर म्हणून अनेकांनी अनेक प्रकारचीं पत्रें पाठविलीं. त्यांचें हें परिपत्रक डॉ. मुंजे यांच्याकडे अर्थातच आलें. मुंजे हे समेटाला अनुकूल असले तरी राष्ट्रीय पक्षाने तेवढ्यासाठी नेमस्तांशी भलतें उद्दिष्ट ( क्रीड ) मान्य करून समेट करणें त्यांना संमत नव्हतें. टिळकांनी या संबंधात नेमस्तांसमोर जें अतिशय लवचीकपणाचें धोरण ठेवलें तेंही त्यांना मनातून संमत नव्हतेंच आणि आता टिळक तुरुंगात गेल्यावर समेट करून तथाकथित राष्ट्रीय सभेच्या नांवासाठी मूळ तत्त्वांवर, मवाळांच्या नव्या उद्दिष्टपत्रिकेवर स्वाक्षरी करून, पाणी सोडणें तर त्यांना अगदीच संमत नव्हतें. माधवराव बोडस यांच्या उपर्युक्त परिपत्रकाला उत्तर पाठविताना महाराष्ट्रातील टिळकपक्षीयांनी आपल्या भूमिकेवर खंबीर राहावें व मध्यप्रांत आणि विदर्भातील टिळकांच्या अनुयायांना विचारात न घेता या संबंधा-

तील निर्णय घेऊ नयेत अशी स्पष्ट सूचना करणें त्यांना अगत्याचें वाटलें. दि. १८ ऑगस्ट १९०८-ला बोडसांना पाठविलेल्या पत्रात मुंजे लिहितात : " टिळकांच्या गैरहजेरीत काँग्रेसला तिच्या संमतीविरुद्ध क्रीड वगैरेचा विटाळ न लागू देण्याची जबाबदारी सर्वस्वी महाराष्ट्रावरच येऊन पडली आहे. मुंबईस ता. ३ ऑक्टोबर रोजी सभा भरविल्यास सर्वांस सोयीचें होईल. "

वस्तुत: तडजोडीच्या कोणत्याही प्रयत्नांना यश येणार नाही हें मुंजे यांनी पक्कें ओळखलेलें होतें. कारण सुरतेची काँग्रेस मोडल्यावर तडजोडीचे प्रयत्न करावयास स्वत: टिळकांनीच स्थापन केलेल्या समितीच्या चिटणिसांनी सर दिनशा वाच्छा व गोपाळ कृष्ण गोखले यांना पुढच्या वाटाघाटींच्या दृष्टीने पत्रें पाठविलीं होतीं. पण या पत्रांना उत्तरें पाठविण्याचें सौजन्यही गोखले व वाच्छा यांनी दाखविलें नाही. त्यामुळे मुंजे यांना हें पूर्णपणे कळून चुकलें होतें की "तुमच्यावाचून आमचें चालतें व त्यामुळे आम्हांला तुमच्याशी कोणतीही तडजोड करण्याची इच्छा व आवश्यकता नाही. आमच्या विना तुमचें चालत नसेल तर आम्ही म्हणतो तसें करा – म्हणजेच आमच्या नव्या प्रतिज्ञापत्रकावर सही करून आपला मृत्युलेख आपल्या हाताने लिहा ही नेमस्तांची दुर्योधनी भूमिका आहे. त्यामुळे राष्ट्रीय सभेला एकतर नवें प्रतिज्ञापत्रक मान्य करू देऊ नये किंवा स्वतंत्रपणे राष्ट्रीय पक्षाने वेगळी राष्ट्रीय सभा भरवावी अशा ठाम मताचे ते झालेले होते. अशी वेगळी राष्ट्रीय सभा भरवू नयें असें माधवराव बोडस यांना वाटत होतें. राष्ट्रीय पक्षात काही लोक जसे बोडस यांच्या मताचे होते तसेंच काही लोक मुंजे यांच्या मताचेही होते. आपली वेगळी राष्ट्रीय सभा भरविण्याचा मनोदय ऑगस्टपासूनच मुंजे हळूहळू प्रकट करू लागले होते. दि. २१ सप्टेंबर १९०८-ला बोडस यांना लिहिलेल्या पत्रात मुंजे लिहितात : " तुमच्या कमेटीची सभा बोलाविली हें चांगलें झालें. किंबहुना ती थोडी आधीच बोलवावयास पाहिजे होती. तीत कन्व्हेन्शनवाल्यांना अखेरचें काय तें लिहू. आम्ही येथे राष्ट्रीय सभा भरवायची तर नोव्हेंबरच्या पूर्वी काहीच उपक्रम करू शकत नाही. पुढेही अवघा दीडच महिना राहतो. पण पाहू. कमेटीची सभा तुम्हांस नागपुरास भरविणें असल्यास भरवा. व्यवस्था करतो."

डॉ. मुंजे यांच्या स्वतंत्र राष्ट्रीय सभा भरविण्याच्या प्रकट होत असलेल्या निश्चयामुळे माधवराव बोडस बरेच अस्वस्थ झाले होते असें दिसतें. मुंजे यांच्या सांगण्यावरून राष्ट्रीय मंडळाचे एक सदस्य डॉ.

ल. वा. परांजपे यांनी या वेळी वृत्तपत्रात एक जाहिरात देऊन राष्ट्रीय पक्षाच्या लोकांची माहिती मिळविण्याची खटपट प्रारंभ केली होती. बोडसांना या खटपटीचीही चीड येऊन त्यात वेगळी राष्ट्रीय सभा भरविण्याच्या प्रयत्नाचा वास आला. त्यांचें समाधान करण्यासाठी दि. ९ सप्टेंबर १९०८-ला बोडस यांना मुंजे यांनी पुढीलप्रमाणे पत्र पाठविलें : "डॉ. परांजपे हे जाहिरात देऊन फक्त आपल्या पक्षाच्या लोकांची माहिती मिळविण्याचें काम करीत आहेत. त्याविषयी गैरसमज करून घेऊ नका. तुमचें आमचें काम एकच आहे. परांजपे हे राष्ट्रीय पक्षाची डायरी तयार करीत आहेत. तुमच्या कामात तुम्हांला असावें तितकें साहाय्य नाही अशी तुम्ही पूर्वी मजजवळ तक्रार केली. सुदैवाने आमच्या जवळ राष्ट्रीय मंडळ आहे व थोडें द्रव्यसाधनही आहे. म्हणून तुमचेंच काम आम्हीही थोडेसें करीत आहोत इतकेंच काय तें. तुम्ही जाहीर विनंतीपत्र काढलें तें तुमच्या कमेटीला विचारल्याशिवाय काढलेत. त्यामुळे खापर्डे यांच्या पत्राप्रमाणे तुमच्या पत्रालाही व्यक्तीच्या प्रयत्नाचें स्वरूप येतें. म्हणून कमिटीची सभा बोलवा असें मी सुचवितो."

बंदीत जाण्यापूर्वीच्या शेवटच्या भेटीत लोकमान्यांनी दादासाहेब खापर्डे यांना असें सांगितलें होतें की आता आमचें काम तुम्ही चालवावें. समेटाचे सर्व प्रयत्न अयशस्वी झाल्यास राष्ट्रीय पक्षाने आपलें काम तसेंच पुढे रेटावें. खापर्डे यांची वस्तुतः मुंजे यांना अनुकूलता होती. पण राष्ट्रीय पक्षाचे बंगालपर्यंत पसरलेले अनेक प्रौढ पुढारी वेगळ्या राष्ट्रीय सभेला अनुकूल नसल्यामुळे खापर्डे यांचीही मुंजे यांना अनुकूलता नसेल अशी माधवराव बोडस यांची कल्पना झाली व त्यांनी डॉ. मुंजे यांच्या वरील पत्राला कडक उत्तर लिहून त्यात तुम्ही घाईने व अविचाराने वागून खापर्डे यांच्यासारख्या ज्येष्ठ नेत्याचाही विचार घेत नाही असा आरोप केला. पण मुंजे असल्या पत्रांना मुळीच भीक घालणारे नव्हते. त्यांनी बोडसांना मुंबईला दि. २३ सप्टेंबर १९०८-ला पुढीलप्रमाणे खरमरीत उत्तर पाठविलें. " तुमच्या पत्राचा रोख पाहून आश्चर्य वाटलें. मी तुमचेंच थोडेसें काम केल्याबद्दल तुम्ही माझे आभार मानावयाचे तें सोडून मी घाईच केली, अविचारच केला, कोणाला विचारलेंच नाही असे आरोप करता, पण ते खरे नाहीत. मी पुढारी नसलो तरी इमानदार अनुयायी आहे. खापर्ड्यांनी सांगितल्याबाहेर मी काही एक केलें नाही व जें केलें त्याने तुम्हांलाच मदत झाली असेल. तुम्ही सभा भरविली म्हणजे मजकडे आलेल्या

सर्व पत्रांचा निष्कर्ष तिच्यापुढे ठेवीन. बहुतेकांनी खापर्डे यांच्याच मताला पुष्टि दिली आहे. खापर्डे यांना आम्ही टिळकांच्या खालोखाल मानतो हें तुम्हांला माहीत असेलच. इंदुप्रकाशात खापर्ड्यांवर हल्ला कोणी केला व कां केला असेल याचें कारण आता मात्र मला थोडें थोडें उमगतें. परप्रांताचे लोक आपल्या कमिटीला फारसे येणार नाहीत. पण वेगळी काँग्रेस भरण्याचें ठरलें तर येतील असें वाटतें. नागपुरास राष्ट्रीय सभा भरविल्यास येथील राष्ट्रीय मंडळ स्वागत मंडळाचें काम करण्यास तयार आहे."

या वेळी डॉ. मुंजे हेच मध्यप्रांताचे एकमेव (राष्ट्रीय पक्षाचे) पुढारी होते व राष्ट्रीय पक्षाने आपली वेगळी काँग्रेस भरवून नेमस्तांना निष्प्रभ करावें हें त्यांचें मत सगळ्या प्रांताचेंच मत होतें. त्यांचा पक्ष दिवसेदिवस इतका प्रबळ होत चालला होता की बोडसच काय, पण कोणालाही त्याची उपेक्षा करून चालणारें नव्हतें. डॉ. मुंजे यांना वेगळी काँग्रेस भरविण्यासंबंधात आपल्या प्रांताइतकीच बंगालही साथ करील असें प्रारंभी वाटलें होतें. पण बंगालचे मोतीलाल घोष प्रभृति नेते या कल्पनेला अनुकूल नाहीत असें त्यांना लवकरच दिसून आलें व त्याचा त्यांच्या मनावर परिणामही झाला. दि. २७ सप्टेंबर १९०८-ला माधव-राव बोडस यांना लिहिलेल्या पत्रात डॉ. मुंजे लिहितात :

"मोतीबाबू व अश्विनीबाबू हे दोघेही वेगळी काँग्रेस भरवि-ण्याच्या विरुद्ध आहेत. टिळकांनी खापर्ड्यांना सांगितलें होतें म्हणतात की नेमस्त काहीच जुळवून न घेतील तर जुन्या पद्धतीने आपण राष्ट्रीय पक्षामार्फत काँग्रेस भरवावी. पण बंगाल अनुकूल नसेल तर हें योग्य असूनही होणार कसें?"

शेवटी या गोष्टीचा एकदा सोक्षमोक्ष लावावयाचें ठरलें व त्यासाठी सुरत येथे टिळकांच्या उपस्थितीत नियुक्त झालेल्या समितीची सभा दि. १८ ऑक्टोबरच्या आगेमागे कलकत्त्याला घ्यावी असा निर्णय घेण्यात आला. या सभेसंबंधी डॉ. मुंजे व भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांच्या सहीने दि. ४ ऑक्टोबरला एक विनंतीपत्रक काढण्यात आलें. त्या आधी दि. १० ऑक्टोबरला मुंबईला मुंबई, वऱ्हाड व मध्यप्रांत येथील राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांची एक सभा घ्यावी असें ठरलें. कल-कत्त्याच्या सभेत या तीन प्रांतांच्या तरी मतात एकात्मता असावी हाही मुंबईची सभा घेण्याचा हेतु होता. मुंबईच्या या सभेपुढे निराळी राष्ट्रीय सभा भरवावयाची झाल्यास ती कोठे भरवावी व तिच्यासाठी निधिसंग्रह कसा

करावा हे चर्चेचे विषय होते. पण प्रत्यक्षात ही मुंबईची सभा भरू शकली नाही. कलकत्त्याची सभाही दि. १८ ऑक्टोबरला भरली नाहीच. कारण ते दिवस बंगालमधील दुर्गापूजा महोत्सवाचे असल्यामुळे कलकत्त्यातील महत्त्वाचे पुढारी कलकत्त्याबाहेर होते. पण कलकत्त्याची ही सभा बारगळली मात्र नाही. दि. ७ नोव्हेंबरला ही सभा कलकत्त्याला अमृत बझार पत्रिकेचे बाबू मोतीलाल घोष यांच्या घरी भरली. या सभेला महाराष्ट्राच्या वतीनें न. चिं. केळकर, चिंतामणराव वैद्य, शिवरामपंत परांजपे व मध्यप्रांत-वऱ्हाड तर्फे डॉ. मुंजे उपस्थित होते. मोतीबाबूंनी समेट घडवून आणण्याच्या प्रयत्नातील एक पाऊल म्हणून बंगालमधील नेमस्तांनाही या सभेला येण्याचें निमंत्रण दिलें होतें. तदनुसार भूपेन्द्रनाथ बसू प्रभृति नेमस्त पक्षाचे लोकही तेथे उपस्थित होते. या सभेत बंगालच्या प्रौढ पुढाऱ्यांनी असें आश्वासन दिलें की, नेमस्तांचा व आपला समेट होण्याची शक्यता आम्हांस वाटते. यास्तव राष्ट्रीय पक्षाची अशी वेगळी काँग्रेस भरविण्याचा विचार तूर्त करू नये. पण तसें नच घडल्यास मद्रासला नेमस्तांच्या वतीने होणाऱ्या काँग्रेसला आपल्यापैकी कोणी जाऊ नये. दि. १५ नोव्हेंबरला बंगालच्या नेमस्तांची सभा कलकत्त्याला भरावयाची होती व तेथे समेटाचें वातावरण निर्माण करण्याची भूमिका सिद्ध करता येईल असें मोतीलाल घोष प्रभृति पुढाऱ्यांना वाटत होतें. पण या सभेत समेटाची आशा करण्यासारखा एकही ठराव झाला नाही. अर्थातच वेगळी राष्ट्रीय सभा भरवावी या डॉ. मुंजे यांच्या मताला अनुकूल वातावरण उत्पन्न झालें. अशी राष्ट्रीय सभा घ्यावयाचीच तर नागपूरचें निमंत्रण पहिलें असल्यामुळे ही सभा नागपूरलाच घ्यावी हें आपलें मत मुंजे यांनी पुढे रेटलें. या नव्या परिस्थितीचा विचार करण्यासाठी दि. २८ नोव्हेंबरला मुंबईच्या राष्ट्रमत कचेरीत काँग्रेस कन्टिन्युएशन कमिटीची खास सभा बोलावण्यात आली. चिंतामणराव वैद्य हे तिचे निमंत्रक होते. या सभेत एक किंवा दोनच मतें विरुद्ध पडून नागपूरला राष्ट्रीय पक्षाची वेगळी राष्ट्रीय सभा डिसेंबरमध्ये भरवावी असा ठराव संमत करण्यात आला. मुंजे यांचा विजय झाला. या सभेत ज्यांनी विरुद्ध मतें दिलीं त्यांत श्री. न. चिं. उपाख्य तात्यासाहेब केळकर होते. त्यांनी असें सांगितलें की, "एकटया महाराष्ट्राने वेगळी राष्ट्रीय सभा भरविण्याची जबाबदारी घेऊ नये. सुरू केली व मग मोडली असें न व्हावें. परप्रांतांतील काही लोक अशा सभेला येतील कीं नाही हें अजून पूर्णपणे अजमावलें गेलें नाही. जें गेलें आहे त्यावरून थोडीशी डळमळच दिसते. विशेषत: बंगाल्यात उभय पक्षांमध्ये वैमनस्य कमी हें पबना येथील सभेवरून दिसून

आलें आहे. कन्व्हेन्शनवाल्या नेमस्तांच्या सभेत ता. १५ रोजी जरी हवे तसे अनुकूल ठराव झाले नाहीत तरी त्यांना एकदम सोडून स्वतंत्र राष्ट्रीय सभेला बंगालचे राष्ट्रीय पक्षाचे पुढारी येणार नाहीत. त्यांच्या-पेक्षा आमच्यावर मोतीबाबूंचें प्रेम अधिक आहे हें खरें, तरी पण तें वेगळें, आणि स्वतंत्र राष्ट्रीय सभेला येऊन मिळणें वेगळें. ते नेहमीच्या राष्ट्रीय सभेलाही फारसे जात नाहीत. मग आमच्या सभेला या स्थितीत कसे येतील ? अर्थात् परप्रांतांतील लोक यथाप्रमाण येत असल्याशिवाय नुसत्या महाराष्ट्रीयांनी स्वतंत्र काँग्रेस भरविणें योग्य नाही. नागपुरा-खेरीज इतर कोणत्याही प्रांताने अशी सभा आपल्या प्रांतात भरवू असें आजवर म्हटलेलें नाही, तसेंच 'समितीच्या कायद्याने' सरकार नागपूरची सभा बंद करण्याचा संभव आहे. आणि ती बंद केली तर विनाकारण आपण थप्पड खाऊन बसलो असें होईल. म्हणून वेगळी राष्ट्रीय सभा न भरविता महाराष्ट्रापुरते एक राष्ट्रीय पक्षाचें कान्फरन्स भरवावें."

—गतगोष्टी अर्थात् माझी जीवनयात्रा. लेखकः– कै. न. चिं. केळकर. पृ. ३८९-३९०

केळकरांच्या या विरोधाची केवळ नोंद होऊन राष्ट्रीय सभा नागपूरला घेण्याचा निर्णय निश्चित झाला. तदनुसार डॉ. मुंजे यांच्या नेतृत्वाखाली राष्ट्रीय मंडळाने आपलें स्वागतमंडळ भरवून सर्व सिद्धता केली. या सिद्धतेनंतरही बंगालमधील राष्ट्रीय पक्षाच्या धुरीणांचे, वेगळी राष्ट्रीय सभा घेऊ नये या दिशेने प्रयत्न चालूच होते. डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात बाबू मोतीलाल घोष यांचें डॉ. मुंजे यांना या संबंधात पत्र आलें. मुंजे आपलें ऐकत नाहीत म्हणून त्यांनी दि. १० डिसेंबरला श्री. न. चिं. केळकर यांच्याकडे कागाळीही केली. केळकरांना लिहिलेल्या पत्रात मोतीबाबू लिहितात :–"आज टिळक असते तर त्यांचें मन मी वळवू शकलो असतो. पण त्यांच्या अनुयायांचा तेवढा मजवर विश्वास दिसत नाही. डॉ. मुंजे यांना मी पत्र लिहिलें आहे. त्याचा सारांश असा : तुम्ही आपलेंच मत घेऊन बसला आहा. तरी मला जें वाटतें तें तुम्हांला लिहितो व तें माझें मत कायम आहे. आम्ही आज वर्षभर संयुक्त काँग्रेस झाली तरच काँग्रेस, नाहीतर काँग्रेस नाही अशी चळवळ केली असती तर मद्रासच्या काँग्रेसला तुम्हांला बराच गौणपणा आणता आला असता. व एक दोन वर्षांत तुम्हांला राष्ट्रीय सभा काबीज करता आली असती. आम्ही इकडे काँग्रेसला जाऊन मिळालो नाही आणि एक प्रकारची तटस्थ वृत्ति धरून बसलो आहो. पण तुम्ही जर वेगळी काँग्रेस काढली तर आधीच जे दोन पक्ष आहेत त्याचे तीन

होतील व तुम्ही आम्ही एकमेकांतच झगडल्यासारखें होईल. तुमच्या-प्रमाणेच आमचेंही म्हणणें असें की, प्रतिज्ञापत्रक नसावें. या दृष्टीने तुमचें आमचें अधिक जुळतें ही गोष्ट खरी. राष्ट्रीय पक्षावर स्टेट्स्मन वगैरे पत्रांतून हल्ले होतात त्यांना पत्रिका (अमृतबझार पत्रिका) उत्तर देत असते. पण वेगळ्या काँग्रेसचें समर्थन करवत नाही. पबना येथील आमच्या ठरावाप्रमाणे कोणत्याच काँग्रेसला जावयाचें नाही असें आम्ही ठरविलें आहे. तरी पण वेगळी काँग्रेस निघाली म्हणजे एखादा दुसरा इकडे जाईल, एखादा दुसरा तिकडे जाईल. तुम्ही आम्ही सर्व एक विचाराने आवळून बसलो तर मेथा वगैरे लोकांना कठीण जाईल! वेगळी सभा काढून बंगालची सहानुभूति या वेळी घालवू नका."

पण एकदा निर्णय झाल्यावर व तदनुसार सर्व प्रकारची सिद्धता झाल्यावर मुंजे पाय मागे घेणार नव्हतेच. राष्ट्रीय पक्षाची वेगळी राष्ट्रीय सभा नागपूरला भरणार असें प्रकट होताच भारतातील प्रत्येक प्रांतात असलेल्या राष्ट्रीय पक्षाच्या लोकांत त्या दृष्टीने हालचाल सुरू झाली. प्रत्येक प्रांतातील राष्ट्रीय पक्षाच्या गटाने नागपूरच्या राष्ट्रीय सभेस पाठवावयाच्या प्रतिनिधींची निवड केली. नागपूरला राष्ट्रीय मंडळाजवळ विद्यार्थ्यांच्या संघटनेचें फार मोठें बळ होतें. त्यातून राष्ट्रीय सभेच्या व्यवस्थेला आवश्यक असें स्वयंसेवक दल उभारण्यात आलें. उतरण्याची व बाहेर गावाहून येणाऱ्या प्रतिनिधींच्या जेवणाची व्यवस्था करण्यात आली. राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनासाठी मोठा मंडपही उभारण्याचें काम प्रारंभ झालें. केवळ अध्यक्षाची निवडच काय ती व्हावयाची राहिली होती. पण सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक व सर चार्लस् क्लीव्हलंड यांना ही क्रांतिप्रवण राष्ट्रीय सभा नागपूरला होऊ देणें इष्ट वाटलें नाही. अस्मानी सुलतानीचा पुन्हा एकदा प्रत्यय आला. नागपूर प्रांत सरकारी दडपशाहीखाली कसा भरडला जात होता व सरकार-विरुद्धच्या सर्व उपद्रवांचें खरें कारण डॉ. मुंजे हेच आहेत असें सरकार कसें समजत होतें याचा निर्देश मागेच केला आहे. दि. ११ डिसेंबरला कोणाच्या ध्यानीमनी नसताना नागपूरच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटने क्रिमिनल प्रोसीजर कोड १४४ प्रमाणे नोटीस काढली व फर्माविलें की, "नागपूर येथे होऊ घातलेली २४-वी राष्ट्रीय सभा सरकारकडून बंद करण्यात येत आहे. दि. ११ जानेवारी १९०९-पर्यंत स्वागत मंडळानें या राष्ट्रीय सभेसंबंधाने कोणतीही प्रकट सभा भरवू नये. कोणत्याही इमारती उभारू नयेत. काम चालू असेल तें बंद करावें. मंडप वगैरे घालू नयेत." या सरकारी सुलतानशाहीने अक्षरशः "हा हन्त हन्त

नलिनीं गज उज्जहार" असा प्रकार झाला. सरकारने ही अन्याय्य आज्ञा परत घ्यावी म्हणून डॉ. मुंजे यांनी पुष्कळ प्रयत्न केले. पण त्यांचें सर्व म्हणणें व कागाळ्या ऐकून घेऊन जिल्हा न्यायाधीशाने पुनश्च दि. १६ डिसेंबरला पूर्वीची बंदी आज्ञा पक्की केली. शेवटी निरुपायास्तव राष्ट्रीय सभेच्या स्वागतकारिणीचे चिटनवीस डॉ. मुंजे व नारायणराव अळेकर यांनी राष्ट्रीय सभेचें पूर्व नियोजित अधिवेशन होऊ शकत नाही असें घोषित केलें. हें सर्व वृत्त मुंजे यांनी कॉंग्रेस कन्टीन्युएशन कमेटीला सादर केलें.

या प्रकारानंतर बंदीहुकूम नागपूरपुरताच असल्यामुळे मुंबईला राष्ट्रीय सभा कां भरविण्यात येऊ नये असाही एक विचार पुढे आला. पण नागपूरच्या प्रकरणातून जें सरकारी धोरण प्रकट झालें त्यावरून कोठेही राष्ट्रीय सभा भरविण्याचा यत्न झाला तरी त्यावर बंदीआज्ञेचा आघात होणार हें निश्चितच असल्यामुळे त्या विचारात काही स्वारस्य नव्हतें.

समेटवादी पक्ष प्रथमपासूनच नागपूरला भरणाऱ्या राष्ट्रीय सभेच्या विरुद्ध होता. याचा निर्देश मागे केलाच आहे. सरकारी आज्ञेने कां होईना, पण नागपूरची राष्ट्रीय सभा बंद झाली याचा या पक्षाला आनंद झाला. इतका की तो व्यक्त करण्याने आपण सरकारच्या अन्याय्य धोरणाचा अप्रत्यक्षपणे पाठपुरावा करतो याचेंही भान त्यांना राहिलें नाही. कॉंग्रेस कन्टीन्युएशन कमेटीचे कार्यवाह माधवराव बोडस हे त्यांपैकीच एक होते. त्यांनी तत्काळ मराठा पत्रामध्ये असें निवेदन प्रसिद्ध केलें की, "राष्ट्रीय सभा वेगळी भरवावी या गोष्टीला मी पहिल्यापासून विरुद्ध आहे. मी संयुक्त राष्ट्रसभेच्या कल्पनेचेंच सतत समर्थन केलें आहे. एकतर्फी राष्ट्रीय सभा भरविणें हें इष्ट नाही. तिला लोकांच्या दृष्टीने काही किंमत असणार नाही. उद्या नेमस्त लोकांना अधिक शहाणपणा सुचून त्यांचा पक्षाभिमान हटेल व संयुक्त राष्ट्रीय सभा भरेल अशी मला आशा आहे. नेमस्त पुढाऱ्यांबद्दल व्यक्तिशः मला अत्यंत आदर वाटतो व लॉर्ड मोर्ले यांच्या सुधारणांच्या योजनेतून दरम्यान काही भरीव असा फायदा हाती लागेल अशी आपण सर्वांनी आशा करावी हें योग्य आहे. नागपूरच्या अधिकाऱ्यांनी सभाबंदीचा हुकूम काढला हें दिसण्यात संकट असलें तरी वस्तुतः ती ईश्वराची कृपाच होय. कारण आमचे नागपूरचे उत्साही मित्र जी मोठी चूक करणार होते ती अशा रीतीने परस्पर बचावली गेली."

असो नागपूरच्या संकल्पित कॉंग्रेसच्या या विचक्यानंतर कोणत्याही प्रांतातील राष्ट्रीय पक्षाने स्वतंत्र राष्ट्रीय सभा घेण्याचा विचारच

पुढे आणला नाही. कारण सरकारचें धोरण वाढत्या दडपशाहीचें व राष्ट्रीय पक्षाच्या विरोधाचें असल्यामुळे असा प्रयत्न केल्यास आयत्या वेळी नागपूरच्या प्रकाराचीच तेथेही पुनरावृत्ति होईल हें सर्वांनाच दिसत होतें. सन १९१४-पर्यंत म्हणजे लोकमान्य टिळक मंडालेहून सुटून येई-पर्यंत राष्ट्रीय पक्ष काँग्रेसबाहेर राहून स्वतंत्रपणे काम करीत होता व नेमस्तांनी १९१४-पर्यंत काँग्रेसचीं अधिवेशनें प्रतिवर्षी भरविलीं तरी एक पक्षीय मेळावा यापलीकडे त्यांच्या त्या अधिवेशनाला महत्त्व उरलें नाही. सरकारधार्जिण्या धोरणामुळे लोकांच्या मनातून ते उतरलेलेच होते. त्यांच्यामुळे काँग्रेसही दिवसेदिवस अधिकाधिक निस्तेज होत चालली.

सन १९०९ ते १९१४-पर्यंतच्या या भारतीय प्रकट राजकार-णाच्या ‘जैसे थे’च्या काळात डॉ. मुंजे यांनी आपल्या पक्षाचें दृढीकरण करण्याच्या दृष्टीने जे बहुविध प्रयत्न केले त्याकडे पुढील प्रकरणात वळू.

याच धामधुमीच्या काळात डॉ. मुंजे यांच्यावर एक दारुण अशी कौटुंबिक आपत्ति कोसळली. त्यांची पत्नी सौ. कृष्णाबाई या १९०८-च्या नोव्हेंबरमध्ये बाळंतपणाच्या काळात प्रकृति बिघडून अत्यवस्थ झाल्या. त्यांचें ऑपरेशन करावें लागलें व त्यातच त्यांचें निधन झालें. त्यानंतर डॉक्टर पुन्हा वैवाहिक पाशात पडले नाहीत. त्यांनी आपलें सारें जीवन राजकारणाला वाहिलें, तें अखेरपर्यंत !



प्रकरण तेरावें

# सरकारी दडपशाहीचा धुमाकूळ

सुरत कॉंग्रेसनंतर सरकारने मवाळांना तुच्छ लेखण्याचें व केवळ अधिक कडक शब्दांत विचारांची अभिव्यक्ति करणाऱ्या जहालांना चिरडून टाकण्याचें जें धोरण स्वीकारलें त्यामुळे सनदशीर चळवळ करून देशाची प्रगति करण्याचे सर्व मार्ग खुंटल्यासारखेच झाले. त्याचा परिणाम सशस्त्र क्रांतिकारक मार्गाकडे तरुणांची अधिकाधिक प्रवृत्ति वाढण्यात झाला. प्रार्थना व आवेदनपत्रांना सरकार भीक घालीत नाही व अधिक स्पष्ट शब्दांत आपलें म्हणणें मांडलें तर त्याचा परिणाम अत्याचाराने तें तोंड आवळण्यातच होतें तर मग ब्रिटिशांची राजसत्ता शस्त्रबळानें उलथून पाडण्याच्या इतिहाससिद्ध मार्गाचीच कास कां धरू नये ही मनोवृत्ति स्वाभाविकपणे बळ धरू लागली. बंगालमध्ये श्री. अरविन्द घोषांच्या प्रभावाने क्रांतिकारक चळवळ फोफावू लागली व दि. ११ ऑगस्ट १९०८-ला खुदिराम बोस यांस झालेल्या फाशीनंतर सरकारच्या दडपशाहीला न जुमानता नोकरशाहीच्या अधिकाऱ्यांना कंठस्नान घालून व विश्वासघातक्यांना यमसदनास पाठवून वधस्तंभाला आलिंगन देणाऱ्या तरुणांची संख्या वाढू लागली. दि. २० नोव्हेंबर १९०८-ला नरेन्द्र गोस्वामीच्या विश्वासघातासाठी त्याला अलीपूरच्या तुरुंगात कंठस्नान घालून कन्हैयालाल दत्त फाशी गेला. अलीपूर बॉंब अभियोगाचे सरकारी वकील बॅ. नार्टन यांच्या आठवणीतील वर्णन वाचलें की बंगालच्या क्रांतिमय वातावरणाची कल्पना येते. बॅ. नॉर्टन लिहितात, "मला खटला चालवीत असताना, सरकारच्या वतीचा वकील म्हणून हत्येच्या धमकीचें पत्र आलें. न्यायमूर्ति उठून गेल्यावर मी आरोपीच्या पिंजऱ्याजवळ गेलो व बारींन्द्र (अरविन्दांचे बंधु व क्रांतिकारकांचे पुढारी) यांना विचारलें की या हत्येला तुझी संमति आहे काय? त्याने मला उत्तर दिलें की, "एक व्यक्ति या नात्याने तुम्हांला मारलेंच पाहिजे असें नाही. पण क्रांतिकारकांच्या दृष्टिकोनातून न्यायाच्या कामात तुमचें अस्तित्व हा मोठाच अडथळा असल्यामुळे कोणी तुमची हत्या करण्याचें ठरविलेंच तर त्याला अडथळा करणें शक्य व योग्य नाही." नंतर माझ्या क्षुद्रतेची मला जाणीव करून देत तो म्हणाला, "एखाद्या माशीपलीकडे तुमची किंमत ती काय? आमचें खरें लक्ष्य या साऱ्या दमनयंत्राचे जे सूत्रधार आहेत ते

सर सेनापति अथवा व्हाइसरॉय हे आहेत." मी रोषाने त्याला म्हटलें की, ब्रिटन हें काही अशक्त राष्ट्र नाही. तुम्ही लोकांनी एक सरसेनापति अथवा व्हाइसरॉय ठार केला तर त्याची जागा घ्यावयास ब्रिटनमध्ये उमराव घराण्यांतील पुष्कळ योग्य पुरुष आहेत." बारीन्द्र हसून म्हणाला "मागणीच्या मानाने तुम्ही करीत असलेला पुरवठा फारच कमी पडेल!" हें बोलत असताना तो रोषात नव्हता. जरी तो हत्येचा संकेत करीत असला तरी त्याच्या उद्‌गारातून त्याची तत्त्वचिंतक राजकारणी नेत्याची भूमिका व स्वतःच्या देशबांधवांच्या दृष्टिकोनाविषयीचा सहानुभूतीचा भावच प्रकट होत होता. बारीन्द्राचा या संबंधातील द्रष्टेपणा पुढे व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिजवर टाकलेल्या बाँबने सिद्धच केला. सारख्या येणाऱ्या हत्त्येच्या धमक्यांच्या पत्राने माझा दुय्यम इतका घाबरला की तो माझ्याबरोबर माझ्या गाडीतून येईना. तो शेवटी मारला गेलाच. माझा उजवा हात असलेल्या पोलिस अधिकाऱ्याची हत्या तर हायकोर्टाच्या आवारातच झाली."

बंगालप्रमाणेच महाराष्ट्रातही क्रांतिकारक चळवळीची गंगा सप्तस्रोतस्विनीच्या विशाल स्वरूपात प्रकट होऊ लागली होती. श्री. गणेश दामोदर सावरकर प्रभृति क्रांतिसंघटनेच्या नेत्यांनी महाराष्ट्रापासून मद्रासपर्यंत क्रांतिसंघटनेचें जाळें विणीत आणलें होतें. क्रांतिकारकांचे मुकुटमणि स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या लंडनमधील वास्तव्याने जागतिक क्षेत्रातील क्रांतिनेत्यांचे व भारतीय क्रांतिकारकांचे संबंध जुळून येऊन भारतातील क्रांतिकारक चळवळीला अधिकाधिक दाहक व व्यापक स्वरूप प्राप्त होत होतें.

ब्रिटिश सरकारला खरी भीति या पूर्ण स्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्या व सशस्त्र स्वातंत्र्ययुद्ध घडवून आणण्याच्या ईर्षेने बद्धपरिकर झालेल्या क्रांतिकारक आन्दोलनाचीच होती. भारतातील या वाढत्या आन्दोलनाने ब्रिटिश राज्यकर्त्यांची झोप उडाली. बंगालचे गव्हर्नर सर जॉर्ज इलियट यांनी 'एंपायर रिव्ह्यू' मध्ये या वेळी लिहिलेल्या लेखात असें प्रतिपादन केलें की, "यापुढे ब्रिटिशांनी भारतीय लोकांच्या दुर्बलतेसंबंधीच्या व मृदुतेसंबंधीच्या सर्व कल्पना बदलविल्या पाहिजेत. जर ब्रिटिश सरकार याच वेळी आहे ही परिस्थिति दृढ निश्चयाने दडपून टाकावयास सिद्ध होणार नाही तर पुढे याहून किती तरी अधिक गंभीर उपाययोजना करण्याशिवाय गत्यंतर उरणार नाही. वृत्तपत्रांवर तत्काळ कडक नियंत्रण घालणें आवश्यक आहे आणि काँग्रेसला स्पष्ट शब्दांत असें बजाविलें पाहिजे की, कायदा व सुव्यवस्था यांचा भंग करणाऱ्यांशी

तिने सर्व प्रकारचे संबंध तोडून टाकले पाहिजेत." लंडनच्या डेली मेल पत्राने तर असें प्रसिद्ध केलें की, लॉर्ड किचनेर व लॉर्ड मिंटो यांना ठार करण्यासाठी हिंदुस्थानात गुप्त संस्था स्थापन करण्यात आल्या आहेत. पुणें हें या गुप्त संस्थांचें केन्द्र आहे. भारतातील संस्थानिक व श्रीमंत जमीन-दार यांनी या गुप्त संस्थांना मुबलक पैसा दिलेला आहे." ब्रिटिश लोकांच्या हृदयाला मवाळांच्या प्रार्थना व जहालांच्या घोषणा यांपेक्षा क्रांतिकारकांच्या पिस्तुलांच्या गोळ्या कशा जाऊन भिडल्या होत्या हें यावरून स्पष्ट होईल. त्यातील काही उतावळे ब्रिटिश अधिकारी तर क्रांति-कारक तरुणांची पारध करण्याच्या रक्तपिपासेने वेडे झालेले होते.

राष्ट्रीय पक्षाचा व क्रांतिकारकांचा घनिष्ठ संबंध होता. त्या पक्षाचे महान् अग्रणी लोकमान्य टिळक, लजपतराय व अरविंद घोष यांच्या चळवळींना क्रांतिकारक तरुण उचलून धरीत. नेमस्तपक्षाचे लोक क्रांतिकारक तरुणांना पाण्यात पहात तर जहाल पक्षाचे पुढारी जरी या तरुणांना अविचारी समजत असले तरी त्यांचा मार्ग हाच खरा स्वातंत्र्याचा अंतिम सत्य मार्ग होय हें ते ओळखीत होते. त्यामुळे ते त्यांना साहाय्य करीत व जवळचे मानीत. त्यांच्यातील हा परस्परसंबंध सावध ब्रिटिश सरकारला न्यायालयातून सिद्ध करणें अवघड असलें तरी ते हें ओळखून होते, व त्यांची ही समजूत सत्यावर आधारलेली होती. टिळकांचा राष्ट्रीयपक्ष व क्रांतिकारक यांच्या जिव्हाळ्याच्या संबंधावर क्रांतिकारकांचे मुकुटमणि स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी स्वतःच आपल्या आत्मचरित्रात प्रकाश टाकलेला आहे. स्वातंत्र्यवीर सावरकर लिहितात : "प्रकट चळवळीपैकी त्या काळातील भारतव्यापी चळवळ काँग्रेसची. तिने हिंदुस्थानच्या कोनाकोपऱ्यापर्यंत केलेल्या राष्ट्रैक्याच्या जागृती-विषयी जरी क्रांतिकारकांना समाधान वाटे तरी तिच्या ब्रिटिशनिष्ठ मनोवृत्तीची त्यांना इतकी चीड येई की, काँग्रेसशी त्यांचें सूत कधीच जमलें नाही. दुसरी प्रकट चळवळ म्हणजे स्वदेशनिष्ठ अथवा टिळक पक्षाची. ह्या पक्षाच्या उघड आंदोलनाशी मात्र त्या क्रांतिकारकांचे जिव्हाळ्याचे संबंध असत. टिळक पक्षाच्या प्रकट चळवळीचा व्याप नैर्बंधिक कक्षेतच होता. त्याची रूपरेखा, स्वदेशनिष्ठ पक्षाची मनोवृत्ति, नि कार्यक्षेत्र ह्यांचें जें रेखण मागे केलें आहे त्यातच सामावलेली होती. प्रकटपणे चालविलेल्या पण अंततः आपल्या अप्रकट नि गुप्त अशा क्रांतिकारक क्षेत्राचे दिशेनेच जाणाऱ्या ह्या टिळकपक्षीय सर्व चळवळीं-मध्ये सहस्रावधि क्रांतिप्रवण मंडळी भाग घेत असत. किंबहुना टिळकांच्या सन १८९५-पर्यंतच्या दुष्काळाच्या चळवळीत, हिंदु-मुस्लिम दंग्यांचे

प्रकरणी, शिवोत्सव-गणेशोत्सवादिक सामुदायिक आंदोलनांत आणि पुढच्याही सर्व चळवळींत अनुयायांचा जो भर, स्फूर्ति, कडवेपणा, निस्वार्थत्यागी तळमळ दिसून येई त्याचें मुख्य श्रेय त्यात शिरलेल्या ह्या क्रांतिनिष्ठांचेंच असे. टिळकांनाही ह्याची पूर्ण जाणीव होती. ”

—समग्र सावरकर वाङमय, १ चरित्र खंड पृ. ८०

क्रांतिकारकांचे व राष्ट्रीय पक्षाचे हे संबंध ध्यानात घेऊन त्या पक्षालाही चिरडून टाकण्यासाठी सरकार कटिबद्ध झालेलें होतें व म्हणून ज्या मोर्ले यांच्या सुधारणेकडे राष्ट्रीय पक्षाचेही माधवराव बोडस यांच्यासारखे लोक आशाळभूतपणे पहात होते त्यांच्या जनकाने ब्रिटिशविरोधी बनत चाललेल्या भारतीयांना कोणतेही खरे अधिकार द्यावयाचे नाहीत, इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानात लोकतंत्राची पद्धति अवलंबिण्यात येणार नाही असें उद्‌घोषूनच टाकलें. हाऊस ऑफ लॉर्डस्‌मध्ये भाषण करताना मोर्ले म्हणाले : –

“ If I were attempting to set up a Parliamentary system in India or if it could be said that this chapter of reforms led directly or necessarily up to the establishment of a Parliamentary system in India, I, for one, would have nothing to do with it ”

—*morley* : *Indian speeches*

( हिंदुस्थानात पार्लमेंटरी पद्धति स्थापन करण्याचा मी प्रयत्न करतो किंवा या सुधारणांचा परिणाम प्रत्यक्षात पार्लमेंटरी पद्धति स्थापन होण्यात घडून येईल अशी जर कोणाची समजूत असेल तर मी माझ्यापुरतें तरी स्पष्ट करतो की मला त्याशी काही कर्तव्य नाही. )

ज्या वेळी मोर्ले यांच्या सुधारणा बिलावर इंग्लंडच्या लोकसभेत वादविवाद सुरू झाला त्या वेळी भारतात इंग्लिश लोकांच्या होत असलेल्या हत्या व त्याला कारणीभूत होणारें अधिकाऱ्यांचें धोरण यांच्यावर टीकास्त्राची फैर झडली. हाऊस ऑफ कॉमन्समध्ये लॉर्ड कर्झन यांना या प्रकारचें वातावरण निर्माण करण्याबद्दल उत्तरदायी व दोषी धरण्यात आलें. याच्या उलट लॉर्ड कर्झन यांनी आपल्यावरील आरोपातून अंग झटकून टाकून पार्लमेंटच्या सभासदांनाच ठपका दिला. त्यांनी असें सांगितलें की, पार्लमेंटचे सभासद हिंदुस्थानातील लोकांविषयी सहानुभूति बाळगतात व ज्यांनी हिंदुस्थानात विशिष्ट पद्धतीची इंग्रजी शिक्षणाची प्रक्रिया सुरू केली तेच या वातावरणाला खरे उत्तरदायी आहेत.

इ. स. १९०९-मध्ये केवळ भ्रमाचा भोपळा असलेल्या मोर्ले यांच्या सुधारणा घोषित झाल्या. त्याने भारताच्या परिस्थितीत कोणताही

फरक पडला नाही. या सुधारणांनुसार व्हाइसरॉयांच्या कार्यकारी मंडळात एका हिंदी सभासदाची वर्णी लागली. पण पाश्चिमात्य नोकर-शाहीच्या भक्कम तटबंदीवर त्याचा कोणताच परिणाम होणारा नव्हता. या सुधारणांत प्रांतीय व मध्यवर्ती विधिमंडळांत लोकनियुक्त प्रतिनिधींचा अंतर्भाव होईल अशी व्यवस्था करण्यात आली होती. या व्यवस्थेनुसार नगरपालिका व अन्य स्थानिक स्वराज्य संस्था प्रांतीय व मध्यवर्ती विधिमंडळांत आपले प्रतिनिधि पाठवू शकत होत्या. पण हा केवळ फसवा देखावा होता. याने प्रांतीय व मध्यवर्ती विधिमंडळांचा आकार केवळ वाढला. पण लोकनियुक्त प्रतिनिधींना कोणतेही अधिकार नव्हते. ते सरकारवर कसल्याही प्रकारचें प्रभावशाली वजन आणू शकत नव्हते. त्यांचें कार्य केवळ अकरणात्मक होतें. या सुधारणांच्या फलिताचें स्वरूप एका विचिकित्सकाने वर्णिताना लिहिलें आहे :

" The Government had thus organised for itself a perpetual opposition with no function except to criticize, no chance of ever taking office, and no real responsibility to the rather vague electorate which they were supposed to represent. "

— *Thompson* and *Garrett*, p. *583*

(सरकारने अशा रीतीने स्वतःच्या विरुद्ध अशी कायम स्वरूपाची विरोधी आघाडी निर्माण करून ठेवली. तिचें काम फक्त सरकारवर टीका करण्यापलीकडे नव्हतें. कारभार चालविण्याची त्यांना कधीच संधि मिळणारी नव्हती व ज्या मतदारसंघाचें ते तथाकथित प्रतिनिधित्व करीत त्याला ते यथार्थाने उत्तरदायी असू शकत नसत. )

सरकारची सत्ता या सुधारणांत इतकी अबाधित राखण्यात आलेली होती की, एखाद्या लोकप्रतिनिधींच्या संस्थेने आपला प्रतिनिधि निवडून विधिमंडळात पाठविला तरी त्याला सभासद करून घेणें वा न घेणें सरकारच्या लहरीवर अवलंबून होतें. श्री. न. चिं. केळकर यांच्यासारख्या लोकनेत्यावर असा विपरीत प्रसंग आला होता. त्यांना प्रतिनिधी म्हणून निवडून देण्यात आलें असताही " त्यांची निवड लोकहिताची आहे असें सरकारला वाटत नाही " या सबबीवर त्यांचें सभासदत्व अमान्य करण्यात आलें!

या सुधारणांचा कायदा संमत होताच हिंदुस्थानात व्यापक प्रमाणावर निराशेची लाट उसळली. राष्ट्रीय पक्षाचे एक महान् नेते श्री. अरविन्द घोष यांनी या सुधारणांच्या मायावी स्वरूपावर प्रकाश टाक-णारें एक प्रकट वक्तव्य प्रकाशित केलें. सर्व भारतात त्या वक्तव्याचा

जसा प्रसार झाला तसाच व्यापक प्रमाणावर मध्यप्रांतातही त्याचा प्रसार झाला. या वक्तव्यात अरविंदांनी या सुधारणांच्या पोकळपणामुळे संपूर्ण भ्रमनिरास कसा झाला आहे हें दाखवून देऊन असें स्पष्ट शब्दांत प्रतिपादन केलें होतें की, स्वराज्य मिळविण्याचा खरा मार्ग एकच आहे व तो म्हणजे राज्यकर्त्यांच्या मायावी भ्रमजालाच्या पाशात मुळीच न अडकता राष्ट्रीय सामर्थ्य केन्द्रित करणें हाच होय. त्यांनी या वक्तव्यात नेमस्तांच्या पडखाऊ व संकुचित धोरणाविषयी खेद व्यक्त केला होता व सर्व राष्ट्रवाद्यांची एक परिषद बोलावून भावी कार्यक्रमाचें धोरण त्या परिषदेत निश्चित करण्यात यावें असें आवाहन केलें होतें. या वक्तव्याच्या प्रकाशनानंतर श्री. अरविन्द घोष यांना अटक करण्याचें सरकारने ठरविलें. अलीपूरच्या अभियोगातून अरविन्द निर्दोष सुटले हें शल्य सरकारच्या मनात होतेंच. त्यांनाही टिळकांच्याचप्रमाणे तुरुंगात डांबावें असा या वक्तव्यानंतर सरकार विचार करू लागले. पण अरविन्दांनी अटकेचें वॉरंट चुकविलें व फ्रेंचांच्या हद्दीत पांदेचरीला ते निघून गेले. त्यांचें शेष जीवन पांदेचरीलाच व्यतीत झालें.

सन १९०९-मध्ये ज्या वेळी नवीन निर्माण झालेल्या मध्यवर्ती विधिमंडळाची पहिली बैठक झाली त्या वेळी तिचें उद्घाटन या सुधारणांचे जनक भारतमंत्री लॉर्ड मोर्ले यांनी केलें. या भाषणात त्यांनी सुस्पष्ट शब्दांत सांगितलें की " या प्रांतीय व मध्यवर्ती विधिमंडळांच्या निर्मितीचा हेतु हिंदुस्थानी लोकांच्या हातात प्रत्यक्ष काही सत्ता सोपवावी असा मुळीच नाही. ब्रिटिश सरकारने हिंदुस्थानी लोकांना या विधिमंडळांचे सदस्य होण्याची जी अनुज्ञा दिलेली आहे ती केवळ सरकारला त्याच्या हिंदुस्थानी प्रजेचा दृष्टिकोन समजावा या हेतूनेच होय. विधिमंडळाच्या सदस्यांना आपलें मत व्यक्त करण्याचें संपूर्ण स्वातंत्र्य आहे. पण तें मत मान्य करणें अथवा न करणें या संबंधात सरकार पूर्णपणे स्वतंत्र आहे." त्यांनी हेंही स्पष्ट केलें की, हिंदुस्थानात लोकतंत्र पद्धतीचें सरकार निर्माण करण्याचा ब्रिटिश सरकारचा मुळीच विचार नाही. या विधिमंडळाच्या सदस्यांच्या हातात खरी सत्ता मुळीच सोपविण्यात येणार नाही. "

याप्रमाणे सन १९०९-मध्ये मोर्ले यांच्या सरकारने हें प्रकट केलें की हिंदुस्थानने या पोकळ सुधारणांवरच संतुष्ट राहिलें पाहिजे व जर भारतीयांचा एखादा वर्ग याविरुद्ध आवाज उठविण्याचा प्रयत्न करील तर त्याचें डोकें तत्काळ ठेचलें जाईल.

सरकारच्या या नीतीने भारतीय मन दबलें नाही. अत्याचारांची पराकाष्ठा झाली तरीही असंतोषाचा वह्नि अधिक चेतत राहून त्याची प्रतिक्रियाही उग्र स्वरूपात प्रकट होऊ लागली. बंगालप्रमाणेच महाराष्ट्रातील क्रांतिपक्षही ठेचून काढावा म्हणून क्रांतिसंघटनेचे अध्वर्यु श्री. गणेश दामोदर सावरकर यांना जन्मठेपेची अमानुष शिक्षा देण्यात आली. नागपूरच्या राष्ट्रीय मंडळाच्या सदस्यांचा बंगाल व महाराष्ट्र या दोन्ही प्रांतांतील क्रांतिकारक संघटनांशी जिव्हाळ्याचा संबंध होता. सरकारलाही या गोष्टीची जाणीव होती. इ. स. १९१२-मध्ये भारत सरकारने प्रांतीय सरकारांना एक प्रश्नावलि पाठविली होती. त्यात नागपूर प्रांतांच्या चीफ कमिशनरला विचारण्यात आलेला एक प्रश्न व त्याचें चीफ कमिशनरने दिलेलें उत्तर पाहण्यासारखें आहे. हीं प्रश्नोत्तरें पुढीलप्रमाणे:

**Question** :– Are political agitators in the Central Provinces in communication with those elsewhere ?

**Answer** : – There is no doubt that the political agitators of the Central Provinces were in communication on the one side with the Bengal agitators and on the other side with those of Poona and Nasik " —(The History of Freedom Movement in Madhyapradesh, P. 259)

(प्र० – मध्य प्रांतातील राजकीय चळवळे लोक इतर ठिकाणच्या चळवळ्या लोकांशी संबंध राखतात काय ?

उ० – मध्यप्रांतातील राजकीय चळवळ्या लोकांचा एका बाजूने बंगालमधील चळवळ्या लोकांशी व दुसऱ्या बाजूने पुणें व नाशिक येथील चळवळ्या लोकांशी संबंध आहे यात संशय नाही.)

बंगालच्या क्रांतिकारकांचा डॉ. मुंजे यांच्या द्वारेच मध्यप्रांताशी संबंध आला. डॉ. मुंजे यांचे या क्रांतिकारकांशी संबंध, लोकमान्य टिळकांच्या समवेत मुंजे हे शिवाजी उत्सवाच्या निमित्ताने कलकत्त्याला गेले असता उत्पन्न झालेले आहेत. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या महाराष्ट्रभर विखुरलेल्या क्रांतिकारक संस्थेचे डॉ. मुंजे हे तत्कालीन मराठी मध्यप्रांतातील एक महत्त्वाचे साहाय्यकर्ते व विश्वासाचें स्थान होते. याचें एक मोठें प्रमाण येथे उल्लेखिण्यासारखें आहे. इ. स. १९०९-मध्ये प्रसिद्ध झालेल्या व प्रसिद्धीपूर्वीच जप्त झालेल्या सावरकरांच्या १८५७-च्या क्रांतियुद्धावरील इंग्रजी ग्रंथाच्या प्रती पिक्विक पेपर्स, वेव्हर्ले इत्यादि इंग्रजी कादंबऱ्यांच्या सुंदर वेष्टनातून भारतात गुप्त रितीने पाठविण्यात

आल्या होत्या. त्यांतील एक प्रत डॉ. मुंजे यांच्याकडे पाठविण्यात आली होती. ती प्रत मुंजे यांच्याकडे आल्याचा सुगावा गुप्तचरांना काही दिवसांनी लागला. नागपूरच्या सिटी सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिसने डॉ. मुंजे यांच्याकडे सकाळी भेटावयास येत असल्याचा निरोप पाठविला. भेट कशास्तव आहे हें मुंजे यांनी ओळखलें. ते लगेच स्नान करून देवपूजेसाठी बसले. मागाहून तो पोलिस अधिकारी येताच त्याला बाहेर बसविण्यात आलें. कृष्णराव भीष्म या नांवाचे एक कार्यकर्ते होते. त्यांनी घरच्या झाडकाम करणाऱ्या नोकराचा वेष घेऊन एका केराच्या टोपलीत खाली कचरा–वर कचरा व मध्यभागी तें पुस्तक लपवून तो अधिकारी बसला होता तेथून झाडीत झाडीत ते कचरा टाकावयाच्या निमित्ताने बाहेर निघून गेले. मागाहून मुंजे पूजा आटोपून बाहेर आले व निश्चितपणे त्या अधिकाऱ्याशी बोलू लागले. त्याने पुस्तकाविषयी विचारताच मुंजे म्हणाले "हवें तर झडती घ्या व संशय फेडून घ्या." झडती घेण्यात आली. पण पुस्तक तेथे नव्हतेंच तर सापडणार काय ! श्री. कृष्णराव भीष्म यांनी तें पुस्तक केशवराव हेडगेवार (पुढे सरसंघचालक डॉ. हेडगेवार) यांच्या घरी नेऊन दिलें. डॉ. हेडगेवार यांच्याजवळ तें पुस्तक त्यानंतर अनेक वर्षे होतें.

क्रांतिकारक चळवळीचा बंगालमधील वाढता जोर व विलायतेतील धिंगरा प्रकरण व नाशिक येथील जॅक्सनवधाचें प्रकरण यानंतर क्रांतिकारक चळवळ व तिला माणसांचा व पैशांचा पुरवठा करणारा राष्ट्रीय पक्ष यांचें निखंदन करावयाचा ब्रिटिश सत्तेने निर्धार केला. क्रांतिकारकांचे अग्रणी म्हणून सावरकरांना पन्नास वर्षें काळे पाण्याची अमानुष शिक्षा देण्यात आली. अनेक तरुणांना वधस्तंभावर लटकविण्यात आलें व अनेकांच्या घरादारावरून नांगर फिरले. मध्यप्रांतातील क्रांतिकारक गट व राष्ट्रीय पक्ष नष्ट करण्यासाठी इन्स्पेक्टर-जनरल ऑफ पोलिस क्लीव्हलँड याने विडाच उचलला होता. त्यासाठी त्याला विशेष अधिकारही देण्यात आले होते. त्याने केलेल्या कामगिरीसंबंधी चीफ कमिशनर मध्यवर्ती सरकारला पाठविलेल्या वृत्तात (१९१२) लिहितो :

A few years ago there was a dangerous political society with its head quarters in Nagpur known as the Rashtriya Mandal; but it was broken up by Mr. Cleveland.

—History of Freedom Movement in Madhyapradesh P.259.

(काही वर्षांपूर्वी राष्ट्रीय मंडळ या नांवाची एक भयंकर राजकीय संस्था येथे होती व नागपूर हें तिचें केंद्र होतें. पण मि. क्लीव्हलँड यांनी ती मोडून काढली.)

मध्यप्रदेशात विशेषत: नागपूर विभागात अनेकांचा संशयावरून छळ सुरू झाला. मोठमोठ्या पुढाऱ्यांच्या संबंधातही सरकारची वागणूक कशी पशुत्वाची असे याचें एक महत्त्वाचें उदाहरण म्हणून श्री. अच्युतराव कोल्हटकर यांच्या तुरुंगातील छळाचें देता येईल.

अच्युतराव हे वस्तुत: रावबहादुर वामनराव कोल्हटकर यांच्या-सारख्या सरकारच्या कृपेत असणाऱ्या मवाळाग्रणीचे चिरंजीव होते. पण स्वत: ते जहाल मताचे असल्यामुळे इ. स. १९०८-मध्ये श्री अरविन्द घोष यांचीं भाषणें आपल्या देशसेवक पत्रात छापण्याच्या अपराधावरून ते पकडले गेले याचा उल्लेख मागे केलाच आहे. त्यांना अठरा महिन्यांची सश्रम कारावासाची शिक्षा झाली. सन १९१०-मध्ये अच्युतरावांनी कलकत्ता हायकोर्टात अपील केल्यावर न्यायमूर्तींनी त्यांची मुक्तता केली. तुरुंगातून सुटून येताच नागपूरच्या जनतेने त्यांचें अतिशय उत्साहाने स्वागत केलें. सरकारची सूडबुद्धि मात्र त्यांच्या संबंधात पहिल्या इतकीच जागृत होती. नागपूरच्या ज्युडिशिअल कमिशनरने दि. २६ मार्चला विशेष आज्ञा काढून त्यांची वकिलीची सनद रद्द केली. अच्युत-रावांनी तुरुंगात त्यांना जी वागणूक मिळाली तिचा जो परिस्फोट केसरीतून केला तो पाहण्यासारखा आहे.

'देशसेवकचे' संपादक रा. अच्युतराव कोल्हटकर यांची मुक्तता झाल्यावर त्यांची केसरीच्या खास प्रतिनिधीने मुलाखत घेतली; त्या वेळी उभयतांचें पुढीलप्रमाणे संभाषण झालें.

प्र० – आपणांस २७ तारखेस संध्याकाळी सोडतील अशी आम्हांस कल्पनाही नव्हती. आपणांस तरी हें माहीत होतें काय?

उ० – नाही, आणि तुरुंगातील अधिकाऱ्यांसही त्याची माहिती नसावी. मला सोडण्याचा सरकारचा हुकूम सायंकाळी एका पोलिस अधिकाऱ्याच्या हाती देण्यात आला व तो त्याने प्रथम तुरुंगातील अधिकाऱ्यांस कळविला. हा हुकूम आल्यानंतर अर्ध्या तासाच्या आतच माझी मुक्तता झाली.

प्र० – आपली शहरापर्यंत येण्याची कशी व्यवस्था झाली?

उ० – मला जेल अधिकाऱ्यांनी सांगितलें की, तुम्हांस पाहिजे असल्यास बाहेर टांगा उभा आहे. बाहेर आल्यावर पोलिस सब-इन्स्पेक्टरनी माझी कोठे जाण्याची इच्छा आहे, याची विचारपूस केली. मी म्हणालो की, मला प्रथम वडिलांचें दर्शन घेतलें पाहिजे. परंतु सिताबर्डीवरील आमचे घरात माझे कुटुंबातील कोणीही त्या वेळी नसल्यामुळे मी एकदम माझे प्रिय व सन्मान्य मित्र डॉ. मुंजे ह्यांचेकडे शहरात आलो.

प्र० – आपण २२ फेब्रुवारी रोजी सुटणार अशी येथे दाट वदंता होती व त्या दिवशी सकाळपासून संध्याकाळपर्यंत आपली मित्रमंडळी तुरुंगाजवळ सुटकेची प्रतीक्षा करीत बसली होती. आपणांस त्या दिवशी मुद्दाम सोडलें नाही, हें खरें काय ?

उ० – ही बातमी कशी पसरली हें मला माहीत नाही. २२ फेब्रुवारी हा माझ्या सुटकेचा दिवस मुळीच नव्हता. माझी सुटका खरोखर १ मार्च रोजी व्हावयाची.

प्र० – मग आपणांस दीड दिवस अगोदर कां सोडलें ?

उ० – हेंच तर आश्चर्य! शिवाय कैद्यांना संध्याकाळी सोडण्याचा नेहमीचा संप्रदाय नाही. माझ्या मित्रांना २२ फेब्रुवारी रोजी एक सबंध दिवस विनाकारण तसदी पडली, त्याबद्दल मला फार वाईट वाटतें.

प्र० – तुरुंगात आपणांस चष्मा मिळाला होता काय ?

उ० – नाही. शिक्षा झाल्या दिवसापासून माझा चष्मा जेलच्या ऑफिसमध्ये पडला होता. तो मुक्ततेचा हुकूम आल्यानंतर मला देण्यात आला. मी कच्च्या कैदेत असतानाही प्रथम तो मजपासून घेतला होता, परंतु तो मागाहून परत देण्यात आला. फक्त सुपरिंटेंडेंटच्या देखत मी तो लावू नये, अशी जेलरनी आपली इच्छा प्रदर्शित केली.

प्र० – आपण प्रथम जेलमध्ये गेला तेव्हा आपलें वजन किती होतें ?

उ. – १३५ पौंड. परंतु कैद केल्यापासून तों मुकदम्याचा निकाल होईपर्यंत जे चार पांच महिने तुरुंगात गेले तितक्या मुदतीत तें ११४ पौंडांपर्यंत आलें होतें !

प्र० – वजन इतकें कमी होण्याचें काय कारण ?

उ० – मला वाटतें, आमच्या घरचें अन्न जें मला त्या वेळी येत होतें तें मजकडे पोचविण्याची जी तुरुंगातील अव्यवस्थित तऱ्हा होती त्याचा हा परिणाम असावा.

प्र० – परंतु इतकें वजन कमी झाल्याबद्दल अधिकाऱ्यांनी आपल्याजवळ विचारपूस केली कीं नाही ?

उ० – कधीही नाही. तुरुंगात प्रत्येक पंधरा दिवसांनी सर्वांचें वजन करण्यात येतें. माझ्या स्वतःच्या अनुभवावरून मला तर तो व्यर्थ खटाटोप वाटत असे.

प्र० – शिक्षा झाल्यानंतरही हीच तऱ्हा ?

उ० – शिक्षा झाल्यानंतर पहिल्याच पंधरवड्यात माझें वजन सुमारे ११० पौंडांपर्यंत आलें. पुढे मी काही दिवसांनी आजारी पडलो

व ह्या आजारात मला वाटतें माझें वजन १०० पौंडांवर येऊन बसलें असावें !

प्र० — आपणांस कोणतें दुखणें आलें होतें? व त्या दुखण्यात आपली कशी शुश्रूषा झाली?

उ० — एक दिवस माझ्या सर्व अंगावर गळवें उठलीं. माझ्या दुखण्याची सविस्तर हकीकत सांगावयाची म्हणजे तुरुंगातील कित्येक नाजूक गोष्टी प्रसिद्ध केल्या पाहिजेत. परंतु मी इतकेंच सांगतो की, ह्या दुखण्यासंबंधाने (तें खोटें असावें असा) सुपरिं. साहेबांनी संशय घेतला. नागपुरातील तुरुंगात उत्तरचक्र व दक्षिणचक्र अशीं दोन बडीं चक्रें (octagons) आहेत. उत्तरचक्रात एकवार गुन्हेगार (First offenders) कोंडले जातात व दक्षिणचक्रात दुबारे, तिबारे गुन्हेगारांची कोंडणूक होत असते. मी अर्थातच दक्षिण चक्रात होतो. ह्या दक्षिणचक्राचे अधिपति मि. शिवराज मिश्र ह्या नांवाचे एक गृहस्थ त्या वेळी होते. ह्यांच्यावर सुपरिंटेंडेंट साहेबांची अतिशय मेहेरबानी असे. माझ्या दुखण्याचा संशय घेतल्यावर त्याची शहानिशा करणें सुपरिंटेंडेंट साहेबांस जरूर वाटलें असावें; व त्यामुळे त्यांनी असा हुकूम केला की, मला दवाखान्यात न पाठविता माझ्या खोलीतच मला औषधपाणी द्यावें व तेंही देण्यासाठी ऑफिसात असिस्टंटांनी एकटे न जाता प्रत्येक वेळी मि. शिवराज मिश्रांस आपल्याबरोबर घेऊन जावें. सुपरिंटेंडेंट साहेबांस संशय आला, तरी दुखणें मला सोडीना.

प्र० — सुपरिंटेंडेंटची खात्री पटल्यानंतर तरी आपणांस इस्पितळात नेलें कीं नाही?

उ० — माझें सर्व दुखणें माझ्या खोलीतच मला काढावें लागलें. इस्पितळात गव्हाची पोळी, वरण वगैरे अन्न मिळत असे; पण मला मामुली भाकरीच खावी लागली. इस्पितळात खाट वगैरे असते म्हणतात. पण मला खोलीतल्या फरशीवरच तरटावर निजावें लागलें. काही दिवस दुधाचा हुकूम करण्यापलीकडे दुखणेकऱ्याचें अन्न मला दिलें नाही.

प्र० — मामुली अन्न कसें असतें?

उ० — प्रथम तुरुंगात गेलो त्या वेळी सकाळी एक मीठ घातलेली चांदकी, दुपारी चार (जोंधळ्याच्या) भाकऱ्या, तुरीची आमटी व कसली तरी भाजी, असें अन्न मिळत असे. संध्याकाळी दुपारच्या प्रमाणेच अन्न मिळे.

प्र० — प्रथम हें अन्न तुम्हांस चमत्कारिक वाटलें असेल?

उ० – ज्या दिवशी शिक्षा सुनावण्यात आली त्या दिवशी संध्याकाळी तें अन्न पहिल्याने खाण्याचा प्रसंग मला पडला. तीन भाकऱ्या मी कशाबशा खाल्ल्या व भाजीही ढकलली; परंतु आमटी जाणें मुष्किलीचें झालें. पुष्कळ दिवसपर्यंत त्या आमटीचा वासही मला खपत नसे. भाकरी-आमटी-भाजी हीं आपण सांसारिक माणसें ज्याप्रमाणे रोज पाहतो तशींच तीं तेथे असतील असें आपण समजाल; परंतु बाहेरील कल्पना तेथे मुळीच उपयोगी पडावयाची नाही. तुरुंगातील ही त्रयी ओळखीची होण्यास तिचें प्रत्यक्ष दर्शनच घेतलें पाहिजे. एक दिवस तर खूपच मजा झाली. जानेवारीचे दहा अकरा दिवस गेले असतील, तों खाण्याचे वेळेस दुपारी माझ्या ताटात दोनच पदार्थ पडले व त्या दोहोंपैकी आमटीचा थाट रोजच्याहून निराळा दिसला. ह्याची चौकशी करता मला असें सांगण्यात आलें की, इतउत्तर आमटी व भाजी एकत्र शिजविण्याचा हुकूम झाला आहे! ह्या योजनेचें मला फार कौतुक वाटलें. आता जर कोणी मला असें सांगितलें की त्या आमटी-भाजी मिक्श्चरमध्येच भाकरीचेंही पीठ टाकून तो रस्सा कैद्यांना चारण्याचा हुकूम झाला आहे, तर मला एकाएकी त्यावर अविश्वास वाटणार नाही. वरील योजना सुरू झाल्यापासून आतापर्यंत भाकरी व हें मिक्श्चर असे दोनच पदार्थ नागपूर जेलमध्ये माझ्या नजरेस पडलें!

प्र० – नऊ भाकऱ्यांत कैद्याचें पोट खूपच भरत असेल?

उ० – मला तरी निदान तसा अनुभव नाही. ह्या नऊ भाकऱ्या म्हणजे कुलवाडी लोकांच्या घरातील चार-पांच भाकऱ्यांचा तरी ऐवज असेल कीं नाही, ह्याचा संशयच आहे. नागपूर जेलमधलें मोजमाप मला माहीत नाही. पण खांडवा जेलमध्ये मला प्रत्यक्ष बल्लवगिरी करावी लागल्यामुळे कैद्यांना किती अन्न मिळतें ह्याची माहिती मला झाली. जितक्या पिठाच्या नागपुरात चार भाकऱ्या करतात तितक्याच्याच येथे पांच भाकऱ्या बनवितात व या हिशोबाने खांडव्यास एकंदर अकरा भाकऱ्या प्रत्येक कैद्याच्या वाट्यास येतात. परंतु इतक्या खाऊनही पोटातील आग मुळीच शमत नाही. ही माझी स्वतःची स्थिति, मग जे जात्याच मजूरवर्गाचे असून शरीरसामर्थ्याची ज्यांच्यावर साहजिक कृपा, त्यांची स्थिति तर विचारावयासच नको. क्षुधा इतकी तीव्र होत असे की, त्या सपाट्यात लाकडाचें पीठही पचून जाईल असें मला वाटे.

प्र० – खांडव्यास गेल्यापासून तुम्हांकडे स्वयंपाकाचेंच काम होतें काय?

उ० – खांडव्यास मी एकंदर आठ साडेआठ महिने होतो. त्यांत पहिले दोन महिने मला खडी फोडावी लागली. सहा घनफूट खडी एका दिवसात एका कैद्यास फोडावी लागते. हें काम धुळीत बसून करावें लागतें व दगड फोडताना कपरी कोठे उडेल ह्याचा नियम नसतो. हातोडीने हाताचीं बोटें फुटून जातात. दातांवर एखादा खडा लागला म्हणजे ज्या झिणझिण्या येतात त्याचें वर्णन करवत नाही. खडी मी फोडीत होतो त्या कारकिर्दीत तेथे एक पारशी सुपरिंटेंडेंट होते. पुढे ते जाऊन त्यांच्या जागी एक युरोपियन सुपरिटेंडेंट आले, व मला वाटतें ते आल्याबरोबर एकदोन दिवसांच्या आतच त्यांनी मला खडीपासून सोडविलें. खडी सुटल्यापासून मी जो स्वयंपाकाचे कामावर होतो तो खांडव्याहून निघेपर्यंत.

प्र० – तेथे आपणांस मिक्श्चरही बनवावें लागत असेल?

उ० – मिक्श्चरचा प्रकार तेथे नाही. तेथे भाकरी-आमटी-भाजी वेगवेगळाली मिळते. उमरावती, अकोला, यवतमाळ, येथेही मिक्श्चर नाही, असें मला समजलें आहे. खांडव्यास काही डाकेखोर दुसऱ्यांदा शिक्षा पावून आले होते. त्यांपैकी काहींनी आपलें पहिलें कैदी आयुष्य येरवड्यास घालविलें होतें. तेही सांगत असत की, तेथेही मिक्श्चर नाही.

प्र० – स्वयंपाक कारखान्यात किती लोक काम करीत असत?

उ० – तीन. त्यांपैकी एक पीठ मळीत असे व दुसरे दोघे त्याच्या भाकऱ्या लाटीत. जोंधळ्याचें पीठ मळून गव्हाच्या पिठाइतकी त्यास तार आल्यावर लाटण्याने लाटून त्याची भाकरी बनविण्याची सुंदर पद्धति मी खांडव्यास पाहिली. ती लाटलेली भाकरी दिसण्यात चांगली दिसून तव्यावर कच्ची राहत नाही. सवयीने त्या लाटण्याच्या कामात मी बराच तरबेज झालो. एका तासात शंभरसव्वाशे भाकऱ्या मी सहज लाटून ठेवीत असे.

प्र० – खडी फोडण्यापेक्षा हें काम आपणांस सुलभ गेलें असेल?

उ० – वास्तविक म्हटलें म्हणजे स्वयंपाकाच्या कामात खडीपेक्षा जास्त मेहनत पडते. शिवाय सर्व कैदी दोन्ही वेळा जेवून जाईपर्यंत जीव धागधूग करीत असतो. कारण न जाणो कोण काय केव्हा खोडी काढील व कसा प्रसंग गुदरेल! परंतु ह्यात हातापायाला जखम होत नसल्यामुळे व क्षुधितांना अन्नसंतर्पण करण्यात जात्याच मौज असल्यामुळे मला हें काम अतिशयच आवडलें.

प्र० – नागपुरास आपण कोणत्या कामावर होता?

उ० – मी तुरुंगात गेलो तेव्हा सर्व कामात दळण्याचें काम अतिशय कठीण अशी कैद्यांची समजूत दिसून आली. खडी फोडण्यात ज्यांना काहीच श्रम वाटत नाहीत अशा सशक्त व जोमदार कैद्यांना दळण्याचें काम मिळाल्याबरोबर ते रडकुंडीस आलेले मी पाहिले आहेत. माझी अशी आशा होती की, मला निदान दळण्याचें तरी काम सांगणार नाहीत. नागपूर जेलमध्ये पुष्कळ निरनिराळीं कामें चालतात. शिपीखाना, लोहारखाना, सुतारखाना, वेतकाम, सतरंजी कारखाना, छापखाना अशीं बरींच कुशलतेचीं व मन रमणारीं कामें तेथे सुरू आहेत. याशिवाय रंग देणें, डागडुजी करणें, इमारत बांधणें वगैरे कामेंही येथे आहेत. ह्यांपैकी कशात तरी माझा शिरकाव होईल अशी मी आशा करीत होतो. मला लिहिण्याचें कारकुनी काम देण्याचें कोणाच्या मनात आलें असतें तर तेंही अशक्य नव्हतें. प्रूफ रीडिंग अथवा टाईप रायटिंग, याही गोष्टी तेथे होत्या. परंतु दळण्याचेंच श्रमाचें काम मला देण्यात आलें! रोज उभें राहून २० शेर अथवा नागपूर मापाचे दोन कुळव जोंधळे मला दळावे लागत! कैद्याला प्रथमतः कामाची सवय नसते. त्यामुळे टांचाचें काम (task) निर्बंधाप्रमाणे पुरें करून देण्यास सहा दिवसांची सवड साधारणतः नवीन कैद्यास मिळत असते. परंतु मला असें स्मरतें की, तिसऱ्याच दिवशी त्या दिवसाचें पुरें २० शेर दळण्याची मला कोणीतरी सूचना केली.

प्र० – ह्या कष्टाच्या कामातून आपली लवकरच सुटका झाली असेल?

उ० – ह्या प्रश्नाचें अपेक्षित उत्तर मला देता येत नाही, याबद्दल वाईट वाटतें. नागपूर जेलमध्ये ५॥ महिने होतो; तेवढ्या सर्व दीर्घ अवधीत दळणें हें एकच काम अव्वलपासून अखेरपर्यंत मला करावें लागलें! या कामातून आज निघेन, उद्या निघेन, अशी आशा मी रोज करीत होतो, परंतु ती सर्व व्यर्थ गेली. माझ्या दृष्टीसमोर अनेक कैदी दळण्याच्या कामात येत व अनेक निघून जात; परंतु दळण्याच्या कामाला माझ्यासारखा कायमचा आधारस्तंभ कोणीही मिळाला नाही! अगदी पहिल्या दिवसापासून दळण्याचें काम मिळणें व तें अव्याहत साडेपांच महिने राहणें, अशीं उदाहरणें जमा करण्यास मुद्दाम शोध करावा लागेल. साडेपांच महिन्यांनंतर माझी खांडव्यास बदली झाली, तेव्हाच जात्याच्या खुंट्याचा व माझ्या हाताचा प्रथम वियोग झाला. हाही वियोग कायमचा नव्हता, असें मला अनुभवांती समजलें. कारण सुटकेपूर्वी आठच दिवसांकरिता जरी मला खांडव्याहून नागपुरास आणलें

तथापि तेवढ्याशा थोडक्या अवधीतही माझे पूर्वीचें दररोज वीसशेर दळण्याचें काम पुनः देण्यात आलें !

प्र० – त्याशिवाय आपणांस काही दुसरा त्रास नागपुरास झाला कीं काय ?

उ० – आपत्ति कधीच एकट्या येत नसतात ! मला असें वाटे की, मी गृहस्थ (Gentleman) असल्यामुळे जेलखान्यात माझे हातून कोणतेंही गैरवर्तन घडणार नाही. खाणेंपिणें कितीही दरिद्रतेचें असलें तरी तेवढ्यामुळे माझी जिव्हा स्वैर होईल व परमेश्वराचें चिंतन करण्याऐवजी मिष्ट अन्नाचें व तूप साखरेचें मला चिंतन करावयास लावील, असा धाक मला कधीच वाटत नसे. ज्यांना सिगारेट वगैरे ओढण्याची सवय आहे त्यांची तुरुंगांत फार दुरवस्था होते. परंतु असा ‘ शोक ’ मी आजन्म कधी केला नव्हता. तेव्हा कामाची गोष्ट बाजूस ठेवली तर इतर कोणत्याही बाबतीत मी डाग लावून घेणार नाही, अशी मला पक्की खात्री होती. पण हा माझा अदमास सर्वथैव चुकला. नागपूरच्या साडेपांच महिन्यांच्या अवकाशात माझे वीस रिपोर्ट झाले व जेलखान्यात साधारणतः जितक्या शिक्षा दिल्या जातात त्यांतील नांव घेण्याजोगी अशी काठ्या मारण्याचीच पशुवृत्तीची शिक्षा माझे वाट्यास येण्याची उरली ! कैद्यास प्रत्येक महिन्यास तीन दिवसांची माफी मिळत असे; परंतु ह्या वीस रिपोर्टांच्या तडाख्यात माझी ही माफी जप्त (Fine) करण्यात आली. विशेष हा की, मे महिनाअखेरपर्यंत मी नागपूर जेलमध्ये होतो. परंतु ह्या वीस रिपोर्टांचे इतकें दूरदर्शित्व की ह्यांनी पुढे येणाऱ्या सात महिन्यांच्या माफीचा आगाऊच ग्रास करून टाकला. मार्च, एप्रिल, मे हे तीन महिने मध्यप्रांतात उकाड्याचे असतात. मे महिन्याची आग तर विचारावयासच नको. परंतु ह्या तिन्ही महिन्यांत मधूनमधून माझ्या दुर्दैवाने मला गनीक्लोदिंग (गोणपाटाचा पोशाख) घालावें लागलें. कैद्याला एक कुडतें, एक चड्डी, व एक कमरेला गुंडाळावयास रुमाल अशीं तीन महावस्त्रें मिळतात. तीं सुताचीं असतात; परंतु ज्या कैद्यांना गनीक्लोदिंग देण्यात येतें, त्यांना ह्यापैकी कुडतें व चड्डी हीं दोनच वस्त्रें नागपूरजेलमध्ये मिळतात व हीं दोन्ही राठ गोणपाटाचीं केलेलीं असतात. इतर कपडे, आपली इच्छा असली तर, काढून ठेवण्याची परवानगी आहे. परंतु नागपूरमध्ये हा गोणपाटी काटेरी पोशाख चोवीस तासांत एक क्षणभरही उतरण्याची परवानगी नाही! ‘ गनी क्लोदिंग ’ ऊर्फ गोणपाटाचा कपडा घालून दळत असताना कुडत्याच्या बाहीच्या खरखरीत कडा दंडाला बोचत व निजले असता

त्या पाठीला टोचत ! दळण्याच्या कामात थंडीच्या दिवसांतही पंधरा वीस मिनिटांच्या आत अंगांत उब येते. मग उन्हाळयाच्या दिवसांत मनुष्य घामाघूम होत असेल ह्यात काय नवल ! ह्याकरिता असा नियमही केलेला आहे की, दळावयास लागण्यापूर्वी कुडतें काढून ठेंवलें पाहिजे. परंतु इतर लोकांस असें उघडें दळावयास मिळत असता 'गनीक्लोदिंग'वाल्यास 'गनी'कुडतीं अंगात ठेवूनच दळावें लागतें ! एप्रिल-मेचे दिवस, रखरख करणारें ऊन, दंड हुळहुळा झालेला, अंग घामाने चिंब भिजून निथाळेलें, अंघोळ करण्याची सोय नाही, व घाम पुसावयास सुद्धा जवळ फडकें नाही, अशा स्थितीत किती यातना झाल्या असतील त्याची आपणच कल्पना करावी ! यात आणखी असें झालें की, त्या गोणपाटी कपड्यांमध्ये घामाची घाण मुरून जाऊन त्यांत शेंकडो उवा पडल्या ! शरीराच्या सर्व भागावरून उवा धावत व जागोजागी चावा घेत. त्यांच्या दुर्गंधीमुळे अन्नाची शिसारी आली, पण अन्न न खाल्ल्यास दळवणार नाही म्हणून जबरदस्तीने अन्न खावें लागत असे ! अशा यमयातनांत रात्री झोंप येणें अशक्य झालें. दिवसाचे श्रम व रात्रीचें जागरण ह्यांच्या माऱ्याखाली जेरीस येऊन जेव्हा शरीरास थकवा येई, तेव्हाच थोडासा डोळा लागत असे. गोणपाट अंगात असतानाच पायांना बेडीचाही लाभ झाला. ह्या सर्व प्रकारांचा प्रकृतीवर परिणाम होऊन चोरटा ताप येऊ लागला. सकाळीच ताप भरावा. दुपारी निघून जावा, संध्याकाळी भरावा, सकाळी उतरावा, असें होऊ लागलें. एकदा मी हॉस्पिटल असिस्टंटला ताप अंगांत असताना बोलाविलें व प्रकृति दाखविली. त्यांनी तपासून पाहिलें तों ताप अंगात होता. डॉक्टर निघून गेले, तापही संध्याकाळी निघाला व माझें शरीर व जातें यांची दोस्ती मात्र अबाधित राहिली ! ह्या स्थितीत मी असाच राहिलो असतो तर क्षयरोगाची वगैरे भावना मला झाली असती, असा माझा तर्क आहे; पण लौकरच मला खांडव्यास नेण्यात आलें. नागपुरास स्टेशनवर डॉ. चोळकर व इतर मित्रमंडळी ह्यांनी मला पाहिलें तें ह्याच स्थितीत होय.

प्र० — आपणांस नागपूर मुक्कामी कोणकोणत्या शिक्षा मिळाल्या ?

उ० — हातकडी, पायसाखळी (Link Fetters), दंडाबेडी, कोलदंडा (Cross-Bar Fetters) व गनीक्लोदिंग ह्या सर्व शिक्षा मला दिल्या गेल्या ! जानेवारीपासून डिसेंबरपर्यंतचे बारा महिन्यांचे माफीचे ३६ दिवस कापून टाकल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. ह्यांपैकी ४ दिवस मात्र चुकूनमाकून राहून गेले होते.

प्र० –हे २० रिपोर्ट साडेपांच महिन्यांत झाले असें आपण म्हणता, त्यांची विल्हेवारी आपणांस करता येईल काय ?

उ० –पहिल्या साडेचार महिन्यांत दहा व पुढील एकाच महिन्यात त्यांची गर्दी उसळून संख्या विसापर्यंत गेली. त्याच महिन्यात मला सांगण्यात आलें की, तुमची वर्तणूक फारच 'बदमाशीची' असल्यामुळे तुम्हांला लवकरच फटक्याची शिक्षा द्यावी लागेल. एकदोनदा मला ही ताकीद मिळाली व खांडव्यास बदली झाली नसती तर पाठीवर वेताच्या काठ्या खाण्याचीही मजवर पाळी आली असती.

प्र० –फटक्यांची शिक्षा म्हणजे वेताच्या छडीने मारतात ?

उ० –होय, मनुष्याला बांधून वेताच्या जाड काठीचे तीस जोराचे तडाखे मारण्यात येतात.

प्र० –खांडव्यास तुमचे कितीसे रिपोर्ट झाले ?

उ० –एकही नाही. नागपूरच्या साडेपाच महिन्यांत वीस रिपोर्ट झाल्यामुळे मला अशी भीति वाटू लागली की, माझ्या बाह्य श्रीमंतीबरोबर माझ्या हृदयाची आंतर श्रीमंतीही गेली की काय ? जसे माझे घरचे कपडे मला उतरावे लागले त्याप्रमाणे माझ्या अंतःकरणानेही नीतीचें पहिलें परिधान टाकून दिलें असावें. वाईट दशा आली तरी मी गृहस्थच (Gentleman) राहीन असा जो माझा गर्व होता, तो फुकट अशी शंका माझें मन घेऊ लागलें. परंतु खांडव्यास नऊ महिने राहूनही जेव्हा एकही रिपोर्ट झाला नाही, तेव्हा माझी नीति मजजवळ कायम आहे असें वाटून मला अत्यानंद झाला.

प्र० –खांडव्याच्या अधिकाऱ्यांनी आपणांस कसें वागविलें ?

उ० –जेव्हा पहिल्या दिवशी मला पारशी सुपरिंटेंडेंट साहेबांपुढे उभें करण्यात आलें तेव्हा त्यांनी माझें हिस्टरी टिकेट पाहून असें सांगितलें की, तुम्ही नागपूरच्या जेल अधिकाऱ्यांस अतिशय त्रास दिला आहे असें दिसतें. तुमचे वडिलांनी ह्या प्रांतात नांवलौकिक मिळविला आहे. तथापि मी तुम्हांस खात्रीपूर्वक बजावतो ( I promise you most faithfully ) की तुमच्याविरुद्ध जरी एक रिपोर्ट झाला, तरी पहिल्याच रिपोर्टास मी तुम्हांस फटक्यांची शिक्षा देईन. खडीच्या कामात मी नवखा असल्यामुळे सुपरिंटेंडेंटनी तें पुरें माप देण्यास सहा दिवसांची मुदत दिली. नागपूरचा विचित्र अनुभव, खडी फोडण्याचें अवघड काम, हातोडी कशी धरावी हें माहीत नाही व सुपरिंटेंडेंटची धमकी, हें सर्व मनात येऊन मला असें वाटलें कीं नागपुरात झालेली अप्रतिष्ठा कमी झाल्यामुळेच फटके खाण्याकरिता माझ्या दुर्दैवाने मला या अनोळखी ठिकाणी ओढून

आणलें आहे. परंतु त्या सदय परमेश्वराच्या कृपेने सहाव्या दिवशी माझ्या हातून पुरती सहा फूट खडी फुटली व पुढे महिनाभर जरी माझी खडी रोज मोजीत असत तरी ती कधीच कमी भरली नाही. मी अंडर-ट्रायल असता जीं पुस्तकें मला वाचावयास मिळालीं होतीं तीं मजबरोबर खांडव्यास आलींच होतीं. त्यातून मला काही तरी वाचावयास मिळावें, अशी मी सुपरिंटेंडेंट साहेबांस खांडव्यास गेल्यानंतर एक महिन्याने विनंती केली. त्यावर त्यांनी 'जेल मॅन्युअल' पाहून शेक्सपिअरचे ग्रंथ व 'Set in Authority' ही सारा डंकनची कादंबरी आलटून पालटून दुपारी एक तासभर देण्यात यावी असा हुकूम दिला. खांडव्यास प्रत्येक महिन्याच्या पहिल्या तारखेस तेथील डेप्युटीकमिशनर तुरुंग पाहण्याकरिता येत असत. मला नागपुरात दंडाबेडीची तीन महिन्यांची शिक्षा देण्यात आली होती, तिच्यापैकी नागपुरास दोन महिने भरून गेले होते व एक महिना उरला होता. हा उरलेला एक महिना डे. कमिशनरांनी ऑगस्टमध्ये माफ करविला व राहता राहिलेली जी कोलदंडाची ( Cross-bar fetters ) शिक्षा तिचीही त्यांनी सप्टेंबरमध्ये माफी देवविली. पहिले पार्शी सुपरिटेंडेंट ऑगस्टच्या आरंभी निघून गेल्यानंतर त्यांचे जागी आलेल्या युरोपियन सुपरिंटेंडेंटनी मला खडीच्या कामातून काढून स्वयंपाकाच्या कामात घातलें, हें मघाशी मीं सांगितलेंच आहे. त्यांनी माझा अशक्तपणा पाहून मला दुसऱ्या वर्गाचा मजूर केलें व ताकद येण्याकरिता बरेच दिवसपर्यंत मला एक उत्तम टॉनिक दिलें. पूर्वीच्या सुपरिंटेंडेंटच्या कारकिर्दीत एक तासभर पुस्तकें देण्याचा जो हुकूम होता तो बदलून सर्व दिवसभर पुस्तक जवळ असावें अशी त्यांनी नवीन योजना केली. यांच्या कारकिर्दीत माझें वजन १०३ पौण्डांपासून १२६ पौण्डांपर्यंत वाढलें. हे गृहस्थ थोडे अगोदर आले असते तर माझें वजन पूर्वीच्या इतकें म्हणजे १३५ पौण्डांपर्यंतही कदाचित् चढलें असतें. खांडव्यास रिपोर्ट वगैरे न झाल्यामुळे माझे मित्र तीन वेळ माझ्या भेटीस येऊ शकले व जानेवारी आणि फेब्रुवारी ह्या दोन महिन्यांचे माफीचे सहा दिवस मला मिळाले. हे ६ दिवस व पूर्वीच्या माफीतून चुकून राहिलेले ४ अशी एकंदर १० दिवसांची माझी माफी झाली होती. माझा सुटण्याचा ठरीव दिवस ११ मार्च, त्यांतून हे १० दिवस वजा जाता १ मार्च हा माझ्या मुक्ततेचा दिवस गणिताने येत होता.

प्र० – तुरुंगातील भेटीसंबंधीचे काय नियम आहेत?

उ० – रिपोर्ट न होईल तर तीन महिन्यांनी एकदा आप्तेष्टांस भेटावयास मिळतें. घरी पत्र पाठविण्यासंबंधाने हाच नियम आहे. पत्र

पाठविलें असता भेट होत नाही व कोणी भेटीस आल्यास पत्र पाठविता येत नाही. नागपुरातल्या वीस 'पेशीं' नी (शिक्षेबद्दलचा रिपोर्ट) माझ्या मित्रांची व माझी भेट कधीही होऊ दिली नाही.

प्र० – नागपुरात आपल्यास काही वाचावयास मिळालें होतें काय ?

उ० – अशी विनंती करावयास उत्तेजक परिस्थिति नागपुरास कधीच नव्हती. तथापि त्यातूनही मी सुपरिंटेंडेंट जवळ बायबल मागितलें व तें त्यांनी दिलें. माझ्या विद्यार्थिदशेत मला बायबलचा इतका नाद लागला होता की, माझ्या वडिलांस मी ख्रिस्ती होतो कीं काय अशी भीति पडली होती. बायबलाच्या अभ्यासाचे मजवर अनंत उपकार आहेत. कारण बायबलच्याच अभ्यासाने मी पक्का हिंदु बनलो. बायबलच्या अभ्यासाची पुनरावृत्ति मला नागपूर जेलमध्ये करावयास सापडली. ज्या वेळी तुरुंगातील शारीरिक यातना मला असह्य झाल्या, त्याच वेळी बायबलातील प्रक्षिप्त भाग मी वाचीत होतो. त्यात वर्णन केलेला छळ पाहून मला असें वाटलें की ह्या छळापुढे माझे क्लेश काहीच नाहीत. मग असा छळ सोसणारीं नवरत्नें होऊन गेलीं असता मी माझ्या दुःखाची पर्वा कां करावी ? सेंट मॅथ्यूच्या शुभवर्तमानापैकीं ५, ६, व ७, ह्या तीन अध्यायांचें मी पारायण केलेलें आहे. आपल्या भारतभूचे सर्ववंद्य कैवारी श्री. बाळ गंगाधर टिळक ह्यांस मिळालेल्या सहा वर्षांच्या बंदिवासापुढे माझें सव्वा वर्ष काहीच नाही. हा विचार मनात येऊन सेंट मॅथ्यूमधील पुढील वाक्य मला नेहमी आठवे. " Blessed are ye when men shall revile you and persecute you and shall say all manner of evil against you falsely for my sake. Rejoice and be exceedingly glad for so persecuted they the prophets that went before you.

प्र० – नागपूर व खांडवा येथील कैद्यांत आपणांस काही फरक आढळला काय ?

उ० – नागपूर जेलमध्ये जितके कैदी मला आढळले त्यांत समंजस, सुज्ञ, संभावितपणाचा रीतिरिवाज जाणणारे व स्वदेशावर प्रेम करणारे जास्ती होते. खांडव्यास नीच स्थितीतील व नीच मनोवृत्तीच्या कैद्यांचा जास्ती भरणा दिसून आला. नागपुरात शिपाई अथवा कैदी ह्यांपैकी कोणीही दुसऱ्यास सहसा अरे तुरे करीत नाही. परंतु खांडव्यास अरेतुरेचा प्रकार सार्वत्रिक दिसला. मुद्दाम उपमर्द करण्याच्या उद्देशाने नव्हे, परंतु रोजच्या सवयीने ज्या वेळी एखादा शिपाई मला शिवी देई त्या वेळी माझ्या कल्पनेप्रमाणें ठाण्यास असलेले लो. परांजपे व साबर-

मतीच्या तुरुंगात महिना दीड महिना सक्तमजुरी भोगीत असलेले महाभाग टिळक ह्यांसही एखादा उल्लू शिपुर्डा अशीच शिवी देत असेल काय, अशी कल्पना मनात येऊन चित्ताला चरका बसत असे.

प्र० – आपणांस नागपूर जेलमधून खांडव्यास नेण्यास कोणाचे परिश्रम कारणीभूत झाले असावे असें आपणांस वाटतें ?

उ० – हें मला नीटसें माहीत नाही. परंतु तें कोणाचेंही कृत्य असलें तरी त्याने माझ्या शिरावर उपकारांचें ओझेंच करून ठेवलें आहे यात शंका नाही.

प्र० – कैद्यांची साधारण रोजची व्यवस्था कशी असते ?

उ० – सकाळ झाल्याबरोबर उठण्याची घंटा होते. शौचास नेमल्या वेळीच गेलें पाहिजे व तेंही एक दोन मिनिटांपेक्षा जास्त बसता येत नाही. एकीकडे शौचास जाऊन पाणी घेण्याकरिता दुसरीकडे जावें लागतें. जेलखान्यात नागवेपणाचा मुळीच विधिनिषेध नाही शौचकूपाच्या छपरीत निरनिराळ्या कुंड्या केलेल्या असतात व त्यांना दारें मुळीच नसतात. जास्त वेळ शौचास बसल्यास हात धरून उठविण्यात येतें ! जेलखान्यात शौचाची अतिशयच चोरी आहे. भलत्या वेळी शौचास गेल्यास तें गैरवर्तन समजलें जातें. शौचास अगर लघुशंकेस जाणें तें 'ओव्हरसिअरला' विचारून त्याच्या देखत जावें लागतें. प्रत्येक कैद्यास एक ताट व एक परळ (Cup) अशीं दोन लोखंडी भांडीं दिलेलीं असतात व तीं त्यांस नेहमी स्वच्छ ठेवावीं लागतात. स्नानाचा मुख्य दिवस दर पंधरवड्यातील आदितवार हा होय. श्मश्रू व वजन ह्याच दिवशी होतें. श्मश्रू करण्याचें काम एका कैद्याकडे दिलेलें असतें व श्मश्रू वस्तऱ्याने न करता यंत्राने केली जाते. त्या दिवशी पाणी तापवून त्यात धोब्याची माती मिसळतात व ह्या मृत्तिकामिश्रित पाण्याने सर्व कपडे स्वच्छ धुवावे लागतात. सरकारने जितकें अन्न द्यावयाचें ठरविलेलें असतें तितकें प्रत्येक कैद्यास खावेंच लागतें. कमी अथवा जास्त खाणें हा गुन्हा आहे. शौचासंबंधी कडक नियम असल्यामुळे जास्ती खाणें धोक्याचें असतें. 'कम खाना, गम खाना, जब कटे जेलखाना' ही कैदी लोकांची म्हण इकडील प्रांतात सर्वत्र प्रसिद्ध आहे. कैद्यांचें संध्याकाळचें जेवण सुमारे साडेपांच वाजता होऊन त्यास आपल्या बराकीत बंद व्हावें लागतें. निजावयास एक तरट व एक घोंगडी मिळते. 'बाहू असता आपणांपाशी, मग कशास पाहिजे उशी' ह्या तत्त्वाचा तुरुंगात प्रत्यक्ष व्यवहार करावा लागतो.

प्र० – 'हरिकिशोर'चे संपादक दे. भावे, हे नागपूरच्याच तुरुंगात आहेत. त्यांची व आपली भेट झाली होती काय ?

उ० – भेट होणें मुष्किलीचें होतें. मला इतर कैद्यांच्या बराकीत ठेवलें असतें तर कधी तरी त्यांचें दर्शन झालें असतें. परंतु नागपूर येथे पहिल्यापासून जें मला गुन्हाखान्या (Solitary cell) मध्ये ठेवलें होतें ते शेवटपर्यंत ! पीनल कोडात गुन्हेखान्याची शिक्षा सांगितली आहे. परंतु त्यात सुद्धा असा निर्बंध आहे की, एका खेपेस एका आठवड्यापेक्षा जास्त वेळपर्यंत गुन्हाखाना देऊ नये. माझे जे वीस रिपोर्ट झाले त्यावरून मी खराच दुर्वर्तनी आहे, असें जरी मानलें तरी पहिल्या दिवशी तरी मी खास असला दुर्वर्तनी ठरलो नव्हतो. मला शनिवारी शिक्षा झाली, रविवारचा दिवस सुट्टीचा गेला आणि सोमवारी सकाळी माझ्या हातून असा कोणता गुन्हा होणें शक्य आहे की त्यामुळे माझी त्या वेळी गुन्हेखान्यात रवानगी व्हावी ? एखाद्या गृहस्थास अशा रीतीने गुन्हेखान्यात बेहिशेबी कोंडणें ह्यात कोणाचा कोणता पुरुषार्थ साधला असेल तो असो. दुसऱ्या कैद्यांमध्ये मी मिसळलो असतो तर कोणत्याही प्रकारची आपत्ति आली असती असेंही मानता येत नाही; कारण खांडव्यातील आठ महिन्यांत मला इतर कैद्यांमध्ये वागू दिलें असताही कोणतेंच संकट उद्भवलें नाही. खांडव्यातील अधिकारी स्पष्ट म्हणाले की, आम्ही त्यास विनाकारण गुन्हेखान्यात कोंडणार नाही. नागपुरातील वीस रिपोर्टांचा खांडव्यास एवढाच वाईट परिणाम झाला की, तेथे निजण्यास गुन्हेखान्यात जावें लागे. खांडव्यातील 'एकांती खोल्या' फार चांगल्या आहेत. कैद्यांना निजण्याकरिता त्यात मातीचे पलंग केलेले आहेत व शौचकुपाची कुंडी बरीच दूर असते. नागपुरात असले पलंग तर नाहीतच, पण शौचाची कुंडी व कैद्याचें तोंड ह्यांतही काही वितीपेक्षा जास्त अंतर नसतें.

प्र० – आपल्या आरोग्यार्थ आपल्या हितचिंतकांनी जी खटपट चालविली होती तिची माहिती आपणांस कधी झाली होती काय ?

उ० – ही सर्व गोष्ट मला केवळ अश्रुतपूर्वच होती. खांडव्यास असताना जें सौख्य झालें त्याचा कदाचित् थोडासा वाटा पार्लमेंटातील प्रश्नोत्तरांकडे असेल.

प्र० – आपल्या मुकदम्यात जेव्हा जेव्हा पोलीस ऑफिसरांचा संबंध आला तेव्हा तेव्हा त्यांचें वर्तन कसें झालें ?

उ० – पोलिसांचें वर्तन सभ्यपणाचें होतें. मि. लॅथम, मि. आर्मस्ट्रॉंग, इत्यादि अधिकारी मला जितका कमी त्रास होईल तितका करण्याचा

प्रयत्न करीत. मि. क्लीव्हलंड यांनी मला वाचावयास पुस्तकें आणून दिलीं. खांडव्यास नेताना व तेथून येताना पोलिस अधिकारी मजशी फार अदबीने वागले."

या मुलाखतीवर संपादकीय लिहिताना केसरीत (दि. ८-३-१०) केसरीकार लिहितात :

"वरील संवाद वाचल्यावर कोणासही असें दिसून येईल की, नागपूरच्या 'देशसेवक'चे माजी संपादक रा. अच्युतराव कोल्हटकर यांच्या प्रकृतीसंबंधाने त्यांच्या स्नेह्यांनी केलेल्या अर्जास चीफ कमिशनर साहेबांनी 'कोल्हटकरांची' प्रकृति काळजी उत्पन्न करण्यासारखी नाही, अशा आशयाचें जें उत्तर दिलें, तें सर्वस्वी निराधार होतें. रा. अच्युतराव कोल्हटकर यांची नुकतीच बंदिवासातून सुटका होऊन ते आपल्या घरी जिवंत परत आले, याबद्दल आम्ही त्यांचें व त्याचप्रमाणे मराठी वर्तमानपत्राच्या अमूर्त संघाचें अभिनंदन करतो. अशा प्रकारचें अभिनंदन करताना नेहमीच्या रीतीने 'सुखरूप' परत आले असे शब्द वापरावयाचे; परंतु प्रस्तुत प्रसंगी जिवंत परत आले असे सत्यनिष्ठुर शब्द योजणें हेंच अधिक योग्य व सर्वस्वी सार्थ होणार आहे. कारण वर आमच्या प्रतिनिधीने दिलेल्या त्यांच्या मुलाखतीची हकीकत जो कोणी वाचील त्यास नागपूरच्या तुरुंगात झालेल्या हालअपेष्टेतून अच्युतराव हे खांडव्याच्या तुरुंगात थारेपालट करण्यास जाईपर्यंत तरी जिवंत राहिले याचेंच आश्चर्य वाटेल! परंतु कोल्हटकर यांचे प्राण प्रत्यक्ष खर्ची न पडण्याचें श्रेय नागपूरच्या त्यांच्या 'जेलरास' नसून त्यांच्या वागणुकीच्या संबंधाने धीटपणाने कागाळी करून व मध्यप्रांताच्या सरकारकडे अर्ज भिडवून हा थारेपालट करविणें भाग पाडणाऱ्या डॉ. मुंजे आदिकरून त्यांच्या स्नेहांकित वैद्यचतुष्टयास आहे यात शंका नाही. कोल्हटकर यांच्या प्रकृतीसंबंधाने इतका सार्वजनिक गवगवा झाला नसता, आणि नागपूरच्या तुरुंगातच जर त्यांस आणखी काही दिवस काढावे लागले असते, तर सरकारच्या टीकाकारांपैकी निदान एक व्यक्ति तरी 'विनबोभाट' कायमची कमी झाली असती असें मानण्यास बरीच जागा आहे. पुष्कळ वेळा सोनें आणि सोनार यांच्यामध्ये गुणांची समान वाटणी करून टाकून दागिना बिघडल्याच्या जबाबदारीची आपण विल्हेवाट लावतो. परंतु खांडव्याच्या तुरुंगांतले कोल्हटकर तेच नागपूरच्या तुरुंगांतले कोल्हटकर होते. हें लक्षात घेतलें म्हणजे त्यांचे हाल करण्याचा विडाच नागपूरच्या तुरुंगातील अधिकाऱ्यांनी उचलला असला पाहिजे – एरवी अशा संभावित गृहस्थास दळण दळण्यासारखे अपमानास्पद व अत्यंत मेहनतीचें काम साडेपाच

महिने एकसारखें देणें व इतर रीतींनी त्यांचे इतके हाल करणें याचें दुसरें काही कारण असावें असें कोणासही वाटणार नाही. रा. कोल्हटकर यांनी 'देशसेवक' पत्रामधून सरकारास अप्रिय असे लेख लिहिण्याचा गुन्हा नागपूर शहरात केला म्हणून नागपूरच्या तुरुंगातच त्यांचा विशेष छळ व्हावा, हें स्थलमाहात्म्याचें कारण सहज सुचणारें आहे. परंतु कसेंही असलें तरी अच्युतरावांसारख्या संभावित राजकीय गुन्हेगाराचा असा अमानुष छळ करणें हाही एक अत्याचारच होय, व या अत्याचाराबद्दल त्यांच्या निष्ठुर पहारेकऱ्यांस इंग्रज सरकारच्या कोर्टात जरी शिक्षा होण्यास मार्ग नसला तरी परमेश्वराच्या वरिष्ठ न्यायासनापुढे त्याचा इन्साफ होऊन त्यास तो शासन करील याबद्दल आम्हांस यत्किंचितही शंका वाटत नाही."

प्रत्यक्ष फटक्यांची शिक्षा झाली असती तर अच्युतरावांचा हा छळवाद पूर्ण झाला असता. त्यांच्या संबंधातील सरकारी वर्तणुकीत जें परिवर्तन घडून आलें त्याचें पुष्कळसें कारण डॉ. मुंजे यांनी त्यांच्यासाठी केलेले प्रयत्न होत. नागपूरच्या तुरुंगात असताना अच्युतरावांनी डॉ. मुंजे इत्यादि आपल्या मित्रमंडळींना त्यांना तुरुंगात मिळत असलेल्या रानटी-पणाच्या वागणुकीसंबंधी व विशेषत: लवकरच मिळणार असलेल्या फट-क्यांच्या शिक्षेसंबंधी माहिती कळविली. अच्युतरावांच्या हस्ताक्षरातील तें पत्र येताच मुंजे यांनी त्याची वृत्तपत्रांतून परिस्फुटता केली. त्याचा गवगवा होऊन प्रकरण चीफ कमिशनरकडे गेलें व चीफ कमिशनरने त्यांना भेटावयास बोलाविलें. तेथे झालेल्या प्रश्नोत्तरांत चीफ कमिशनरनें मुंजे यांना अच्युतरावांना मिळत असलेल्या वाईट वागणुकीसंबंधीचा तुमच्याजवळ पुरावा काय आहे असें विचारलें, त्यावर डॉ. मुंजे यांनी अच्युतरावांचें प्रत्यक्ष पत्र हाच पुरावा असल्याचें सांगितलें. त्यावर चीफ कमिशनर चपापला व त्याने तें पत्र दाखवावयास सांगितलें. मुंजे म्हणाले, "आपण माझ्या घरी याल तर, मी तें पत्र आपणांस दाखवीन, पण देणार मात्र नाही." त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सकाळी तो अधिकारी मुंजे यांच्या घरी आला. त्याने तें पत्र वाचून परत केलें तर ठीक; पण न केलें तर आहे तोही पुरावा नष्ट होऊ नये या हेतूने, तें पत्र प्रसंग आला तर त्यांच्याजवळून हिसकावून घ्यावयास धुंडिराजपंत ठेंगडी ( पुढे मिरत कटाचे एक गाजलेलें सूत्रधार ) व अन्य काही गृहस्थांची दारावर गुप्तपणें योजना करण्यात आली. ठरल्यावेळी चीफ कमिशनर आला. मुंजे यांनी त्याचें स्वागत केल्यावर त्याला तें पत्र दिलें. बसावयाच्या खुर्च्यांची रचना देखील अशी केली होती की, प्रवेशद्वारात मुंजे यांची खुर्ची होती

व एक प्रकारे दार अडवूनच त्या अधिकाऱ्याला थोडें मागच्या अंगाला बसविलें होतें. पत्र त्या अधिकाऱ्याने वाचलें व तें मुंजे यांच्या स्वाधीन करून गंभीर चेहऱ्याने तो निघून गेला. काही विशेष न करता प्रसंग निभावला.

पुढे याच पत्राच्या आधारावर पार्लमेंटमध्ये प्रश्न विचारण्यात आले. अच्युतरावांसारख्या मोठ्या योग्यतेच्या पुरुषाला मिळालेल्या या स्वरूपाच्या वागणुकीवरून मध्यप्रदेशात सरकारी दडपशाही कशी चालली होती याची यथार्थ कल्पना येते. राष्ट्रीय पक्षाच्या विचारप्रणालीचीं वृत्तपत्रें सरकारविरुद्ध असंतोष पसरवितात म्हणून त्यांची मुस्कटदाबी करण्यासाठी सन १९१०-मध्ये प्रेस ॲक्ट करण्यात आला. या प्रेस ॲक्टने जवळजवळ सन १९१४-पर्यंत राष्ट्रीय वृत्तपत्रांचा गळाच आवळलेला होता. या कायद्यानुसार मुद्रणालयाच्या मालकाला रजिस्ट्रेशनच्या वेळी मॅजिस्ट्रेटच्या इच्छेनुसार ५०० ते २००० रुपयांपर्यंत जामिनकी भरावी लागत होती. हा कायदा अस्तित्वात येण्यापूर्वी अस्तित्वात आलेल्या मुद्रणालयांकडून प्रांतिक सरकारच्या इच्छेनुसार ५०० ते ५००० रुपयांपर्यंत जामिनकी मागण्याचा मॅजिस्ट्रेट्सना अधिकार होता. त्याचप्रमाणे रजिस्ट्रेशनच्या वेळी नव्या वृत्तपत्राच्या प्रकाशकाकडून प्रांतिक सरकारच्या निर्णयानुसार ५०० ते ३००० रुपयांपर्यंत जामिनकी मागता येत होती. जर तें वृत्तपत्र राजद्रोही विचारांचा प्रसार करणारें आहे असें सरकारला वाटलें तर ही रक्कम जप्त करण्याचा अधिकार प्रांतिक सरकारला देण्यात आला होता व अशा वृत्तपत्राचें प्रकाशन पुन्हा सुरू करावयाचें झाल्यास प्रांतिक सरकारच्या इच्छेनुसार पूर्वीच्या दुप्पट जामिनकी मागण्याचा सरकाराला अधिकार होता. इतकें करूनही वृत्तपत्र पुन्हा सुरू झालें व त्यात पुन्हा दुसऱ्यांदा सरकारला राजद्रोहाचा वास आला तर अशीं वृत्तपत्रें, पुस्तकें जप्त करण्यात येऊन छापखान्याला कुलूप ठोकलें जाई व प्रकाशन सदाचें बंद करण्यात येई. अशा स्थितीत या जुलमी कायद्याचा परिणाम राष्ट्रीय वृत्तपत्रें एकामागून एक बंद होण्यात झाला असल्यास तें स्वाभाविकच म्हटलें पाहिजे. भाषणापासून सर्वच गोष्टींवर सरकारी दडपशाहीचा वरवंटा सतत फिरत असल्यामुळे जवळजवळ इ. स. १९१४-पर्यंत राष्ट्रीय चळवळीची कशी दुरवस्था झाली होती याचें वर्णन कै. न. चिं. केळकर यांनी आपल्या आत्मचरित्रात पुढीलप्रमाणे केलें आहे :

" जॅक्सनच्या खुनाचा खटला संपल्यानंतर महाराष्ट्रात एक प्रकारची उदासीनता व निष्क्रियता आली. वायु झालेला मनुष्य ती लहर

जोरात असता आपल्या आवाक्याबाहेर शारीरिक श्रम करतो; तो वायूचा झटका उतरला म्हणजे प्रतिक्रिया होऊन निपचित पडतो; व वायूच्या लहरीपूर्वी त्याच्या अंगात जितकें त्राण असतें तितकेंही त्या लहरीचा उपशम झाल्यावर उरत नाही. तशी स्थिति महाराष्ट्राची झाली. नवे नवे वाद किंवा नवे नवे उपक्रम सुरू करणारे टिळक तुरुंगात डांबून ठेवले गेले. राष्ट्रीय पक्षाने राष्ट्रीय सभेवर बहिष्कार घातला पण त्याऐवजी स्वतःची अशी संघटना त्याने काहीच केली नाही. टिळक परत येतील व मग जें काय करावयाचें तें करतील असाच हवाला जो तो देत होता !

"दुसरे पक्षी, पूर्वी राष्ट्रीय पक्षाचे लोक राष्ट्रीय सभेत असताना जरी कलह होत तरी त्यामुळे राजकारणात जागृति राहिली होती. पण सुरतेच्या राष्ट्रीय सभेनंतर राष्ट्रीय पक्ष बाहेर पडून जरी नेमस्त पक्षाला एकतंत्री राज्य लाभलें, तरी त्या राज्यात काही स्वारस्य उरलें नाही. विरोधामुळेच पुष्कळ गोष्टींना महत्त्व व तेज राहतें. पण तो विरोध संपला म्हणजे तें तेज नाहीसें होतें. रस्सीखेचीच्या खेळात दोन पक्ष दोन्हीकडे ओढीत असतात, तोपर्यंत त्यांच्या हातांतील दोर लोखंडाच्या कांबीसारखा ताठ राहतो व दोन्ही बाजूचे गडी पवित्र्यावर उभे राहून आपली शक्ति प्रकट करण्याची कमाल करीत असतात. पण ताण ऐन जोरात असता दोर तुटला किंवा एका बाजूच्या लोकांनी अवचित तो सोडून दिला तर दुसऱ्या बाजूचे लोक नुसते कोलमडून पडतात ! त्या-प्रमाणे राष्ट्रीय पक्ष निघून गेल्यामुळे राष्ट्रीय सभेची दुर्दशा झाली. राष्ट्रीय पक्षाबरोबर त्या पक्षात सामील नसलेल्या अशाही अनेक लोकांनी राष्ट्रीय सभेला जाण्याचें सोडलें. सर फेरोजशहा मेथा प्रभृति लोक आळशी व मिजासी असल्यामुळे राष्ट्रीय सभेला जाऊन सर्व वेळ हजर राहून निरनिराळ्या युक्त्यांनी तिला महत्त्व आणून ती चित्ताकर्षक करण्याचें काम त्यांच्या हातून झालें नाही. सभेचे ठराव म्हणजे मिळमिळीतपणाचें प्रदर्शन होऊ लागलें. प्रतिनिधींची संख्या रोडावत चालली. १८९०-च्या सुमाराला ही प्रतिनिधींची संख्या जी २००० पर्यंत गेली होती ती १९१२-१३-च्या सुमाराला अवघ्या ३००-वर येऊन ठेपली, आणि अध्यक्षही मुधोळकरांसारखे लाभू लागले होते. म्हणजे असें की, त्यांच्या भाषणात, युक्तिवादात, कृतीत नुसत्या राजकीय तेजस्वितेचाच अभाव नव्हे, तर मूर्तिमंत रूक्षपणाचा अवतार प्रकट होऊ लागला होता.

"अशा रीतीने राष्ट्रीय पक्ष कुढून बसलेला व नेमस्त पक्ष हालचाल करीत असला तरी त्या हालचालीने सरकारच्या तोंडावरची माशीही

न उडणारी! टिळकांना काळ्या पाण्याची शिक्षा झाल्यामुळे वक्ते व लेखक यांच्यावर जरब बसलेली आणि प्रेस ॲक्ट झाल्यामुळे वर्तमान पत्रें संभाळून लिहिण्याची सवय करू लागलेलीं; अशा स्थितीत चालू राजकारण म्हणून फारसें उरलेलें नव्हतें. वरिष्ठ कायदे कौन्सिलात होणाऱ्या कामालाच काय तें थोडेंबहुत महत्त्व होतें. कारणः व्यापारी लोक म्हणजे सर इब्राहिम रहिमतुल्ला, सर विठ्ठलदास ठाकरसी असे कौन्सिलात शिरल्यामुळे त्यांनी व्यापार व उद्योगधंदे यांविषयीच्या प्रश्नांना एक नवें महत्त्व प्राप्त करून दिलें होतें आणि गोखल्यांचे कायदे कौन्सिलातील काम व त्यांच्या विलायतेतील येरझारा हाच काय तो चर्चेचा मुख्य विषय होऊन राहिलेला होता.

"या सुमारास काही वेळ हिंदुस्थानातील राजकारणाऐवजी दक्षिण आफ्रिकेतील राजकारणाला महत्त्व आलें होतें. सध्याचे महात्मा गांधी तेव्हा नुसते मोहनदास गांधी या नांवाने ओळखले जात असत. त्यांनी सत्याग्रहाची चळवळ करून दक्षिण आफ्रिकेतील सरकारास थोडेसें जेरीस आणलें होतें. विलायतेच्या एका खेपेनंतर गांधी यांनी गोपाळराव गोखले यांना दक्षिण आफ्रिकेस येण्याचें निमंत्रण केलें. ते तिकडे जाऊन त्यांनी सामोपचार केला. तो इकडे फेरोजशहा मेथा वगैरे लोकांनाही आवडला नाही. परंतु गोखल्यांच्या प्रोत्साहनाने हिंदुस्थानात वर्गणी जमवून इकडील लोकांनी गांधींच्या चळवळीचा तिकडे पाठपुरावा केला व सक्रिय सहानुभूति प्रकट केली. या वेळची एक मौजेची गोष्ट अशी की, आजचे अनेक कट्टर गांधीभक्त त्या वेळी गांधींना शिव्या देत होते व त्यांची चेष्टा करीत होते. पण उलट केसरीच्या द्वारे ५००० रु. वर्गणी गोळा करून गांधींना पाठविण्यात आली.

"वर दर्शविलेल्याशिवाय इतर विशेष प्रकारच्या चळवळी हिंदुस्थानात तेव्हा चालू नव्हत्या. बंगाल्यातही असेंच सामसूम होतें. अरविन्द घोष पांदेचरीला जाऊन बसले. त्यांचीं वर्तमानपत्रें बंद पडलीं. त्यांच्या लगत्याची मंडळी विस्कळीत झाली. चित्तरंजन दास यांचें नांव पुढे आलें होतें तरी या वेळी ते स्वतंत्रपणे काही चळवळ न करता सर्व वेळ वकिली करून पैसे मिळविण्यातच घालवीत होते. नाही म्हणायला एखादा क्रांतिकारक तरुण एखादा अत्याचार करी, व दासबाबूसारखे वकील त्याचा डिफेन्स करण्यास लाभल्यामुळे अशा लोकांची न्यायकोर्टातील चौकशी हाच एक मोठा लोकचित्ताकर्षक विषय होऊन रहात असे. महाराष्ट्रात दडपशाही खूप जोरात सुरू होती. समर्थ विद्यालयासारख्या संस्था बेकायदा ठरवून बुडविण्यात आल्या, व गुप्त पोलिसांच्या कारभाराचा इतका

सुळसुळट झाला होता की, त्यांच्या बेसुमार त्रासामुळे व छळामुळे मोठे धीराचे लोकही हातटेकीस आले."

—गतगोष्टी अर्थात् माझी जीवनयात्रा, लेखक न. चिं. केळकर. पृष्ठें ३९८–४००

डॉ. मुंजे यांनी सन १९०८-च्या शेवटी राष्ट्रीय पक्ष स्वतंत्र पायावर संघटित करण्याचें साधन म्हणून वेगळी राष्ट्रीय सभा नागपूरला भरविण्याचा केलेला प्रयत्न सरकारच्या बलप्रयोगाने बंद पडल्यानंतर टिळकपक्षातील अन्य प्रांतांतून असलेल्या पुढाऱ्यांच्याकडून वेगळी राष्ट्रीय सभा असण्याच्या कल्पनेला विरोध असल्यामुळे त्यांना तो नाद सोडून द्यावा लागला. टिळकांचे उजवे हात असणारे राष्ट्रीय पक्षाचे सर्वांत वजनदार पुढारी श्रीमंत दादासाहेब खापर्डे हे जर या वेळी हिंदुस्थानात असते तर मुंजे व खापर्डे यांच्या या संबंधांतील मतैक्यामुळे या कल्पनेने जोर धरला असता. पण दादासाहेब खापर्डे यांना लोकमान्य टिळकांच्या इच्छेनुसार टिळकांच्या शिक्षेविरुद्ध प्रिव्ही कौन्सिलमध्ये अपील दाखल करण्यासाठी इंग्लंडला जावें लागलें. दि. ६ ऑगस्ट १९०८-च्या आपल्या दैनंदिनीत अहमदाबादचें वृत्त लिहिताना दादासाहेब लिहितात, "जेवणानंतर मी व धोंडोबाबा साबरमती जेलमध्ये गेलो. जेल सुपरिंटेंडेंटने आपल्या समक्ष टिळकांची भेट घेण्याची परवानगी दिली. बिचारे टिळक, तुरुंगाचे कपडे घातलेले पाहून अतिशय वाईट वाटलें. प्रिव्ही कौन्सिलला अपील करण्याची परवानगी मागण्याकरिता तयार केलेला अर्ज मी त्यांना दाखविला. त्यांनी तो पसंत केला. मग आम्ही या कामाकरिता कोणाला तरी इंग्लंडला पाठविण्यासंबंधी बोललो आणि त्यांना ती कल्पना पसंत पडली. ते म्हणाले की, "मीच तेथे पुढच्या फेब्रुवारीपर्यंत रहावें व प्रिव्ही कौन्सिलमध्ये अपील जर नामंजूर झालें तर पार्लमेन्टमध्ये चळवळ करावी." टिळकांच्या इच्छेनुसार दादासाहेब दि. १३ ऑगस्टला इंग्लंडला गेले. त्यांना निरोप द्यावयास डॉ. मुंजे हे धुंडिराजपंत ठेंगडी यांच्यासह मुंबईला उपस्थित होते. दादासाहेब जे इंग्लंडला गेले ते त्यांना अनेक दिवस तेथेच अडकून रहावें लागलें. तेथे त्यांनी सर्व प्रकारची खटपट केली पण यश आलें नाही. अठ्ठावीस महिने ते तेथे अडकून पडल्यामुळे वेगळ्या राष्ट्रीय सभेची कल्पना मुंजे यांना सोडून द्यावी लागली.

सर्व प्रकारच्या दडपशाहीच्या या काळात मध्यप्रांतात विशेषत: नागपूर विभागात क्रांतिकारक तरुणांचा डॉ. मुंजे यांनी सर्व प्रकारचा पाठपुरावा चालविलेला होता. पुढे राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे संस्थापक म्हणून विख्यात झालेले व सन १९०९-मध्ये क्रांतिकारक चळवळीत

असलेले केशवराव हेडगेवार यांना रिस्ले सर्क्युलरची झळ लागून शाळा सोडण्याचा प्रसंग येताच यवतमाळला तपस्वी डॉ. नरहर शिवराम परांजपे यांच्या 'विद्यागृह' या नांवाच्या राष्ट्रीय शाळेत डॉ. मुंजे यांनी त्यांना पाठविलें. ही राष्ट्रीय शाळा क्रांतिकारक तरुण निर्माण करणारी गंगोत्री आहे असें ठरवून क्लीव्हलँडने ही शाळा बंद केली. तिच्या आधी त्याने उमरावतीची शाळाही बंद केली होती. नागपूरला केशवराव आल्यावर अलीपूर बाँबच्या खटल्याच्या वेळी त्या खटल्यातील देशभक्त क्रांतिकारकांना साह्य म्हणून राष्ट्रीय मंडळाच्या वतीने अप्रकट रीतीनें एक निधि पाठविण्यात आला. १९१०-मध्ये तर डॉ. मुंजे यांनी आपले परम मित्र दाजीसाहेब बुटी यांच्याकडून पैशांचें साह्य मिळवून देऊन केशवराव हेडगेवार यांना त्यांच्या इच्छेनुसार वस्तुतः क्रांतिकार्यासाठी पण वरून दिसायला डॉक्टरीच्या शिक्षणासाठी कलकत्त्यास पाठविलें. हेडगेवारांचे एक मित्र व क्रांतिकारक नेते रामलाल बाजपेयी आपल्या आत्मचरित्रात लिहितात : "श्री. केशवराव हेडगेवार, आर्.एस्.एस्.चे जनक ह्यांना रा. दाजीसाहेब बुटी ह्यांची थोडी मदत मिळवून डॉक्टरीच्या शिक्षणापेक्षा पुलिन बिहारी दासांच्या हाताखाली क्रांति व संघटना करण्यासाठी पाठविता आलें." हेडगेवार मुंजे ह्यांचें परिचय पत्र घेऊन गेले व या पत्रामुळेच तेथील अपरिचित वातावरणात त्यांची सोय लागली.

संपूर्ण स्वातंत्र्याचा अंतिम साधनमार्ग सशस्त्र क्रांति हाच असला व त्यासाठी क्रांतिकारक पक्षाचें संवर्धन आवश्यक असलें तरी तेवढ्यानेच केवळ राष्ट्रीय समस्या सुटू शकत नाही. क्रांतिकारकांच्या कार्याला जनमानस अनुकूल करण्यासाठी व त्यांच्या संघटनात योग्य माणसें आणण्यासाठी सार्वजनिक प्रचाराची व चळवळीची नितांत आवश्यकता असते; व ते मार्ग तर सरकारने बंद करून टाकलेले ! सन १९१०-मध्ये नागपूरच्या राष्ट्रीय मंडळाने केलेल्या गणेशोत्सवात लोकमान्य टिळकांचें केवळ छायाचित्र लावलें म्हणून गणपति विसर्जनाच्या मिरवणुकीलाही सरकारी अधिकाऱ्यांनी बंदी घातली. अशा स्थितीत डॉ. मुंजे यांनी प्रचाराच्या इतर साधनमार्गांचा अवलंब करावयाचें ठरविलें.

✦ ✦ ✦

प्रकरण चौदावें

# राष्ट्रकार्याचीं विधायक साधनें

सभास्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, लेखनस्वातंत्र्य या सर्वांची गळचेपी होऊ लागल्यावर उघड राजकारणाचा वास न येणारीं व परंपरेने चालत आलेलीं धार्मिक प्रचारसाधनें राष्ट्रीय प्रचारासाठी डॉ. मुंजे यांनी उपयोगात आणावयाचें ठरविलें याचा उल्लेख मागच्या प्रकरणात केलाच आहे. हीं धार्मिक प्रचारसाधनें म्हणजे कीर्तन व प्रवचन या संस्था होत. महाराष्ट्रात कान्हेरेशास्त्री, तांबे शास्त्री प्रभृति राष्ट्रीय प्रवचनकार टिळकांच्या काळात राष्ट्रधर्माच्या प्रचाराला वाहून घेतलेले होते. या दोन्ही संस्था समाजजीवनात पूर्वीपासून प्रतिष्ठा मिळविलेल्या असून सामाजिक क्षेत्रातून कीर्तनकार व प्रवचनकार यांचा योगक्षेम चालावा अशी प्राचीन काळापासूनच स्वयंसिद्ध व्यवस्था चालत आलेली आहे. हे दोन्ही वर्ग नियमित वेतन घेणें अपमानाचें समजतात, व स्वयंस्फूर्त दक्षिणेच्या श्रद्धायुक्त पद्धतीतून त्यांचा योगक्षेम प्रतिष्ठेने चालावा अशीच परंपरा आहे. त्यातही कीर्तनसंस्था ही प्रचाराचें साधन या दृष्टीने अत्यंत प्रभावी व सर्वांगपरिपूर्ण आहे. संस्कृत साहित्यातील दशविध नाटच प्रकारांपैकी **भाण** या प्रकारात कीर्तनाचा समावेश होतो. उदात्त पायावर अधिष्ठित झालेलें एकपात्री नाटक म्हणजे कीर्तन होय. संगीत, वक्तृत्व व अभिनय यांचा त्रिवेणी संगम कीर्तनात झालेला असतो. कीर्तनकलेचा महाराष्ट्रात जसा सर्वांगपरिपूर्ण विकास झाला असा मात्र अन्य कोणत्याही प्रांतातून झालेला नाही.

असो. ज्या काळचें वृत्त आम्ही देत आहोत त्या काळी नागपूरला कीर्तनकलेचे मुकुटमणि ज्यांना म्हणता येतील असे श्रेष्ठ कीर्तनकार होते. दादाजी महाराज साधु, गोपाळशास्त्री हरदास, नारायण महाराज श्रीरंभट्टलवार तैलंग यांच्या नामवंत पिढीचीं कीर्तनें डॉ. मुंजे यांनी स्वतः ऐकलेलीं होतीं. यांपैकी दादाजी महाराज साधु व गोपाळशास्त्री हरदास हे संस्कृत व मराठीचे उत्कृष्ट कवि असून साधूंच्या कवितेचा रेव्हरंड नारायण वामन टिळक यांच्या कवितेवर विलक्षण प्रभाव आहे. या पिढीच्या पठडीतून तयार झालेली कृष्णाबुवा पातुरकर, व्यंकोबा हरदास, माधवराव अवधूत प्रभृति कीर्तनकार १९१२-मध्ये चांगलेच नांवाजलेले असून त्यांपैकी कृष्णाबुवा पातुरकर यांच्या कीर्तनावर तर लोकमान्य

टिळक प्रसन्न होते. अमरावतीला दादासाहेब खापर्डे यांच्या घरी कृष्णाबुवा पातुरकरांचीं कीर्तनें टिळकांनी ऐकलीं. या कीर्तनकारांना हाताशी धरून मुंजे यांनी सन १९१२-मध्ये दादासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखाली कीर्तनसंमेलन भरविलें. या वर्षी अधिक महिना आला होता. त्या निमित्ताने नागपूरला परगावाहून आलेल्या व बुद्धचा संमेलनाच्या दृष्टीनें बोलाविलेल्या कीर्तनकारांचीं कीर्तनें पातुरकरांच्या राममंदिरात करविण्यात आलीं. या कीर्तनकारांच्या परीक्षेसाठी कृष्णशास्त्री तैलंग ह्यांच्या नेतृत्वाखाली एक परीक्षा समितिही नेमण्यात आली होती. दादासाहेब खापर्डे ह्यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात कीर्तनसंस्थेच्या उपयुक्ततेचें प्रतिपादन करून राष्ट्राच्या तत्कालीन परिस्थितीत कीर्तनकारांना काय करता येणें शक्य आहे याचें उत्कृष्ट मार्गदर्शन केलें होतें. डॉ. मुंजे यांनी या कीर्तनसंमेलनासाठी लागलेला सर्व खर्च करून शिवाय वर ५०० रुपयांची देणगीही दिली होती. या कीर्तनसंमेलनाचें फळ म्हणून कृष्णराव भीष्म व रघुनाथशास्त्री अथवा दादाजी कायरकर हे दोन त्या वेळी होतकरू असणारे तरुण राष्ट्रीय कीर्तनकार म्हणून पुढे आले. यांपैकी कृष्णराव भीष्म यांचीं कीर्तनें मधून-मधून डॉ. मुंजे यांच्या घरी होत. भीष्म यांची घरची गरिबी असूनही प्रत्येक कीर्तनात मिळणाऱ्या बिदागीचा एक चतुर्थांश अंत्यजोद्धारकार्यासाठी ते देत असत. त्या तशा काळात एका कीर्तनकाराने हें करणें मोठेंच साहस होतें. दुसरें, दादाशास्त्री कायरकर राष्ट्रीय कीर्तनकार म्हणून भारतविख्यात झाले. दिल्लीला त्यांच्या झालेल्या कीर्तनाला पं. मोतीलाल नेहरू, पं. मदनमोदन मालवीय, तात्यासाहेब केळकर प्रभृति भारतख्यात राजकीय नेते उपस्थित होते. त्यांनी लावलेल्या महाराणी झांशीच्या आख्यानाची सर्वांच्या मनावर मोठी पकड बसली. टिळकपक्षाच्या तत्त्वज्ञानाच्या प्रसाराचें कार्य नागपूर प्रांतात व प्रांताबाहेरही डॉ. मुंजे यांच्या प्रेरणेनें दादाशास्त्री कायरकर व दाजीशास्त्री चांदेकर या दोन कीर्तनकारांनी प्रभावीपणे केलें. यांपैकी दाजीशास्त्री चांदेकर हें टिळकपक्षीय राजकारणाच्या प्रत्यक्ष चळवळीतही भाग घेत व राजकीय सभा आणि परिषदा आपल्या वक्तृत्वाने गाजवीत.

या काळात स्वतः डॉ. मुंजे यांना कीर्तन करण्याची स्फूर्ति झाली होती. त्यासाठी सहा महिनेपर्यंत डॉ. मुंजे यांनी गाणें शिकण्याचा प्रयोग केला व शेवटी स्वराच्या जगाशी आपला काहीही संबंध नाही हें ध्यानात घेऊन त्यांनी तो विचार सोडून दिला. होतकरू कीर्तनकारांना गायन शिकण्याची सोय असावी म्हणून राष्ट्रीय वृत्तीचे टिळकभक्त भारतख्यात

गायनाचार्य विष्णु दिगंबर पलुसस्कर यांच्याशी दिवसचे दिवस पत्र व्यवहार करून डॉ. मुंजे यांनी नागपूरला गांधर्व महाविद्यालयाची शाखा उघडली व ती स्थिरपद केली.

यानंतर पुढे लवकरच राजकीय वातावरणात इष्ट ते फरक दिसू लागले व १९१३-च्या प्रारंभालाच पूर्वीचे राजकीय उद्योग पुनश्च हाती घेण्यासारखी परिस्थिति निर्माण झाली. इ. स. १९१०-मध्ये भारताचे व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो हे निवृत्त झाले व त्यांच्या जागी नवे व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिज हे आले. नव्या सुधारणांच्या अनुसार व्हाइसरॉयांच्या कार्यकारी मंडळाची पुनर्घटना झाली. बादशहा सप्तम एडवर्ड यांचें निधन होऊन पंचमजॉर्ज गादीवर आले. लॉर्ड मोर्ले यांच्या जागी लॉर्ड क्रीम (Creme) हे भारतमंत्री झाले. नेमस्तांना हें सर्व परिवर्तन स्वागतार्ह वाटलें व डिसेंबर १९१०-मध्ये भरलेल्या अलाहाबाद काँग्रेसमध्ये नव्या व्हाइसरॉयांच्याकडे एक शिष्टमंडळ पाठवून त्याच्या द्वारें आपलें मनोगत व्यक्त करण्याचा प्रस्ताव संमत करण्यात आला. या प्रस्तावानुरूप जें शिष्टमंडळ व्हाइसरॉयांच्याकडे पाठविण्यात आलें त्यात उमरावतीचे रावबहादुर आर्. एन्. मुधोळकर व नागपूरचे डॉ. हरिसिंग गौर यांचा अंतर्भाव करण्यात आला होता. या दोघांनीही मध्यप्रदेश व वऱ्हाडसाठी लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असावें अशी मागणी केली. या शिष्टमंडळाची व नव्या व्हाइसरॉयची जी भेट झाली त्या संबंधात सर विल्यम वेडरबर्न यांनी असें म्हटलें आहे की, व्हाइसरॉयांनी अत्यंत मित्रभावाने काँग्रेसच्या शिष्टमंडळाचें स्वागत करण्याची ही पहिलीच वेळ आहे. सन १९११-मध्ये नवे बादशहा पंचमजॉर्ज यांनी महाराणीसह भारताला भेट द्यावयाचें ठरविलें. तदनुसार दि. ७ डिसेंबर १९११-ला बादशहा साम्राज्ञीसह दिल्लीला आले व १२ डिसेंबरला दिल्ली दरबार भरला. या प्रसंगी बादशहांनी बंगालची फाळणी रद्द झाल्याची घोषणा केली. कलकत्त्याहून भारताची राजधानी याच वेळी दिल्लीला नेण्यात आली. जनमताला प्रसन्न करून घेण्यासाठी परकीय राजसत्तेकडून पावलें टाकण्यात येत होतीं. या गोष्टींनी काही भोळे राजकीय नेते फसले तरी चांगली वा वाईट पण अशी कोणतीही परकीय राजसत्ताच नको असें म्हणणारे क्रांतिकारक मात्र फसले नाहीत. दि. २३ डिसेंबर १९११-ला राजप्रतिनिधि लॉर्ड हार्डिज यांनी नव्या राजधानीतील प्रवेशाचा थाटाचा प्रकट समारंभ घडवून आणला. हत्तीवरून व्हाइसरॉय यांनी दिल्लीत प्रवेश केला. त्यांची मिरवणूक चांदणी चौकापर्यंत आली मात्र; तोंच हार्डिज यांच्या रोखाने क्रांतिकारकांचे नेते रासबिहारी बसू यांच्या प्रेरणेने बाँब

फेकण्यात आला. व्हाइसरॉयांचा अंगरक्षक जागच्या जागी ठार झाला व त्यांना थोडीशी जखम झाली. बांकीपूर येथे भरलेल्या काँग्रेसने १९१२-मध्ये अध्यक्ष मुधोळकर यांच्या नेतृत्वाखाली या प्रकाराचा कडकडीत निषेध करून व्हाइसरॉयांना सहानुभूतीचा संदेश पाठविला. सन १९११-च्या वातावरणात होऊ लागलेला बदल सुचविणारें आणखी एक गमक घडलें व तें म्हणजे हिंदु-मुस्लिम लोकनेत्यांची संयुक्त परिषद हें होय. या परिषदेला पं. मदनमोहन मालवीय, सुरेन्द्रनाथ बॅनर्जी, रहिमतुल्ला, हसन इमाम व महंमदअल्ली जिना हे उपस्थित होते. अल्ली बंधूंच्या कॉम्रेड या पत्राने या परिषदेच्या निमित्ताने मुस्लिम लीगला असा उपदेश केला की, तिने ब्रिटिशधार्जिणेपणा व जातीय दृष्टिकोन यांचा परित्याग करावा. या परिषदेचें सर्वांत अधिक दुःख जर कोणाला झालें असेल तर तें अँग्लो-इंडियन वृत्तपत्रांना होय. त्यांनी लिहिलें की, "हिंदु-मुस्लिम जमातींना एकत्र आणण्याची खटपट करण्यातील या उपद्व्यापी लोकांचा हेतु प्रस्थापित सरकारविरुद्ध संयुक्त आघाडी उभारण्यापलीकडे दुसरा काय असू शकेल ?" या ऐक्य-परिषदेचा सुपरिणाम लवकरच दिसून आला. या परिषदेनंतर सर इब्राहिम रहिमतुल्ला यांच्या अध्यक्षतेखाली मुस्लिम लीगचें जें अधिवेशन झालें त्या अधिवेशनात मुस्लीम लीगचें ध्येय ब्रिटिश साम्राज्यांतर्गत स्वराज्य असल्याचें घोषित करण्यात आलें. यानंतर कराची येथे झालेल्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनात मुस्लिम लीगच्या या घोषणेबद्दल तिचें अभिनंदन करण्यात येऊन या संबंधात होणाऱ्या प्रयत्नांना संपूर्ण सहकार्याचें आश्वासन देण्यात आलें. भारताचें राजकीय भवितव्य देशातील विभिन्न जमातींच्या संवादी कार्यपद्धतीवर व परस्पर सहकार्यावरच ठरणारें आहे असें या राष्ट्रीय सभेने सांगितलें.

याप्रमाणे सन १९११ ते १३-पर्यंतच्या कालखंडात स्वराज्याच्या प्रयत्नासाठी सर्व पक्षोपपक्षांची प्रगतीच्या दिशेने वाटचाल होऊ शकेल असें वातावरण निर्माण होऊ लागलें होतें. मध्यप्रांत व वऱ्हाडातील वातावरणही अनुकूल दिशेने बदलू लागलें होतें. सर रेजिनॉल्ड क्रॅडॉकची सुलतानी राजवट संपून त्या स्थानी सर बेंजामिन रॉबर्टसन हे आले होते. त्यांच्यात वृत्तीचा समतोल व शक्य तें चांगलें करण्याची प्रवृत्ति दिसून येऊन लोकांना हायसें वाटलें. राबर्टसन् यांच्या कारकीर्दीत दि. ८ नोव्हेंबर १९१३-ला लेजिस्लेटिव्ह कौन्सिल स्थापन झालें. त्याच्या पायाभरणीच्या कार्यक्रमासाठी व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज सपत्नीक नागपूरला आले होते. मध्यप्रांताच्या या पहिल्या कायदेमंडळात एकंदर

२६ सभासद असून त्यांची वर्गवार विभागणी पुढीलप्रमाणे होती. नगरपालिका व जिल्हा मंडळें यांनी निवडून दिलेले सात सभासद, सात सरकारनियुक्त, जमीनदार व मालगुजार वर्गाचे दोन प्रतिनिधि, व दहा सरकारी अधिकारी. या कायदेमंडळात तांत्रिक दृष्टीने का होईना पण बिनसरकारी सभासदांची संख्या अधिक होती. मध्य-प्रांताच्या या कायदेमंडळात काँग्रेसमधील नेमस्त पक्षातून तीन लोकांची वर्णी लागलेली होती. रावबहादूर आर्. एन्. मुधोळकर, सर मोरोपंत जोशी व पं. विष्णुदत्त शुक्ल हे ते तीन गृहस्थ होत.

या पुष्कळच निवळलेल्या वातावरणात डॉ. मुंजे यांनी राष्ट्रीय मंडळाचें पुनरुज्जीवन करून मध्यंतरी बंद पडलेली चळवळ प्रारंभ करावयाचें ठरविलें. क्रॅडॉक व क्लीव्हलँड यांच्या दडपशाहीने नागपूरची स्वदेशनिष्ठ वृत्तपत्रें बंद पडलीं होतीं. त्यांचें पुनरुज्जीवन करणें, अथवा तें शक्य होत नसल्यास नवें वृत्तपत्र काढणें आवश्यक होतें. कारण वृत्तपत्राइतकें विचाराच्या प्रचाराचें अन्य प्रभावी साधन असूच शकत नाही. नागपूरच्या 'देशसेवका'चा गळा आवळून त्याचे संपादक श्री. अच्युतराव कोल्हटकर यांना सरकारने तुरुंगात कसें डांबलें होतें व त्यांचा तेथे कसा छळ झाला याचें वर्णन मागे केलेंच आहे. तुरुंगातून सुटल्या-वर पुन्हा वृत्तपत्र सुरू करण्याची शक्यता नाही व वकिलीची सनद रद्द करण्यात आलेली, अशा स्थितीत नागपूरला राहण्याऐवजी अच्युत-रावांनी मुंबईला राहण्याचा निर्णय घेतला. तेथे दत्तो अप्पाजी तुळजा-पूरकर व रामचंद्र विनायक पटवर्धन यांच्या सहकार्याने अच्युतरावांनी वेदांच्या अनुवादकार्याला वाहिलेलें श्रुतिबोध मासिक प्रारंभ केलें व पुढे तेथेच संदेश हें चटकदार वृत्तपत्र काढलें. मुंजे यांची खरी इच्छा अच्युतरावांनीच पुन्हा नागपूरला यावें व 'देशसेवका'चें पुनरुज्जीवन करावें अशी होती. त्या दृष्टीने रॉबर्टसन् यांच्या कारकीर्दीत पूर्वीचें वातावरण निवळलेलें दिसताच त्यांनी अच्युतरावांशी पत्रव्यवहार प्रारंभ केला. पण मुंबईत स्थिर होऊ पाहणारे अच्युतराव कोल्हटकर नागपूरला यावयास सिद्ध होईनात.

## नागपूरच्या महाराष्ट्राचा जन्म

शेवटी डॉ. मुंजे यांनी अच्युतरावांनाच नागपूरला स्थिर राहून टिळक संप्रदायाचें वृत्तपत्र चालविण्याचें संपूर्ण दायित्व स्वीकारणारा एखादा या क्षेत्रातील कर्तृत्ववान् पुरुष पाहण्याची गळ घातली व अच्युत-रावांनी मुंबईचे आपले मित्र श्री. गोपाळ अनंत ओगले यांचें नांव सुचविलें. गोपाळराव ओगले हे सन १९१२-मध्ये पुढारी म्हणून प्रसिद्ध नसले

तरी त्यांना लेखनाची हौस होती व त्यांची टिळकनिष्ठा संशयातीत होती. मधून मधून ओगले यांचे लेख व कविता केसरीतून प्रसिद्ध होत असत. तेही आपल्या आवडत्या राजकीय कार्यात व्यावसायिक दृष्टीनेही स्थिरावता आलें तर पहावें अशा शोधात होतेच. ओगले यांची चिकाटीने काम करण्याची वृत्ति, धिमा स्वभाव व व्यावहारिक दृष्टि यांचा परिचय असल्यामुळे अच्युतरावांनी मुंजे यांचा त्यांच्याशी परिचय करून दिला. नागपूरच्या राष्ट्रीय मंडळाने प्रारंभी ओगले यांना आर्थिक साहाय्य करावें व ओगले यांनी नागपुरात स्थिर होऊन वृत्तपत्राचें संपूर्ण दायित्व स्वीकारावें, असें मुंजे यांनी सुचविलें. यात ओगले यांना वृत्तपत्र काढावयास प्रारंभी डॉ. मुंजे व राष्ट्रीय मंडळ यांच्याकडून आर्थिक साहाय्य मिळणार होतें, व कोणाचेंही नोकर न राहता स्वतःच्या कर्तृत्वावर वृत्तपत्रासारख्या महत्त्वाच्या संस्थेचे चालक व मालक या नात्याने प्रतिष्ठितपणे राजकीय जीवनात स्थिरावता येणार होतें. सन १९१२-पासूनच यासंबंधात ओगले व मुख्यतः अच्युतराव कोल्हटकर यांचा डॉ. मुंजे यांच्याशी पत्रव्यवहार चालू होता. या वाटाघाटीत यवतमाळचे तपस्वी डॉ. बाबासाहेब परांजपे यांचाही पुष्कळच भाग होता. दि. १४ नोव्हेंबर १९१२-मध्ये डॉ. मुंजे यांना लिहिलेल्या पत्रात गोपाळराव ओगले लिहितात : "काल संध्याकाळी यवतमाळचे डॉ. परांजपे येथे आले व माझ्या घरी ते, अच्युतराव कोल्हटकर, व मी अशा तिघांची बैठक झाली. तुमच्या अनुपस्थितीत तुम्ही सुचविलेल्या योजनेवर आम्ही पुष्कळ चर्चा केली. पण (निर्णयाच्या दृष्टीने) फारशी प्रगति करू शकलो नाही. कारण आमच्या ध्यानात तुमच्या योजनेचें तपशीलवार स्वरूप आलेलें नाही. शेवटी या बैठकीत असें ठरलें की, या आठवड्याच्या शेवटी आपण स्वतः मुंबईला यावें अशी आपणांसच विनंती करावी. तुम्हांला हें पत्र शनिवारी मिळेल. जर तुम्ही शनिवारी मेलने नागपूर सोडलें तर रविवारी सकाळी तुम्ही मुंबईला पोहोचू शकाल. जर हें ठरलें तर नागपूर सोडताना तुम्ही बाबा परांजपे यांना पुण्याला केसरीच्या पत्त्यावर तशी तार करावी. म्हणजे ते तुमच्या येण्याचे वेळी मुंबईला येतील. माझी आपणांस अशी विनंती आहे की, आपण आपला एक संपूर्ण दिवस चर्चेसाठी आम्हांला द्यावा व आपण सर्वच संबंधित एकत्र बसणार असल्यामुळे सर्व प्रकारची तपशीलवार चर्चा होऊन या विषयावरील सर्व बोलणें पूर्ण व्हावें. तरी कृपापूर्वक आपण मुंबईला येण्याचें निश्चित करावें व डॉ. परांजपे यांना तशी तार करावी.

आपला

**गो. अ. ओगले**

या पत्रानुसार डॉक्टरसाहेब मुंबईला गेले व तेथे आर्थिक दायित्वासह नागपूरला काढावयाच्या वृत्तपत्राच्या योजनेची संपूर्ण चर्चा झाली. तरीही त्या वेळी हें प्रकरण पूर्ण झालें नाही. यानंतर काही दिवसांनी योजनेला मूर्त स्वरूप येऊ लागलें असें दिसतें. नव्या पत्राचें नांव काय ठेवावें असा प्रश्न होता. मुंजे यांनी हंस व गरुड अशीं दोन नांवें सुचविलीं. अच्युतरावांना दोन्ही नांवें पुरेशीं काव्यमय वाटलीं नाहीत; व त्यांनी त्याऐवजी विहंगम, महाराष्ट्र व मध्यवर्ती अशीं तीन नांवें सुचविलीं. अच्युतरावांचें या संबंधातील पत्र नागपूरच्या दैनिक महाराष्ट्राच्या कूळकथेच्या दृष्टीने महत्त्वाचें असल्यामुळे त्या मूळ इंग्रजी पत्राचा अनुवाद आम्ही येथे उद्धृत करतो. दिनांक १५ मे १९१३-ला अच्युतराव कोल्हटकर यांनी मुंबईहून डॉ. मुंजे यांना लिहिलेलें हें पत्र असें :

"प्रिय डॉक्टर, कालची मेल निघून गेल्यावर तुमचें पत्र मिळालें. माझेंही असेंच मत आहे की, मुद्रणालय व वर्तमानपत्र यांचीं नांवें वेगवेगळीं असावीं व शक्यतोवर त्यांचा जमाखर्चही वेगळाच असावा. हंस व गरुड या नांवांपेक्षा मला विहंगम हें नांव अधिक आवडेल. कारण त्यांत हंस व गरुड या नांवातील अर्थ येऊन शिवाय पक्षाच्या सर्वसमावेशक दृष्टीचा ध्वनि आहे. मी आणखी दुसरें नांव 'महाराष्ट्र' अथवा 'मध्यवर्ती' असें सुचवीन. असो. श्री. अळेकर यांची काव्यात्मता व गोपाळरावांची राजकीय दृष्टि नांवाच्या दृष्टीने तेथे विचार करावयास असल्यावर मी आपल्याला काही सुचवावें असें नाही."

यानंतर दि. २२।९।१९१३-ला अच्युतराव कोल्हटकरांच्या सहीने महाराष्ट्राच्या जाहिरातीचाही नमुना मुंजे यांच्याकडे पाठविण्यात आला. सन १९१३-मध्ये गोपाळराव ओगले नागपूरला येऊन स्थिरावले. डॉ. मुंजे यांच्या द्वारे त्यांना प्रारंभी आर्थिक साह्य झालें व सन १९१४-च्या फेब्रुवारी महिन्यात साप्ताहिक महाराष्ट्राचा पहिला अंक निघाला. जुनें महाराष्ट्र ऑफिस शुक्रवार पेठेत होतें. राष्ट्रीय मंडळाचे बहुतेक पुढारी संध्याकाळी तेथे एकत्रित येत व राजकीय चळवळींच्या नियमित बैठकीचें स्वरूप महाराष्ट्राच्या कार्यालयाला प्रारंभी तरी होतें.

१९०८ ते १३-च्या या कालखंडात डॉ. मुंजे यांनी टिळकांच्या सुटकेसाठीही काही स्वतंत्र प्रयत्न चालविले होते असें दिसतें. टिळकांना शिक्षा झाल्यानंतर त्या शिक्षेचे हेतु जसजसे स्पष्ट होऊ लागले तसतशी टिळकांच्या अनुयायांना त्यांच्या राजकीय चळवळीचें मुख्य साधन असलेलें 'केसरी' पत्रही सरकार बंद करतें कीं काय अशी भीति वाटू लागली.

प्रेस अॅक्टनंतर बंगाल व महाराष्ट्रातील व विशेषतः नागपूरच्या देशसेवक प्रभृति पत्रांचा जो गळा आवळण्यात आला, त्यामुळे केसरीविषयी चिंता वाटणें स्वाभाविक होतें. त्या दृष्टीने केसरी बंद पडू नये म्हणून दि. ९ सप्टेंबर १९१०-ला श्री. न. चिं. केळकर यांना लिहिलेल्या पत्रात डॉ. मुंजे लिहितात,

" सरकारने केसरीकडून जामीन मागितला तर कठीण प्रसंग. दहा-हजार रुपये घालावयाचे व ते जावयाचेच म्हणून वाटते की जामिनकी देऊ नये. पण वर्तमानपत्र थांबवून तरी काय करणार असेंही वाटतें. टिळक येईपर्यंत त्यांच्या कुटुंबाकरिता तरी वर्तमानपत्र चाललें पाहिजे. म्हणून वाचकांना कळवावें की टिळक येईपर्यंत आम्ही केसरीत नुसती बातमी घालीत जाऊ, संपादकीय मजकूरच लिहिणार नाही. टिळक येई-पर्यंत त्यांच्याकरिता लोक हेंही कबूल करतील. प्रसंग अवघड म्हणून सुचलें तें लिहिलें आहे. "

लोकमान्य टिळकांच्या अटकेसाठी नेमस्त पक्षाच्या पुढाऱ्यांनी खटपटी केल्या होत्या असा एक प्रवाद होता, त्याला साहाय्यक असा पुरावा मुंजे यांच्या पत्रव्यवहारातून आढळतो. दि. १७ डिसेंबर १९१२-ला श्री. न. चिं. केळकर यांना इंग्रज सरकारच्या गुप्तचर दलाचे एक महत्त्वाचे अधिकारी सर चार्लस क्लीव्हलंड यांच्याशी झालेल्या भेटीचें वृत्त कळविताना डॉ. मुंजे लिहितात, " सर चार्लस क्लीव्हलंड यांची गाठ पडली होती. ते म्हणाले, ' सरकारने टिळकांविषयी काय करावें? ' मी म्हणालो, तें सरकारासच माहीत! तरी पण टिळकांना सरकारने सोडावें असें मी सांगतो. टिळकांना स्वतः त्याचें काहीं वाटत नसेल, पण त्यांची बुद्धिमत्ता फुकट जात आहे असें लोकांना वाटतें. राजकारणात पडू नये पण त्यांनी आपलीं इतर कामें करावीं अशी काही व्यवस्था सरकारास करता आली असती." सर चार्लस म्हणाले की, " टिळकांना शिक्षा झाली तेव्हा कित्येक लोकांना आनंद झाला. त्याच लोकांच्या चिथावणीवरून टिळकांवर मूळ खटला करण्यात आला, व हल्ली त्यांच्या सुटकेच्या आड तेच लोक येत आहेत. "

दिल्ली दरबारच्या वेळी टिळकांची सुटका व्हावी म्हणून सर चार्लस क्लीव्हलंड यांनी काही प्रयत्न केले होते. दि. १४ एप्रिल १९१३-ला केळकर यांना पाठविलेल्या पत्रात डॉ. मुंजे लिहितात, " मी अलीकडे सिमल्यास गेलो होतो. सर चार्लस क्लीव्हलंड यांची गाठ पडली. दिल्ली दरबारच्या प्रसंगी टिळकांना सोडावें अशी क्लीव्हलंड यांनी पुष्कळ खट-पट केली, पण लॉर्ड सिडनहॅम व इतर काही लोक यांनी विरुद्ध अभि-प्राय दिल्यामुळे त्याला यश आलें नाही. "

'महाराष्ट्र' वृत्तपत्र सुरू झाल्यावर प्रांतातील लोकमत जागृत करण्याच्या दृष्टीने नागपूरच्या राष्ट्रीय पक्षाला महत्त्वाचें साधन उपलब्ध झालें. तरीपण सन १९१४-च्या जूनमध्ये टिळकांची सुटका होईपर्यंत महत्त्वाचा असा पक्ष टिकवून धरण्याशिवाय दुसरा राजकीय कार्यक्रम पक्षाजवळ नव्हता. अशा वेळी डॉ. मुंजे यांनी एका धार्मिक स्वरूपाच्या कार्यक्रमाचें सूत उवाच करून महाराष्ट्राच्या वैचारिक क्षेत्रात मोठी खळबळ माजवून दिली होती. डॉ. मुंजे यांचे वडील शिवरामपंत मुंजे हे या वेळी ८० वर्षांचे वृद्ध होते. त्यांनी आपल्या मितव्ययाने पांच सहस्र रुपयांची पुंजी मागे टाकली होती. डॉ. बाळकृष्णपंत व हरिभाऊ हीं त्यांचीं दोन्ही मुलें आपआपल्या व्यवसायांत इतकीं स्थिरपद व आर्थिक दृष्टीने इतकीं संपन्न होतीं की, त्यांना वडिलांनी ही पुंजी मुलांना न देता कोणत्या तरी त्यांना आवडणाऱ्या धार्मिक कार्यात खर्च करावी असें वाटत होतें. त्यांच्या वडिलांनी मुलांचें हें म्हणणें मान्य केलें व ही पुंजी कोणत्या स्वरूपात खर्च करावी हें आपल्या वडील मुलावर म्हणजेच डॉ. मुंजे यांच्यावर सोपविलें. डॉक्टरसाहेबांचा विचार धर्म या विषयाला वाहिलेलें एखादें चांगलें मासिक काढावें असा होता. त्या दृष्टीने त्यांनी श्री. अच्युतराव कोल्हटकर यांच्याशी पत्रव्यवहारही केला. सन १९१३-मध्ये या दृष्टीने अनेक लेखकांशी त्यांनी पत्रव्यवहार केला. पण त्यांना कोणी समाधान करील असा योग्य संपादक आढळला नाही. शेवटी हिंदुधर्मशास्त्राचा इतिहास कोण्या तज्ज्ञाकडून लिहवून घेऊन त्याच्या प्रकाशनाच्या कार्यात वडिलांच्या पुंजीचा विनियोग करावयाचें त्यांनीं ठरविलें. दि. १ जानेवारी १९१४ च्या केसरीत यासंबंधी डॉ. मुंजे यांनी पुढीलप्रमाणे निवेदन प्रसिद्ध केलें.

आमचे वडील ८० वर्षांचे वृद्ध व सशक्त असून त्यांस सरकारातून ३० रु. पेन्शन मिळत असतें. त्यांनी आपल्या आमदनीत ६० रुपयेपर्यंत पगाराची नोकरी करून आपला संसार व्यवस्थित, मितव्ययी व जुन्या बाळबोध रीतीने चालवून जी थोडी पुंजी म्हातारपणात स्वतंत्रपणे उपयोगी पडावी म्हणून जमविली आहे तिचा लोकोपयोगी धर्मकृत्यात नवीन पद्धतीने व्यय करण्याची त्यांची इच्छा आहे. या हेतूने त्यांनी ४००० रुपये निराळे काढून ठेवले आहेत. या रकमेच्या व्याजातून हिंदु धर्मशास्त्राच्या माहितीचा प्रसार लोकांत सुलभ भाषेच्या द्वारे करविण्याचा त्यांचा मनोदय आहे. या त्यांच्या हेतूप्रमाणे सर्व व्यवस्था नीट जमली तर या रकमेत भर टाकण्याचीही त्यांची तयारी आहे.

हा हेतु साध्य करण्यासाठी नागपूर येथे हिंदुधर्मशास्त्राचे (Hindu Sociology) एक मासिक पुस्तक सुरू करावें असा माझा विचार होता. परंतु कोणी योग्य संपादक आजपर्यंत न मिळाल्यामुळे हा हेतु मासिक पुस्तकाच्या द्वारे साध्य होईल अशी आशा दिसत नाही. तथापि एकदोन महिन्यांत कोणी योग्य संपादक पुढे आल्यास मासिकाचा विचार आम्ही आताच सोडून दिला आहे असें नाही. असा संपादक न मिळाला तर हिंदुधर्मशास्त्र या विषयावर कोणी विद्वानांनी प्रमाणभूत ग्रंथ लिहिल्यास त्यांत उत्तम ठरेल त्या ग्रंथास १००० रुपये दक्षिणा देण्याचा आमचा विचार आहे. हा ग्रंथ लिहू इच्छिणाऱ्यासाठी ज्या अटी आज निश्चित ठरल्या आहेत त्या अशा:––

१) ग्रंथलेखक हिंदुधर्मी असावा.

२) ग्रंथ मराठी किंवा इंग्रजी भाषेत असावा.

३) ग्रंथ अंदाजे १००० छापील पृष्ठें होतील एवढा असावा.

४) ग्रंथ एक वर्षात तयार व्हावा. परंतु लेखकाच्या सोयीप्रमाणे ही मुदत वाढविण्यात येईल.

५) ग्रंथात धर्मशास्त्रासंबंधी माहिती पूर्ण व साधार असून विषय-विवेचन आपल्या परंपरेस न सोडता ऐतिहासिक व पाश्चात्य समाज-शास्त्राच्या तत्त्वाशी तुलनात्मक पद्धतीने केलेलें असावें.

६) ग्रंथपरीक्षणासाठी नामांकित विद्वानांची कमिटी नेमण्यात येईल.

अशा ग्रंथाची सध्याच्या कामी अत्यंत आवश्यकता आहे असें ज्यांस वाटत असेल त्यांनी सदहू ग्रंथात कोणकोणते विषय संकलित व्हावे याबद्दल काही सूचना केल्यास त्यांचे आमच्यावर फार उपकार होतील आणि विषयानुक्रमणिका ठरविताना त्याचा अवश्य विचार केला जाईल. तरी या विषयाचा व्यासंग असलेल्या विद्वानांनी विषयानुक्रमणिका ठर-विण्यासाठी खाजगी पत्रव्यवहाराने अथवा केसरीमार्फत मदत करण्याची कृपा करावी, अशी त्यांस सविनय प्रार्थना आहे.

नागपूर शहर

**बा. शि. मुंजे**
नेत्रवैद्य

डॉ. मुंजे यांच्या या विचारांचें स्वागत करताना केसरीने आपल्या संपादकीय टीपेत असें लिहिलें आहे की, "डॉ. मुंजे यांच्या वडिलांनी घालून दिलेलें हें उदाहरण खचित कित्ता घेण्यासारखें आहे. मुलें आपापल्या पोटास मिळवितीं झालीं तरी मुलांकरिता ज्यांचा द्रव्यलोभ सुटत नाही असे बाप पुष्कळ; व स्वत:स काही कमी नसताही पितृधनाचा ज्यांना लोभ सुटत नाही असे पुत्रही थोडे नसतात. म्हणून जुन्या पद्धतीच्या एका गृहस्थाने ऐतिहासिक दृष्टि ठेवून हिंदुधर्मशास्त्राचा इतिहास लिहिण्यास्तव आपलें सर्व स्वकष्टार्जित धन देणें ही आम्हांस अत्यंत अभिनंदनास्पद अशी गोष्ट वाटते. डॉ. मुंजे यांच्या मनात येणाऱ्या मासिक पुस्तकाच्या कल्पनेपेक्षा हिंदुधर्मशास्त्राचा इतिहास लिहिण्याची कल्पना व्यक्तिशः आम्हांस अधिक पसंत वाटते. आणि त्यांनी सदर पत्राच्या द्वारे विनंती केल्याप्रमाणे, अशा ग्रंथात कोणकोणते विषय यावे याविषयीच्या सूचना पाठवून महाराष्ट्रातील विद्वान् लोक डॉ. मुंजे यांस त्यांनी योजिलेल्या सत्कृत्यास योग्य मदत करतील, यात आम्हांस मुळीच शंका वाटत नाही."

दि. १-चें डॉ. मुंजे यांचें हें निवेदन दि. १३ जानेवारीच्या केसरीत प्रसिद्ध झालें. त्यानंतर मुंजे यांनी तें निवेदन व त्यासोबत एक स्वतंत्र पत्र महाराष्ट्रातील नामवंत पंडितांच्याकडे व्यक्तिशः पाठविलें. मुंजे यांनी या योजनेचा प्रचार प्रारंभ करताच महाराष्ट्रातील विचारवंत व विद्वान् लोकांत या दृष्टीने विचारमंथन सुरू झालें व अनेक प्रकारच्या सूचना-प्रतिसूचना त्यांच्याकडे येऊ लागल्या. काही लोकांनी त्यांची मासिकाची कल्पना उचलून धरली तर अधिक गंभीर विचार करणाऱ्या लोकांना त्यांची धर्मग्रंथाच्या इतिहासाची कल्पना अधिक चिरस्थायी स्वरूपाची व महत्त्वपूर्ण वाटली. मुंजे यांचें हें निवेदन प्रसिद्ध झाल्यावर श्री. तात्यासाहेब केळकर यांनी केसरीतून जरी त्याचा पाठपुरावा केला तरी व्यावहारिक दृष्टिकोनातून या योजनेचा विचार होणें त्यांना अवश्य वाटलें. यास्तव त्यांनी या प्रसिद्धीकरणाच्या पाठोपाठ मुंजे यांना महत्त्वाचें मार्गदर्शन करणारें पत्र पाठविलें. तें पत्र असें :—

स. न. वि. वि. धर्मग्रंथासंबंधाने माझी मुख्य सूचना अशी आहे की, बक्षिसाच्या आशेने एवढा प्रचंड ग्रंथ लिहिण्यास विद्वानांना सरसकट आव्हान केलें तर कोणीच लिहीत नाही. कारण श्रम व्यर्थ जातात. नेहमीचा परिपाठ असा असतो की, अनुक्रमणिकेपैकी एखादा विषय देऊन बक्षिसाकरिता चढाओढीने लिहिणाऱ्या लोकांपैकी सर्वांत चांगला लेखक कोण हें ठरवून मग त्याजकडे सगळे ग्रंथ देतात; तथापि इतर एकदोन रीति

आहेत. आपल्या पसंतीने सर्वच ग्रंथ एकाकडे लिहिण्यास द्यावयाचा, किंवा अनुक्रमणिकेतील निरनिराळे विषय स्वतःच्या पसंतीने निरनिराळ्या लेखकांकडे देऊन त्या सर्व लेखांचा मिळून ग्रंथ छापावयाचा. या बाबतीत मजकडे एकदोन तोंडी सूचना आल्या आहेत. त्या लेखी मागवून आपणांकडे लौकरच पाठवून देतो. एक हजार रुपयांस एक हजार पानें उत्कृष्ट लिहून मिळतील अशी अपेक्षा व्यर्थ आहे. आपण काय योजना ठरविली आहे तें कळवावें. मासिक पुस्तकाची कल्पना मला फारशी पसंत नाही. या कामी तुमची आमची समक्ष गाठ पडती तर अधिक बरें झालें असतें. अनुक्रमणिकेच्या विषयाबद्दल रावबहादुर चिंतामणराव वैद्य यांना लिहून मागवावें. कळावें ही विनंती.

आपला
**नरसिंह चिंतामण केळकर**

श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या सूचनेनुसार डॉ. मुंजे यांनी धर्मशास्त्रावरील ग्रंथाचाच विचार पक्का केला व त्या दृष्टीने संकल्पित ग्रंथात कोणकोणते विषय यावे याची स्थूल रूपरेषा आखून ती संबंधित विद्वानांकडे पाठविली. मुंजे यांच्या मनात जो ग्रंथ तयार करावयाचा होता त्याचें स्वरूप केवढें व्यापक होतें याची कल्पना येण्यासाठी त्यांची ती रूपरेषेची योजना येथे उद्धृत करतो. मुंजे यांनी आपल्या या ग्रंथाचें दहा प्रकरणात विभाजन केलें होतें. त्यांचें प्रकरणवार स्वरूप असें :

### प्रकरण १ लें – धर्मशास्त्राचें स्वरूप

( १ ) धर्मशास्त्राची आवश्यकता केव्हा भासली, कां व कोणास ? ( २ ) वैदिक धर्मच सनातन आहे काय, व कसा ? ( ३ ) इतर सर्व प्रचलित धर्म सनातन वैदिक धर्माचींच अंगें आहेत काय, कीं ते स्वतंत्र आहेत ? ( ४ ) धर्माची सर्वव्यापी व्याख्या काय ? ती अशी की सर्व धर्मांस लागू पडेल. ही व्याख्या शक्य असेल तर प्राचीन धर्मग्रंथांतून, तशी न मिळाल्यास इतर वाङ्मयांतून, व तशीहि न मिळाल्यास स्वतः बनवून द्यावी. ही व्याख्या वैदिक धर्मास लावून दाखवावी व सनातन धर्माचें वैशिष्टच दाखविण्याचे हेतूने जरूर वाटल्यास निराळी व्याख्या करावी; ती आपल्या धर्मग्रंथातून दिल्यास उत्तमच. तीत सनातन धर्माचें स्वरूप दाखविणारें वर्णन असावें.

( ५ ) धर्मशास्त्रासंबंधी प्रमाणें कोणतीं ? त्यांपैकी शब्दप्रामाण्याचे आधारभूत ग्रंथ कोणते ? त्यांचें योग्यतेप्रमाणे वर्गीकरण करावें.

धर्मशास्त्रासंबंधी वादग्रस्त मुद्द्यांचा निकाल लावण्यात पुराणें कितीशी अधिकारी आहेत ? 'पुराणे धर्मनिश्चयः' याचा अर्थ काय ? ( ६ ) श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मशास्त्रातील नियमांत फेरबदल झाला आहे कीं नाही ? असा फरक होत असल्यास कोणत्या आधाराने ? (७) आजपर्यंत धर्मशास्त्रात स्थित्यंतरें झालीं कीं नाही ? कोणत्या कारणांनी व केव्हा ? त्यांत प्राचीन काळापासून २०-व्या शतकाच्या आरंभापर्यंत अव्याहत चाललेलीं मतें व नियम कोणते ? बदलले कोणते ? २०-व्या शतकात काय स्थित्यंतर झालें ? त्यापासून लाभालाभ कोणते ? (८) बौद्ध, जैन, चार्वाक इत्यादि प्राचीन धर्मपंथांमुळे व महंमदी, ख्रिस्ती इत्यादि अर्वाचीन धर्मपंथांमुळे व परचक्रामुळे काही फेरबदल झाला काय? त्यांची इष्टानिष्टता काय ? ( ९ ) सद्यःस्थितीला अनुसरून परंपरा न सोडता फेरबदल करणें इष्ट आहे काय ? असल्यास कोणता फेरबदल व तो कसा करता येईल ? ( १० ) धर्मशास्त्रांच्या नियमांचा राष्ट्राच्या राजकीय स्थितीवर किंवा प्रगतीवर परिणाम होतो काय ? व झाला असल्यास कोणता ? इष्ट की अनिष्ट ? (११) सनातन वैदिक धर्म हा सध्याच्या हिंदुस्थानच्या सीमेतच प्रचलित होता काय ? किंवा काबूल, कंदाहार, चीन इत्यादि मुलखांतही होता ? तसें असल्यास परस्परांत अन्नविवाहादि व्यवहार होत असत काय ? याचीं निश्चयात्मक उदाहरणें. (१२) बऱ्याच शतकांत धर्मशास्त्राचा अभ्यास न केल्यामुळे, त्यास चालना न मिळाल्यामुळे व धर्मशास्त्रज्ञानाचा प्रसार लोकांत न केल्यामुळे राष्ट्रावर काही इष्टानिष्ट परिणाम झाले काय ? सध्याच्या स्थितीत धर्मशास्त्राध्ययनाची जरुरी आहे कीं नाही?

## प्रकरण २ रें – संस्कार

(१) धर्मशास्त्रप्रणीत अनेक संस्कारांचें तात्त्विक व व्यावहारिक विवेचन करावें. आज आवश्यक संस्कार कोणते व अनावश्यक कोणते ?

## प्रकरण ३ रें – वर्ण व जातिव्यवस्था

( १ ) वर्णव्यवस्थेचें समग्र विवेचन – तिचें प्रयोजन काय ? वर्णभेद जन्मावर कीं कर्मावर अवलंबून आहे व कसा ? इतर धर्मांत वर्णभेद नाहीत काय ? असल्यास कोणत्या रूपात ? त्यापासून लाभालाभ ? (२) चातुर्वर्ण्य हें एक सनातन धर्माचें वैशिष्ट्यदर्शक अंग असल्यामुळे, वर्णव्यवस्था व जातिभेद हे एकाच वस्तूचे वाचक दोन शब्द आहेत किंवा या दोन निरनिराळ्या संस्था आहेत? यासंबंधी साधार

व सविस्तर वर्णन. (३) जाति व वर्ण या दोन निरनिराळ्या संस्था असतील तर त्यांचा परस्परसंबंध काय ? त्या दोहोंपैकी ऐतिहासिक परंपरेने जुनी व अधिक महत्त्वाची कोणती ? (४) चातुर्वर्ण्य वैदिक धर्मास आरंभापासूनच मान्य आहे की, पुढे ज्ञानाच्या प्रगतीमुळे हें तत्त्व ओळखण्यात येऊन धर्मशास्त्रात ग्रथित करण्यात आलें ? (५) वर्णव्यवस्थेत आणि जातिव्यवस्थेत अन्नविवाहादि व्यवहारांचे आणि स्पर्शास्पर्शाच्या नियमांचें विवेचन करावें. एका वर्णातील मनुष्य दुसऱ्या वर्णात जाऊ शकतो कीं नाही ? शकत असल्यास त्याचे नियम व उदाहरणें ? नसल्यास कां ? (६) चातुर्वर्ण्य मानल्यास अंत्यजांचें अस्तित्व कोठें उरतें ? (७) वेदोक्ताचा अधिकार मनुष्यमात्रास कां नाही ? (८) जाति आणि वर्ण यांपासून राष्ट्रास लाभ व हानि कोणत्या प्रमाणावर झाली ? विवेचन साधार व सविस्तर असावें. (९) एक वर्ण, चार वर्ण किंवा असंख्य जाति यांपैकी कोणती समाजव्यवस्था राष्ट्रास हितकर आहे ? पूर्वी हंस नांवाचा एकच वर्ण होता काय ? त्या वेळी चातुर्वर्ण्य व जाति नव्हत्या काय ? (१०) चातुर्वर्ण्यात शिक्षणप्रसारास प्रतिबंधक असे नियम आहेत काय ? असल्यास त्यांचा हेतु काय ? असा प्रतिबंध नसणें इष्ट आहे काय ?

## प्रकरण ४ थें – आश्रमसंस्था

(१) आश्रमधर्मासंबंधी नियम कोणत्या तत्त्वावर बसविले आहेत ? ते नियम सद्यःस्थितीत पाळणें शक्य आहे काय ? नसल्यास तत्त्व राखून नवे नियम बसविता येतील काय ? बसवून दाखवावे.

## प्रकरण ५ वें – विवाह

(१) विवाहासंबंधी नैसर्गिक व शास्त्रीय नियमांचा उद्देश काय? (२) प्रौढ विवाह, विधवा विवाह आणि नियोगविधि यासंबंधी विवेचन करता यावें, म्हणून विवाहासंबंधीच्या नियमांचें समग्र व साधार विवेचन करावें : – (अ) विवाहाचा काल (ब) प्रकार (क) कलियुगात सर्व प्रकारचे विवाह मान्य कां नाहीत ? (ड) विवाहविधि पूर्ण झाल्यावर मोडता येतो कीं नाही ? व वधूवरास पुन्हा निरनिराळे विवाह करिता येतात किंवा नाही ? येत असल्यास कोणत्या नियमाने ? (३) अनेकपत्नीकत्व किंवा अनेकपतित्व धर्मशास्त्रसंमत आहे कीं नाही ? असल्यास कोणत्या नियमाने ? व यामुळे समाजावर इष्टानिष्ट परिणाम

काय ? (४) अनुलोम-प्रतिलोम पद्धति धर्मशास्त्रसंमत आहेत काय ? असल्यास त्यास हल्ली प्रतिबंध कां ? व तो केव्हापासून सुरू झाला ? (५) इतर बहुतेक जातींत पुनरुद्वाह (पाट) रूढ असता ब्राह्मणासच हा प्रतिबंध आहे काय ? प्रतिबंधाचा उद्देश काय ? (६) 'संकर' शब्दाची शास्त्रीय व्याख्या व विवेचन (अ) संकराचीं कारणें (ब) संकरापासून विशेष हानि काय ? ज्या समाजात चातुर्वर्ण्य किंवा जाति-भेद रूढ नाही, त्या समाजात संकराचें निवारण कसें करता येईल ? व्यभिचारजन्य संततीसंबंधी वर्ण किंवा जाति यांचा निश्चय कसा करता येईल ? याचें साधार व सोदाहरण विवेचन.

## प्रकरण ६ वें – भक्ष्याभक्ष्य व पेयापेय

(१) वर्णधर्म, जातिधर्म व आश्रमधर्म यांसंबंधी भक्ष्याभक्ष्य व पेयापेय यासंबंधी नियमांचें विवेचन (२) भक्ष्याभक्ष्याचा व पेयापेयाचा वैद्यकशास्त्राशी निकट संबंध आहे की धर्मशास्त्राशी ? ( ३ ) अहिंसा परमो धर्मः हें तत्त्व सनातन धर्माच्या आरंभापासून मान्य होतें काय ? असल्यास यज्ञयागातील हिंसा अहिंसा कशी होते ? नसल्यास हें तत्त्व केव्हापासून धर्मशास्त्रात ग्रथित झालें ? यज्ञयागातील अवशिष्ट यांस भक्ष्य मानलें जात असे कीं नाही ? असल्यास मांसभक्षण निषिद्ध कधी-पासून झालें ? निषेधापासून राष्ट्रास लाभालाभ काय ? त्याचा राष्ट्रीय शीलावर परिणाम काय ? (४) मांस हें श्राद्धभोजनात अवश्य आहे काय ? (५) सोमरस आणि मद्य हीं दोन्ही एकच काय ? असतील तर वेदकाळी सोमरसाचा एवढा महिमा असता मद्यपान हें महापातकांपैकी एक मानलें जात असे कीं नाही ?

## प्रकरण ७ वें – समुद्रयान

(१)समुद्रयान धर्मशास्त्रात निषिद्ध आहे काय? असल्यास त्याचा मूलोद्देश दाखविण्यासाठी साधार विवेचन. निषिद्ध नसल्यास ते कधी-पासून व कां निषिद्ध मानलें जाऊ लागलें ? हिंदुस्थानच्या बाहेर समुद्रा-पलीकडच्या देशांत अगर द्वीपात सनातन धर्मीयांच्या वसाहती होत्या कीं नाही ? असल्यास वसाहतीतल्या लोकांना धर्मबाह्य वर्तनास्तव हिंदुस्थानचे लोक अव्यवहार्य किंवा अपंक्त समजत काय ?

### प्रकरण ८ वें – स्वधर्मत्याग व परधर्मस्वीकार

(१) परधर्मावलंबनामुळे जो दोष होतो, त्याचें क्षालन करण्याचीं साधनें आहेत काय? असल्यास तो हिंदुधर्मीयांशी व्यवहार करताना येतो काय? येत असल्यास आधार? साधनें नसल्यास कां नाहीत? (२) धर्मांतर केलेल्यास स्वधर्मात पुन्हा परत घेतल्याचीं उदाहरणें पुराणेतिहासांत असल्यास त्यांचें समग्र विवेचन. (३) खुद्द हिंदुस्थानातच सनातन धर्मापासून उत्पन्न झालेल्या बौद्ध किंवा जैन धर्मांत वर्ण किंवा जातिभेद नव्हता. त्या धर्मांच्या चक्रवर्ती राजांच्या अंमलात पुष्कळशी प्रजा बौद्ध किंवा जैनधर्मी झाली. पण हल्ली त्यांची संख्या त्या प्रमाणाने कमी आहे; तर त्या त्या धर्माची राजसत्ता खालावताच बौद्ध किंवा जैन धर्मीय लोकांपैकी काही फिरून हिंदुधर्मात प्रविष्ट झाले काय? झाले असल्यास सप्रमाण विवेचन द्या.

### प्रकरण ९ वें – श्राद्ध

(१) धर्मशास्त्रात श्राद्धासंबंधी नियम कोणत्या तत्त्वावर केले आहेत?

### प्रकरण १० वें – प्रायश्चित्त

(१) धर्मशास्त्रात प्रायश्चित्त प्रकरणाची तात्त्विक व व्यावहारिक आवश्यकता काय आहे? त्याचें विवेचन.

डॉ. मुंजे यांनी ही अनुक्रमणिका अनेक विद्वानांच्याकडे पाठविल्यावर लेखक म्हणून अनेकांनी अनेक नांवें त्यांच्याकडे पाठविलीं. पण एवढें मोठें काम करू शकणारा लेखक हा पाश्चिमात्य आणि पौरस्त्य अशा दोन्ही समाजशास्त्रांचा महापंडित असणें आवश्यक होतें. तसें नांव मुंजे यांच्यासमोर आलें नाही. हें काम सोपें नसून अत्यंत अवघड आहे याची सुस्पष्ट जाणीव त्यांना त्यांचे मित्र, आजचे लोकनायक व त्यावेळचे माधवरावजी अणे यांनी दिली. अणे आपल्या दि. २७-५-१४ च्या पत्रात लिहितात,

"प्रिय डॉक्टरसाहेब,

तुमचें केसरीतील निवेदन वाचलें. वस्तुस्थिति अशी आहे की, ज्या विषयावर ग्रंथ लिहावयास तुम्ही आधुनिक विद्वानांना आवाहन केलें आहे तो विषय हल्लीच्या हिंदुस्थानातील कोणत्याही महाविद्यालयातून शिकविला जात नाही. हिंदुधर्मशास्त्राचा इतिहास लिहावयाचा

म्हणजे लेखकाला त्यात अंतर्भूत होणाऱ्या सर्व विषयांचें परिपूर्ण ज्ञान असणें आवश्यक आहे. या लेखकाला मूळ धर्मग्रंथांचें तर परिपूर्ण ज्ञान हवेंच पण त्याचबरोबर प्रत्येक ग्रंथावरील वेगवेगळ्या टीकाकारांच्या टीकांचेंही परिपूर्ण ज्ञान हवें. प्रत्येक टीकाकाराचें एक स्वतंत्र मत असतें. ऐतिहासिक दृष्टीने त्यांचें समालोचन करता आलें पाहिजे. शिवाय हा लेखक शिल्पशास्त्र, वंशशास्त्र व समाजशास्त्र यांचाही गाढा पंडित हवा, आणि त्याचें ज्ञान त्या त्या विषयातील आजचें संशोधन आकलन करण्याइतकें व्यापक व अद्यतन हवें."

बापूजी अणे यांनी सुचविलें तें अगदी योग्यच होतें. पण असा मनुष्य व तोही केवळ एक सहस्र रुपयांवर संतुष्ट होण्याइतका अल्पसंतोषी कसा सापडावयाचा हा प्रश्नच होता. डॉ. मुंजे यांनी ग्रंथाचा जो उपरिनिर्दिष्ट आराखडा तयार केला तो श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या सूचनेप्रमाणे भारताचार्य चिंतामण विनायक वैद्य यांच्या साहाय्याने तयार केला असें दिसतें. पण स्वत: चिंतामणराव असा ग्रंथ लिहावयास तयार नव्हते. आधुनिक विद्वानांत डॉक्टरांना धर्मशास्त्राचा पंडित होण्यासाठी संस्कृतचें जें गाढ ज्ञान आवश्यक आहे तें आढळेना, व प्राचीन पंडितांना इतिहासाची दृष्टि नव्हती. अशा स्थितीत टिळकांची सुटका झाल्यावर मुंजे यांनी त्यांना काही लेखकांचीं नांवें देऊन मत विचारलें. टिळकांनी त्यांना असें कळविलें की, धर्मग्रंथांतील संस्कृत वचनांच्या यथार्थ अभिप्रायाच्या ज्ञानाच्या दृष्टीने आधुनिक पंडितांवर भरंवसा न ठेवता प्राचीन परंपरेने शिकलेल्या जुन्या पद्धतीच्या पढीक पंडितांनाच यासंबंधात प्रमाण मानावें. महाराष्ट्रात त्या वेळी धर्मशास्त्रावर ऐतिहासिक दृष्टीने तौलनिक ग्रंथ लिहू शकणारा एकच पंडित होता व तो म्हणजे डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर हे होत. मुंजे यांनी त्यांच्याशी पत्रव्यवहार केल्यावर केतकरांनी आपली सिद्धता दाखविली. दि. १२ नोव्हेंबर १९१४-च्या पत्रात केतकर लिहितात,

"सा. न. वि. वि. आपण हिंदुधर्मशास्त्रावर ग्रंथ लिहून मागता व त्यासंबंधाने आपलें बोलणेंही झालें होतें. आपली जर इच्छा असेल तर त्या विषयावर ग्रंथ लिहिण्याची माझी तयारी आहे. पण त्या संबंधाच्या अटी मला येणेप्रमाणे पाहिजेत.

(१) तो ग्रंथ लिहिण्यासाठी मला नेमलें पाहिजे. याचा अर्थ की, ग्रंथ लिहून तयार झाल्यानंतर तो पास झाल्यास आपणांस ती रक्कम देऊ असें नको.

(२) तो ग्रंथ लिहिण्यास एक वर्षापेक्षा मला अधिक काळ लागेल व तो १००० पानांत संपूर्ण होईल असें आश्वासन मी देत नाही. मला असें वाटतें की, या विषयावर सशास्त्र विवेचन करण्यास अधिक पृष्ठें लागतील.

(३) हा ग्रंथ तयार करण्यासाठी काही रक्कम सुमारे एक तृतीयांश मला आगाऊ द्यावी. (ही अट घालण्याचें कारण हें की, या कामासाठी मला स्वतःस पैसा खर्च करावा लागेल; काही विद्वान् लोकांस भेटावयास जावें लागेल, काही शास्त्री मंडळींस consult करावें लागेल, काही पुस्तकें घ्यावीं लागतील व काही कालपर्यंत पुस्तकें जेथे उपलब्ध होतील तेथे जावें लागेल.)

(४) व पुढे दरमहा काही रक्कम पाठवीत जावी.

या अटी आपणांस मान्य असल्यास कळवावें. कळावें ही विनंती

आपला

१२-११-१४ **श्रीधर व्यंकटेश केतकर**

उमरावती

केतकरांशी डॉ. मुंजे यांचा इ. स. १९१४-च्या प्रारंभापासूनच पत्रव्यवहार चालू होता. दि. ८-२-१४-ला कलकत्त्याहून मुंजे यांना लिहिलेल्या पत्रात डॉ. केतकर लिहितात,

"आपलें चार तारखेचें पत्र व केसरीतील उतारा हीं पावलीं. मला यासंबंधाने ज्या सूचना करावयाच्या आहेत त्या येणेप्रमाणे :—

आपण ज्या प्रकारचा ग्रंथ तयार करून मागता त्या तऱ्हेचा ग्रंथ दोन चार वर्षांच्या अवधीतही तयार होईल किंवा नाही याची मला वानवाच वाटते. आपण हिंदुधर्मशास्त्रावर ग्रंथ मागता व त्यास फक्त हजार रुपये दक्षिणा देता. कलकत्ता युनिव्हर्सिटीने दहा हजार रुपयांचें बक्षीस लावलें आहे. व हें बक्षिस (टागोर लॉ प्रोफेसरशिप) आज चार वर्षें जाहीर झालें आहे. तथापि समाधानकारक असा एकही ग्रंथ पुढे आला नाही. मी स्वतः या विषयावर थोडेसें अध्ययन केलें आहे व कमीत कमी तेवीस ग्रंथ चाळून पाहिले आहेत. तथापि ज्या ग्रंथाने माझें स्वतःचें समाधान होईल असा ग्रंथ निर्माण करण्यास मला कमीत कमी पांच वर्षें लागतील. आपलें पत्र येण्यापूर्वीच मी आपलें पत्रक पाहिलें होतें व तें येथील प्रसिद्ध व विद्वान् मीमांसक लक्ष्मणशास्त्री यांस दाखविलें होतें. तथापि लक्ष्मणशास्त्री देखील हें काम हाती घण्यास तयार नाहीत. हें काम हाती घेण्यास जितकें ग्रंथावलोकन पाहिजे

तितकें करण्यास त्यांस फुरसत नाही. या विषयावर काम हाती घेण्याचे अगोदर तो ग्रंथ वाचण्यास योग्य असा वाचकवर्ग निर्माण झाला पाहिजे. कारण सामान्य मनुष्यास अगदी मूलतत्त्वें देखील माहिती नसतात. तीं मूलतत्त्वें सांगावयाचीं म्हणजे ज्या वेड्यावाकड्या कल्पना अगोदरच प्रसृत झाल्या आहेत व कायदा, रिलिजन व धर्मशास्त्र यांच्या परस्परसंबंधाविषयी जो घोटाळा उडाला आहे त्याच्याशी झगडावें लागेल. धर्मशास्त्राविषयी लोकांस शिक्षण द्यावयाच्या अगोदर तें शिक्षण देण्यास योग्य अशी भूमिका तयार झाली पाहिजे.

केतकरांनी आपल्या पत्रात ज्या लक्ष्मणशास्त्रींचा निर्देश केला ते लक्ष्मणशास्त्री म्हणजे वाराणशीचे पंडितराज राजेश्वरशास्त्री द्रविड यांचे वडील कै. महामहोपाध्याय लक्ष्मणशास्त्री द्रविड हे होत. स्वतः लक्ष्मणशास्त्रींनी हें काम अंगावर घेतलें असतें तर तें फारच उत्कृष्ट झालें असतें यात शंका नाही. पण लक्ष्मणशास्त्री द्रविड मराठीत ग्रंथ लिहिण्याची शक्यता नव्हती. त्यामुळे केतकर यांच्याशी पत्रव्यवहार करून त्यांनाच तें काम द्यावयाचें ठरलें. पण केतकरांच्या योजनेनुसार ज्ञानकोश मंडळासारखें एक मोठें मंडळ स्थापन करूनच हें काम उभारणें आवश्यक होतें. याला दीडदोन लक्षांचा निधि आवश्यक होता. ती गोष्ट त्या वेळी तरी डॉ. मुंजे यांच्या आवाक्याबाहेरची होती. शेवटी ग्रंथाचा नाद सोडून देऊन दुसऱ्या योजनेकडे वळणें त्यांना भाग पडलें. त्यांनी आपल्या वडिलांच्या नांवें संकल्पित ५००० रुपयांची रक्कम नागपूरच्या भोसला वेदशास्त्र महाविद्यालयाला देणगी म्हणून दिली. डॉ. मुंजे यांच्या जीवनातील या कालखंडात त्यांनी जे धार्मिक व सामाजिक उद्योग हाती घेतले होते त्या सर्वच उद्योगांना बाजूला सारून आपल्या आवडीचें राजकारण करण्याची संधि त्यांना पुन्हा प्राप्त झाली. ती संधि म्हणजे सन १९१४-च्या जून महिन्यात झालेली लोकमान्य टिळकांची मुक्तता होय.

✦ ✦ ✦

प्रकरण पंधरावें

# पहिल्या जागतिक महायुद्धाच्या सावलीत!

१९१४-च्या जून महिन्यात मंडालेच्या तुरुंगातून लोकमान्य टिळकांची सुटका झाली व दि. १७ जूनला मध्यरात्रीनंतर एका घटकेने त्यांना सरकारने पुण्याला गायकवाड वाड्यात आणून सोडलें. टिळक सुटल्याची वार्ता कळताच जिकडे तिकडे मोठा आनंद झाला. दादासाहेब खापर्डे तर ही वार्ता कळताच सरळ लोकमान्यांच्या भेटीसाठी पुण्याला निघून गेले. नागपूरला टिळकांच्या मुक्ततेनंतर दोन तीन दिवसांनी चिटणीस पार्कमध्ये राष्ट्रीय मंडळाचे अध्यक्ष दादासाहेब उधोजी यांच्या अध्यक्षतेखाली प्रकट सभा झाली. या सभेत डॉ. मुंजे यांनी लोकमान्यांच्या अभिनंदनाचा ठराव मांडला. सभेत भवानीशंकर नियोगी प्रभृतींचीं भाषणें होऊन सभेच्या शेवटी गूळखोबऱ्याचा प्रसाद वाटण्यात आला.

दि. २१ जून १९१४-ला तात्यासाहेब केळकरांना लिहिलेल्या पत्रांत डॉ. मुंजे लिहितात :– " टिळक सुटून आल्याची तार येथे पोहोचताच शहरात एकच खळबळ उडाली. लोकांनी पेढे वाटले. आपलीं घरें शृंगारलीं, सर्व शहरभर उत्साह दिसून येत होता. सायंकाळी व्यंकटेश नाटकगृहाच्या पाठीमागील मैदानात सुमारे पांच हजार लोकांची सभा भरली. तीत सर्व पक्षांचे, जातींचे व धंद्यांचे लहान थोर लोक हजर होते. अध्यक्ष उधोजी यांना अभिनंदनाचा ठराव मांडताना गहिंवरून आलें. पटांगणाच्या मध्यभागी देवळाच्या शिखरावर सर्वांस दिसेल अशा ठिकाणी टिळकांची तसबीर लावण्यात आली होती. तिच्यावर सर्वांनी मंत्रपुष्प, अक्षता व फुलें यांची वृष्टि केली." विशेष म्हणजे डॉ. केशवराव हेडगेवार यांनी टिळकांच्या सुटकेच्या आनंदाप्रीत्यर्थ डॉ. मुंजे यांच्या घरावर सर्वत्र दिवे लावून दिवाळीसारखा दीपोत्सव साजरा केला. यानंतर लोकमान्यांना भेटण्यासाठी मुंजे पुण्याला जाऊन आले.

टिळक म्हटले की सरकारशी संघर्षाचा उद्भव व्हावा असा जणू संकेतच होता. टिळक मुक्त होताच सरकारविरोधी चळवळींना नवें बळ प्राप्त होईल अशी सरकारची कल्पना होती. टिळकांच्या दर्शनासाठी होणाऱ्या वाढत्या गर्दीने व त्यांची लोकप्रियता कमी होण्याऐवजी समाजातील मोठमोठ्या धुरीणांनी त्यांच्या संबंधांत दाखविलेल्या प्रेमाने व

निष्ठेने सरकारच्या अंगाचा तिळपापड झाला. लगेच मुंबई सरकारने टिळकांकडे येणाऱ्या लोकांना बंदी करणारा हुकूम काढला. अर्थातच तो केवळ सरकारी नोकरांपुरता होता. त्यांच्या अभिनंदनाच्या सभा सरकार थांबवू शकत नव्हतें व सरकारी नोकर नसणाऱ्यांना बंदीही घालू शकत नव्हतें. मोर नाचला म्हणजे लांडोरानेही नाचावें त्याप्रमाणे या वेळी कोल्हापूर दरबारनेही आपले दिवाण सबनीस यांच्या सहीने टिळक हे आपले शत्रु आहेत असें घोषित करून त्यांच्या दर्शनाला जाण्यास या ना त्या स्वरूपात आपले अंकित असणाऱ्या लोकांना बंदी केली. सरकारने या वेळी आपल्या मनाचा इतका क्षुद्रपणा दाखविला की त्यापूर्वीच्या गणेशोत्सवाच्या विसर्जनाच्या मिरवणुकीत टिळकांनी व त्यांच्या मुलांनी भाग घेऊ नये अशी सरकारची इच्छा असल्याचें पुण्याच्या कलेक्टरने टिळकांना कळविलें व अप्रत्यक्षपणे गणपतीच्या मिरवणुकीत टिळकांच्या नांवाचा जयजयकार होऊ नये व त्यांचीं छायाचित्रें गणेशोत्सवाच्या जागी लावू नयेत अशी आज्ञा काढली. टिळकांच्या घरावर पहारा होता व त्याना भेटायला येणाऱ्या जाणाऱ्यांची पोलीस नोंद करीत असत. आपल्याशी चालणारें सरकारचें हें वर्तन निष्कारण असून तें थांबवावें म्हणून हिंदुस्थानात कितीही प्रयत्न केले तरी ते थांबणार नाहीत हें ओळखून टिळकांनी इंग्लंडमध्ये खटपट सुरू केली. पार्लमेंटचे सभासद केरहार्डी यांना टिळकांनी सविस्तर वृत्त कळविलें व त्यांनी भारतमंत्री लॉर्ड क्यू यांना हें वृत्त कळविलें. त्यांनी मुंबई सरकारकडे यासंबंधी पत्र पाठविलें. पण सरकारी गतीने हीं चक्रें फिरण्याआधीच एक अशी घटना घडली की, हिंदुस्थानातील महत्त्वाच्या लोकनेत्यांचा पाठिंबा मिळविणें सरकारला आवश्यक वाटलें. ती गोष्ट म्हणजे दि. ४ ऑगस्ट १९१४-ला युरोपखंडांत जर्मनीशी इंग्लंड व त्यांच्या मित्रराष्ट्रांचें सुरू झालेलें महायुद्ध होय.

महायुद्ध सुरू होताच स्वतःच्या कारणास्तव टिळक व सरकार यांनी आपापल्या दृष्टिकोनात आवश्यक तो बदल केला. असें काही महायुद्ध होणार आहे अशीं स्वप्नें सरकारला पूर्वीपासूनच पडत होतीं. या महायुद्धाचा उपयोग 'इंग्लंड्स् डिफिकल्टी इज् अवर ऑपर्च्युनिटी' या सूत्रानुरूप करावयाचे दोन मार्ग होते. एक सशस्त्र म्हणजे स्वातंत्र्ययुद्ध उभारणें. पण त्यासाठी लागणारें शस्त्रास्त्रांचें व सैन्याचें बळ व आवश्यक ती जनमानसाची सिद्धता नव्हती. त्यामुळे असलेल्या संधीचा लाभ घेऊन सरकारला साह्य करणें व मिळतील ते लाभ पदरात पाडून घेणें व आजवर बंद असलेलीं सैन्याचीं दारें उघडलीं गेल्यास भारतीयांना अद्ययावत्

शस्त्रास्त्रांच्या व सैनिकी व्यवसायाच्या शिक्षणाची संधि प्राप्त करून देणें हा युद्धाच्या संधीचा लाभ घेण्याचा दुसरा प्रकार होता. प्राप्त परिस्थितीत गत्यंतर नाही म्हणून टिळकांनी हा दुसरा मार्ग स्वीकारला. त्यासाठी आवश्यक तें वातावरण निर्माण करावें यास्तव टिळकांनी एक प्रकट निवेदन केलें. त्यांतील काही महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे आहे.

" हिंदुस्थान देश आपणांस अत्यंत इष्ट असलेलें ध्येय प्राप्त करून घेण्याचा मार्ग धिमेपणाने आक्रमण करील याबद्दल निदान मी निराश झालो नाही. लॉर्ड मोर्ले व लॉर्ड मिंटो यांच्या कारकीर्दीत ज्या सुधारणांचा उपक्रम झाला, त्यावरून असें दिसून येईल की, राज्यकारभारात प्रगतिपर फेरबदल करण्याची आवश्यकता सरकारच्या पूर्णपणे लक्षात आलेली असून राज्यकारभाराच्या कामी लोकांशी दिवसानुदिवस अधिकाधिक संबंध ठेवण्याची सरकारची इच्छा आहे. या गोष्टीवरून अधिकारी व प्रजा यांजमधील परस्पर विश्वास बराच वाढत चालला असल्याचें आणि प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकून तीं दूर करण्याचा सतत प्रयत्न सुरू असल्याचें दिसून येतें असें म्हणता येईल व आम्हीही तें मान्य करणें रास्त होईल. सार्वजनिक दृष्टया विचार करता हा इतका फायदाच झाला असें मला वाटतें. आणि हा फायदा जरी सर्वांशी निर्भेळ नसला तरी मला अशी दृढ आशा वाटत आहे की अखेर या राजकीय सुधारणांत जें काही चांगलें आहे तें शिल्लक व कायम राहील आणि ज्याबद्दल आमची हरकत आहे तें नाहीसें होईल."

"माझ्या सहा वर्षांच्या गैरहजेरीत येथील व इंग्लंडातील इंग्रजी पत्रांत, उदाहरणार्थ मि. चिरोल यांच्या पुस्तकात माझे लेख व कृत्यें यांचा असा अर्थ करण्याचा प्रयत्न झाल्याचें मला दिसून येतें की, त्यामुळे अत्याचाराच्या कृत्यांना प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष चिथावणी मिळाली. अथवा मी जीं भाषणें केलीं तीं हिंदुस्थानातील इंग्रज सरकारचें राज्य उलथून पाडण्याच्या हेतूने केलीं. मी आपला बचाव करण्यास नागरिक या नात्याने स्वतंत्र नव्हतो अशा वेळी हे प्रयत्न करण्यात आले ही शोचनीय गोष्ट होय. तथापि या पहिल्याच सार्वजनिक प्रसंगी मजवरील या घाणेरड्या व सर्वस्वी निराधार अशा आरोपांचा मन:पूर्वक तिटकाऱ्याने निषेध करणें मला जरूर आहे. राजकीय चळवळ करणाऱ्या इतर लोकांप्रमाणे काही बाबींत, किंबहुना काही अंशी अंतर्गत राज्यव्यवस्थेसंबंधानेही सरकारमध्ये व मजमध्ये विशिष्ट मतभेद आहेत. परंतु त्यामुळे माझी वृत्ति किंवा माझीं कृत्यें इंग्रज सरकाराबद्दल द्वेषभाव व्यक्त करणारीं आहेत असें म्हणणें असमंजसपणाचें होईल."

"हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत अत्याचारांचे जे जे प्रकार घडून आलेले आहेत ते माझ्या स्वभावाला प्रतिकूल आहेत इतकेंच नव्हे तर अशा कृत्यांच्या योगाने आमच्या राजकीय प्रगतीचें पाऊलही दुर्दैवाने बरेचसें मागे पडलें असेंही माझें मत आहे. इंग्रजी राज्यातील केवळ सुधारलेल्या राज्यपद्धतीमुळेच नव्हे, तर सदर राज्यपद्धतीने हिंदुस्थानातील निरनिराळ्या जाति व लोक यांचें एकीकरण होऊन त्यातून कालांतराने संयुक्त भारतीय राष्ट्र निर्माण होण्याचाही संभव असल्यामुळे इंग्रजी राज्यापासून हिंदुस्थानचा अगणित फायदा होत आहे असें जें म्हणतात तें बरोबर आहे."

"जर्मनीच्या बादशहाने अनेक तहनामे आणि पुन:पुन्हा राज्य-खंडत्वाचीं अभिवचनें मोडून एका कमकुवत संस्थानाच्या सरहद्दीवर स्वारी केल्यामुळे सदर संस्थानाच्या बचावासाठी जर्मन बादशहाचे विरुद्ध इंग्लंडास हाती शस्त्र धरणें भाग पडलें आहे हें आपणांस माहीत आहेच. अशा बिकट प्रसंगी प्रत्येक हिंदी प्रजाजनाने—मग तो लहान असो वा मोठा असो, श्रीमंत असो वा गरीब असो,—इंग्रज सरकारास आपल्याला शक्य असेल तेवढी मदत करून पाठबळ देणें हें त्याचें कर्तव्य आहे असें माझें दृढ मत आहे आणि यासंबंधी लोकमत जोराने व्यक्त करण्याकरिता इतर ठिकाणी घडून आल्याप्रमाणे सर्व पक्षांच्या, जातींच्या व वर्गांच्या लोकांची जाहीर सभा पुण्यासही भरविण्यात यावी; त्याला आता किंचित्ही विलंब लावू नये असें माझें म्हणणें आहे."

शिवाजी महाराजांनी आग्र्याहून युक्तीने निसटल्यावर औरंग-जेबाला राजनिष्ठा दाखविणारें जें पत्र पाठविलें त्याचीच टिळकांचें हें निवेदन म्हणजे दुसरी आवृत्ति होती. सरकारही हें ओळखत नव्हतें असें नाही. पण सरकारला या वेळी टिळकांसारख्या लोकनेत्याच्या सहानु-भूतीची आवश्यकता वाटत होती. यास्तव औरंगजेबाने ज्याप्रमाणे शिवाजी महाराजांना कृपावंत होऊन त्यांच्या मागच्या अपराधांकडे न पाहता क्षमा करावयाचें ठरविलें तसेंच धोरण ब्रिटिश सरकारने टिळकांच्या बाबतीत स्वीकारून त्यांच्या संबंधातील आपलें धोरण बदललें. सरकारने आपलें पूर्वीचें परिपत्रक परत घेतलें व सेक्रेटरी ऑफ स्टेटने केरहार्डी यांना असें कळविलें की, टिळकांनी सरकारविषयी स्नेह-भावाचे उद्‌गार काढल्यामुळे आम्ही त्यांच्यावरचा पहारा उठविला आहे.

सन १९१२-पासूनच नागपूर प्रांतात वस्तुस्थिति कशी आहे व सरकारविरोधी संप्रदाय कोणकोणते आहेत याची सूक्ष्मपणे चौकशी सरकारने चालविली होती. भारतातील सर्वच प्रांतांतून सरकारी

स्तरावरून या स्वरूपाची माहिती गोळा करण्यात येत असली पाहिजे असें दिसतें. १९१४-मध्ये प्रारंभ झालेल्या महायुद्धाची ब्रिटिश सरकारला आधीच जाणीव कशी झाली होती व त्या दृष्टीने भारतातील समाजाचें त्यांनी किती सूक्ष्म निरीक्षण चालविलें होतें याची कल्पना भारत सरकारची प्रश्नावलि व तिला प्रांतिक सरकारांनी पाठविलेली उत्तरावलि यांवरून येण्यासारखी आहे. हिंदुस्थान सरकारने ही प्रश्नावलि तयार करण्यासाठी एक समिति नियुक्त केली होती. या समितीने जी प्रश्नावलि तयार केली तिची एक प्रत त्यांनी मध्यप्रांताकडेही पाठविली. त्या प्रश्नावलीतील काही महत्त्वाचे प्रश्न व त्यांस मध्यप्रांताचे चीफ कमिशनर यांनी दिलेलीं उत्तरें येथे उद्धृत करतो म्हणजे त्यावरून सरकारी चौकशीची सूक्ष्मता व सरकारी दृष्टिकोनातून युद्धपूर्वकालीन मध्य-प्रदेशाची स्थिति याची नीट कल्पना येईल.

**Question 14** :— In times of disturbance what do you consider the principal centres in the Central Provinces from which danger is to be apprehended ?

**Answer** :— The extremist party is most active in Berar and in Maratha Districts of the province. There is no garrison in Berar and disturbances in sympathy or in concert with outbreaks in other parts of the country might occur in any of the headquarters or towns. The Chief Commissioner, from his experience of Berar, believes that in the country parts, the people would not readily join in any such movement. As already remarked, the influence of the civil officer still stands for a good deal in the part of the country where the administration had been conducted on rather paternal lines. And the village officers in Berar are a particularly well disposed set of men and would not readily risk their positions by going against the Government.

Of the Nagpur country, it is probable that the same might to a large extent be said. Only in the towns would there be a serious response to a general call to a rising, and even these, it is likely that a very considerable portion of the populace would range itself on the side of the Government. In the northern and eastern part of the province, it is probable that the people would be slow to move in the direction of rising. Much would of course depend on the success with which such a rising is met at the outset. The personal opinion of the Chief Commissioner is that

though the local outbreaks might undoubtedly be looked for in the south and west, the rest of the province would remain fairly secure for some time, and by then an improvement in the general situation might reasonably be looked.

**Question 16 :—** What are the most important societies at work in the Central Provinces with political or quasipolitical objects in view ?

**Answer :—** The Arya samaj and the Moslem League both have branches in the Central Provinces; but neither of them is particularly strong or possess much influence. The Chief Commissioner believes that in this province the Arya Samaj movement is chiefly confined to the religious side. The Moslem League is purely political, but Mahomedans are not very numerous in this province and the provincial branch of the League does not possess much local influence. There are Gorakshan Sabhas in every part of the province, but it is believed that they are not connected with any central body but are purely local institutions. A few years ago, there was a dangerous political society with its headquarter in Nagpur known as the Rashtriya Mandal; but it was broken up by Mr. Cleveland ( now Sir Charles ) in 1909 and if any relics of it still survive, they keep themselves very quiet. If they break out at all it is in the form of some religious movement such as deification of Shivaji.

**Question 19 :—** Are political agitators in the Central Provinces in communication with those elsewhere ?

**Answer :—** There is no doubt that the political agitators of the Central Provinces were in communication on the one side with the Bengal agitators and on the other side with those of Poona and Nasik. Khaparde of Amaraoti was generally considered to be the lieutenant of Tilak. The agitators of Nagpur were closely connected with Khaparde and his friends in Berar, and were also in touch with the leaders of sedition in Bengal during the years 1906 to 1909. There was also evidence that the Bengal agitators attempted to establish a connection with the Maratha Brahmins in Sagar while a branch of the brahmacharis in Bengal is also established for a short time in Jabalpur where a certain number of Bengalis have settled. The Nasik conspirators were undoubtedly in connection with some of the disaffected brahmins in Berar.

**Question 20** :— Did the deportation of Lajpat Rai in 1907 and the subsequent incarceration of Tilak exercise any influence on the political activities of the anti-brahmin agitators in the Central Provinces ?

**Answer** :— There is nothing to show that the deportation of Lajpat Rai had much effect on local agitation, though it is understood that to some extent it caused wavers to draw back. The prosecusion and conviction of Tilak on the other hand had somewhat exasperating effect on local extremists. The conviction of Tilak was followed by an attempt to raise a disturbance in Nagpur itself, which however was speedily quelled, and this was followed later on by defilement of the statue of Queen Victoria. It was the investigation into this latter performance which led to the final break-up of the local political societies by Mr. Cleveland ( Now Sir Charles ).

**Question 21** :— What influence have the Ganapati and anti-cow-killing movements and the Shivaji cult in the Central Provinces ?

**Answer** — The anti-cow-killing movement has not had much influence in this province. There are 35 Gorakshan Sansthas in the province, all small, but they keep the movement alive. The movement was useful in the old days when disloyalty showed itself insidiously, but as soon as agitation came out in the open, it was found to be too tame and was discarded for more rabid methods. Recently Sorabji Jassawala has been able to collect a good deal of money to enable him to go to England and start a society there. The movement is one that most Hindus will support without any political bias.

The Ganapati celebrations are still alive and are still kept up wholly for political reasons. Last year the celebrations were held at Amaraoti, Nagpur, Yeotmal, Hoshangabag and at Bina and Bhopal within Railway jurisdiction. The only noticeable feature was the temper shown by the Nagpur nationalists over the action of the District Suprintendent of Police who refused to allow the Ganapati to be worshipped while the portraits of Tilak and Shivaji were displayed at the Mandal.

The Shivaji celebrations were also political only. They were held in Nagpur, Yeotmal and Amaraoti this year. Central Provinces agitators also visited Poona where it was remarked that

their speeches were more rabid than those made by the local speakers.

As regards the influence of these methods of agitation they are not now used so much as a means of gathering recruits as of collecting sympathisers together and affording a meeting place where sedition can be discussed.

**Question 24** :— What do you consider the attitude and political importance of the National Congress in the Central Provinces ? Do you think that the complete local autonomy advocated by the Congress is a serious aspiration ?

**Answer** :— The Chief Commissioner is not disposed to attach much weight to the influence of the National Congress in the Central Provinces. It has its following in the educated classes in the towns whose views may be taken as the stereo-typed ones of the Congress. But since the succession of the extremist party and the considerable harrying which the more dangerous local representatives of the latter have undergone, there has been a general disposition even amongst men of the moderate school to give politics a bit of rest and not say much which might in any way embarrass the Government. There has in short been rather a lull so far as the local energies of the Congress are concerned. The Chief Commissioner has not yet ascertained how far the local autonomy idea has taken root here.

**Question 25** :— Is there still any marked cleavage between the so-called moderates and extremists ? Do the extremists exercise pernicious influence over the younger generation ?

**Answer** :— The cleavage between the moderates and the extremists is complete in this province. At the last Congress a special committee was appointed to try and find a common working programme for both parties. No result has followed on this so far as these provinces are considered. The tendency elsewhere in India, the Chief Commissioner believes, seems to be for all, except the revolutionaries, to come back into the Congress fold. The same will probably happen in the Central Provinces should politics again come more into fashion.

The corruption of the younger generation used to be the foremost plank in the extremist programme. This was shown by the students' riots in the Hislop College in 1907, the stoning of

Mr. Jones, Principal of the Morris College in 1908 and the sedition discovered in the Agricultural College at the time of the mutilation of the Queen's Statue. The secret police abstracts are full of the participation of students at extremist meetings, etc. At present all this has ceased.

**Question 26** :— Has the Press Act had a salutory effect ? Is it still being consistently applied ?

**Answer** :— There can be no two opinions as to the beneficial effect of the Press Act. A perusal of the writings in the news papers before and after the passing of the Act shows this at once. There is not now much necessity for applying the Act. The knowledge that the Act is there, is generally a sufficient preventive. The only recent case necessitating the issue of a warning occurred last year, when the ' Batamidar ' of Yeotmal referred to the Durbar as ' Darawada ' ( an attack by robbers ) on two occasions. The paper has since stopped publication. The security of Rs. 5,000/- recently taken from the Poona Kesari may also be said to affect this province, as this paper has a larger circulation than any other, local or otherwise.

**Question 27** :— Are there any Sadhus or other wandering sections in the Central Provinces and is there any reason to suppose that they exercise a maleficent influence ?

**Answer** :— The Inspector General of Police has remarked as follows regarding this matter :—

" Political Sadhus are always a difficult question and little is known of them. Arbindo Ghosh wished to start his Bhawani Mandir in which political Sadhus could be instructed. The educational part of Arbindo Ghosh's programme was to have been kept separate from the active and revolutionary part. V. B. Lele is a type of the political Sadhu and undoubtedly Arbindo and Lele saw alike in this matter. It has never been discovered accurately how far the movement affected these provinces. Sadhu Vishnu Paranjpe seems to have started out with much the same idea. ( He was connected with V. B. Lele ). But his character could not sustain it as his relations with women soon brought him into discredit.

Besides the Sadhus, we have the inculcation of Nationalism by means of drama, and of this Patankar's theatrical company is the most prominent example. Kirtan singers are another agency

for creating disaffection, and they have always been very prominent. As usual these singers sing patriotic and religious songs and everywhere consert with extremists.

**Question 29:**–What is the present attitude of the Mahomedan Community in the Central Provinces ? Is the young mahomedan party active there ? Do you think there is any likelihood of the combination for political purposes between the young Mahomedan party and the Hindu agitators ?

**Answer** :–The chief characteristic among Mahomedans here is apathy. As a community they are loyal. Individually they are keen and anxious for the welfare of their community, but so far they have failed to accomplish much. They have no leaders who are recognised throughout the province. There are a few leaders like Nawab Muhammad Salamullah Khan, C. I. E. of Deoghat Buldhana District, whose influence extends beyound the district in which he resides, otherwise the leaders have only a purely local standing.

The young Muslim party can hardly be said to be active in these provinces, but there is a branch of the Muslim League, with 13 sub-branches, and if the young Mahomedan party captured the League, its influence would no doubt come to be felt in these parts, although the local people might not move with much alacrity at first.

For the present the Mahomedans hold quite aloof from the Hindus, politically. Whether they will continue to maintain this attitude depends on the policy of the Muslim League. A possible fusion is obviously a consideration that will always have to be reckoned with. It will probably come slowly in these provinces, unless considerable pressure were exerted in this direction from above.

**Question 30** :–Has the pan-Islamic movement spread among the Mahomedans of the Central Provinces.

**Answer** :–The only signs of stirring amongst the community are the establishment of the Muslim League branches already referred to. But their influence has as yet been slight.

The Turko–Italian Wars, the events in Morocco and Persia have been noticed in the provinces. There are reports of prayers for Turks being said in the mosques and the collections being made for the wounded in Tripoli, but these manifestations appear to be of little moment.

**Question 31**:– It has been suggested that the Mahomedans of India have no real community of interest and are not a homogeneous body. What are your views on the subject as regards the Mahomedans in the Central Provinces ? Are they likely to be affected in the event of war with Afaganistan, the Frontier tribes or any outside Mahomedans Power?

**Answer**:–The Mahomedans in the Central Provinces may be regarded as a fairly homogeneous body, although as already indicated they have hitherto showed little interest in politics or disposition to combine for racial purposes, and the establishment of the Muslim League has not yet had time to exert much influence. It would largely depend on the attitude of the latter body whether the local community showed much interest in matters such as a war with Afghanistan etc. Apart from the contingency of pressure being brought to bear through the League any manifestations of sympathy for outside happenings of this kind would probably be comparatively unimportant. The loyalty of the Mahomedan community would unless unforeseen developments take place, bear very considerable strain.

(प्रश्न १४ वा – सार्वत्रिक उठाव निर्माण झाला असता मध्यप्रांतातील कोणत्या महत्त्वाच्या केंद्रातून तुम्हांला धोक्याचा संभव वाटतो?

उत्तर – मध्यप्रांतातील मराठी जिल्हे आणि वऱ्हाड या भागांत जहाल पक्षाच्या हालचाली फार जोरात चालू आहेत. वऱ्हाडात लष्करी ठाणें कोठेच नाही. अशा स्थितीत देशाच्या इतर भागात जर दंगल उफाळली तर तिच्या जोडीने किंवा तिला सहानुभूत अशा दंगली जिल्ह्यांच्या प्रमुख ठिकाणी शहरांतून निर्माण होणें शक्य आहे. तथापि वऱ्हाडमधील एकंदर परिस्थितीचा अनुभव लक्षात घेता, चीफ कमिशनरचें मत असें आहे की, ग्रामीण भागातील लोक सहसा अशा चळवळीत एकदम सामील होणार नाहीत. ज्या ठिकाणी अधिकारी लोकांशी प्रेमाने वागतात अशा ठिकाणी मुलकी अधिकाऱ्यांचें लोकांवर वजन असतें आणि वऱ्हाडातील ग्रामीण भागातील अधिकारी वर्ग हे सामान्यत: चांगले लोक असून सरकारविरुद्धच्या चळवळीत ते स्वत:ला गुंतवून घेण्याचा धोका पतकरणार नाहीत.

नागपूर विभागातही सामान्यत: असेंच घडेल. फक्त शहरांतून उठावाला अनुकूल वातावरण आढळतें. तथापि लोकसमाजापैकी फार मोठा भाग सरकारच्याच पाठीशी उभा राहण्याचा फार संभव आहे.

मध्यप्रांताच्या उत्तर व पूर्व भागातील लोक उठावाला प्रवृत्त झाले तरी तें फार संथपणानेच चालेल. अशा प्रकारच्या उठावाला सुरवातीला किती तडाखेबंद प्रतिकार होतो यावर त्याचें यशापयश अवलंबून राहील. चीफ कमिशनरचें स्वत:चें असें मत आहे की, प्रांताच्या दक्षिण आणि पश्चिम भागात मात्र उठाव होण्याची पुष्कळ शक्यता आहे; परंतु इतरत्र बराच काळपर्यंत चांगला सुरक्षितपणा टिकून राहील; आणि तोपर्यंत एकंदर परिस्थितीत सुधारणा घडून येणें शक्य आहे.

प्रश्न १६ वा – मध्यप्रांतात राजकीय किंवा तत्सम स्वरूपाच्या उद्देशाने कार्य करणाऱ्या महत्त्वाच्या संघटना कोणत्या ?

उत्तर – आर्यसमाज आणि मुस्लिम लीग या दोघांच्याही मध्य-प्रांतात शाखा आहेत. परंतु त्यांच्यापैकी कोणतीच विशेष प्रभावी किंवा सामर्थ्यसंपन्न नाही. चीफ कमिशनरच्या मताप्रमाणे आर्यसमाजाची चळवळ मुख्यतः धार्मिक स्वरूपाची आहे. मुस्लिम लीग ही केवळ राज-कीय संघटना आहे. पण या प्रांतात मुसलमान संख्येने फार अल्प आहेत आणि मुस्लिम लीगच्या प्रांतिक शाखांना विशेष स्थानिक महत्त्व नाही.

या प्रांतातील प्रत्येक भागात गोरक्षण संस्था आहेत पण व्यापक संघटनेच्या शाखांच्या स्वरूपात त्या नसून स्थानिक स्वरूपाच्याच आहेत.

काही दिवसांपूर्वी एक भयंकर स्वरूपाची राजकीय संस्था येथे होती व नागपूर येथे तिचें केंद्र होतें. त्या संस्थेचें नांव राष्ट्रीय मंडळ. पण मि. क्लीव्हलंड (आता सर चार्लस) यांनी १९०९-मध्ये ती मोडून काढली. आता तिचे काही अवशेष राहिले असले तरी ते स्वस्थ आहेत. ते पुन्हा हालचाल करू लागले तरी त्यांचें स्वरूप धार्मिक व शिवाजी उत्सवाच्या चळवळीचें राहील.

प्रश्न १९ वा – मध्यप्रांतातील राजकीय चळवळ्यांचा इतर ठिकाणच्या चळवळ्यांशी संबंध आहे काय ?

उत्तर – मध्यप्रांतातील राजकीय चळवळ्यांचा संबंध एका बाजूने बंगालमधील चळवळ्यांशी व दुसऱ्या बाजूने पुणें व नाशिक येथील चळवळ्यांशी आहे यात शंकाच नाही. अमरावती येथील खापर्डे हे टिळकांचे अनुयायी समजले जातात. नागपूर येथील चळवळ्या लोकांचा खापर्डे यांच्याशी व त्यांच्या वऱ्हाडातील मित्रांशी फार निकटचा संबंध आहे. तसेंच त्यांचा बंगालमधील राजद्रोही पुढाऱ्यांशीही १९०६ ते १९०९ पर्यंतच्या काळात जवळचा संबंध होता. बंगालमधील या चळवळ्यांचा सागर भागातील महाराष्ट्रीय ब्राह्मणांशीही संबंध होता हें सिद्ध झालें आहे. तसेंच बंगालमधील ब्रह्मचारींची एक शाखा काही काळ जबलपूर

येथे स्थापन झालेली होती, आणि तेथे काही बंगाली जाऊन राहिले होते. वऱ्हाडातील राजद्रोही ब्राह्मणांशी नाशिक येथील कटवाल्यांचा संबंध होताच.

प्रश्न २० वा – लजपतराय यांची १९०७-मधील हद्दपारी व त्यानंतर टिळकांना झालेली शिक्षा यांचा मध्यप्रांतातील ब्राह्मणेतरांच्या राजकीय चळवळीवर काही परिणाम झालेला आढळतो काय ?

उत्तर – लजपतराय यांच्या हद्दपारीचा स्थानिक चळवळीवर फारसा परिणाम झाल्याचें दिसून आलें नाही. तथापि अर्धवट लोकांना परत त्या गोटात आणून सोडण्याच्या कामी काही परिणाम झाला असावा असें मानण्यास जागा आहे. याच्या उलट, टिळकांवरील खटला व त्यांना झालेली शिक्षा यांचा स्थानिक जहालपक्षीय मंडळींवर फार तीव्र स्वरूपाचा परिणाम दिसून आला आहे. टिळकांना झालेल्या शिक्षेचा तत्काळ परिणाम म्हणजे नागपुरात झालेली दंगल होय. ती लौकरच थांबली; तथापि राणी व्हिक्टोरियाचा पुतळा विद्रूप करण्याचा झालेला प्रयत्न हा तिचेंच पर्यवसान होय. या प्रकरणाच्या चौकशीतून ज्या घटना पुढे घडल्या त्यांत क्लीव्हलंड (आता सर चार्लस) यांनी या स्थानिक संघटनेचीं पाळेंमुळें खणून काढलीं.

प्रश्न २१ वा – मध्यप्रांतात गणेशोत्सव व गोहत्याप्रतिबंधक चळवळ आणि शिवाजी संप्रदाय यांचा कितपत प्रभाव आहे ?

उत्तर – या प्रांतात गोहत्या प्रतिबंधक चळवळीला फारसें वजन नाही. प्रांतात ३५ गोरक्षण संस्था आहेत; पण त्या सर्व लहान आहेत. त्यांनी ती चळवळ जिवंत ठेवली आहे इतकेंच. जेव्हा राजद्रोहाला गुप्ततेचें स्वरूप होतें तेव्हा ह्या चळवळीला महत्त्व होतें. पण राजद्रोहाच्या चळवळीचें स्वरूप बाहेर पडल्याबरोबर गोहत्याप्रतिबंधाच्या चळवळीत फारसा जीव राहिला नाही. उलट, अधिक विकृत स्वरूपाच्या मार्गांनी राजद्रोहाची भावना व्यक्त होऊ लागली. अलीकडे सोराबजी जसावाला यांनी बराच पैसा गोळा केला असून ते विलायतेस जाऊन तेथे एक संस्था स्थापन करण्याच्या विचारात आहेत. ही चळवळ अशी आहे की तिला बहुतेक सर्व हिंदु लोक पक्षनिरपेक्ष दृष्टीने साहाय्य करतील.

गणेशोत्सवाची चळवळ मात्र प्रभावी आहे व तिचा उपयोग राजकारणासाठीच केला जातो. गेल्या वर्षी अमरावती, नागपूर, यवतमाळ, होशंगाबाद येथे आणि बिना व भोपाळ येथील रेल्वे हद्दीतही गणेशोत्सव साजरे झाले.

या वेळी विशेष घडलेली गोष्ट म्हणजे नागपूर येथील डी. एस. पी. ने गणपतीच्या मूर्तीशेजारी टिळक आणि शिवाजी यांचीं चित्रें लावण्यास हरकत घेतल्यामुळे गणपतिपूजनाच्या कामात वाद निर्माण झाला.

शिवाजी उत्सव हीही एक राजकीयच चळवळ आहे. नागपूर, यवतमाळ, आणि अमरावती येथे यंदा हे उत्सव साजरे झाले. मध्यप्रांतातील काही चळवळ्या लोकांचीं पुण्यासही भाषणें झालीं, व तेथील स्थानिक वक्त्यांपेक्षा यांचीं भाषणें अधिक उपद्रवी होतीं.

प्रश्न २४ वा – राष्ट्रीय सभेचें मध्यप्रांतातील राजकीय महत्त्व व तिचें धोरण या संबंधाने तुम्हांस काय वाटतें? काँग्रेसने संपूर्ण स्थानिक स्वराज्याची मागणी केली आहे ती मनापासूनची आहे की वरवरची ?

उत्तर – चीफ कमिशनरच्या मताप्रमाणे मध्यप्रांतातील राष्ट्रीय सभेच्या वजनाला विशेष महत्त्व देण्यासारखें काही नाही. सुशिक्षित वर्गात व शहरांतून तिला अनुयायी आहेत; व काँग्रेसचीं धोरणें ते जशींच्या तशीं आपलीं म्हणून स्वीकारतात. पण जहाल पक्ष अवतीर्ण झाल्यापासून व त्यांच्यातील स्थानिक प्रतिनिधींच्या अतिशय जहाल व भयंकर प्रचारामुळे नेमस्त पक्षाच्या राजकारणी लोकांमध्ये एक प्रकारची उदासीनता निर्माण झाली आहे. सरकारला अडचणीत टाकण्यासारखें ते काही फारसें बोलत नाहीत. काँग्रेसच्या स्थानिक नेत्यांतही फारशी हालचाल दिसत नसून औदासीन्यच आढळतें. स्थानिक स्वराज्याच्या मागणीच्या ओढीने त्यांच्या मनाची किती पकड घेतली आहे याची चीफ कमिशनरला अद्याप स्पष्ट कल्पना आलेली नाही.

प्रश्न २५ – मवाळ आणि जहाल या पक्षांत डोळ्यात भरण्यासारखी फाटाफूट झालेली आढळते काय ? तरुण वर्गावर जहाल पक्षाच्या विचारसरणीचा कितपत घातक परिणाम दिसून येतो ?

उत्तर – या प्रांतात जहाल व मवाळ यांच्यात आता पूर्ण फाटाफूट झालेली आहे. गेल्या काँग्रेसच्या वेळी एक विशेष समिति नेमण्यात आली होती, व दोन्ही पक्षांना समान अशा कार्यक्रमाची आखणी करण्याचें काम तिच्याकडे दिलेलें होतें. पण या प्रांतापुरता विचार करता त्यातून काही निष्पन्न झालें नाही. चीफ कमिशनरच्या मताप्रमाणे सामान्यतः सर्वत्रच असें आढळतें की, क्रांतिकारकांचा पक्ष सोडता बाकीच्यांना परत काँग्रेस गोटात सामील होण्याची इच्छा आहे व जर राजकारणाला पुन्हा गति प्राप्त झाली तर मध्यप्रांतातही असेंच घडून येईल.

जहालांच्या कार्यक्रमाचा एक महत्त्वाचा भाग म्हणजे तरुण पिढीला सरकारविरुद्ध चिथावणें हा आहे. १९०७ वर्षी हिस्लॉप कॉलेजात विद्यार्थ्यांनी केलेली दंगल हें त्याचेंच निदर्शन होय. १९०८ वर्षी मॉरिस कॉलेजचे प्राचार्य मि. जोन्स यांना दगड मारणें, राणीचा पुतळा विद्रूप करण्याच्या कट व त्याचा एक भाग म्हणजे शेतकी कॉलेजच्या आवारात राजद्रोही कृत्यांचा पुरावा सांपडणें हा सर्व त्याचाच भाग होय. जहाल पक्षाच्या सभांतून विद्यार्थ्यांनी भाग घेतल्याच्या हकीकतींनी गुप्त पोलिस खात्याचे वृत्तान्त भरलेले आहेत.

आता मात्र हें सर्व थंडावलें आहे.

प्रश्न २६ वा – प्रेस ॲक्टचा कितपत चांगला परिणाम झाला ? अजून त्याचा वापर वारंवार करावा लागतो काय ?

उत्तर – प्रेस ॲक्टचा अतिशय हितकारक उपयोग घडून आला, याबद्दल दुमत होणें शक्य नाही. हा कायदा होण्यापूर्वीच्या व नंतरच्या वृत्तपत्रीय लेखनावर दृष्टि टाकली असता हें चटकन लक्षात येतें. या कायद्याचा आता वापर करण्याची फारशी आवश्यकता राहिली नाही. हा कायदा आहे याची जाणीवच पुरेशी प्रतिबंधक आहे. गेल्या वर्षी 'बातमीदार' नांवाच्या यवतमाळ येथील एका वृत्तपत्राला ताकीद द्यावी लागल्याचें एकच उदाहरण घडलें. त्याने 'दरबार' चा उल्लेख 'दरवडा' असा केला होता. आता तें पत्र बंद पडलें आहे. पुण्याच्या 'केसरी' पत्रांकडून पांच हजारांची जामिनकी घेण्यात आली त्याचाही या प्रांतावर परिणाम घडून आला. कारण येथील कोणत्याही स्थानिक पत्रापेक्षा या भागात केसरीचा वाचकवर्ग अधिक मोठा आहे.

प्र० २६ वा–मध्यप्रांतात कोणी साधु किंवा सतत फिरते असणारे लोक आहेत काय ? व त्यांचा समाजावर काही घातक परिणाम घडत असल्याचें मानण्यास जागा आहे काय ?

उ० – इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस यांचें या संबंधातील म्हणणें पुढीलप्रमाणे आहे :

राजकीय साधु ओळखणें ही एक कठीण गोष्ट असून त्यांच्या संबंधाने फारशी माहिती उपलब्ध नाही. अरविंद घोष यांना भवानी मंदिर स्थापन करण्याची इच्छा होती व तेथे राजकीय साधूंना शिक्षण देण्याचा त्यांचा विचार होता. अरविंद घोषांच्या कार्यक्रमात शैक्षणिक भाग व चळवळीचा भाग वेगवेगळे ठेवण्याची योजना होती. व्ही. बी. लेले हें अशा राजकीय साधूचें उदाहरण दाखविता येईल. अरविंद घोष व लेले यांचे या संबंधातील विचार सदृश होते यात शंका नाही. या

चळवळीचा मध्यप्रांतावर कितपत परिणाम घडून आला आहे याचा बरोबर अंदाज करता आलेला नाही. साधु विष्णु परांजपे हेही याच विचाराने प्रवृत्त झालेले आढळतात. (त्यांचाही व्ही. बी. लेले यांच्याशी संबंध होताच.) पण स्त्रियांच्या संबंधात त्यांची नाचक्की झाल्या-कारणाने त्यांला महत्त्व उरलें नाही.

याशिवाय नाटकांच्या रूपाने राष्ट्रीय विचारांचा प्रसार हा एक महत्त्वाचा भाग आहे. पाटणकर यांची नाटक मंडळी ही याचें मोठें उदाहरण होय. राजद्रोहाचा फैलाव करण्याचें काम कीर्तनकारही मोठ्या प्रमाणावर करतात. हे कीर्तनकार देशभक्तीचीं आणि धार्मिक गाणीं व पदें म्हणतात व सर्वत्र त्यांचा जहाल पक्षीय मंडळींशी संबंध आढळून येतो.

प्र० २९ वा – मध्यप्रांतातील मुसलमानांची सध्याची मनोवृत्ति कोणत्या प्रकारची आहे? तरुण मुसलमानांचा पक्ष चळवळीत भाग घेतो काय? तरुण मुसलमानांचा वर्ग आणि हिंदु चळवळे हे राजकीय उद्दिष्टांसाठी एकत्रित येण्याची कितपत शक्यता आहे?

उ० – मुसलमानांच्या संबंधात असें सांगता येईल की, ते केवळ उदासीन आहेत. एकंदर मुसलमान समाज या दृष्टीने विचार करता ते राजनिष्ठ आहेत. व्यक्तिशः त्यांचा विचार करता आपल्या समाजाचें हित घडवून आणण्यापुरते ते दक्ष असतात. पण आतापर्यंत त्यांनी भरीव असें काही फारसें केलेलें नाही. प्रांतभर मान्यता असलेले असे त्यांच्यातसें कोणी नेते नाहीत. बुलढाणा जिल्ह्यातील देवघाट येथील नबाब महंमद सलामुल्लाखान, सी. आय. ई, यांच्यासारखे काही थोडे पुढारी त्यांच्यात आहेत व त्यांचे आपल्या भागाबाहेरही थोडें फार वजन आहे. परंतु सामान्यतः त्यांना स्थानिक स्वरूपापेक्षा अधिक महत्त्व नाही.

तरुण मुसलमानांची या प्रांतात हालचाल नाही. येथे मुस्लिम लीगची एक शाखा आहे व तिच्या १३ उपशाखा आहेत. जर तरुण मुसलमानांनी लीगचें नेतृत्व आपल्या हाती घेतलें तर तिचा प्रभाव वाढेल यात शंका नाही. पण आरंभी तरी स्थानिक मुसलमान हालचाल करण्याचा संभव फारसा नाही.

सध्या तरी मुसलमान समाज हिंदूंच्यापासून अलग आहे. राज-कारणात त्यांचें हेंच धोरण पुढेही राहील कीं नाही हें मुस्लिम लीगच्या पुढील धोरणावर अवलंबून राहील. त्यांच्यात असें ऐक्य घडून आलें तर त्या घटनेची दखल घ्यावी लागेल. बहुधा या प्रांतात ती स्थिति आलीच

तर मंद गतीने येईल. वरूनच त्या दिशेने काही विशेष दडपण आलें तरची गोष्ट वेगळी.

प्र० ३० वा – मध्यप्रांतातील मुसलमानांत 'सर्व मुसलमान तेवढे एक' या विचारसरणीचा प्रसार कितपत आढळतो?

उ० – याचा एक भाग म्हणजे मुस्लिम लीगच्या शाखांची स्थापना हा होय. पण त्याचा प्रभाव असा नाही.

तुर्क-इटालियन लढाया, मोरोक्को आणि इराण येथील घटना, यांकडे या प्रांतातील मुसलमानांचें लक्ष आहे. तुर्कांच्या यशाकरता मशिदींतून प्रार्थना करण्यात आल्या आणि त्रिपोलीत जखमी झालेल्यांच्या करिता काही फंड गोळा करण्यात आला अशा बातम्या आहेत. पण त्यांना विशेष महत्त्व देण्यासारखें नाही.

प्र० ३१ वा – असें सांगण्यात येतें की, हिंदुस्थानातील मुसलमानांमध्ये मुसलमान म्हणून विशेष हितसंबंध नसून ते एकजीव समाज या स्वरूपातही नाहीत. मध्यप्रांतातील मुसलमानांच्या संबंधात या दृष्टीने तुमचें काय मत आहे? अफगाणिस्थान किंवा सीमेवरील मुसलमानी टोळ्या किंवा बाहेरील एखादी मुसलमानी सत्ता यांच्याशी लढाईचा प्रसंग निर्माण झाला तर त्याचा येथील मुसलमानांवर काय परिणाम घडून येईल?

उ० – मध्यप्रांतातील मुसलमान हे समाज या नात्याने एकसंध समाज आहेत असें समजण्यास हरकत नाही. परंतु वांशिक दृष्टिकोनातून त्यांनी राजकारणाचा फारसा विचार केलेला आढळत नाही; आणि मुस्लिम लीगला आपला प्रभाव त्यांच्यावर पाडण्यास अद्याप वेळ मिळालेला नाही. ती आपला प्रभाव कितपत पाडील यावर स्थानिक मुसलमान अफगाणांविरुद्ध युद्धासारख्या प्रश्नात कितपत लक्ष घालतील तें अवलंबून राहील. लीगच्या वतीने असें दडपण न आलें तर स्थानिक मुसलमान अशा प्रश्नात फारसें लक्ष घालणार नाहीत. काही अनपेक्षित अशा घटना न घडल्या तर स्थानिक मुसलमानांची राजनिष्ठा अशा बाह्य दडपणांनी विचलित होणार नाही.

असो. सन १९१२-पासूनच लोकस्थितीच्या परिज्ञानासंबंधात जागरूक असणाऱ्या सरकारने प्रत्यक्ष महायुद्ध प्रारंभ होताच अधिक सावध असणें स्वाभाविकच होतें. युद्ध सुरू होताच सामान्यतः सर्व जित राष्ट्रांत जसें होतें तसेंच भारतातही झालें. हिंदुस्थानची संमति न घेताच इंग्लंडचें साहाय्यक राष्ट्र म्हणून त्याला उभें रहावें लागलें. जहाल पक्षातील लोकांवरील सरकारी वक्रदृष्टि पूर्ण निवळली नव्हती. टिळक

नुकतेच मंडालेहून सुटले होते. हिंदुस्थानात राहणें योग्य नाही असें पाहून अरविंद घोष पांदेचरीच्या वातावरणात आत्मचिंतनात निमग्न होते. लजपतराय सीमापार होऊन अमेरिकेत होते व बिपिनचंद्र पाल तुरुंगात होते. तरीही भारताने केवळ क्रांतिकारक पक्षाचा अपवाद सोडून सरकारला पूर्ण पाठिंबा दिला. सन १९१४-च्या मद्रास काँग्रेस-मध्ये राजनिष्ठा व्यक्त करण्यात येऊन तशी संधि भारताला प्राप्त करून देण्यासाठी व्हाइसरॉय व हिंदुस्थान सरकारने जें पाऊल उचललें त्या-विषयी स्वतंत्र ठरावाने त्यांचें अभिनंदन करण्यात आलें.

पहिल्या महायुद्धाचा प्रारंभ जर्मन बादशहा कैसर यांनी सर्व्हिया-सारख्या छोट्या राष्ट्रावर स्वारी केल्यामुळे झाला असल्याकारणाने व या अन्यायाविरुद्ध आपण उभें ठाकलो आहोत अशी इंग्लंडची भूमिका असल्यामुळे ब्रिटिशांचा व त्यांच्या मित्रराष्ट्रांचा पक्ष न्यायी आहे अशी सर्वसामान्य धारणा होती. दक्षिण आफ्रिकेतून नुकतेच परतलेले गांधीजी यांनी याच भावनेने या वेळी सैन्यभरतीचा लोकांना उपदेश केला व टिळकांनीही हिंदुस्थान ब्रिटिशांच्या पाठीशी उभा असल्याचें घोषित केलें. सहस्रावधि भारतीय तरुण सैन्यात भरती झाले व रेडक्रॉस निधि आणि युद्धकर्ज रोख्यांत भारतीयांनी स्वयंस्फूर्तीने व मुक्तहस्ताने आपले पैसे गुंतविले.

मध्यप्रांत वऱ्हाडातील वातावरण याहून वेगळें असण्याचें कारण नव्हतें. मध्यप्रांतात तर उलट अधिकच उत्साह होता. कारण या प्रांताला स्वतंत्र कायदेमंडळाचे विशेषाधिकार नुकतेच प्राप्त झालेले होते. युद्ध-प्रारंभानंतर अवघ्या एका पंधरवड्यानेच दि. १७ ऑगस्ट १९१४-ला लेजिस्लेटिव्ह कौन्सिलची पहिली बैठक भरली. या कौन्सिलच्या स्वतंत्र इमारतीचा कोनशिलासमारंभ जरी एक वर्षापूर्वीच व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिज यांच्या हस्ते संपन्न झाला असला तरीही कौन्सिलचें कामकाज चालण्याइतकें इमारतीचें काम पूर्ण झालें नव्हतें. त्यामुळे या कौन्सिलची पहिली बैठक सेक्रेटरीयटमध्ये भरली. चीफ कमिशनर सर बेंजामिन रॉबर्टसन हे या बैठकीचे अध्यक्ष होते. जवळ जवळ शंभर प्रेक्षक या नव्या कौन्सिलच्या कामकाजाच्या वेळी उपस्थित होते. सर बेंजामिन रॉबर्टसन यांनी आपल्या भाषणात कौन्सिलचें महत्त्व व प्रांतातील परिस्थिति यांचा आढावा घेतल्यावर युद्धपरिस्थितीचें गांभीर्य व ब्रिटनची भूमिका समजावून सांगितली.

कौन्सिलच्या या बैठकीनंतर गव्हर्नमेन्ट हाऊसमध्ये युद्धप्रयत्नांना साह्य करण्याचें आवाहन करण्यासाठी प्रांतातील प्रमुख नागरिकांची लोक-

रच एक बठक बोलावण्यात आली. या बैठकीत प्रांतीय स्तरावर युद्ध-साह्यनिधीची उभारणी करण्यात आली. सर गंगाधरराव चिटनवीस हे या निधिसमितीचे अध्यक्ष होते व नागपूरचे कमिशनर हे त्याचे उपाध्यक्ष होते. मिस्टर सी. ई. लो हे कार्यवाह होते. हें लक्षात ठेवण्यासारखें आहे की, प्रांतातील मुसलमान समाज या वेळी तटस्थ व स्वस्थ होता. पुढे लवकरच तुर्कस्थान युद्धात पडल्यावर मुसलमान समाजाला जाग आली. खान बहादुर मलिक ह्यांच्या अध्यक्षतेखाली प्रांतातील मुसलमानांची प्रातिनिधिक बैठक बोलावण्यात आली. या बैठकीत राजनिष्ठेचा ठराव करून तो व्हाइसरायांच्याकडे पाठवून देण्यात आला. जरी या युद्धात कोणतीही अट न घालता टिळकप्रभृति नेत्यांनी सरकारला साह्य करावयाचें ठरविलें होतें तरी या साह्याचा मोबदला म्हणून विशेष राजकीय अधिकार हिंदुस्थानच्या पदरात पडतील अशी आशा त्यांना वाटत होतीच. अर्थातच हिंदुस्थानचे सर व्हॅलेन्टाईन चिरोल यांच्यासारखे जन्मजात शत्रु टिळकांच्याच विनाअट सहकार्याच्या भाषेचा विलायतेतील लोकांना असा अर्थ सांगू लागले होते की, ज्या अर्थी टिळकांसारखे जहाल लोकही ब्रिटिश राज्यपद्धतीचें गुणगान करीत आहेत त्या अर्थी प्रचलित राज्यपद्धति हिंदुस्थानच्या लोकांच्या आवडीची असून तिच्यात सुधारणा करण्याचें कोणतेंही प्रयोजन नाही !

असो. १९१४-च्या शेवटापर्यंत युद्धसाह्याच्या वेगवेगळ्या योजनांनीच वातावरण कुंद बनलें होतें. सन १९१४-च्या नोव्हेंबर महिन्यात राष्ट्रीय सभेसंबंधात काय धोरण ठरवावें व गेलीं पांचसहा वर्षे अडलेलें राष्ट्रीय पक्षाच्या राजकारणाचें गाडें पुढे कसें चालवावें यासंबंधात टिळकांच्या हालचाली सुरू झाल्या व परप्रांतांतील टिळकांचे अनुयायीही टिळकांना यासंबंधांत विचारणा करू लागले. मवाळांशी नमतें घेण्याला फारसे अनुकूल नसलेल्या डॉ. मुंजे यांनीही या वेळी लोकमान्यांना पत्र पाठविलें. राष्ट्रीय सभेबाहेर राहून व्यर्थ बळ खर्च न करता राष्ट्रीय सभेत हवें तें करून शिरावें व तीच ताब्यात घ्यावी असें टिळकांचें मत होतें. डिसेंबरमध्ये झालेल्या मद्रास काँग्रेसनंतर टिळकांनी केसरीतून या विषयाला तोंड फोडलें, आणि कोणालाही बहिष्कृत न करता राष्ट्रीय सभा सर्व राष्ट्राची प्रतिनिधि असावी म्हणून जहालांना राष्ट्रीय सभेत प्रवेश असला पाहिजे असें प्रतिपादन केलें. वस्तुत: राष्ट्रीय सभेचें तेज जें दिवसेंदिवस मंदावत चाललें होतें त्यामुळे बहुतेक नेमस्तांनाही राष्ट्रीय सभेचीं द्वारें जहालांसाठी उघडीं करावीं असें वाटू लागलें होतें. समेटाला खरा अडथळा इतर कोणाचाही नसून मुंबईचे सर फेरोजशहा मेथा व

नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांचाच होता. दि. ५ जानेवारीच्या केसरीत टिळकांनी लिहिलें आहे, "घोडे अडतें मुंबईस. त्याला कोणी लगाम घालणारा भेटल्याखेरीज तें असेंच उधळत, अडत, लाथा मारीत राहणार. मेथा व गोखले यांचें धोरण सर्वसामान्य नेमस्तांतही किती अप्रिय होत चाललें होतें याचें मोठें उदाहरण मद्रास काँग्रेसच्या वेळीच घडलें. मद्रासच्या राष्ट्रीय सभेत सव्वासहाशे प्रतिनिधि आले होते. त्यांपैकी बाहेरचे केवळ एकशे पंचवीसच प्रतिनिधि होते. व त्यांतलेही शंभर मुंबई व बंगालमध्ये विभागले होते. वस्तुतः मद्रासच्या सभेचे अध्यक्ष भूपेन्द्रबाबू समेटाला अनुकूल होते. मद्रास काँग्रेसच्या वेळीच हा समेट घडूनही आला असता, पण त्याची कुणकूण लागताच फेरोजशहा मेथांचे एक विश्वासू सहकारी दिनशा वाच्छा यांनी भूपेन्द्रनाथ बसू व सुरेन्द्रनाथ बानर्जी यांना अपमानास्पद तारा पाठविल्या व तुम्ही नेमस्त पक्षाचा विश्वासघात करीत आहात असें सांगितलें. सर फेरोजशहा मेथा यांनीही भूपेंद्रबाबूंना याच अर्थाचें पत्र पाठविलें. शेवटी मवाळाग्रणींना या मुंबईच्या हटवादी नेत्यांसमोर शरणागति पत्करून खोट्याचा आश्रय करावा लागला. युद्धात टिळक सरकारवर बहिष्कार घालणार असून आयरिश लोकांच्या अडवणुकीच्या मार्गाचा ते स्वीकार करणार आहेत असें सांगून त्यांना राष्ट्रीय सभेत घेणें धोक्याचें आहे असें भूपेंद्रबाबूंनी विषयनियामक समितीत प्रतिपादन केलें. त्यांच्या दुर्दैवाने या राष्ट्रीय सभेला बेझंट बाई उपस्थित होत्या. त्यांनी टिळकांनाच तार पाठविली. टिळकांनी त्यांना ही गोष्ट खोटी असल्याचें कळविलें. पण टिळकांची तार येण्याच्या आधीच मवाळ पुढारी समेट मोडून मोकळे झाले. शेवटी भूपेन्द्रबाबूंना टिळकांची जाहीर माफी मागावी लागली. बेझंट बाईंनी राष्ट्रीय सभा ही राष्ट्राची प्रातिनिधिक नसून ती केवळ एका पक्षाची मजलीस आहे असे प्रकटपणे उद्गार काढले व १२ जानेवारी १९१५-च्या अंकात अमृतबझार पत्रिकेने असें लिहिलें की, "टिळक राष्ट्रीय सभा ताब्यात घेतील अशा भयाने मवाळांनी हा समेट हेतुतः मोडला." फेब्रुवारीच्या पूर्वार्धापर्यंत समेटासंबंधात एकमेकावर आरोप प्रत्यारोप चालू होते. त्यांतीलच एक महत्त्वाचें अंग म्हणून नामदार गोपाळराव गोखले व लोकमान्य टिळक यांचें वाग्युद्ध सुरू झालें. येनकेन प्रकारेण मिजासखोर फेरोझशहा मेथांच्या कच्छपी लागून व वाममार्गाचा अवलंब करून गोखले समेटास खो घालीत आहेत असें पाहून टिळकांनी या प्रकरणाचा विस्तृत परामर्श घेणारा एक लेख दि. ९ फेब्रुवारी १९१५-च्या केसरीत लिहिला. या लेखाच्या शेवटी उद्वेगाने टिळकांनी लिहिलें होतें, "सरतेशेवटी

आमचें एवढेंच सांगणें आहे की, हा वाद यापुढे अशा तऱ्हेने चालविण्यात काही अर्थ नाही. राष्ट्रीय पक्षातील लोकांस मवाळांच्या काँग्रेसात घ्या अगर घेऊ नका, पण त्यासाठी गुप्त लेखांचे किंवा कृत्यांचे उपाय योजू नका किंवा राष्ट्रीय पक्षातील लोक जें उघडउघड बोलतात त्याचा विपर्यास करून सरकारचा गैरसमज करू नका. गोखले काय किंवा टिळक काय दोघांच्याही गोवऱ्या आता बहुतेक ओंकारेश्वरावर गेल्या आहेत असें म्हणावयास हरकत नाही. टिळक काँग्रेसमध्ये आले तर ती कबजात घेतील या म्हणण्यात काही हशील नाही. काँग्रेस राष्ट्रीय आहे. टिळकांची नव्हे किंवा गोखल्यांचीही नव्हे. काँग्रेसचें धोरण काय असावें हें काँग्रेसनेच ठरवावयाचें आहे, अमुक एका व्यक्तीने नाही. म्हणून काँग्रेसमधल्या प्रत्येक मनुष्यास आपलीं मतें काँग्रेसपुढे ठेवण्याचा व त्यांचा बहुमताने निर्णय करून घेण्याचा हक्क आहे आणि हीं मतें जोपर्यंत कायदेशीर आणि सनदशीर असतील तोपर्यंत तीं कोणीही सभेपुढे आणल्यास आणि सभेने वादविवादाअंती तीं ग्राह्यच आहेत असें ठरविल्यास 'हा मनुष्य भयंकर आहे' 'हा काँग्रेस काबीज करील' असें म्हणणें किंवा भीति बाळगणें म्हणजे हिंदुस्थानातील हजारो शहाण्या लोकांस मूर्ख ठरवून आपल्याच नेमस्तपणाचा व शहाणपणाचा टेंभा मिरवण्यासारखें आहे. ज्यांना हा मार्ग स्वीकारावयाचा असेल त्यांनी तो खुशाल स्वीकारावा. परंतु एवढें पक्कें लक्षात ठेवावें की, काँग्रेसचें याने पोषण न होता घात मात्र होईल. राष्ट्रीय पक्षास ही गोष्ट करावयाची नाही म्हणूनच त्याने खुलासेवार व मोकळेपणाने आपलीं काय मतें आहेत तीं जाहीर करून काँग्रेसमध्ये गेल्यानंतर रीतसर, कायदेशीर आणि बहुमताचा निर्बंध पाळून आपला उद्योग चालू ठेवण्याचा उद्देश मवाळांस कळविला आहे. मुंबईच्या लोकांस राष्ट्रीय पक्ष नको असला तरी सध्या राष्ट्रीय सभेत असलेल्या सर्व हिंदुस्थानातील लोकांस तो नकोसा झालेला नाही म्हणून मुंबईच्या मवाळ पुढाऱ्यांनी या बाबतीत आग्रह धरू नये, निदान राष्ट्रीय पक्ष सरकारवर बहिष्कार टाकणारा आहे इत्यादि खोटेनाटे आरोप आणि तेही गुप्तपणाने त्यांनी करू नयेत हें चांगलें. तुम्हांला पळवत नसलें तर पळू नका, पण लोकांचे पाय कां ओढता! राष्ट्रीय पक्षाचे हेतु मवाळ पक्षाच्या हेतूंइतकेच सद्बुद्धीचे आणि देशहिताचे आहेत हें त्यांस कळू नये इतके काही ते मूर्ख नाहीत. पण भित्रेपणाने म्हणा, अभिमानाने म्हणा, मत्सराने म्हणा किंवा स्वतःच्या हातातच काँग्रेसचा एकमुखी रुद्राक्ष राहावा अशा बुद्धीने म्हणा, किंवा अखेर या राजकीय बाबतीत एकमेकांत दुही झाल्यामुळे सरकारास कसें फावतें हें नीट लक्षात न आल्या-

मुळे म्हणा, राष्ट्रीय पक्षास हाणून पाडण्याचे आमच्या इलाख्यातील मवाळांचे उद्योग चालू असतात. हे उद्योग ज्या दिवशी संपतील तो सुदिन म्हणावयाचा ! ”

टिळकांच्या या लेखानंतर अवघ्या दहाच दिवसांनी ना. गोपाळराव गोखले यांचा मृत्यु झाला. टिळकांच्या लेखातील विषारी शब्द हृदयाला लागून गोखले यांचा मृत्यु ओढवला असें काहूर माजविण्यासही टिळकांच्या टीकाकारांनी कमी केलें नाही, पण तें टिकण्यासारखें नव्हतें. कारण गोखले हे काळजाच्या विकाराने बरेच दिवस आजारी असून निद्रानाशामुळे वस्तुतः मृत्युशय्येवरच आहेत हें सर्वांनाच माहीत होतें.

असो. गोखले यांच्या अंत्ययात्रेला टिळक उपस्थित होते. त्यांनी भाषण करून गोखल्यांना श्रद्धांजलि वाहिली. गोखले यांच्या राजकारणाच्या मार्गाविषयी मतभेद असले तरी त्यांच्या देशभक्तीविषयी व कर्तृत्वाविषयी कोणाचाच मतभेद असणें शक्य नव्हतें. त्यांच्या मृत्यूने राष्ट्रकार्याची अपरिमित हानि झाली असें सर्वांनाच वाटलें.

गोखले यांच्या मृत्यूचा धक्का नागपूरलाही जाणवला. राष्ट्रीयपक्षाचें मराठी मध्यप्रांतातील मुखपत्र असलेल्या महाराष्ट्राने गोखल्यांच्या कर्तृत्वाचें समालोचन करणारा एक अग्रलेख लिहिला. सर गंगाधरराव चिटनवीस यांच्या अध्यक्षतेखाली नागरिकांची सभा होऊन गोखले यांना श्रद्धांजलि समर्पण करण्यात आली. गोखले यांच्या स्मारकासंबंधी एक योजनाही तयार करण्यात आली.

दि. १५ नोव्हेंबर १९१४ ते १५ एप्रिल १९१५ हा कालखंड नागपूरला अतिशय दुर्दैवाचा गेला. या पांच महिन्यात प्लेगने शहरावर अवकळा आणून त्याचें जवळजवळ स्मशान बनविलें होतें. सरकारी आकड्यानुसार या दिवसांत एकंदर ४६१५ लोक प्लेगने लागले तर त्यांपैकी ४४८२ मृत्युमुखी पडले. हे केवळ शहरविभागातील आकडे होत. या दिवसांत रस्त्यावर पडलेल्या अनाथ प्रेतांचा मोठा प्रश्न निर्माण झाला होता. डॉ. मुंजे यांनी डॉ. ल. वा. परांजपे, डॉ. मो. रा. चोळकर व धुंडिराजपंत ठेंगडी या आपल्या मित्रांचें एक मंडळ स्थापून निधि जमविला. अनाथ प्रेतदाह संस्कारनिधि असेंच या निधीचें नांव होतें. या निधीच्या द्वारे अनाथ प्रेतदाहाची व्यवस्था करण्यात आली.

टिळकांच्या मुक्ततेपासून नागपूर शहरात विलक्षण चैतन्य निर्माण झालें असून राष्ट्रीय मंडळाच्या कार्याला वेग चढला होता. टिळकांनी गीतारहस्य याच कालखंडात प्रकाशित केलें होतें. गीतारहस्यातील मध्यवर्ती कल्पना टिळकांनी पूर्वी प्रथम नागपूरलाच मांडलेली असल्यामुळे

नागपूरच्या टिळकविषयक अभिमानात भरच पडली होती. नागपूरला प्रतिवर्षी टिळक जयंती साजरी करण्यात येत असे पण या वर्षी ती विशेषच उत्साहाने साजरी करण्यात आली. व्यंकटेश थिएटरमध्ये या जयंतीनिमित्त भरलेल्या सभेला तीन सहस्रांहून अधिक लोक उपस्थित होते. श्री. नारायणराव अळेकर वकील या सभेचे ( आषाढ वद्य षष्ठी रविवार दि. १ ऑगस्ट १९१५) अध्यक्ष होते. प्रारंभी ताम्हनकर यांचें काव्यगायन झाल्यावर भवानी शंकर नियोगी, माधवरावजी अणे, किसन फागू बंदसोडे, गोपाळराव ओगले व धुंडिराजपंत ठेंगडी या वक्त्यांची टिळकांच्या गुणगौरवपर भाषणें झालीं. माधवरावजी उपाख्य बापूजी अणे यांनी आपल्या भाषणात गीतारहस्याची जन्मभूमि नागपूर असल्याचा निर्देश केला होता. श्री. गोपाळराव ओगले यांनी आपल्या भाषणात, त्या वेळी युरोपमधून नुकतेच परतलेले भारताचे त्रिखंडकीर्ति संशोधक सर जगदीश चंद्र बोस यांचा गौरवपर निर्देश केला. या सभेत शेवटी केलेल्या भाषणात डॉ. मुंजे म्हणाले की, " राजकारण व धार्मिक कल्पना यांत टिळक महाराष्ट्राचे गुरु व पुढारी आहेत, यात आता शंकाच नाही. सामाजिक प्रश्नांवरही त्यांचींच मतें खरीं आहेत असें म्हणण्याची पाळी आपणांस लवकरच येईल अशी मला खात्री आहे. "

नामदार गोखले यांच्या मृत्यूनंतर राष्ट्रीय सभेत प्रवेश करण्यासंबंधीच्या वाटाघाटी काही काळ मंदावल्या. टिळकांनी या वेळी आपला पक्ष संघटित करण्याचें योजिलें. पक्षाचें बळ वाढविण्याने शेवटी नेमस्तांना राष्ट्रीय सभा टिकविण्यासाठी आपल्याला राष्ट्रीय सभेत प्रवेश देणें भाग पडेल असें त्यांचें अनुमान होतें. हें बळ वाढविण्याचें पहिलें पाऊल म्हणून त्यांनी प्रांतिक परिषदा घ्यावयाची योजना आखली. तदनुसार पुणें येथे बॅ. बॅप्टिस्टा यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र प्रांतिक परिषद भरविण्यात आली. या परिषदेच्या कार्यवाहांनी असें निवेदन प्रसिद्ध केलें होतें की या परिषदेत जे प्रतिनिधि भाग घेतील त्यांना काँग्रेसचें प्रतिज्ञापत्र मान्य आहे असें समजण्यात येईल. टिळक प्रतिज्ञापत्रकावर सही करण्यास तयार असून मवाळ पुढाऱ्यांचीच भूमिका हटवादीपणाची आहे हें या निवेदनाने सहजच सिद्ध झालें. स्वतः टिळकांनी परिषदेला येण्याचें लोकांना आवाहन करताना असें घोषित केलें की, " लोकमतानुसार प्रतिनिधि निवडणें ही पूर्वपरंपरा असून पुढेही ती चालावी इतकाच प्रयत्न आहे. व ही मागणी मान्य झाली असता आम्ही काँग्रेसची सर्व घटना मान्य करू व काँग्रेसमध्ये जाऊ. " पुण्याच्या या प्रांतिक परिषदेचे स्वागताध्यक्ष म्हणून महर्षि अण्णासाहेब पटवर्धन

यांना निवडण्यात आलें होतें. याच सुमारास प्रिव्ही कौन्सिलचा निर्णय लागून ताईमहाराज खटल्यात टिळक निष्कलंक ठरल्यामुळे सर्वत्र आनंदाचें वातावरण होतें. दि. ८ मेला किर्लोस्कर नाटकगृहात ही परिषद झाली. अध्यक्ष बॅप्टिस्टा यांनी टिळक बंधुमुक्त झाल्याबद्दल व ताईमहाराज खटल्यातून ते निर्दोष सुटल्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें. नंतर महायुद्धाचा आढावा घेऊन इंग्लंडमध्ये लोकमत अनुकूल करण्याचे प्रयत्न करावे व योजना तयार करून होमरूलची मागणी करावी असें त्यांनी प्रतिपादन केलें. जहाल व मवाळ यांच्या युतीसंबंधी बोलताना ते म्हणाले की, "मवाळ व जहाल हा भेद आपण विसरला पाहिजे. सर्वच आपापल्या परीने देशाभिमानी आहेत. मवाळ म्हटला की तो गवळ्याच्या दुधाप्रमाणे बेचव आणि जहाल म्हटला म्हणजे हातात कोलीत घेऊन नाचणारा अत्याचारी असतो ही समजूत टाकून द्यावी." या परिषदेत महायुद्धात दोस्त राष्ट्रांना यश चिंतणारा पहिला ठराव टिळकांनी मांडला. यानंतर गोखले यांच्या दुखवटयाचा ठरावही टिळकांनीच मांडला. या ठरावावर बोलताना टिळक म्हणाले की, "गोखले यांच्यासारख्या तरुण मनुष्याच्या मृत्यूसंबंधी दुखवटयाचा ठराव मांडण्याचें काम माझ्यासारख्या त्यांच्याहून वडील माणसाकडे यावें याचें वाईट वाटतें."

परिषदेचे स्वागत सभासद ४०० होते. ९६० प्रतिनिधि आले. व तिकीट काढून एक सहस्र प्रेक्षक आले. परिषदेचें फलित सांगताना कै. न. चिं. केळकर लिहितात, "१९०९ ते १९१४ सालापर्यंत भरलेल्या कोणत्याही नेमस्त काँग्रेसला इतका समाज जमला नसेल! परिषदेच्या या यशाचा परिणाम इतर प्रांतांतील राष्ट्रीय पक्षावर तर झालाच; पण नेमस्तांवरही झाला. कन्व्हेन्शन्च्या शिक्क्याशिवाय प्रांतिक परिषदेचें नाणें खरें ठरणार नाही या समजुतीने मुंबई प्रांतिक काँग्रेस कमेटीने आपली टाकसाळ बंद ठेविली तरी जनतेचें अडत नाही ही गोष्ट सिद्ध झाली. आणि राष्ट्रीय पक्षाला काँग्रेसमध्ये येण्याला घटनेत काहीतरी अधिक सोयी तुम्ही कराव्या हेंच आता अपरिहार्य होय अशीही गर्भित सूचना पुण्याच्या परिषदेच्या यशात होती. इतकेंच नव्हे तर समेटाचा पुढेही प्रयत्न व्हावा याकरिता परिषदेत टिळक, बॅप्टिस्टा व बेळवी यांची एक समितिही नेमण्यात आली. टिळकांनी केसरीत लिहिलें की, "प्रांतिकसभा राष्ट्रीय सभेहून भिन्न राहू इच्छिते असें आता कोणी अनुमान करील तर तें चुकीचें आहे."

—समग्र केळकर वाङ्मय, २ लोकमान्य खंड, पृ. ४७६–४७७

पुण्याला झालेल्या या राष्ट्रीय पक्षाच्या परिषदेला उत्तर म्हणून दि. १० जुलैला नेमस्तांनी आपली परिषद भरविली व हसें करून घेतलें. सतत दोनतीन महिने प्रचार करून व गव्हर्नरांना परिषदेत सपत्नीक उपस्थित करूनही परिषदेला लोक इतके थोडे आले की शेवटी स्वागत समितीच्या अध्यक्षांनी पुढील उद्गार काढले : "आमचा पक्ष अल्पसंख्येचा असला तरी महत्त्वाचा आहे." पुण्याला झालेल्या या दोन परिषदांनी एक गोष्ट स्पष्ट झाली, व ती म्हणजे दोन पक्षांतील समेटाची आशा मावळली. पण डॉ. मुंजे यांनी याच वर्षी नागपूरला जहाल व नेमस्त या पक्षांची संयुक्त प्रांतिक परिषद भरवून व प्रांतापुरते पक्षभेद मिटवून समेटाचें नवें पर्व प्रारंभ केलें. वस्तुत: मुंजे हे समेटाचे विरोधक म्हणून प्रसिद्ध होते. काळाचीं पावलें ओळखून त्यांनी निदान विदर्भ व मध्यप्रांतापुरता हा जो चमत्कार करून दाखविला त्यामुळे त्यांचा राजकीय मुत्सद्दीपणा तर दिसून आलाच; पण संयुक्त राष्ट्रसभा ही अशक्य कोटीतील गोष्ट नाही हें सिद्ध झालें. मुंजे यांच्या या महत्त्वपूर्ण राजकीय कामगिरीकडे पुढील प्रकरणात वळू.

✦ ✦ ✦

प्रकरण सोळावें

# नागपूरची चौथी प्रांतिक परिषद्

सन १९०७-मध्ये नेमस्त व जहाल यांचा प्रकट सभेत तंटा होऊन जे दोन तट पडले त्याचा डॉ. मुंजे यांना नेहमीच विषाद वाटत होता. मुंजे यांच्या स्वभावाचें हें नेहमीचेंच वैशिष्टय होतें की, ते तत्त्वाला जितके कठोर तितकेच खाजगी व्यवहारात उदार हृदयाचे, अंतःकरणाने निर्मत्सर, वाणीने कोणाला सहसा न दुखविणारे, अपशब्दांचा वाणीला स्पर्श नसलेले व कार्यासाठी वैयक्तिक प्रतिष्ठा बाजूला ठेवून हवी तितकी पड घेणारे होते. राजकीय मतप्रणालीसाठी आवश्यक कर्तव्य म्हणून त्यांनी नेमस्त पुढाऱ्यांचें नेतृत्व उधळून लावलें तरी सर गंगाधरराव चिटनवीस, वामनराव कोल्हटकर, बापूराव दादा किनखेडे, डॉ. सर हरिसिंग गौर या नागपूरच्या नेमस्ताग्रणींविषयी त्यांच्या अंतःकरणात आदर, प्रेम व जिव्हाळा होता. त्यांच्यापैकीच काहींच्या खांद्यावर बसून मुंजे यांनी सार्वजनिक जीवनात प्रवेश केला होता. त्यामुळे या भांडणानंतर मुंजे यांनी नेमस्ताग्रणींचे व आपले खाजगी व राजकारणाचें क्षेत्र सोडून अन्य सार्वजनिक क्षेत्रांतील संबंध कधीही बिघडू दिले नव्हते. शत्रूच्या घरीसुद्धा निर्भयपणे पण सौजन्य न सोडता जाणारे मुंजे या आपल्या जुन्या मित्रांना व त्यांतील वडीलधाऱ्या मंडळींना सदाचे शत्रु कसे समजतील? गांधर्व महाविद्यालयाची स्थापना, कीर्तन-संम्मेलन, प्लेगची विपत्ति, अनाथ प्रेतदाह संस्काराची व्यवस्था, ग्रंथालयाची स्थापना, अंत्यजोद्धार व्याख्यानमाला इत्यादि सन १९१० ते १४-च्या कालखंडात ज्या ज्या चळवळी डॉ. मुंजे यांनी केल्या व त्यांच्या प्रेरणेने झाल्या त्या प्रत्येक चळवळीत त्यांनी नागपूरचे ज्येष्ठ, श्रेष्ठ व घरंदाज नागरिक म्हणून सर गंगाधरराव चिटनवीस यांनाच पुढारीपणाचा सर्व मान कटाक्षाने दिला. डॉ. गौर हे आपल्या कायद्यातील विद्वत्तेने तळपणारे अग्रगण्य कायदेपंडित मताने मवाळ होते तरी मुंजे यांनी त्यांचे संबंध कायम ठेवले. या त्यांच्या विशेष धोरणामुळे पुणें, मुंबई इत्यादि ठिकाणी नेमस्त व राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांत व अनुयायांत खाजगी संबंधातही जो कडवटपणा होता तो नागपूर प्रांतात मुळातच उत्पन्न झाला नाही. सर गंगाधरराव यांची १९११ ते १३-च्या कालखंडातील मुंजे यांना आलेलीं अनेक पत्रें

त्यांच्या मनातील मुंजे यांच्या विषयीचा जिव्हाळा व्यक्त करणारींच आहेत. पुण्याच्या नेमस्त व राष्ट्रीय पक्षांच्या दोन स्वतंत्र परिषदा भरल्यावर अमरावतीचे नेमस्त पुढारी मुधोळकर यांनी विदर्भ व मध्य-प्रांताची प्रांतिक परिषद भरविण्याची उचल घेतली. मुंजे व मुधोळकर यांचे खाजगी संबंध चांगले असल्यामुळे मुंजे यांनी त्यांची गाठ घेऊन या परिषदेचें स्वरूप संयुक्त असावें हें त्यांच्या गळी उतरविलें. मुधोळ-करांनाही तें पटलें. त्यानंतर मवाळपक्षातील सर्वच पुढाऱ्यांच्या भेटी घेऊन व पत्रव्यवहाराने, थोडी पड घेऊनही उभय पक्षांचें ऐक्य साधण्यासाठी ते प्रयत्न करू लागले. स्वत: टिळकांनीच अंतर्गत स्वायत्तता हें ध्येय मान्य केलें असल्यामुळे मवाळाग्रणींच्या याच स्वरूपाच्या घोष-वाक्यांशी विरोधाचें कारणच नव्हतें. सप्टेंबर महिन्यात संयुक्त परि-षदेच्या दृष्टीने अनुकूल वातावरण दिसू लागताच मुंजे यांनी लो. टिळकांना पत्रद्वारा हें वृत्त कळविलें व संयुक्त परिषदेसाठी कोणत्या मर्यादेपर्यंत मिळतें घ्यावें याविषयी त्यांचें मार्गदर्शन विचारलें. या पत्राला लो. टिळकांनी, प्रकृति स्वास्थ्यासाठी यवत येथे असताना पुढील-प्रमाणे उत्तर पाठविलें.

Yawat, Dist : Poona.
28th Sept., 1915.

My dear Dr. Munje,

All your letters duly to hand. You are proceeding on the right lines. We do not object to the acceptance of the goal of self-government. In fact as I wrote sometime back, it is our goal and was borrowed by the moderates from us after the Calcutta Congress. What we want is election of delegates by our own bodies and if your Conference admits, without any further reservation, delegates elected at public meetings or by national associations we shall have gained our point. Our Poona Provincial Conference was convened on this principle. That is we accepted the goal of self-government but not the election-rules of the moderates' constitution. If you do not do that, your conference cannot be said to be held under the present conventionists' constitution, though attempts may be made to represent it as such. But I do not attach much importance to these attempts, when the fact of free election of delegates is without doubt. I am glad to see that Mudholkar has fallen in with your arrangement. Probably he could not help it.

Your next move now should be to have the election of delegates by a public meeting at Nagpur. Supplementary to this the Rashtriya Mandal may also elect its own delegates; and those there should be admitted to the conference without any reservation. The Amaraoti people should also do the same. All the nationalists should and must attend the conference so that you may have a sure majority therein. I am watching your proceedings, and shall write you again very shortly.

I am improving in health. Yavat-weather and अभ्रक has done me good and I mean to stay here till Dasra holidays at least. My letters etc. should however be sent to my Poona address.

Hoping this finds you in good health and spirits.

Yours Sincerely,
Bal Gangadhar Tilak

(तुमचीं सर्व पत्र मिळालीं. तुम्ही योग्य मार्गानें जात आहा. स्वराज्याचें ध्येय स्वीकारण्यास आमची काहीच हरकत नाही. किंबहुना मी मागे लिहिल्याप्रमाणें, तें आमचेंच उद्दिष्ट आहे. आणि कलकत्ता काँग्रेसनंतर नेमस्त पक्षीयांनी आमच्यापासूनच त्याची उसनवारी केलेली आहे. आमचें म्हणणें इतकेंच आहे की, प्रतिनिधींची निवड निवडणुकीने झाली पाहिजे, व ती लोकांच्या संघटनांनी केलेली पाहिजे. तुमच्या परिषदेने हातचें काही न राखता हें मान्य केलें, म्हणजे राष्ट्रीय संस्थांच्या वतीने किंवा सार्वजनिक सभा भरवून प्रतिनिधींची निवड करण्याचें मान्य झालें तर आम्ही एक मुद्दा जिंकला असें होईल. आमची पुण्याची प्रांतिक परिषदही याच तत्त्वानुसार भरविण्यात आली. म्हणजे आम्ही स्वराज्याचें ध्येय मान्य केलें व प्रतिनिधींची निवड वरील तत्त्वानुसार केली. तुमच्या परिषदेने जर निवडणुकीची ही पद्धति न स्वीकारली तर तिला प्रातिनिधिक स्वरूप प्राप्त होणार नाही. कन्व्हेशनवाल्यांनी जी घटना बनविली आहे तीत अशा प्रकारच्या निवडणुकीची पद्धति स्वीकारलेली नाही. पण जर प्रतिनिधींची स्वतंत्र रीतीने निवडणूक करण्यासंबंधाने एकमत झालें, तर इतर गोष्टींना मी विशेष महत्त्व देत नाही. मुधोळकर तुमच्या योजनेशी जुळते झाले हें पाहून मला आनंद वाटतो. कदाचित् त्यांना गत्यंतर उरलें नसेल!

तुम्ही आता नागपूर येथे जाहीर सभा भरवून प्रतिनिधींची निवड करण्याचें काम हाती घ्या. त्यांच्या जोडीला राष्ट्रीय मंडळानेही आपली

सभा भरवून आणखी प्रतिनिधींची निवड करावी, आणि या सर्वांना कोणताही आडपडदा न ठेवता परिषदेत भाग घेता यावा. अमरावती येथील लोकांनीही असेंच करावें. राष्ट्रीय पक्षाच्या सर्व लोकांनी परिषदेला उपस्थित राहिलें पाहिजे. म्हणजे तुम्हांला निर्विवाद बहुमत प्राप्त होईल. तुमच्या कडील हालचालींवर माझें लक्ष आहे. लौकरच मी तुम्हांस पुन्हा लिहीन.

माझी प्रकृति सुधारत आहे. यवतची हवा आणि अभ्रक भस्म यांचा माझ्या प्रकृतीला चांगला उपयोग होत आहे. दसऱ्यापर्यंत यवत येथेच राहण्याचा माझा विचार आहे. तथापि मला पाठवावयाचीं पत्रें माझ्या पुण्याच्याच पत्त्यावर पाठवावीं.

आपला

**बाळ गंगाधर टिळक**

लोकमान्य टिळकांचें हें पत्र आल्यावर मुंजे यांनी अमरावती व नागपूरच्या नेमस्तांचीं या दृष्टीने मनें वळविण्याचे प्रयत्न प्रारंभ केले. सन १९०७-नंतर मध्यप्रांत विदर्भाची एकही प्रांतिक परिषद भरलेली नव्हती. १९०५-पर्यंत प्रतिवर्षी प्रांतिक परिषदा भरत असत; पण त्या अर्थातच मवाळांच्या वर्चस्वाखाली होत्या. कारण डॉ. मुंजे यांच्या उदयापर्यंत राष्ट्रीय पक्षाचें राजकारण मध्यप्रांतात नव्हतेंच. सन १९०६-मध्ये जहाल व मवाळ यांचे परस्पर खटके उडू लागले तरी प्रांतिक परिषद भरली व जरी तिच्यावर प्रभुत्व मवाळांचें असलें तरी खापर्डे-मुंजे यांच्या सारख्या जहालांनी त्यात भाग घेतला होता. पण १९०६-ची रायपूरची प्रांतिक परिषद ही शेवटचीच प्रांतिक परिषद ठरली. मुंजे यांच्यामुळे प्रांतातील उभयपक्षांचे संबंध सलोख्याचे असल्यामुळे व दोन्ही पक्षांचे धुरीण दिलदार असल्यामुळे मुंजे यांना टिळकांनी सांगितलेला प्रतिनिधींच्या निवडीचा मुद्दा नेमस्तांच्या गळी उतरविता आला. प्रांतिक परिषद सदाची बंद राहणें प्रांतातील लोकजागृतीच्या दृष्टीने कोणालाच इष्ट वाटत नव्हतें. राष्ट्रीय पक्षाच्या साहाय्याशिवाय परिषद होऊ शकणार नाही हें मवाळही मनात जाणून होते. त्यामुळे अडचण निर्माण झाली नाही. दि. ३ ऑक्टोबर १९१५-ला नागपूरच्या नगर भवनात उभय पक्षांच्या वतीने नागपूरच्या नागरिकांची प्रचंड प्रकट सभा भरून तेथे परिषदेच्या पुनरुज्जीवनाचा ठराव संमत झाला. या सभेचा महाराष्ट्रात प्रसिद्ध झालेला वृत्तान्त एकोप्याची कल्पना येण्याच्या दृष्टीने उद्बोधक आहे. तो असा :

## स्वागत कमिटीची सभा

पूर्वी प्रसिद्ध केल्याप्रमाणे रविवार ता. ३ ऑक्टोबर रोजी संध्याकाळी ५ वाजता नागपूर येथे टाऊन हालात जंगी जाहीर सभा भरली होती. आयते वेळी मुसळधार पाऊस कोसळू लागला तरी लोकांची गर्दी झाली. आरंभी डॉ. गौर यांच्या सूचनेवरून रा. ब. वासुदेवराव पंडित यांनी अध्यक्षस्थान स्वीकारलें. डॉ. गौर म्हणाले की, आजच्या प्रसंगी सर बिपिनकृष्ण बोस हे अध्यक्ष होणार होते. परंतु प्रकृति नीट नसल्यामुळे ते येऊ शकले नाहीत.

अध्यक्ष रा.ब. पंडित म्हणाले, "आजची सभा अत्यंत महत्त्वाची आहे. कारण आज मध्यप्रांत व वऱ्हाड यांची प्रांतिक परिषद भरविण्याचा विचार ठरणार आहे. ही परिषद काही पहिली नव्हे. अशा तीन परिषदा पूर्वीच भरून गेल्या आहेत. चमत्कारिक परिस्थितीमुळे गेल्या आठ वर्षांत ती भरली नाही. परंतु ही आनंदाची गोष्ट आहे की, येथील सर्व पक्षांची मंडळी एकत्र येऊन बंधुप्रेमाने खांद्यास खांदा भिडवून चौथी परिषद भरविण्यास तयार झाले आहेत. ब्रिटिश साम्राज्यात वसाहतीसारखें स्वराज्य सनदशीर उपायांनी प्राप्त करून घेण्याचा नियम ज्यांना पसंत आहे अशा सर्व लोकांची ही परिषद आहे. शिवाय प्रांतिक हिताचे प्रश्नही या परिषदेपुढे येतील. नियमांत नमूद केलेल्या आमच्या महत्त्वाकांक्षांचा बराच मोठा भाग आज साध्य झाला. आपल्यापैकी उत्कृष्ट राजकीय सुधारकांचें समाधान होण्यासारख्या त्या महत्त्वाकांक्षा आहेत. आपण ब्रिटिश साम्राज्याचा भाग आहोत. आपणाला योग्य व सन्मान्य असा दर्जा मिळालाच पाहिजे."

यानंतर डॉ. हरिसिंग गौर यांनी पहिला ठराव सभेपुढे मांडला. तो येणेप्रमाणे :—"या सभेच्या चालकांनी ठरविलेल्या पद्धतीने मध्यप्रांतीय प्रांतिक परिषद पुन्हा सुरू करावी व तिची बैठक नागपुरास येत्या मोहरमच्या सुट्टीत भरविण्यात यावी असें नागपूरच्या रहिवाशांचें मत आहे."

हा ठराव पुढे मांडताना डॉ. गौर म्हणाले, "आज आठ वर्षें कॉन्फरन्स बंद ठेवावी लागली. ती पुन्हा जिवंत करण्यास पुष्कळच अडचणी होत्या. तीव्र पक्षभेद व मतभेद होते. परंतु दोन्ही पक्षांनी या अडचणी दूर करण्याचें मनावर घेतलें म्हणूनच परिषद भरविणें शक्य झालें आहे. याबद्दल सर्व प्रांतास आनंद होईल. राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांनी त्यांच्या देशाभिमानास साजेल अशा रीतीच्या मुत्सद्देगिरीने व शहाणपणाने तडजोड व एकी करण्यास मोठीच मदत केली आहे. म्हणू-

नच समेट व सलोखा झाला. राष्ट्रीय पक्षाचे वृद्ध पुढारी श्री. नीळकंठराव उधोजी (ते नेहमीप्रमाणे लठ्ठ सोटा घेऊन आजही सभेस आलेच आहेत,) यांनी व राष्ट्रीय पक्षाचे दुसरे पुढारी डॉ. मुंजे यांनी (यांच्या मिशा बादशाही थाटाच्या आहेत तरी) समेटाच्या कार्यासाठी जी खटपट व मदत केली तीमुळे, तसेंच दुसऱ्या पुष्कळ राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या साहाय्याने आजचा गोड प्रसंग जमून आला आहे. डॉ. मुंजे समेटासाठी कळकळीने पड खाऊन मेहनत करतात हें पाहून मला फारच आश्चर्य व आनंद वाटला. असा समेट होऊन प्रांतिक राजकीय सुधारणांचें काम हाती घ्यावें असें सर्वांच्याच मनात होतें. पण तें सर्वांचाच सलोखा झाल्याशिवाय शक्य नव्हतें. परवा ना. शास्त्री म्हणाले त्याप्रमाणे प्रांताच्या कौन्सिलातील लोकप्रतिनिधींना लोकांचा पाठिंबा पाहिजे. त्यांना निवडून देणारांनी आपल्या गरजा काय व तक्रारी काय यांची माहिती व सूचना दिल्या पाहिजेत. लोकमताच्या पाठिंब्याशिवाय प्रतिनिधि लुले व लंगडे होतात. त्यासाठी सुसंघटित व सुव्यवस्थित अशी राजकीय संस्था पाहिजे. तशी संस्था प्रांतिक परिषद आहे. आतापर्यंत आम्ही विभक्त प्रांत होतो आता फिरून संयुक्त झालो आहोत. एकीतच प्रांताचें सामर्थ्य आहे. परस्पर विश्वास हाच राष्ट्रीय सुधारणेचा आधारस्तंभ आहे. पाश्चिमात्य देशांत लोकसत्तेची वाढ झाली आहे. तशी येथेही होण्यास प्रांतात समेटाची बुद्धि उत्पन्न झाली पाहिजे. ती आज उद्भवलेली दिसत आहे. प्रांतिक प्रश्नाचा विचार आज लढाईमुळे बंद ठेवावा असें म्हणणें गैर आहे."

या ठरावास रा. नारायणराव अळेकर यांनी पुष्टि दिली. ते म्हणाले, "आज आपलें ऐक्य जाहीर करण्यासाठी आपण जमलो आहोत. मतभेद व भांडणें आपसांत मागे होतीं, पण तीं अखेरपर्यंत कायमच ठेवलीं पाहिजेत काय? सध्या लढाई चालू असता तुम्ही एकत्र होऊन परिषदेची चळवळ कां करता व सरकारला कां सतावता? असें कोणी म्हणतात. या लोकांची मला कीव येते. संयुक्त परिषद भरवून एकदिलाने सरकारला महायुद्धात देखील आपला पाठिंबा आहे असें जाहीर करणें म्हणजे सरकारला सतावणें काय? ही सरकारला मदतच आहे. याला जे सतावणें म्हणतात ते सरकारचे व लोकांचे शत्रु होत. बंगाल, मद्रास, मुंबई, संयुक्त प्रांत हे सर्व आपापल्या प्रांतांच्या परिषदा भरवीत आहेत ते सरकारला सतावीत आहेत काय? ते सतावीत असते तर तेथील सरकारची सहानुभूति त्यांस कशी मिळती? परिषद भरवून आम्ही सरकारला सतावतो (Embarrass) असें म्हणणें म्हणजे सरकारचा उपमर्द

करणें होय. डॉ. गौर यांनी राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांची स्तुति केली म्हणून आम्ही त्यांची प्रशंसा करावी व 'परस्परं प्रशंसन्ति' असा प्रकार करावा म्हणून ही सभा भरलेली नाही. परंतु सर बिपिन बोस, सर गंगाधरराव, रा. ब. पंडित, ना. दीक्षित, डॉ. गौर – यांचें नांव मी सांगत नाही – इत्यादि पुढाऱ्यांनी मनांत आणलें म्हणूनच समेट शक्य झाला. समेट करणाऱ्यांचा जयजयकार असो. पूर्वीची स्लेटपाटी पुसून आता आपण तिच्यावर नवीन अक्षरें व वाक्यें लिहिणार आहोत. प्रसंग येताच आपण एक न झालो तर राष्ट्रोद्धाराच्या कल्पनेस आजच रामराम ठोकला पाहिजे."

यानंतर डॉ. बा. शि. मुंजे म्हणाले, "पूर्वी पक्षभेद झाले होते. हॉकीचा खेळ खेळताना चुरस व इर्षा उत्पन्न होते. पण खेळ आटोपताच खरे हाडाचे खेळगडी परस्परप्रेमाने हस्तांदोलन करतात. तसाच आजचा प्रसंग होय. पूर्वी आम्ही बंधूप्रमाणे भांडलो तर आज बंधूप्रमाणेच एक झालो आहोत. सर बिपिन, ना. दादाभाई, रा. ब. पंडित, (हे तर माझे बाळपणाचे मित्रच आहेत.) ह्यांच्या मदतीनेच ही परिषद भरत आहे. वऱ्हाडचे पुढाऱ्यांनीही याला संमति दिली आहे. ना. मुधोळकर व ना. जोशी यांनी उदारपणे सहानुभूति दर्शविली आहे. श्री. दादासाहेब खापर्डे हे इकडील राष्ट्रीय पक्षाचे पुढारीच आहेत. त्यांचाही आमच्या समेटाच्या खटपटीस आशीर्वाद आहे. आपल्या समजूतदारपणामुळे समेट घडला हें आपणांस भूषणावह आहे."

ना. मोरोपंत दीक्षित यांनी दुसरा ठराव पुढे मांडला तो असा :– "परिषद भरविण्यासाठी नागपूरच्या प्रमुख गृहस्थांची स्वागत कमिटी स्थापन करावी (यांत ५० हून जास्त गृहस्थांचीं नांवें आहेत. तीं पुढे दिलीं आहेत.) व तिच्यात आणखी नांवें सामील करण्याचा अधिकार या गृहस्थांस देण्यात यावा." ना. दीक्षित म्हणाले, "तीन मजेदार भाषणें झाल्यावर मी आणखी ऐक्याची प्रशंसा व दोन्ही पक्षांची स्तुति करावी असें नाही. मी कोणत्याच एका पक्षाच्या कप्प्यात आपणांस कोंबून घेतलेलें नाही. जुनी पिढी अधिकारारूढ होती. ती राजकीय चळवळीचीं सूत्रें हातचीं सोडावयास नाखूष होती. तरुण पिढीला त्या सूत्रांचा ताबा पाहिजे होता. असे झगडे सर्वत्र होतातच. या टाऊन-हॉलातच राष्ट्रीय सभा मोडली अशी आपली कीर्ति आहे; पण आता समेटही नागपुरास टाऊनहॉलातच होत आहे.

रा. ब. भवानीशंकर नियोगी या ठरावास पुष्टि देऊन म्हणाले, "परस्पर भांडणें व पक्षभेद सर्वत्र आहेत. इंग्लंडातही ते होते. पण लढाई सुरू होताच ते मिटले आहेत. सर्वपक्षीय प्रधानमंडळही स्थापन झालें आहे. तशीच आपली भाऊबंदकी (Family feud) मिटविली पाहिजे. आज येथील सर्व पक्ष एकत्र होऊन इंग्लंडच्या इतिहासातील (Ministry of All Talents किंवा Broad Bottom Ministry) आपण स्थापिली आहे."

या ठरावास डॉ. रतनसिंग (येथील हिंदी ख्रिस्ती समाजापैकी प्रमुख गृहस्थ) व रा. नटेशराव द्रविड यांनी संमति दिली. व रा. ब. पंडित यांनी सदरहू सभा उत्तम तऱ्हेने पार पडल्याबद्दल आनंद व्यक्त करून सभा बरखास्त केली. डॉ. गौर यांनी अध्यक्षांचे आभार मानले. खालील गृहस्थांची स्वागत कमिटी स्थापिली असून त्यात आणखी पुष्कळ लोक सामील होतील.

सर गंगाधरराव चिटनवीस, सर बिपिन बोस, ना. दादाभाई, डॉ. गौर, रा. ब. पंडित, ना. मोरोपंत दीक्षित, रा. गोपाळराव बुटी, दाजीसाहेब बुटी, रा. सा. आबासाहेब बुटी, रा. सा. डी. लक्ष्मीनारायण, मि. नीळकंठराव उधोजी, डॉ मुंजे, रा. ठेंगडी, माधवराव पाध्ये, बॅ. गोविंदराव देशमुख, बॅ. अभ्यंकर, रा. बोबडे, पंडित, दप्तरी वकील, रा. नटेशराव द्रविड, ना. रा. ब. नारायणराव केळकर, रा. जकातदार (भंडारा), डॉ. परांजपे, डॉ. चोळकर, मि. मुन्ना, मि. नायडू वकील, रा. ब. दामोदरपंत खरे (वर्धा), मि. कृपाशंकर, रा. बळवंतराव देशमुख (चांदा), चेंडके वकील (चांदा), दाजीसाहेब देवईकर (चांदा), बॅ. चक्रवर्ती, रा. एम्. भवानीशंकर, रा. नारायणराव वैद्य, रा. ओगले, गोपाळराव देव, रा. भवाळकर वकील (नागपूर), वामनराव जोशी, भाऊराव भवाळकर वकील (सावनेर), जागोबा पारखी, रा. कोलते, बॅ. कुकडे, रा. बावरे, बॅ. शंकरराव देशमुख, रा. सा. कप्तान, रा. विठ्ठलराव दाते, धाबे, पुराणिक, देऊसकर, मांडे, डॉ. हरदास, रा. रामराव देशमुख, रा. मंगलमूर्ति वकील, रा. तुकारामपंत जानेफळकर, व्यंकटराव नाईक, डॉ. रतनसिंग, मि. मित्र, रा. किनखेडे, डॉ. गद्रे, रा. माधवराव देशपांडे, मि. महंतराम, गोस्वामी रामकृष्ण पुरीजी, खा. ब. मलिक, मि. सलिमुल्लाखाँ, बॅ. कोतवाल, मीर अस्लामखां, मि. बायरामजी, मि. नानावटी, मि. अबदुल अझीझ सुभेदार, मि. डीक, मि. सोराबजी मेहता, सर कस्तुरचंद डागा, मि. नागरमल, मि. परेख, मि. नारायणराव घटाटे, रा. भास्करराव चांदे.

—महाराष्ट्र ६ ऑक्टोबर १९१५

परिषदेच्या स्वागत सभासदांची यादी बारकाईने पाहिली तर मवाळ व जहाल पक्षाचे सर्व नामवंत पुढारी मध्यंतरी सहा वर्षें बंद पडलेल्या प्रांतिक परिषदेच्या कार्यासाठी खांद्यास खांदा लावून कसे एकत्रित आले होते याची कल्पना येते. लवकरच प्रांतिक परिषदेचे स्वागताध्यक्ष म्हणून सर गंगाधरराव चिटनवीस व कार्याध्यक्ष म्हणून बिपिनकृष्ण बोस यांस नियुक्त करण्यात आलें. परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष नेमस्ताग्रणी डॉ. गौर हे होते, तर सर्वसाधारण कार्यवाह अथवा मुख्य मंत्री डॉ. मुंजे हे होते. या परिषदेची एक ठरावसूचक समिति होती. सर गंगाधरराव चिटनवीस, सर बिपिनकृष्ण बोस, डॉ. गौर, दादाभाई, रा. ब. पंडित, ना. दीक्षित, नारायणराव अळेकर व डॉ. मुंजे हे तिचे सभासद होते. मुख्य मंत्री डॉ. मुंजे व सहमंत्री नारायणराव अळेकर यांच्या हस्ताक्षरीने परिषदेला साहाय्य करण्यासाठी एक प्रकट निवेदन काढण्यात आलें. सर्व प्रांतात परिषदेविषयी अतिशय उत्साह होता. तिचा प्रचारही प्रांतभर पुष्कळ झाला. एक मोठें क्रांतिकारक पाऊल म्हणून कार्यवाह डॉ. मुंजे यांनी या परिषदेचें कामकाज व भाषणें इंग्रजीतून न होता हिंदी व मराठीतून होतील असें घोषित केलें. तत्कालीन इंग्रजाळलेल्या वातावरणात हें एक मोठेंच साहस होतें.

परिषदेची सिद्धता याप्रमाणे चालू असता मिसेस ॲनी बेझंट या दि. १२ ऑक्टोबरला कलकत्त्याहून मुंबईला जाताना नागपूरला उतरल्या. जुन्या भारतीय राजकारणात ॲनी बेझंट या होमरूल लीग अथवा हिंदी स्वराज्य संघाच्या जनक समजण्यात येतात. वस्तुतः या स्वराज्यसंघाची पहिली कल्पना टिळकांची. १९१४-च्या मद्रास काँग्रेसच्या पूर्वी श्री. सुब्बाराव यांच्याशी केलेल्या भाषणात टिळकांनी ही कल्पना मांडली होती. त्यानंतर पुण्याच्या प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष बॅ. बॅप्टिस्टा यांनी या कल्पनेचा उच्चार केला. हा विचार चालू असता कोणाशीही विचारविनिमय न करताच बाईंनी स्वराज्यसंघाची स्थापना केली. दादाभाई नौरोजींना त्याचें अध्यक्षपदही देऊन टाकलें. होमरूल लीगचा उद्देश स्पष्ट करताना दि. २५ सप्टेंबर १९१५-च्या न्यू इंडिया पत्राच्या अंकात बाई लिहितात, " आमची ही लीग, राष्ट्रीय सभा व काँग्रेस कमिटी यांना पुरवणीदाखल असून लीगचा हेतु काँग्रेसच्या प्रतिज्ञापत्रकाला धरून लोकांना राजकीय शिक्षण देणें हा आहे. लीगच्या शाखा हिंदुस्थानात व इंग्लंडमध्येही काढल्या जातील. १९०६-मध्ये दादाभाई नौरोजी यांनी हिंदुस्थानासाठी स्वराज्याची मागणी केली व त्यांनीच या लीगचें अध्यक्ष

स्थान स्वीकारण्याचें मान्य केलें आहे. हिंदुस्थानातील शाखेचे अध्यक्ष सर सुब्रह्मण्यम् अय्यर व इंग्लंडमधील शाखेचे अध्यक्ष सर विल्यम् वेडरबर्न हे राहतील. या लीगने काँग्रेसला कोणत्याही तऱ्हेने बाध येणार नाही. अशी लीग स्थापण्याची आवश्यकता युद्ध संपून गेल्यापेक्षा युद्ध चालू आहे तोवरच अधिक आहे."

टिळकांनी केसरीतून या नव्या स्वराज्यसंघाला पाठिंबा दिला. नेमस्तांना टिळक व बाईंच्या युतीमुळे होमरूल लीगला विरोध करणें हें कर्तव्य वाटून ते दादाभाई नौरोजींच्या कानाशी लागले व पूर्वी आपण बाईंना काय कबूल केलें होतें याचें सोइस्कर विस्मरण होऊन दादाभाईंनी दि. २७ सप्टेंबरच्या क्रॉनिकलमध्ये असें प्रसिद्ध केलें की, मी लीगचा अध्यक्ष होण्याचें कबूल केल्याचें जें प्रसिद्ध झालें आहे तें काही गैरसमजाने झालें असावें. वस्तुस्थिति तशी नाही. पण अशाने बेझंटबाई स्वस्थ बसणाऱ्या नव्हत्या. त्यांनी दादाभाईंना तार पाठवून त्यांच्याशी स्वतःच्या झालेल्या चर्चेची अधिक स्पष्ट शब्दात आठवण दिली व दादाभाईंच्याकडून क्रॉनिकल पत्रात पुनश्च असें प्रसिद्ध करविलें की, काही शर्तीवर मी लीगचा अध्यक्ष होण्याचें कबूल केलें, ही गोष्ट खरी आहे. अर्थातच या प्रकरणात नेमस्तांचीच फजिती झाली. मुंबईचे नेमस्त फेरोजशहांच्या नेतृत्वाखाली लीगला विरोध करीत होते. सगळ्या भारतात दौरा करून बाईंनी इतर प्रांतांतील नेमस्तांची अनुकूलता मिळविली. याच दौऱ्यात बेझंट बाई नागपूरला आल्या होत्या. नागपूरला दि. १२-ला त्यांचें सर बिपिनकृष्ण बोस यांच्या अध्यक्षतेखाली 'महायुद्धानंतरचें हिंदुस्थान' या विषयावर भाषण झालें. हें भाषण अतिशय प्रभावशाली झालें. नागपूरच्या या मुक्कामात बाईंनी येथील नेमस्त पुढाऱ्यांचीं मनें वळविलीं. या मुक्कामात बाईंची डॉ. मुंजे यांच्याशी भेट व चर्चा झाली. डॉ. मुंजे यांच्या मनावर असा परिणाम झाला की, बेझंट बाई ह्या मवाळांशी अधिकाधिक संपर्क ठेवून लीगला होणारा काँग्रेसचा संभाव्य विरोध नाहीसा करू पहात आहेत. त्याचा परिणाम म्हणून आपण लीगमधून जें साधू शकतो तें साधू शकेल कीं नाही असाही संशय त्यांच्या मनात आला. त्यांनी या संबंधात मार्गदर्शन करण्यासाठी, बेझंट बाईंनी नागपूर सोडताच लोकमान्य टिळकांना पत्र पाठविलें. दि. ४ नोव्हेंबर १९१५-ला टिळकांनी त्यांना पुढीलप्रमाणे उत्तर पाठविलें.

Poona City
4th Nov. 1915

My dear Munje,

I have duly received your letter of Oct. 14, giving an account of an interview with Mrs. Besant when she was at Nagpur. You are right in your interpretation of her plans. She wants the support of the moderates and she is playing with them and with us also. But she will, I am sure, soon find that the moderates will forsake us as soon as she takes up to agitation. The Bombay moderates may go so far as to pass a resolution about Home Rule Scheme in the Conference. But they are dead against continuous agitation; and they wired to the Calcutta Congress Committee not to have anything to do with Mrs. Besant's scheme when she was in Calcutta. It was in consequence of this that the Calcutta meeting had to be convened, not by Surendra or Bhupendra, but by Motilal and Hirendra. Mrs. Besant had to seek Mr. Motilal's assistance at last. Mr. Motilal and myself take the same view as you and Dadasaheb; and I am arranging for a common action on the part of all nationalists whether in Bengal, Bombay or Nagpur. If we join we all join together and not singly by provinces. In any case we shall not join if the League is to be guided solely by moderates. we do not want the moderates in it. We shall be glad if they join Not that the league and are willing to keep up continuous agitation. But we want the league open to all from the beginning though for policy's sake it may be announced as 'ancillary' to the Congress. I have written to Motilal to work on this line. Let us see how the matter proceeds.

As for your conference you have done well so far. In my opinion you might take the current questions in your province, e. g. Land Revenue Settlement Bill. There will be no opposition I think for this, though it is a contentious question. On the contrary I think there will be a majority in the Subjects Committee for taking up the question. But if the Committee does not wish to take up imperial contested question you may not insist upon their doing so. Rao B. Mudholkar and Co. cannot now spoil what you have done.

Mr. N. C. Kelkar may be present as visitor at your Conference, enroute to his trip to Calcutta.

Yours very sincerely,
Bal Gangadhar Tilak

डॉ. मुंजे यांस, आपलें दि. १४ ऑक्टोबरचें पत्र मिळालें. बेझंटबाई यांच्याबरोबर नागपूर येथे झालेल्या चर्चेचा वृत्तान्त समजला. त्यांच्या धोरणासंबंधाने आपलें मत बरोबर आहे. त्यांना नेमस्तांचा पाठिंबा हवा आहे व म्हणून त्या त्यांच्याशी व आपल्याहीबरोबर बोलणें करीत आहेत. पण माझी अशी खात्री आहे की त्यांनी चळवळीला हात घातला की, नेमस्त पक्षाचे लोक आपल्याला सोडून देतील. मुंबईची नेमस्त मंडळी फार तर परिषदेत स्वराज्याच्या योजनेवरील ठरावाला पाठिंबा देतील; परंतु सतत चळवळीला त्यांचा विरोधच राहील. बेझंटबाई कलकत्ता येथे होत्या तेव्हा कलकत्ता काँग्रेस कमिटीला त्यांनी तारेने कळविलें की, बेझंटबाईंच्या योजनेशी आपला संबंध ठेवू नका. त्यामुळेच कलकत्ता येथील सभा सुरेंद्रनाथ किंवा भूपेंद्र यांनी न बोलावता ती मोतीलालबाबू आणि हिरेंद्र यांना बोलवावी लागली. बेझंटबाईंना शेवटी बाबू मोतीलाल यांचाच पाठिंबा मिळवावा लागला. तुम्ही आणि दादासाहेब यांच्या मताप्रमाणेच मोतीबाबूंचें आणि माझेंही मत आहे. राष्ट्रीय पक्षाच्या सर्वच मंडळींनी – मग ते बंगाल, मुंबई किंवा नागपूर कोठलेही असोत, – सर्वांनी मिळून एक समान कार्यक्रम आखावा यासाठी मी प्रयत्नात आहे. आपण जाऊ तर सर्व मिळून त्यात जाऊ. केवळ प्रांतांनी आपापल्या पुरतें असें नव्हे. परंतु जर होमरूल लीग नेमस्तांच्याच तंत्राने चालणार असेल तर मात्र कोणत्याही परिस्थितीत आम्ही त्यांना मिळणार नाही. आम्हांस त्यात नेमस्तपक्षीय नकोत असें मुळीच नाही. ते होमरूल लीगला येऊन मिळतील आणि सदाची चळवळ चालविण्यास सिद्ध होतील तर आम्हांस आनंदच वाटेल. ही लीग सर्वांना खुली असली पाहिजे असा आमचा आग्रह आहे. धोरण म्हणून ती काँग्रेसला पूरक आहे अशी घोषणा केली तरी आम्हांस चालेल. या धोरणाने काम करण्याबद्दल मी मोतीबाबूंना लिहिलें आहे. काय काय घडतें तें लौकरच दिसेल.

तुमच्या परिषदेसंबंधाने बोलावयाचें तर तुम्ही आतापर्यंत छान काम केलें आहे. माझ्या मते तुम्ही आपल्या प्रांतातील चालू उपस्थित प्रश्नांचा या परिषदेत विचार करावा. उदा., लँड रेव्हेन्यू सेटल्मेंट बिल. हा प्रश्न वादग्रस्त असला तरी त्याला कोणाचा फारसा विरोध असणार नाही. उलट, विषयनियामक समितीत हा विषय विचारार्थ घेण्याला बहुमत मिळेल. राष्ट्रीय वादग्रस्त प्रश्न या परिषदेने घेऊ नयेत असें काहींचें मत असलें तर तुम्ही त्यावर आग्रह न धरला तरी चालेल. तुम्ही आतापर्यंत जें घडवीत आणलें आहे त्यात आता रा. ब. मुधोळकर आणि कंपनी बिघाड निर्माण करू शकणार नाही.

श्री. तात्यासाहेब केळकर हे कलकत्त्यास जात आहेत. वाटेत ते नागपूरला आपल्या परिषदेस प्रेक्षक या नात्याने उपस्थित राहू शकतील.

पुणें
दि. ४ नोव्हेंबर १९१५

आपला
**बाळ गंगाधर टिळक**

असो. मध्यप्रांत वऱ्हाडात भरणारी ही चौथी प्रांतिक परिषद होती. गेल्या तीन परिषदांचे ओळीने अध्यक्ष महाराष्ट्रीय झाल्यामुळे या वेळी मध्यप्रांताच्या हिंदी विभागाला हा मान द्यावयाचें ठरून जबलपूरचे नामदार पं. बिशनदत्त शुक्ल हे एकमताने परिषदेचे अध्यक्ष निवडले गेले. परिषदेच्या एकात्म वातावरणासंबंधी 'महाराष्ट्रा'ने दि. १२ नोव्हेंबरच्या अग्रलेखात म्हटलें आहे : "यंदाचें वर्ष हें मध्यप्रांतास मोठ्या आनंदाचें व उत्साहाचें आलें आहे. सध्या या प्रांतावर एकीच्या व सलोख्याच्या तारका उदय पावल्या असून त्यांचे सुखकर किरण प्रांतातील लोकांचीं अंत:करणें हर्षोत्फुल्ल करून सोडीत आहेत. जहाल, मवाळांच्या पक्षभेदाचें जें खिंडार गेल्या आठ वर्षांत इतर प्रांत बुजवू शकले नाहीत तें नागपूरच्या पुढाऱ्यांनी झटकन बुजवून सव प्रांताची परिषद आरंभिली ही गोष्ट खरीच अभिमान वाटण्याजोगी आहे.

परिषदेची ही पूर्वतयारी होत आली असतानाच नेमस्तपक्षाचे महान् पुढारी सर फेरोजशहा मेथा यांचें निधन झालें. सन १९०७-मध्ये मेथा यांनी डॉ. मुंजे यांना चांगलेंच दुखविलें होतें. पण तें मनातही न आणता त्यांचा मोठेपणा व सार्वजनिक कार्य ध्यानात घेऊन मुंजे यांनी त्यांच्यासंबंधी सर्वपक्षीय शोकसभा घडवून आणली. त्यामुळे प्रांतातील नेमस्ताग्रणी अधिक प्रसन्न झाले.

संपूर्ण हिंदुस्थानात जहाल व मवाळ यांच्या एकात्मतेचें अभूतपूर्व युग प्रवर्तित करणारी ही परिषद दि. १७ नोव्हेंबर १९१५-ला नागपूर येथे प्रारंभ झाली. प्लेगचे दिवस असूनही परिषदेला एक सहस्र प्रतिनिधि आले. अपूर्व उत्साह होता. परिषदेचे अध्यक्ष ना. पं. बिशनदत्त शुक्ल हे रविवार दिनांक १४ नोव्हेंबरला दुपारच्या मेलने नागपूरला आले. त्यांच्या स्वागतासाठी स्टेशनवर सर गंगाधरराव चिटनवीस, दादाभाई, नीळकंठराव उधोजी, खा. ब. मलिक, डॉ. गौर, ना. दीक्षित, डॉ. मुंजे, डॉ. गर्दे इत्यादि नेते उपस्थित होते. अध्यक्ष गाडीतून उतरताच 'वन्दे मातरम्'च्या जयघोषात सर गंगाधरराव यांनी त्यांना हार घातला.

मंगळवार दि. १६-ला दुपारी-३ला परिषदेचें प्रकट अधिवेशन प्रारंभ झालें. प्रतिनिधि व प्रेक्षक यांनी मंडप फुलून गेला होता. मंडप उत्कृष्ट व भव्य होता. मंडपाच्या दर्शनी कमानीवर मध्यभागी बादशहांचें चित्र काढून दोन्ही बाजूस रोडकीं गुरें, गरीब, कपडे फाटलेला, शिकण्यास पैसे नसलेला व उपाशी विद्यार्थी, धंदा सर्वथैव बसल्यामुळे पोट पाठीस लागलेला कोष्टी, व रोडक्या बैलांनी तुटपुंजी शेती करणारा व शेतसारा आणि सावकार देणें यांनी डबघाईस आलेला लंगोट्या शेतकरी अशीं अर्थपूर्ण चित्रें काढलेलीं होतीं. जणू ब्रिटिशांच्या साम्राज्यात झालेल्या भारताच्या दु:स्थितीचें तें प्रत्यक्ष दर्शनच होतें. अध्यक्षांबरोबर श्रीमंत दादासाहेब खापर्डे, बिपिन कृष्ण बोस, दादाभाई व डॉ. गौर हे मंडपात येताच टाळ्यांच्या कडकडाटांनी जनतेने त्यांचें स्वागत केलें. प्रारंभी गांधर्व महाविद्यालयातील विद्यार्थ्यांनी ईशप्रार्थना केल्यावर स्वागताध्यक्ष सर गंगाधरराव यांचें भाषण झालें. त्यांनी आपल्या भाषणात प्रथम इतके दिवसांनी प्रांतिक परिषद भरत असल्याबद्दल आनंद प्रदर्शित करून पाहुणे व प्रतिनिधि यांचें स्वागत केलें. त्यानंतर बादशहा पंचम जार्ज यांना नुकत्याच फ्रान्समध्ये झालेल्या अपघातातून ते सुरक्षित वाचल्याबद्दल आनंद व्यक्त केला. त्यांच्या भाषणातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे :

"भाषणाला सुरवात करण्यापूर्वी हिंदुस्थानच्या कित्येक विश्वासू सत्पुत्रांचे व पुरस्कर्त्यांचे अत्यंत खेदजनक मृत्यु नुकतेच घडून आले, त्यांचा उल्लेख केल्याशिवाय पुढे जाणें रास्त नाही. ना. गोखले, सर हेन्री कॉटन आणि सर फेरोजशहा मेथा हे हिंदुस्थानातील सनदशीर चळवळीचे अत्यंत थोर व सन्मान्य पुढारी होते. त्यांच्यावर इतक्या अल्पकाळात घाला घालून मृत्यूने आमच्या देशाचें फारच नुकसान केलें आहे. या तीनही पुढाऱ्यांनी आपलें सामर्थ्यसर्वस्व राष्ट्रसेवेत खर्चून हिंदुस्थानच्या सर्व मागण्या अत्यंत वक्तृत्वपूर्ण रीतीने सरकारपुढे व इंग्रजी जनतेपुढे मांडण्यात आपल्या आयुष्याचा व्यय केला. आपल्या राष्ट्राची जी काही थोडीबहुत प्रगति झाली तिचें पुष्कळसें श्रेय या तिघांच्या प्रयत्नांस देणें अवश्य आहे. आपल्या नागपुरातही मृत्यूचा घाला पडल्याशिवाय राहिला नाही. रा. ब. बापूरावदादा हे आपल्या प्रांताच्या सेवेत विशेषत: नागपूरच्या म्युनिसिपालिटीत शहाणपणाचा सल्ला घडोघडी देऊन गेलीं तीस वर्षें काम करीत होते. उपरिनिर्दिष्ट गृहस्थांनी अत्यंत निरपेक्ष बुद्धीने राष्ट्रकार्य केलें आहे. आणि त्यांचें

कृतज्ञतापूर्वक स्मरण करणें अवश्य आहे. त्यांचा मृत्यु ही राष्ट्राची मोठी हानि आहे. ईश्वरी इच्छेला इलाज नाही हें जाणून या मृत महात्म्यांचें स्फूर्तिजनक उदाहरण आपण आपल्यापुढें ठेवलें पाहिजे हें सांगावयास नकोच.

"वादग्रस्त विषय या सभेच्या कार्यक्रमात फारसे आणावयाचे नाहीत असें जें आम्ही ठरविलें तें याच कारणास्तव. आम्ही फक्त प्रांतिक गरजा व प्रांतिक अडचणी यांचाच विचार करणार आहोत आणि प्रांताशी प्रत्यक्ष संबंध असलेल्या विषयांवर आपलें मत जाहीर करणार आहोत. फार काय सांगावें! चालू लढाईत यश मिळविण्यासाठी आम्ही मदत करावयास तयार आहोत असें जाहीर करण्याची प्रांताची उत्कट इच्छा हेंही प्रस्तुत परिषद भरविण्याचें एक कारण आहे. किंबहुना अशा प्रकारचें साह्य देण्याचा आमचा निश्चय गंभीरपणे जाहीर करण्या-साठीच आम्ही आज जमलो आहोत. साम्राज्याचें संरक्षण म्हणजेच आमचें आत्मसंरक्षण होय. ब्रिटिश राष्ट्र व आम्ही यांचें हिताहित एक-रूपच आहेत. आमच्या प्रांतस्थांनी आपली इच्छा प्रांतिक सरकारच्या कानावर वारंवार घातली आहे व आपले एकुलते एक मुलगे स्वयंसेवक म्हणून रणांगणावर पाठविण्यास ते तयार झाले आहेत. आम्हांला स्वयंसेवक करा असें आम्ही कां म्हणतो? बादशहाच्या नोकरीत आमचें रक्त वेचण्याची आमची इच्छा आहे म्हणून. ब्रिटिश प्रजाजनांशी नागरिकत्वाचा समान हक्क आम्हांस मिळावा अशी आमची मागणी आहे आणि नागरिकत्वाच्या समान हक्काबरोबरच येणारी जबाबदारी हीही चुकविण्याची आमची इच्छा नाही. आम्हांला वाईट वाटतें तें इतकेंच की, हिंदुस्थानातील मर्दानीपणाचा करून घ्यावा तितका उपयोग करून घेतला जात नाही. हिंदी शिपाई पूर्व व पश्चिम रणांगणावर लढत आहेत. आमच्याकडचे स्त्रीपुरुष निरनिराळ्या संस्थांमार्फत हॉस्पिटलें व अॅम्ब्युलन्स गाड्या इत्यादि रूपाने सरकारला मदत करीत आहेत याबद्दल जरी आम्हांस आनंद व अभिमान वाटतो तरी एवढ्या मदतीने आमचें समाधान होत नाही. आमची बुद्धिमत्ता व शरीरबल यांचा उपयोग करण्यासाठी जास्त अवकाश पाहिजे. आपले परमपूज्य बादशहा यांनी 'आणखी माणसें पाहिजेत' अशी जी जाहीर हाक मारली आहे तिलासुद्धा आम्हा हिंदी लोकांना ओ देण्याची सवड नाही हें आम्हा हिंदी लोकांच्या मनास लागून राहिलें आहे. आपले लोकप्रिय व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज हे परवा म्हणाले, "हिंदुस्थान हा साम्राज्याचा खराखुरा मित्र आहे असें समजलें पाहिजे. हें नुसतें ओझें आहे किंवा

आपला नोकर आहे असें समजता कामा नये.' साम्राज्य संरक्षणाविषयीची ही कळकळ म्हणजे मोठेंच सामर्थ्य होय. ही कळकळ व्यक्त करण्यासाठीच आमची परिषद भरली असल्याकारणाने या मध्यप्रांतीय परिषदेचें महत्त्व हिंदी लोक आणि सरकार यांच्या लक्षात आल्याशिवाय राहणार नाही.

"सद्गृहस्थहो, आम्ही आज वादग्रस्त विषय बाजूला ठेवावयाचे म्हटले, तरी त्यामुळे आपण आपलीं राजकीय ध्येयें कायमचीं सोडून दिलीं किंवा आपल्या राजकीय चळवळीची पिछेहाट झाली असें कोणी समजू नये. अलीकडे पिछेहाट होण्याच्या ऐवजी आपण राजकीय दृष्टया बरीच पुढची मजल गाठली आहे. गेल्या वर्षांत आमच्या हक्काविषयी विलायतेतील व हिंदुस्थानातील जबाबदार अधिकाऱ्यांना सहानुभूतिपूर्वक विचार करण्याची विशेष जरुरी वाटू लागली आहे. लढाई सुरू होताच हिंदुस्थानचे अंडर सेक्रेटरी मि. मांटेग्यू यांनी सरकारचा दृष्टिकोन बदलल्याचें जाहीर केलें. तेव्हापासून सनदशीर मागण्यांना आपल्या अटकळीपेक्षा जास्त बळकटी आली आहे.

"अशा प्रकारे हिंदुस्थानचा भविष्यकाळ उज्ज्वल दिसत आहे. पूर्व क्षितिजावर उषःकालची नवीन प्रभा फाकू लागली आहे."

यानंतर परिषदेचे अध्यक्ष ना. पं. बिशनदत्त शुक्ल यांचें भाषण झालें. त्या भाषणात प्रारंभीच सर गंगाधरराव यांचे आभार मानून पं. बिशनदत्त म्हणाले, "इतक्या वर्षांनी आपल्या प्रांतातले वजनदार, संस्कृतिसंपन्न, प्रभावशाली, राजनिष्ठ व राष्ट्रभक्त पुढारी सर्व मतभेद विसरून एकाच उच्च विचाराने सनदशीरपणे प्रांतिक कार्यासाठी एकत्र जमलेले पाहून माझ्या पोटात माझा आनंद मावेनासा झाला आहे." यानंतर त्यांनी बादशहांच्या अपघातासंबंधी निर्देश करून ते सुधारत असल्याबद्दल आनंद व्यक्त केला. नंतर नामदार गोखले, सर हेन्री कॉटन व फेरोजशहा मेथा यांच्या अकाली निधनासंबंधी त्यांनी दुःख व्यक्त केलें. बिशनदत्त शुक्ल यांच्या अध्यक्षीय भाषणातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे : "सर्व युरोपला पिळवटून टाकणाऱ्या चालू महायुद्धात हिंदुस्थानने हजारो हिंदी लढवय्ये रणांगणावर देह ठेवण्याकरिता पाठविले आहेत. अजूनही हिंदी लोक सर्व प्रकारचें साहय द्यावयास तयार आहेत. हिंदुस्थानची आजपर्यंत बदनामी करणारे आमचे प्रतिपक्षीसुद्धा आपली चूक कबूल करून आमचे स्तुतिपाठक बनले आहेत. तरी अजूनही काही निंदक राहिले आहेत. ते रहावयाचेच."

"परवा. ना. शफी यांनी वरिष्ठ कायदे कौन्सिलात ठराव आणला की, आगामी साम्राज्य परिषदेत हिंदुस्थानचा प्रतिनिधि घ्यावा. हा ठराव हिंदुस्थान सरकारने स्वीकारला याबद्दल लॉर्ड हार्डिंज यांचे आभार मानावे तितके थोडेच. आता मुसलमान व हिंदु यांच्यामध्येही हिंदुस्थानचा दर्जा वाढला पाहिजे, या बाबतीत मतभेद उरलेला नाही. सध्याची वेळही हक्क देण्यास अत्यंत समुचित आहे. तुमचीं आपसांत भांडणें आहेत तेव्हा हक्क कसे द्यावे असें आजपर्यंत सांगण्यात येई. पण आता सर्व भांडणें मिटलीं आहेत. हक्क देण्यास यापेक्षा योग्य वेळ कोणती मिळणार?"

यानंतर पं. बिशनदत्त यांनी प्रांतातील मतभेद मिटविल्याबद्दल आनंद प्रदर्शित केला. सरकारला साह्य करण्याचें आवाहन करून ते पुढे म्हणाले, "याच वेळी हिंदुस्थानात असंतोष उत्पन्न करणाऱ्या दोन गोष्टी घडून आल्या आहेत. (१) विलायत सरकारने व्हॉइसरॉयांची सल्ला झिडकारून संयुक्त प्रांतास कार्यकारी कौन्सिल देण्याचें नाकारलें व (२) लॉर्डांच्या सभेत इस्लिंगटन बिल आणलें. इस्लिंगटन साहेबांनी कितीही जीव तोडून सांगितलें तरी सिव्हिल सर्व्हिस बिलाने आमचा तोटाच होणार अशी भीति आम्हांस वाटते. हें बिल आगाऊ प्रसिद्ध करून त्यावर चर्चा करण्याची संधि आम्हांस मिळावयास पाहिजे होती. ती मिळाल्याशिवायच बिल पास करण्यात आलें. आता लोकांना विचारल्याशिवाय त्याचा अंमल तरी होता कामा नये."

यानंतर अध्यक्ष प्रांतिक प्रश्नांकडे वळले. त्या वेळी नागपूरला युनिव्हर्सिटी स्थापन व्हावयाची होती. त्या कल्पनेचें स्वागत करून युनिव्हर्सिटी सेनेटमध्ये सरकारी सभासदांची संख्या अधिक असल्याची त्यांनी तक्रार केली. सेनेटला तिच्या कारभारात स्वातंत्र्य असावें व प्रत्येक बाबतीत सरकारकडे पाहावें लागू नये असें त्यांनी सुचविलें. व्यापारी शिक्षण व धंदेशिक्षण यांची आवश्यकता प्रतिपादन करून प्रांतात खाणींची समृद्धि असल्यामुळे खाणकामाच्या शिक्षणाचा स्वतंत्र अभ्यासक्रम ठेवावा आणि प्राचीन आर्यसंस्कृतीची विशेष माहिती लोकांस व्हावी म्हणून युनिव्हर्सिटीला जोडलेलें एक संस्कृत कॉलेज असावें असें त्यांनी प्रतिपादन केलें. प्राथमिक शिक्षण सक्तीचें असावें असें सांगून त्यांनी मध्यप्रांतीय कौन्सिलपुढे आलेलें लँड रेव्हेन्यू बिल, सी. पी. टेनन्सी अॅक्ट, फॉरेस्ट व मुदतबंदी यांची विस्तृत चर्चा केली. स्थानिक स्वराज्य व गावपंचायती यांचा निर्देश करून त्यांनी पंचायतींना खरेखुरे अधिकार द्यावे व जिल्ह्याजिल्ह्यांतून

जिल्हाधिकाऱ्यांना सल्ला देण्यासाठी लोकनियुक्त प्रतिनिधींचीं मंडळें स्थापावींत असें सुचविलें. मध्यप्रांतात वऱ्हाडचा समावेश झाला असल्यामुळे या प्रांतावर चीफ कमिशनरऐवजी गव्हर्नर असावा असें सुचवून वरिष्ठ कौन्सिलात प्रांताला दोनच प्रतिनिधि पाठविण्याचा जो अधिकार होता त्याऐवजी तीन प्रतिनिधि पाठविण्यात यावेत अशी त्यांनी मागणी केली. न्याय व अंमलबजावणी खात्यांची विभागणी, शेतकऱ्यांचें दारिद्र्य व सहकारी पतपेढ्या यांची चर्चा करून शेवटी ते म्हणाले, "आम्हांला आपल्या पायावर उभें रहावयास शिकलें पाहिजे. गरीब जनसमाजाच्या गरजांकडे लक्ष आपणच पुरविलें पाहिजे. प्रत्येक जणाला आपला पैसा व वेळ खर्चून लोकांस मदत करता येईल. लोकांस काटकसर व सहकारिता शिकविणारी मंडळी प्रत्येक जिल्ह्यात पाहिजेत. आम्ही आपलें कर्तव्य करू तरच सरकारची मदत मागण्यास आपणांस तोंड आहे. एकीने व निश्चयाने, एकमताने व एक अंतःकरणाने, बेताबेताने, राजनिष्ठेने, देशभक्तीने काम पुढे चालवा म्हणजे यश तुमच्या हातचें आहे. इंग्लंडसारखें एक थोर राष्ट्र हिंदुस्थानसारख्या पुराणराष्ट्राला न्याय व समान हक्क देण्याकरिता हात पुढे करील व त्यामुळे सर्व मानवजातीचें कल्याण होईल. तो दिवस काही दूर नाही."

दुसऱ्या दिवशीच्या अधिवेशनाला ११५० प्रतिनिधि उपस्थित होते व एकंदर २७ ठराव पसार झाले. राजनिष्ठेचा ठराव व सरकारला साह्य देण्याचा ठराव अध्यक्षांनी मांडला. तिसरा सैनिकीकरणासंबंधीचा अध्यक्षांनी मांडला. यानंतर "लॉर्ड हार्डिंज यांनी हिंदी लोक आपले विश्वासू बगलबच्चे आहेत असें न मानता ते मित्र समजले जावे हें जें जाहीर विधान केलें आहे त्याची पूर्तता व्हावी." हा ठराव भंडाऱ्याचे विष्णुपंत जकातदार वकील यांनी इंग्रजीत भाषण करून मांडला व त्याला श्री. माधवराव पाध्ये यांनी मार्मिक भाषण करून दुजोरा दिला. पं. काशीराम यांचें भाषण झाल्यावर हा ठराव संमत झाला. यानंतर नामदार गोखले व सर हेन्री कॉटन यांच्या दुखवट्यासंबंधीचा ठराव अध्यक्षांनी मांडला. सर फेरोजशहा मेथा यांच्या निधनासंबंधीचा दुखवट्याचा ठराव श्री. दादासाहेब खापर्डे यांनी मांडला. दादासाहेब आपल्या भाषणात म्हणाले :– "सर फेरोजशहा मेथांची व माझी फार जुनी ओळख आहे. त्यांच्या ठिकाणी कित्येक लोकोत्तर गुण होते. वादविवादात झालेल्या पराजयाबद्दल त्यांना कधी वाईट वाटत नसे. त्यांचे विचार फार शांतपणाने केलेले असत. पण ते विचार बोलून दाखविताना ते भाषा मात्र फार कडक वापरीत. वादविवादात विरुद्ध

पक्षाला चिडवून तो क्रुद्ध झाला म्हणजे त्याची बुद्धि भ्रष्ट होते. मग त्याला हवातसा पतंगाप्रमाणे खेळवावा व त्याच्याचकडून आपला कार्य-भाग करून घ्यावा अशी त्यांची वादविवादाचे वेळी पद्धति होती. त्यांच्या तरुणपणी पारशी मंडळी आम्ही हिंदी नाही असें म्हणत. पण सर फेरोजशहा पारशी लोक हिंदुस्थानवासीच आहेत असें प्रतिपादीत. काही काळपर्यंत ते व आम्ही एकाच मार्गाने जात होतो. पण नदीच्या प्रवाहात मध्येच एखादा खडक वगैरे आला म्हणजे जसे त्या प्रवाहाचे दोन भाग होऊन ते काही काळपर्यंत भिन्न मार्गांनी जातात पण पुढे एका ठिकाणी मिळतात, त्याप्रमाणे काही बाबतींत त्यांचा आमचा कार्य-पद्धतीमुळे मतभेद झाला, तथापि ते व आम्ही, आमचें परस्परांचें ध्येय एकच असल्यामुळे एकच आहो."

खानबहादूर मलिक व प्रभा पत्राचे संपादक कालूराम गंगराडे यांनी पाठिंबा दिल्यावर हा ठराव संमत झाला. यानंतर प्रांतीय महत्त्वाच्या अनेक ठरावांवर मंगलमूर्ति वकील, वामनराव लाखे, बाबा-साहेब खापर्डे, रविशंकर शुक्ल (काँग्रेस राज्यातील जुन्या मध्यप्रदेशाचे मुख्यमंत्री) रा. ब. पंडित, डॉ. गौर, इत्यादि वक्त्यांचीं भाषणें झालीं.

या परिषदेत तेव्हाचे माधवराव व आताचे लोकनायक बापूजी अणे यांनी लोकांनी झीज सोसून स्वदेशी धंद्यांना उत्तेजन द्यावें या विषयावर भाषण केलें. नरहर शिवराम उपाख्य तपस्वी बाबासाहेब परांजपे यांनीही भाषण केलें. वऱ्हाडातील बलुत्यांना धान्याच्या रूपाने द्यावा लागणारा कर बंद करण्यात यावा हा ठराव यवतमाळचे शामराव दादा देशपांडे यांनी मांडला. विशेष म्हणजे सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीचे नटेश आप्पाजी द्रविड यांच्या पत्नी सौ. मथुराबाई द्रविड यांनी स्त्रीशिक्षण-विषयक ठराव मांडला व त्यांचें भाषण अतिशय सुंदर झालें. या ठरावाला द्वारकाबाई देऊसकर यांनी अनुमोदन दिलें. डॉ. मुंजे यांच्या प्रेरणेने कीर्तनाला राष्ट्रीय स्वरूप देणारे कीर्तनकलानिधि दादाशास्त्री कायरकर यांनी या परिषदेत सुंदर संस्कृत भाषण केलें. शेवटचे दोन ठराव पुढील-प्रमाणे होते : (१) सर गंगाधरराव चिटनवीस, सर बिपिनकृष्ण बोस, ना. दादाभाई, डॉ. गौर व डॉ. मुंजे या गृहस्थांचें एक डेप्युटेशन या परिषदेचे ठराव घेऊन ना. चीफ कमिशनर यांच्या भेटीस जावें. व (२) प्रांतांतील राजकीय चळवळीचें कार्य प्रस्तुत परिषदेच्या धोरणावर सतत चालू ठेवण्यासाठी दोन्ही प्रांतांतील शंभर गृहस्थांची एक मंडळी नेमावी. या मंडळीने आपलें कार्यकारी मंडळ नेमून घ्यावें व जरूर वाटल्यास आणखी दहा सभासद अधिक घ्यावेत.

शेवटी दादासाहेब खापर्डे यांनी परिषद यशस्वी केल्याबद्दल व बाहेरगांवच्या लोकांची उत्कृष्ट व्यवस्था केल्याबद्दल कार्यकारी मंडळाला धन्यवाद देऊन पुढच्या वर्षीच्या परिषदेचें वऱ्हाडच्या वतीने निमंत्रण दिलें. नागपूरकरांच्या व स्वागत मंडळाच्या वतीने नारायणराव अळेकर यांनी आभार प्रदर्शन केल्यावर डॉ. हरिसिंग गौर यांनी अध्यक्षांचे आभार प्रदर्शन करणारें भाषण केलें. अध्यक्षांनी सर बिपिनकृष्ण बोस यांचा अत्यंत गौरवाने उल्लेख करून डॉ. मुंजे, ना. दादाभाई, डॉ. चोळकर, ना. दीक्षित, रा. ब. पंडित, अळेकर व धुंडिराजपंत ठेंगडी यांच्या परिश्रमांची प्रशंसा केली. त्यानंतर भिडे कन्याशाळेच्या मुलींनी 'सकल जगामधि छान, अमुचें प्रिकर हिंदुस्थान' हें गीत म्हटलें. नंतर बंगाली मुलींनी राष्ट्रगीत गायिलें. यानंतर वंदेमातरम्‌च्या घोषात परिषदेचें विसर्जन झालें.

प्रस्तुत परिषदेचें महत्त्व व श्रेय यांसंबंधी महाराष्ट्राने विस्तृत अग्रलेख लिहिला आहे. त्यातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे :

"ज्या नागपूरच्या प्रांतिक परिषदेकडे सर्व हिंदुस्थानचें लक्ष वेधलें होतें ती एकदाची निर्विघ्नपणे पार पडली हें पाहून आम्हांस अत्यंत आनंद वाटतो. मध्यप्रांत व वऱ्हाड येथील नेमस्त व राष्ट्रीय पक्षांत एकजूट होऊन संयुक्त परिषद भरविण्याचा हेतु जेव्हा प्रथम जाहीर करण्यात आला तेव्हा हें कार्य कसें काय पार पडतें याबद्दल सर्वत्र वाटाघाट चालू होती. परंतु संयुक्त प्रांतीय परिषद भरवून शंकेखोर लोकांच्या तोंडास नागपूरकरांनी कुलूप घातलें आहे. सुरतेच्या ब्रह्मघोटाळ्यानंतर नेमस्त पक्ष आणि राष्ट्रीय पक्ष यांच्यात समेट घडवून आणल्यावाचून यशस्वी व सर्वमान्य प्रांतिक परिषद भरविणें प्राय: असंभाव्य असल्यामुळे किंवा तसें करणें प्रांतिक हिताहिताच्या दृष्टीनें अनिष्ट असल्यामुळे कोणत्या तरी मार्गाने समेट घडवून आणावयाचाच असा नागपूरकरांनी जो संकल्प केला त्याचें फळ प्रांतिक परिषदेची ही बैठक होय. या कार्यात ना. चिटणीस, सर बिपिनकृष्ण बोस, डॉ. गौर, रा. ब. पंडित, ना. दीक्षित, श्री. नीळकंठराव उधोजी, डॉ. मुंजे, रा. अळेकर यांनी जी खटपट केली तिला लोकमान्य दादासाहेब खापर्डे, ना. मुधोळकर, ना. मोरोपंत जोशी, रा. द्रविड यांनी मनोभावें उत्तेजन दिलें. प्रांतातील सर्व कार्यकर्त्या पुरुषांनी एकदा समेट करावयाचा असें निश्चित केल्यावर आणि अंत:करणपूर्वक कार्यारंभ केल्यावर प्रांतातील सर्व उत्साही लोक त्यांच्या भोवती जमले यात काही नवल नाही. इतर लोकांना दुस्साध्य, निदान कष्टसाध्य भासणारें हें समेटाचें कार्य नाग-

पूरकरांनी लीलेने उरकलें याबद्दल सर्व हिंदुस्थान त्यांचे धन्यवाद गाईल अशी आमची खात्री आहे आणि समेटाची सर्वग्राह्य दिशा दाखविल्या-बद्दल त्यांच्यावर स्तुतीचा वर्षाव करील असेंही निश्चयात्मक विधान करण्यास आम्हांस शंका वाटत नाही.

"११४७ प्रतिनिधि आजपर्यंत हिंदुस्थानात कोणत्याही प्रांतिक परिषदेला आले होते असें आम्हांस तरी माहीत नाही. प्रथम दिवसाचा जमाव पाहून ही परिषद नव्हे, काँग्रेस आहे असे उद्गार सहस्र मुखांतून निघालेले आम्हांस अजून आठवत आहेत; आणि त्यांत थोडी दुरुस्ती करून, ही सांप्रतची काँग्रेस नसून सुरतेच्या बखेड्यापूर्वीची सर्वपक्षीय, सर्वराष्ट्रीय काँग्रेस आहे असें विधान करण्याची आम्ही वाचकांची परवानगी घेतो.

"या यशस्वी परिषदेत जय कोणाचा झाला असा वेडगळपणाचा प्रश्न कोणीही काढता कामा नये. समेट केल्यावर जय सर्व पक्षांचा व सर्व लोकांचा अशी उदारबुद्धि अंतःकरणात साठविली पाहिजे. समेटाच्या कारभारात प्रत्येक पक्षाचा थोडा जय आणि थोडा अपजय ठरलेलाच असतो. त्याशिवाय समेटाची कल्पनाच संभवत नाही. जय राष्ट्राचा ! !

"अनेक लोकांचे अनेक दिशांनी हात न लागले तर परिषदेचा गाडा हलणें दुष्कर होतें. ही गोष्ट जरी खरी; तरी डॉ. मुंजे यांनी कंबर बांधली नसती तर परिषद होणें अशक्य होतें. परिषदेचें श्रेय एकट्याच व्यक्तीस द्यावयाचें म्हटलें तर तें डॉ. मुंजे यांसच दिलें पाहिजे."

—महाराष्ट्र दि. २४-११-१५

परिषदेत जाणवण्यासारखी अनुपस्थिति अमरावतीच्या ना. मुधोळकरांची होती. ते आले पण पत्नीच्या आजारीपणाची अचानक तार आल्यामुळे निघून गेले. आपली परिषदेला सहानुभूति असल्याचें मात्र त्यांनी पत्रद्वारे कळविण्याची दक्षता घेतली होती. तसेंच ना. जोशी यांच्या घराशेजारीच प्लेगची केस झाल्यामुळे तेही आले नाहीत. या दोघांचींही कारणें खरीं नसून 'राजकीय' आहेत असा लोकांचा समज होता. टिळकांच्या मागे उद्धृत केलेल्या पत्रात श्री. न. चिं. केळकर परिषदेला प्रेक्षक म्हणून उपस्थित राहतील असा निर्देश होता. पण तात्यासाहेबांना पुण्याहून निघावयासच उशीर झाला. परिषदेनंतर ते दोन दिवसांनी नागपूरला आले व कलकत्त्याला, बंगालच्या राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांशी बोलणीं करण्यास्तव गेले.

या प्रांतिक परिषदेचें बोलकें चित्र म्हणून दि. १५ डिसेंबर १९१५-च्या महाराष्ट्रात एक अभंग प्रसिद्ध झाला होता. तो असा :—

"एकोणिसशें सात साली बिघडली।
घडी नागपुरी राष्ट्रीयांची ॥ १
झाले दोन पंथ साध्य जरी एक।
अंतर अधीक होत गेलें ॥ २
एक म्हणे माझा पंथ निष्कंटक।
दुजा म्हणे देख सत्य मार्ग ॥ ३
एशापरी वाद अमर्याद झाला।
भले भले त्याला बळी झाले ॥ ४
दोघे दोन वाटा हट्टाने धरिती।
ध्येयाते मुकती द्वैत भावे ॥ ५
त्रयस्थाचा बोध रुचेना कोणाला।
अंध करी त्याला अभिमान ॥ ६
लोहखंड दोन संतप्त करून।
ठोकिल्यावांचून न जूळती ॥ ७
शेखी (शेवटी) दया आली प्रभू अनंताला।
अनंतपुरीला एकी झाली ॥ ८
'गंगाधर' (चिटनवीस) देखे आत्मत्व 'गणेशी' (खापर्डे)।
'मुंजे' (डॉ. मुंजे) बिपिनाशी (बिपिनकृष्ण बोस) अभेदत्व ॥ ९
हा रंग देखून 'रंगनाथ' (मुधोळकर) आला।
आला तैसा गेला निरूपाये ॥ १०
सहानुभूतीचें पत्र पाठविलें।
येणें नाही झालें म्हणोनिया ॥ ११
सबब प्लेगाची (ना. जोशी) दाखविली कोणी।
नाही भल्यावाणी कृती केली ॥ १२
बजेट् सभेसाठी जोशीबुवा आले।
तेव्हा कोठे गेलें प्लेगभय? ॥ १३
स्वदेशभक्तीचें व्रत आचरीती।
त्यांना ऐशी कृती अनूचीत ॥ १४
प्रांतिक सभेला जरी रंग आला।
राष्ट्रीय ध्येयाला वगळलें ॥ १५
वादग्रस्त प्रश्न म्हणोनी टाकिला।
सिव्हिल सर्व्हिसला कां घेतलें? ॥ १६

असो, जें झालें तें उत्तम जाह्लें।
महत्कार्य झालें ऐक्यरूपी ॥ १७
तिसावी राष्ट्रीय-सभा मुंबापुरी।
येत्या डिसेंबरी भरणार ॥ १८
मुंबादेवी देवो सद्‌बुद्धी स्वापत्यां।
एकोप्याच्या कृत्या साह्य होवो ॥१९
जैसे लोहपंथ दोन्ही एक होती।
कल्याण गाठिती तैसे होवो ॥ २०

असो. या परिषदेनंतर डॉ. मुंजे यांना अखिल भारतीय राजकारणाच्या क्षेत्रात प्रतिष्ठा प्राप्त झाली. मध्यप्रांतात तर ते सर्व वेगवेगळ्या पक्षांच्या विश्वासाचें माहेरघरच झाले.

नागपूरच्या या अभूतपूर्व परिषदेनंतर मुंबईला राष्ट्रीय सभेचें अधिवेशन झालें. सर फेरोजशहा मेथा यांच्या निधनामुळे त्या अधिवेशनातला प्राण निघूनच गेलेला होता. या अधिवेशनाचे अध्यक्ष सत्यप्रसन्नसिंह हे होते. टिळकांनी या अधिवेशनाला यावें अशा सूचना अनेक नेमस्तपक्षीय वृत्तपत्रें करू लागलीं. त्याला टिळकांचें उत्तर असें होतें की, "समोरचा दरवाजा लावून घेता व माडीवर चढून मग घरात या असें म्हणता. हें तुमचें म्हणणें कोण ऐकेल? मद्रासेस ज्या सूचना करण्यात आल्या त्यांचा विचार व निर्णय सभेच्या आधी दहा बारा दिवस झाला तरीही आम्ही येऊ. राष्ट्रीय संस्थेला जर सर्वांची गरज असेल तर तिने नियमांचें दास्य झुगारून द्यावें आणि आपल्या भोवतालचा खंदक भरून काढावा किंवा त्यावर सोयीचा पूल टाकावा."

नागपूर प्रांतात समेट होऊन मवाळांनी समजूतदारपणाने राष्ट्रीय पक्षाच्या म्हणण्याप्रमाणे प्रतिज्ञापत्रक मान्य करणाऱ्या लोकांना जाहीर सभांमार्फत निवडून येण्याला मोकळीक ठेवली होती. प्रतिज्ञापत्रकावर सही करण्याचा मवाळांचा आग्रह व जाहीर सभांमार्फत निवडून येण्याचा राष्ट्रीय पक्षाचा आग्रह दोघांनीही मान्य केला व समेट झाला. प्रांतिक परिषदांतून जो समजूतदारपणा असू शकतो तितका एवढ्या मोठ्या राष्ट्रीय सभेत कां असू नये असा टिळकांचा प्रश्न होता.

मुंबईकरांनी आपला हट्ट सोडला नाही व टिळक त्या राष्ट्रीय सभेला गेले नाहीत. मुबईला आलेले मुंबई बाहेरचे सर्व मवाळ पक्षीय पुढारी समेटाला व टिळकांना आत घ्यावयास उत्सुक असल्याचें दिसून आल्यामुळे मुंबईकरांच्या हटवादाचें पितळ उघडें पडलें. या राष्ट्रीय

सभेचे अध्यक्ष सत्यनारायण सिंह यांचें भाषण नेमस्तांना न आवडण्या-सारखें मिळमिळीत झालें. ठराव मात्र अध्यक्षांना झोंबण्याइतके झण-झणीत झाले. या राष्ट्रीय सभेला ॲनी बेझंट गेल्या होत्या. त्यांनी स्वराज्यावरील मुख्य ठरावाला पुढीलप्रमाणे उपसूचना आणली. "हिंदु-स्थानला वसाहतीसारखें स्वराज्य देण्याची व तदनुसार स्वराज्य योजना करण्याची वेळ आता आली आहे." घाबरलेल्या अध्यक्षांनी, होमरूल हें ध्येय असलें तरी कॉंग्रेसच्या उद्देशांत तें बसत नाही या सबबीवर आपल्या अधिकारात ती नियमबाह्य ठरविली !

नागपूरची प्रांतिक परिषद, मुंबईची राष्ट्रीय सभा व देशातील वातावरण यांनी हें सिद्ध केलें की, मुंबईच्या मूठभर हटवादी लोकांपली-कडे कोणीही समेटाच्या विरुद्ध नसून कॉंग्रेसमध्ये परिवर्तन होणें आव-श्यक आहे. परिवर्तन होण्याची आवश्यकता जेव्हा सर्वांनाच वाटते तेव्हा तें घडून येतेंच. तसें परिवर्तन पुढच्याच वर्षी म्हणजे १९१६-मध्ये घडून आलें. १९१५-मध्ये राष्ट्रीय सभेतील जुन्या युगाचा अस्त ना. गोखले व सर फेरोजशहा मेथा यांच्या निधनाने झाला. आगामी नव्या युगाच्या उदयाचीं चिन्हें दिसू लागलीं. लोकमान्य टिळक व डॉ. ॲनी बेझंट हे या नव्या युगाचे पथप्रदर्शक दीपस्तंभ होते.



प्रकरण सतरावें

# राष्ट्रीय सभेत पुन्हा प्रवेश

सन १९१५-मध्ये महायुद्धात सरकार जरी एका बाजूला साहाय्याची याचना करीत असलें व हिंदुस्थानाविषयी मित्रत्वाची भाषा वापरीत असलें तरी दुसऱ्या बाजूला त्या भाषेवर विश्वास ठेवण्यात अर्थ नाही अशी भारतीयांची खात्री पटावी असें अत्याचारी पाऊल सरकारने उचललेलेंच होतें. मार्च १९१५-मध्ये भारत संरक्षण निर्बंध करण्यात आला. या निर्बंधान्वये वॉरंटाशिवाय 'उपद्रवी मनुष्य' म्हणून कोणालाही पकडून स्थानबद्ध करण्याचे अथवा तुरुंगात टाकण्याचे अधिकार पोलिसांना देण्यात आले होते. तसेंच खास न्यायालयात चौकशी करून कोणालाही शिक्षा देता येत होती व या शिक्षेवर अपील करता येत नव्हतें. माँटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टमध्ये या कायद्यासंबंधी पुढीलप्रमाणे उद्गार काढले आहेत :—

It was inevitably a drastic measure. It gave the Governor-General-in-Council wide rule-making powers with a view to securing the public safety and defence of the country and also provided for the creation of special tribunals for the quicker trials of certain classes of cases in disturbed tracts. The bill was naturally rather a severe trial to the Indian elected members. As loyal citizens they supported its principle; but they made no secret of their aversion to particular provisions and moved many amendments, against which Government used its official majority without hesitation as they would destroy the efficacy of the bill.

( हा कायदा अर्थातच कठोर स्वरूपाचा होता. गव्हर्नर-जनरलला त्याने नियम करण्याचे व्यापक अधिकार दिले होते. सार्वजनिक शांतता आणि देशाचें संरक्षण हा त्यामागील हेतु होता. त्याखाली विशेष अस्वस्थतेच्या भागात काही प्रकारचे गुन्हे तडकाफडकी निकालात काढण्याकरिता विशेष न्यायालयांची स्थापना करण्याची तरतूद होती. भारतातील निवडून गेलेल्या सभासदांना तर ही एक परीक्षेची कसोटी-चीच वेळ होती. राजनिष्ठ नागरिक या नात्याने त्यांनी बिलातील तत्त्वांना मान्यता दिली; पण या कायद्यातील कित्येक कलमांबद्दल त्यांनी

आपली स्पष्ट नापसंती व्यक्त केली, व त्यात दुरुस्ती व्हावी म्हणून शेवटी उपसूचना सुचविण्यात आल्या. त्यांच्याविरुद्ध सरकारने आपल्या अधिकाऱ्यांच्या बहुसंख्येच्या जोरावर त्या सर्व हाणून पाडल्या. त्या पास होत्या तर त्यायोगे बिलाच्या उपयुक्ततेवर कुऱ्हाड पडली असती.)

हा कायदा होताच तो तत्काळ पंजाब व बंगालला लागू करण्यात आला. पंजाबमध्ये कामागोटामारूचें प्रकरण (याचा संपूर्ण वृत्तान्त आमच्या भारतीय स्वातंत्र्यसमर या ग्रंथात आलेला आहे.) व गदरच्या क्रांतिकारक चळवळीचीं पदचिन्हें दिसू लागलीं होतीं, व बंगालमध्ये तर सन १९०८-च्या खुदीरामच्या बाँब स्फोटाने प्रारंभ झालेलें क्रांतियुग वर्धिष्णु होतें. या चळवळींच्या दमनासाठी इंग्रजी राज्यकर्त्यांची वक्र-दृष्टि प्रथम या प्रांतांच्याकडे वळली. तुरुंगात डांबण्यात येणाऱ्या देश-भक्तांचे अतोनात हाल करण्यात येत. हे वस्तुत: राजबंदी असतानाही त्यांना पशुतुल्य वागणूक देण्यात येई.

महायुद्धाच्या संधीचा लाभ घेऊन या अन्यायांविरुद्ध दाद मागण्यासाठी व युद्धोत्तर परिस्थितीत, युद्धात केलेल्या साहाय्याचें योग्य फलित भारताच्या पदरात पडावें अशी खटपट करण्यासाठी राष्ट्राची एकमुखी प्रातिनिधिक अशी निर्भय संस्था असणें आवश्यक होतें. वस्तु-स्थिति मात्र अशी होती की, नेमस्त व जहाल आणि काँग्रेस व मुस्लिम लीग अशी राष्ट्राच्या शक्तीची चतुर्विध विभागणी होऊन हे विभाग आपापसांत टक्कर घेत होते. ही चतुर्विध विभागणी नष्ट करून एकमुखी राष्ट्रशक्ति राष्ट्रीय सभेच्या रूपाने उभी करण्याच्या प्रयत्नास टिळक लागले. नामदार गोखले व सर फेरोजशहा मेथा हेच समेटाचे खरे विरोधक होते. ते गेल्यामुळे समेटाचा मार्ग तितकासा कंटकमय उरला नव्हता. टिळकांनी नागपूर परिषदेवर बोट ठेवून समेटाचा मार्ग सुचविला. पण त्याचबरोबर मवाळांच्या प्रतिज्ञापत्रकावर सही करून आत प्रवेश करण्यापूर्वी राष्ट्रीय सभा ताब्यात घेण्याच्या दृष्टीने आपल्या पक्षाचें बळ संघटित करणें आवश्यक होतें. ॲनी बेझंट यांनी टिळकां-चीच स्वराज्यसंघाची कल्पना पुढे मांडल्यामुळे १९१५-च्या डिसेंबर-पासूनच टिळकांच्या केसरीने होमरूल लीगच्या कल्पनेचा पाठपुरावा प्रारंभ केला. मुंबईची काँग्रेस चालू असतानाच पुण्याला टिळकांनी स्वराज्यसंघानें ध्येय मान्य असणाऱ्या आपया अनुयायांची बैठक बोलाविली. दि. २४ व २५ डिसेंबरला पुण्याला सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यात ही बैठक झाली. या बैठकीला सर्व महाराष्ट्रातून एकंदर १७५ प्रतिनिधि आले होते. कलकत्त्याची मंडळी येऊ शकली नाहीत.

तरी मोतीलाल घोष, व्योमकेश चक्रवर्ती, हिरेन्द्रनाथ दत्त व शामसुंदर चक्रवर्ती यांचीं अनुकूलतेचीं पत्रें आलीं होतीं. श्री. दादासाहेब खापर्डे हे परिषदेचे अध्यक्ष होते. नागपूरहून डॉ. मुंजे, डॉ. ल. वा. परांजपे, धुंडिराजपंत ठेंगडी, मोरोपंत अभ्यंकर व यवतमाळहून माधवरावजी अणे आले होते. परिषदेत टिळकांनी स्वराज्यसंघाची कल्पना व उद्दिष्ट विशद करणारें भाषण केलें. नंतर टिळकांनी स्वतः पुढील ठराव मांडला :– सनदशीर मार्गाने साम्राज्यांतर्गत स्वराज्य मिळविण्यासाठी खटपट करणारी एक संस्था हिंदुस्थानात पाहिजे. त्या संस्थेत या कार्यास अनुकूल असणाऱ्या प्रत्येक मनुष्याचा समावेश करण्याची सवड असली पाहिजे. या उद्देशाने खालील कमेटी नेमण्यात येत आहे. तिने पुढील प्रश्नांचा विचार करून तो येत्या मार्चअखेर जाहीर करावा. (१) 'होमरूल' मिळविण्यासाठी संघ काढावा काय? (२) त्या संघाची घटना कोणत्या प्रकारची असावी? व (३) अशाच प्रकारचे आणखी दुसरे संघ राष्ट्रात निघाल्यास त्यांना या संघाने कशी मदत करावी?"

परिषदेने नियुक्त केलेल्या समितीचे कार्यवाह श्री. न. चिं. केळकर हे होते व समितीत पुढील सभासद होते : (१) श्री. दादासाहेब खापर्डे, (२) बॅ. बॅप्टिस्टा, (३) लो. टिळक, (४) रा. ब. चिंतामणराव वैद्य, (५) ना. बेळवी, (६) दादासाहेब करंदीकर, (७) डॉ. मुंजे, (८) फणसळकर, (९) डॉ. चंदुलाल देसाई, (१०) माधवराव (बापूजी) अणे, (११) अळतेकर (सदाशिवराव) (१२) बोडस व (१३) अळेकर.

या बैठकीच्या एकवर्ष पूर्वी ॲनी बेझंट यांच्या उपस्थितीत डॉ. मुंजे यांनी होमरूलची चर्चाच उधळून लावली होती. कारण ॲनी बेझंट यांच्यावर मुंजे यांचा, त्या इंग्रज असल्यामुळे, विश्वास नव्हता. या प्रसंगाचें वृत्त डॉ. मुंजे यांनी स्वतःच लिहिलें आहे. त्या वेळी सर फेरोजशहा मेथा व गोखले जिवंत होते. सन १९१४-च्या डिसेंबरमधील ही गोष्ट असावी. मुंजे लिहितात :–

"खटल्यात बळवंतरावांना सहा वर्षांची शिक्षा झाली आणि ते १९१४-मध्ये सुटून आले. या सहा वर्षांच्या अवधीत महाराष्ट्राचा आत्मा व चैतन्य स्थगित अवस्थेत होतें. टिळकांचा अनुयायी राष्ट्रीय पक्ष आपापल्या स्थानी जीव धरून राहिला होता. टिळकांसारखा धडाडीचा व युक्तिबाज असा म्होरका नसल्यामुळे राष्ट्रीय पक्षास जागचे जागी, विशेष गवगवा न करता आपलें कार्य करीत टिळकांची चातका-प्रमाणे मार्गप्रतीक्षा करीत राहणेंच शहाणपणाचें होतें. परंतु त्यांनी आपला पक्ष सोडला नाही आणि सुरतेस कै. फेरोजशहा मेथा यांनी

स्थापिलेल्या नवीन कन्व्हेन्शन कॉंग्रेसला ते सामील झाले नाहीत. अशा या स्थितीत १९१४ साली बळवंतराव हे सुटून आले. महाराष्ट्रात नवीन चैतन्य व आवेश संचरल्याप्रमाणे भासू लागला. या अवधीत टिळक पक्ष मेला असावा म्हणून सरकारास जें सुखस्वप्न पडत होतें तें सर्व एका क्षणात लयास गेलें. पुन्हा राजकारणाची घडी नीट बसवून कॉंग्रेस काबीज करण्याची कल्पना मनात येऊ लागली. अशा वेळेस बेझंट-बाईंनी बळवंतरावांस पत्र लिहून कळविलें की, "कॉंग्रेसमधील दोन्ही तटांत समेट होणें अवश्य आहे आणि तशी इच्छा असल्यास मी प्रयत्न करण्यास तयार आहे." बाईंनी हें असें लिहिल्यावरून बळवंतरावांनी सर्व महाराष्ट्रातील प्रमुख पुढाऱ्यांस पुण्यास बाईंची भेट घेण्यास पत्रें लिहिलीं. इकडून दादासाहेब खापर्डे व मी गेलो. सातारा-पुण्याचीही मंडळी हजर होती. बळवंतरावांच्या लायब्ररी हॉलमध्ये आम्ही सर्व जमलो. बैठक देशीच होती. बाई व बाईंच्या समागमे आलेले, मला वाटतें, श्री. एन्. सुब्बाराव हे दोघे खुर्चीवर बसले होते. इतर मंडळींत रा. शिवरामपंत परांजपे, रा. दादासाहेब करंदीकर, रा. वासुदेवराव जोशी, रा. खाडिलकर, रा. दादासाहेब खापर्डे, मी व आणखी मंडळी होती. बाईंनी समेट केला पाहिजे, या दुहीपासून राष्ट्राचें अतोनात नुकसान होत आहे वगैरे प्रतिपादन केलें. इतर मंडळीही या गोष्टीस कबूल झाली. बळवंतराव अटींसंबंधाने बोलावयास लागले; इतका वेळपर्यंत मी गप्प होतो. बळवंतराव बोलू लागताच मी पुढे सरसावलो व बळवंतरावांस म्हणालो :

"आपण सहा वर्षें आमच्यांत नव्हता. या अवधीत झालेल्या गोष्टींची आपणांस माहिती नाही. आपण सध्याच या भानगडीत पडू नये. आम्ही बाईंशी समेटाच्या अटींसंबंधाने बोलतो. मध्येच काही अडचण उपस्थित झाल्यावर बाई व आम्ही सर्व आपली सल्ला घेऊ. सध्या आपण बोलू नये." बळवंतराव स्वस्थ बसले आणि लगेच मी बाईंशी बोललो, "आम्ही सर्व येथे राष्ट्रीय पक्षातील आपापल्या मंडळींशी विचार करून आलो आहोत. तेथे आपल्यात जें काही ठरेल तें सर्व आमचा राष्ट्रीय पक्ष कबूल करील. आपण सर फेरोजशहांशी बोलून आला आहात काय? येथे जें ठरेल तें त्यांस मान्य होईल असा त्यांनी आपणांस अधिकार देऊन ठेवला आहे काय?" असें मी बोलत असता बाईंनी मी कोण आहे म्हणून जवळच्या मंडळींशी विचारपूस केली. मी नागपूरचा डॉ. मुंजे आहे हें कळताच बाईंच्या कपाळावर आठ्या आल्याशा दिसल्या. बाईंनी थोडें तिरसून उत्तर दिलें की, फेरोजशहा

मेथांशी त्यांचें बोलणें झालेलें नाही व त्यांनी तसा अधिकारही त्यांना दिलेला नाही. यावर मी म्हणालो, "मग उगाच वेळ घालविण्यात काय हशील आहे? जेथे सर फेरोजशहांची कबुली नाही तेथे समेट होणें शक्य नाही." बाई थोड्या संतापल्यासारख्या दिसल्या, व बरें आहे म्हणून उठून जाऊ लागल्या. बळवंतरावही त्यांना पोहोचविण्यास त्यांचे बरोबर जाण्यास उठले व काही वेळाने बाई गेल्यावर मंडळींत परत आले. बळवंतराव मला म्हणाले, "बाईंशी तुम्ही अशा तुसडेपणाने कां बोललात?" मी म्हणालो, "हा इंग्रजी मायावीपणा आहे; आपण आपसांत भावाभावाप्रमाणे भांडलो, मग आपसातच भावाभावाप्रमाणे समेट कां करू नये? तिसरा परकी मध्ये कां येऊ द्यावा? आपणांला समेट हवाच आहे. चला, आपण गोपाळराव गोखल्यांजवळ चलू आणि त्यांच्या ज्या असतील त्या अटी कबूल करू आणि आपसांत समेट करून घेऊ. पुढे मग ज्या रीतीने होईल त्या रीतीने काँग्रेस काबीज करण्याचा प्रयत्न पुन: करू. परकीयांची मध्ये लुडबूड नको?" बळवंतराव म्हणाले, "तुमचें म्हणणें खरें; आपणांला जें हवें तेंच आपण केलें पाहिजे. पण झाला तो थोडासा उद्धटपणाच झाला." मी म्हणालो, "माझ्याकडून चूक झाली असेल तर क्षमा करा." पुढे संध्याकाळी मग बळवंतराव, दादासाहेब खापर्डे यांना व मला बरोबर घेऊन बाईंच्या व गोखल्यांच्या भेटीस Servants of India Society मध्ये गेले. गोखले त्या वेळेस थोडे आजारीच होते."

—लो. टिळक यांच्या आठवणी व आख्यायिका, खंड २ रा, पृष्ठसंख्या ५०६—५०८

ॲनी बेझंट यांच्यावर मुंजे यांचा विश्वास नसला तरी टिळकांच्या स्वतंत्र स्वराज्यसंघाचें रहस्य ओळखून ते त्यात समाविष्ट झाले.

डिसेंबर १९१५-मधील पुण्याची राष्ट्रीय पक्षाची बैठक संपल्यावर मुंबई काँग्रेसच्या पुढाऱ्यांना पुण्यास येण्याचें टिळकांनी निमंत्रण दिलें. त्यासाठी श्री. न. चिं. केळकर हे मुंबईला गेले होते. या निमंत्रणानुसार सी. वाय्. चिंतामणि, नागपूरचे ना. पंडित व मद्रासचे गोविंद राघवय्यर हे नेमस्त पुढारी पुण्यास आले. लो. टिळकांच्या अध्यक्षतेखाली पुण्यास त्यांचें स्वागत व भाषणें झालीं. समेटाच्या प्रयत्नांतीलच हा एक भाग होता.

जानेवारी महिन्यातच नागपूरलाही ऐक्याची निदर्शक अशी विशेष घटना घडली. नागपूरच्या प्रांतिक परिषदेत ठरल्याप्रमाणे दि. १२ जानेवारी १९१६-ला ना. सर गंगाधरराव चिटनवीस, सर बिपिन

बोस, डॉ. हरिसिंग गौर, डॉ. मुंजे व रायपूरचे रायसाहेब ठक्कर यांचें एक शिष्टमंडळ चीफ कमिशनर बेंजामिन रॉबर्टसन यांना भेटलें व प्रांतिक परिषदेचे ठराव त्यांनी त्यांना सादर केले.

सन १९१६-च्या जानेवारीपासून नागपूरच्या वातावरणात गीता-रहस्याचा वाद विशेष रंगला होता. या सुमारास वाईचे धर्ममार्तंड व धर्म या नियतकालिकाचे संपादक पं. भाऊशास्त्री लेले हे नागपूरला आले व त्यांची टिळकांच्या गीतारहस्याच्या खंडनपर व्याख्यानमाला झाली. तिला उत्तर देण्यासाठी पं. दिनकरशास्त्री कानडे यांची गीता-रहस्याच्या मंडनपर व्याख्यानमाला झाली व ती विशेष गाजली. हा वाद बराच रंगला. त्यात पुढे नागपूरचे प्रकांडपंडित महामहोपाध्याय कृष्णशास्त्री घुले हेही पडले. डॉ. मुंजे यांच्या तालमीत तयार झालेले राष्ट्रीय कीर्तनकार दादाशास्त्री कायरकर यांनी या वेळी मुंजे यांच्या सूचनेवरून गीतारहस्याच्या प्रचारासाठी मराठी मध्यप्रांतात दौराही केला.

असो. १९१५-च्या डिसेंबरपासून टिळकांनी आपला पक्ष स्वराज्य-संघाच्या नांवाने संघटित करावयाचा व दुसऱ्या बाजूला समेट करून व काँग्रेसमध्ये शिरून ती अधीन करून घ्यावयाची असें जें द्विदल राज-कारण प्रारंभ केलें होतें तें अनुयायांच्या गळी उतरविण्याची संधि त्यांनी बेळगाव परिषदेच्या वेळी साधली. बेळगावच्या परिषदेचें राष्ट्रीय पक्षाच्या काँग्रेस विजयाच्या दृष्टीने अतिशय महत्त्व आहे. या परि-षदेचे स्वागताध्यक्ष श्री. बेळवी होते व अध्यक्ष दादासाहेब खापर्डे होते. खापर्डे यांना अध्यक्ष म्हणून निवडण्यात बेळगावच्या लोकांनी दाख-विलेल्या चातुर्यासंबंधी दि. १९ एप्रिल १९१६-चा नागपूरचा महाराष्ट्र लिहितो, "परिषदेसाठी श्री. दादासाहेब खापर्डे यांस अध्यक्ष निवडण्यात बेळगावकर मंडळींनी मोठेंच मार्मिकत्व दाखविलें आहे. ज्या 'सरकारी प्रांतात प्रांतिक सभा भरेल त्या प्रांतातल्याच चतुःसीमेचा अध्यक्ष पाहिजे अशी वहिवाट पडून गेली आहे. ती मोडणें जरूर होतें. यंदाच्या बेळगाव परिषदेपुढे 'होमरूल' व 'काँग्रेसचा समेट' हे दोन विषय वाटावाटीस निघावयाचे आहेत. त्यांचा निकाल केवळ मुंबई इलाख्या-तील लोकांनीच लावावयाचा नसून त्यात मध्यप्रांत व वऱ्हाड येथील मंडळींचाही समावेश व्हावा असें गेल्या डिसेंबरातच ठरलें होतें. अशा मुंबई प्रांताच्या व नागपूर वऱ्हाडच्या संयुक्त परिषदेस अध्यक्षही तसाच दोन्ही प्रांतांना मान्य असा पाहिजे होता. तो दादासाहेबांइतका सत्पात्र, विद्वान् व अनुभवी असा मिळणें कठीण होतें. खऱ्या महाराष्ट्राचें राजकीय एकीकरण करण्याचें श्रेय बेळगावकरांनी प्रथम घेतलें आहे."

बेळगावच्या परिषदेचें लोकांच्या दृष्टीने द्विविध आकर्षण होतें. एक म्हणजे लो. टिळक या परिषदेस उपस्थित राहणार होते. दुसरें म्हणजे त्या वेळचे बॅरि. मोहनदास करमचंद गांधी व नंतरचे महात्माजी या परिषदेस येणार होते. गांधी त्या वेळी दक्षिण आफ्रिकेतील त्यांच्या लढ्यामुळे प्रसिद्धीस आलेले असून त्यांच्यासंबंधी लोकांत विशेष आकर्षण होतें.

असो. बेळगावची ही अठरावी प्रांतिक परिषद दि. २९ एप्रिल १९१६-ला प्रारंभ झाली. लोकांत इतका विलक्षण उत्साह होता की, सातार्‍यापासून बेळगावपर्यंत खापर्डे व टिळकांचें अपूर्व स्वागत झालें. बेळगाव स्टेशनवरील स्वागत तर फारच थाटाचें होतें. या परिषदेला १६५० वर प्रतिनिधि आले होते. स्टेशनपासून गावापर्यंत अध्यक्षांची व टिळकांची प्रचंड मिरवणूक निघाली. जनसागराला अश्रुतपूर्व भरती येऊन त्यातून मिरवणुकीच्या वेळी 'वंदे मातरम्'च्या गजराच्या लाटा वारंवार उचंबळत होत्या.

दि. २९-ला दुपारी २-ला परिषदेला प्रारंभ झाला. गांधी त्याच दिवशी आले. स्वागताध्यक्ष ना. बेळवी यांनी समेटाचा मुद्दा मांडताना असें सांगितलें की, "राष्ट्रीय पक्षाचा राष्ट्रसभेत प्रवेश होण्याचे बाबतीत जी कडक मर्यादा घालण्यात आली आहे तिचें स्वरूप अत्यंत ओंगळ आहे. केवळ नाखुषीने भिक्षेचे चार दाणे टाकण्यापैकीच हा उद्योग आहे. राष्ट्रीय सभेच्या घटनेचें पहिलें कलम आपण मान्य केलेंच आहे. आता राहिलेला वाद केवळ क्षुल्लक मुद्द्यांसंबंधीचा आहे. माझें आपणांस येवढेंच कळवळ्याचें सांगणें आहे की, आपण व्यापक दृष्टीने व मुत्सद्दीपणाने या प्रश्नाचा निकाल लावावा."

यानंतर अध्यक्ष दादासाहेब खापर्डे यांचें अध्यक्षीय भाषण झालें. त्यातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे:

"सर्व जगास हलवून सोडणारें महायुद्ध अजून चालूच आहे. सध्याच्या अडचणीच्या प्रसंगी कोणताही वादग्रस्त प्रश्न उपस्थित करू नये असें म्हणतात. पण ते चुकत आहेत. साम्राज्य तरी या लढाईत कां पडलें? युरोपातील छोट्या राष्ट्रांचें स्वातंत्र्य अबाधित रहावें म्हणूनच ना! म्हणजे ज्या त्या देशाने आपला कारभार जातीने पहावा हेंच तत्त्व साम्राज्याने हृदयाशी बाळगलेलें दिसतें. त्यामुळे स्वराज्याची मागणी करण्यात आपण साम्राज्य सरकारला प्रिय अशाच गोष्टीची मागणी करीत आहोत. म्हणून स्वराज्यसंघ स्थापण्याच्या प्रश्नाचा विचार करण्याकरिता बसलेल्या मंडळाने यासंबंधी अंगीकारलेला ठराव मला बरोबर व योग्य वाटतो. तो ठराव मी वाचून दाखवितो.

"स्वराज्य संघ संस्थेच्या कमेटीने असें ठरविलें आहे की, सर्व सनदशीर उपायांनी खटपट करून हिंदुस्थानाकरिता होमरूल म्हणजेच स्वराज्य मिळविण्याकरिता व तत्प्रीत्यर्थ लोकांना शिक्षण देऊन लोकमत तयार करण्याकरिता हिंदुस्थानात स्वराज्यसंघ स्थापन करणें योग्य आहे."

यानंतर दादासाहेबांनी काँग्रेसच्या स्थापनेपासून तिच्या आजवरच्या स्थित्यंतरांचा आढावा घेतला व प्रचलित प्रश्नाकडे वळून ते म्हणाले, "सुरतेनंतर कन्व्हेन्शन पक्षाने राष्ट्रीय सभेस विशिष्ट पक्षाच्या क्लबाचें अथवा मजलसीचें स्वरूप देण्याचा प्रयत्न चालविला असताना तिचें मूळचें पार्लमेंट स्वरूपाचें खुलें धोरण कायम राखण्याचा राष्ट्रीय पक्षाने प्रयत्न सुरू ठेविला आहे. जसजशी उत्क्रांति होत जाते तसतशी नवी रचना वारंवार करावी लागते, व पुष्कळ वेळा दुःखद अनुभव घेतल्यावाचून ती घडून येत नसते. नेमस्तांची तळी उचलून धरणाऱ्या सरकारी धोरणामुळे नेमस्तांस एकतंत्री सत्ताधारी अधिकाऱ्यांचें चांगलेंच पाठबळ मिळून त्यांचे दिवस सुखात गेले. हिंदी राष्ट्रीयांस मात्र पुष्कळच सहनशीलता दाखविणें भाग पडलें व त्यांनी ती दाखविलीही. राष्ट्रीय-नेमस्तांच्या या झगड्यात राष्ट्रीयांनी नेमस्तांच्या मजबूत खडकाला अखेरीस अगदी लहान अरुंद का होईना, परंतु एक भगदाड पाडलेंच. आता आपणांपुढे असा प्रश्न आहे की सर्व खडक उद्ध्वस्त होऊन जाईपर्यंत ह्या अरुंद भगदाडातून आत प्रवेश करावयाचा कीं नाही?"

या परिषदेत अनेक महत्त्वाचे ठराव झाले. पण सर्वांत महत्त्वाचा ठराव समेटाचा होता. तो ठराव असा : "स्वदेशाच्या हिताकडे, दूरवर दृष्टि देता आणि सध्याची परिस्थिति पाहता दोन्ही पक्षांमध्ये समेट होणें इष्ट आहे. म्हणून मुंबईस काँग्रेसने घटनेत केलेली दुरुस्ती पूर्ण समाधानकारक नसली तरी ती मान्य करावी आणि राष्ट्रीय सभेत जाऊन अधिक वाटाघाटी व प्रयत्न करावयास्तव टिळक, खापर्डे, बॅप्टिस्टा, बेळवी व केळकर इतक्या लोकांची एक समिति नेमावी." या ठरावावर तो खुल्या परिषदेत मांडला जाण्यापूर्वी बैठकीत खडाजंगी झाली. डॉ. मुंजे अशा अपमानकारक समेटाला अनुकूल नव्हते. त्यांनी टिळकांना या बैठकीत त्यांच्या तोंडावर, "तुमचा अवतार संपला असा याचा अर्थ आहे" असें सांगितलें. पण त्यांची टिळकांवर निष्ठा इतकी विलक्षण की, त्यांनी तें चुकीचें वाटलें तरी केवळ टिळकांच्या शब्दासाठी मान्य केलें. खुल्या अधिवेशनात स्वतः लो. टिळकांनी ठराव मांडला व इच्छा नसूनही मुंजे यांनी त्याला पाठिंबा दिला. पुढे लवकरच मुंजे यांना स्वतःची चूक कळून आली. डॉ. मुंजे आपल्या आठवणीत लिहितात :

"क्रीडवर सही करून काँग्रेसमध्ये शिरणें ही गोष्ट माझ्या बुद्धीला मुळीच पटत नाही आणि परशुरामाचा व श्रीकृष्णाचा पराभव त्यांचे अवतार संपल्यामुळे जसा झाला, तसा काँग्रेसमध्ये तुम्ही शिरल्याने तुमचा होणार असें मी जवळजवळ स्पष्टपणे टिळकांना सांगितलें. तरी पण मी असें म्हणालो की, तुम्ही माझ्यापेक्षा अनंत पटीने शहाणे आहा आणि तुमच्या शहाणपणावर माझा पूर्णपणे विश्वास आहे. अर्थात् ही श्रद्धेच्या परीक्षेची वेळ आहे म्हणून मी तुमच्या विरुद्ध जाणार नाही. अकल्याण व्हावयाचें असेल तर तुमची आज्ञा पाळून होवो. पण तुम्ही मात्र ही चूक करीत आहा." तेव्हा टिळक मला म्हणाले, "या वेळेस हेंच करणें शहाणपणाचें आहे हें तुमच्या लवकरच प्रत्ययाला येईल." तिसऱ्या दिवशी टाइम्सने असें लिहिलें की, "समेटाच्या ठरावाने टिळकांनी काँग्रेस काबीज केली. तेव्हा माझे डोळे उघडले."

—समग्र केळकर वाङ्मय, खंड २ रा, पृ. ५२०–२१

टिळक क्रीडवर सही करून आले तरी तो त्यांचाच विजय आहे. कारण की, ते काँग्रेस ताब्यात घेतील याची गोखले यांनाही जाणीव होती असें दिसतें. श्री. श्रीनिवास सेटलूर यांची एक आठवण या दृष्टीने बोधप्रद आहे. ते लिहितात "मी गोखले यांच्या भेटीस गेलो त्या वेळी ते आरामखुर्चीवर पडले होते. त्यांनी हसतमुखाने माझें स्वागत केलें व मला खुर्चीवर बसण्यास सांगितलें. बसल्यावर मी त्यांना माझ्या भेटीचीं दोन कारणें सांगितलीं. ते आजारी असल्यामुळे त्यांची एकवार भेट घ्यावी हा माझा एक हेतु होता, व दुसरा उद्देश दोन पक्षांतील ऐक्यासंबंधाचा.

या दुसऱ्या उद्देशाचा मी नुसता उल्लेख करताच त्यांच्या दुर्बल झालेल्या शरीरात आवेश निर्माण झालासें दिसलें. ते आपल्या खुर्चीतून एकदम उठले आणि वरपासून खालपर्यंत माझ्याकडे पाहत म्हणाले,

"अहो सेटलूर, डॉक्टरांनी मला बोलण्यास मनाई केली आहे. तथापि माझ्या माहितीप्रमाणे टिळकांच्या पक्षात तुमचें जें वजन आहे तें लक्षात घेता मी तुमच्याजवळ सर्व काही मोकळेपणाने बोलतो. तुम्ही माझें सगळें ऐकून घ्या. मध्येच दुसरें विचारू नका.

"तुमचें टिळकांच्या जवळ जें वजन आहे त्याचा उपयोग करा व बेझंटबाई येथे आल्या आहेत त्यांच्या वतीने बसूंच्याकडे ज्या अटी पाठविल्या आहेत त्या त्यांना मान्य करण्यास लावा."

मद्रास काँग्रेसने ज्या अटी मान्य केल्या त्या त्यांनी मला सांगितल्या व त्या योग्य आहेत ना असें मला विचारलें. मी त्यांना तत्काळ उत्तर दिलें की, "होय, त्या योग्य आहेत, व टिळकांचा त्यांना विरो

असणार नाही." तें ऐकून गोखले यांनी समाधान व्यक्त केलें व ते म्हणाले की, "एवढी जरी काळजी आम्ही घेतलेली असली तरी मला हें दिसत आहे की थोड्याच वर्षांत टिळक काँग्रेस काबीज करणार." नंतर थोडा वेळ थांबून ते गंभीरपणे म्हणाले, "टिळकांनी जर हें सरळ-पणे मान्य केलें तर आम्ही त्यांना काँग्रेसमध्ये स्वीकारलें पाहिजे. कारण याचा अर्थ देशातील बहुसंख्य जनता त्यांच्या बाजूची आहे असा होईल."

—लो. टिळकांच्या आठवणी व आख्यायिका, खंड २ रा, पृ. ६५६

असो. खुल्या अधिवेशनात टिळकांनी स्वत: हा ठराव मांडला व समेटासंबंधीची आपली भूमिका विशद करणारें भाषण केलें. त्याला डॉ. मुंजे यांनी पाठिंबा दिल्यावर कोणाचाही विरोध न होता हा ठराव एकमताने संमत झाला व टिळकांचें एक काम संपलें.

या परिषदेत टिळकांचें दुसरें काम होमरूल लीग अथवा स्वराज्य-संघाच्या स्थापनेसंबंधीचें होतें. दि. २८ एप्रिलला बेळगांवला संबंधित लोकांची एक बैठक टिळकांनी घेतली. या बैठकीत पहिलाच असा ठराव करण्यात आला की प्रांतिक परिषद व होमरूल लीग यांचा काही संबंध नाही असें मानावें. ही बैठक मागे वर्णिलेल्या पुणें येथील दि. २३ व २४ डिसेंबरच्या बैठकीत निवडलेल्या पंधरा लोकांच्या समितीची होती. या बैठकीत हिंदी स्वराज्य संघाची रीतसर स्थापना करण्यात आली. बॅ. बॅप्टिस्टा हे या संघाचे अध्यक्ष होते. न. चिं. केळकर हे मुख्य कार्यवाह व दा. वि. गोखले हे सहकार्यवाह होते. टिळक, खापर्डे, डॉ. मुंजे, दादासाहेब करंदीकर, माधवराव अणे प्रभृति सभासद होते. सभासदत्वाचें प्रवेश शुल्क दोन रुपये, व वार्षिक शुल्क १ रु. ठरविण्यात आलें. येथे असा ठराव करण्यात आला की होमरूल बिल तयार करावें व इंग्लंडमधील लोकमत जागृत करण्याची खटपट करावी. या संघाच्या विद्यमाने दि. १ मेला टिळकांचें प्रकट व्याख्यान झालें व त्यानंतर संघाच्या प्रांत व जिल्हानिहाय शाखा काढण्याच्या प्रत्यक्ष कार्याला प्रारंभ झाला.

बेळगाव परिषदेहून डॉ. मुंजे नागपूरला परत आल्यावर मध्य-प्रांतात स्वराज्यसंघाचें काम सुरू झालें. मध्यप्रांतीय स्वराज्यसंघाच्या शाखेचे अध्यक्ष डॉ. हरिसिंग गौर हे होते व प्रधान कार्यवाह डॉ. मुंजे होते. नागपूरला या संघाचें प्रधान कार्यालय होतें. प्रांतिक शाखेवर प्रांतातील प्रत्येक जिल्ह्याचा एक एक प्रतिनिधि घेण्यात आला होता. लवकरच स्वराज्यसंघाच्या शाखा प्रांतभर पसरल्या.

स्वराज्य संघाचें कार्य जसजसें वाढू लागलें तसतशी सरकारची डोकेदुखीही वाढू लागली. दि. २२ मेला ॲनी बेझंट पुण्यास आल्या व

सार्वजनिक सभेच्या वतीने टिळकांच्या अध्यक्षतेखाली त्यांचें भाषण झालें. या भाषणाचा व सरकारी दमननीतीचा प्रारंभ एकाच वेळी योगायोगाने झाला. प्रथम सरकारने प्रेस अॅक्टचा दुरुपयोग करून अॅनी बेझंट यांच्या न्यू इंडिया पत्राच्या छापखान्याकडे जामीन मागितला. दि. २२-ला हा जामीन हुकूम निघाला व २६ मेला बाई मद्रासला जाताच त्यांच्यावर तो बजावण्यात आला. अशा आघाताने बाई दबकणाऱ्या नव्हत्या. सरकारवर मात्र या धोरणाने सर सुब्रह्मण्यम् अय्यर यांसारखे मवाळाग्रणीही टीका करू लागले. प्रेस अॅक्टचीं चक्रें वेगाने फिरू लागलीं. नागपूरच्या महाराष्ट्र पत्राकडून जामीन मागण्यात आला व त्यामुळे त्याचा एक अंकही बंद पडला. प्रेस अॅक्टच्या मागोमाग पुढाऱ्यांना स्थानबद्ध करण्याचें तंत्रही सरकारने अवलंबिलें. या वेळी महायुद्ध संपत आलें होतें व तें थांबल्यावर स्वराज्याच्या मागणीला, साहाय्याचा मोबदला म्हणून भारतात जोर चढेल असें सरकारला उघडपणे दिसत होतें. त्यामुळे होमरूलचें नांव काढताच सरकार चिडू लागलें. पण या सरकारी धोरणामुळे अमरावतीचे रा. ब. मुधोळकर यांच्यासारखे मवाळांतले मवाळही सरकारविरोधी बनले व स्वराज्यसंघाच्या कार्याला उत्कृष्ट बाळसें येऊ लागलें.

बेळगांव परिषदेनंतर मध्यप्रांत वऱ्हाडातील महत्त्वाच्या घटनांचा आढावा घेणें क्रमप्राप्त आहे. दि. ६ व ७ मे १९१६ ला यवतमाळ येथे जिल्हा परिषद झाली व ती चांगलीच गाजली. या परिषदेचे अध्यक्ष ना. मोरोपंत दीक्षित हे होते. नागपूरहून नटेशराव द्रविड हे नेमस्त व महाराष्ट्राचे संपादक गोपाळराव ओगले हे जहाल या परिषदेला गेले होते. या परिषदेत शस्त्रांचा कायदा काढून घेण्याची मागणी करण्यात आली. बाकी विषय अर्थातच जिल्ह्यातील तत्कालीन परिस्थितीशी संबद्ध असे होते.

महाराष्ट्राचे संपादक ओगले यांच्याजवळून सरकारने दोन सहस्र रुपयांचा जामीन मागितल्यामुळे महाराष्ट्राचें प्रकाशन एका अंकापुरतें बंद पडलें. प्रथम हा जामीन ५०० रु.चा होता. पण पुढे तो वाढवून दोन सहस्र रु.चा करण्यात आला. त्याला मुख्य कारण "लॉर्ड हार्डिंज यांचा काय दोष ?" या अग्रलेखातील पुढील वाक्य झालें. "हार्डिंजच काय पण प्रत्यक्ष रामचंद्राला जरी हिंदुस्थानचा व्हॉइसरॉय नेमिलें, तरी त्यांस हल्लीच्या परिस्थितीत मोठासा फरक घडवून आणता यावयाचा नाही." प्रेस अॅक्ट विरुद्ध साऱ्या भारतातच या वर्षी जी निषेधाची चळवळ सुरू झाली तिचे पडसाद अर्थातच नागपुरातही उमटले.

या वर्षी डॉ. मुंजे यांनी अंगावर घेतलेलें सांस्कृतिक महत्त्वाचें काम म्हणजे कै. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या महाराष्ट्रीय ज्ञान-कोशाच्या योजनेला आर्थिक साहाय्य मिळवून देणें हें होय. या कोशाच्या योजनेचा प्रारंभ नागपूरलाच झाला होता.

या वर्षीची राष्ट्रीय पक्षाच्या दृष्टीने अत्यंत आनंदाची घटना म्हणजे लोकमान्य टिळकांचा षष्टयब्दीपूर्ति समारंभ होय. दि. २० जुलै १९१६-ला (आषाढ वद्य ६) टिळकांना साठ वर्षें पूर्ण होऊन एकसष्टावें लागत होतें. हा षष्टयब्दीपूर्ति समारंभ सार्वजनिक रीतीने साजरा करावयाचें जनतेने ठरविलें. या निमित्ताने लो. टिळकांना एक लक्ष रुपयांचा निधि समर्पण करण्याची कल्पना कै. न. चिं. केळकर यांनी काढली व ती सर्वांनी उचलून धरली. दि. १८ जुलैच्या केसरीत महर्षि अण्णासाहेब पटवर्धन, दादासाहेब खापर्डे, डॉ. मुंजे, दादासाहेब करंदीकर अण्णासाहेब नेने, गंगाधरराव देशपांडे व धुळ्याचे शंकरराव देव यांच्या सहीने या निधीला साह्य करण्याचें निवेदन प्रसिद्ध करण्यात आलें. ही निधीची कल्पना महाराष्ट्रातील जनतेने इतक्या तडफेने उचलून धरली की अवघ्या बावीस दिवसांत ८७,३३६ रुपये जमले व प्रत्यक्ष निधि देण्याच्या वेळेपर्यंत लक्षाचा संकल्प पूर्ण झाला. या निधीसाठी, अवधि अगदीच थोडा असल्यामुळे श्री. न. चिं. केळकर हे खामगांव, अमरावती व नागपूर येथे जाऊन आले. डॉ. मुंजे यांनी केवळ आपल्या प्रांतातून केळकरांचा निधिसंकल्पच पूर्ण केला असें नाही तर नागपूर प्रांतात सर्वत्र मोठ्या प्रमाणावर हा उत्सव साजरा करून लोकमान्यांच्या पाठीमागे नागपूर प्रांतातील जनता किती एकनिष्ठेने उभी आहे हें दाखवून दिलें.

पुणें येथे हा समारंभ दि. २३ जुलैला गायकवाड वाड्यात थाटाने साजरा झाला. महर्षि अण्णासाहेब पटवर्धन समारंभाचे अध्यक्ष होते. मध्यप्रांत व विदर्भातून या समारंभासाठी चांद्याचे बळवंतराव देशमुख, शिंदीकर देशपांडे, व नारायणराव अळेकर हे गेले होते. सर्व भारतातून अभिनंदनपर तारांचा व संदेशांचा टिळकांवर नुसता वर्षाव झाला होता. सार्वजनिक रीत्या साजरी झालेली भारतातील लोकनेत्याची षष्टयब्दीपूर्ति अशी ही लोकमान्य टिळकांचीच पहिली होय. या प्रसंगी लोकमान्यांना मानपत्र समर्पण करण्यात आलें. तें मराठी, इंग्रजी व संस्कृत अशा तिन्ही भाषांत होतें. संस्कृत मानपत्राचें वाचन परभणीचे गोरेशास्त्री यांनी केलें. मराठी मानपत्राचें वाचन तपस्वी बाबासाहेब परांजपे यांनी केलें व इंग्रजी मानपत्राचें वाचन ना. बेळवी यांनी केलें.

मानपत्रात लोकमान्यांच्या देशासाठी केलेल्या खडतर तपस्येचा निर्देश करून शेवटी म्हटलें होतें, "राष्ट्राकरिता काम करणारे आपणांसारखे लोक स्वार्थनिरपेक्ष असतात. त्यामुळे त्यांचे अनृणी होणें हें काम कठीण होऊन बसतें. तथापि राष्ट्रानेही स्वार्थत्यागपूर्वक राष्ट्रनायकांची सेवा करण्यास तयार होणें हें जें त्याचें कर्तव्य आहे तें बजावलें न जाईल तर त्याच्यावर कृतघ्नपणाचा दोष येईल. म्हणून या दोषातून मुक्त करण्याकरिता तरी आपण या आहेराचा स्वीकार करावा अशी विनंती आहे."

यानंतर जीं भाषणें झालीं त्यांत नागपूर प्रांताच्या वतीने श्री. नारायणराव अळेकर हे बोलले. शेवटी अध्यक्ष महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांनी रौप्यकरंडकातून मानपत्र व जरीचे गोंडे लोंबत असलेल्या जर-तारी थैलीतून एक लक्ष रुपयांच्या सुवर्णमुद्रा लोकमान्यांना अर्पण केल्या. त्यानंतर त्यांना पोशाख समर्पण करण्यात आला. या प्रसंगी अनेकांनी पोशाख, अंगठ्या, शालजोड्या इत्यादि अनेक स्वरूपांचे आहेर लोकमान्यांना दिले.

या स्वागताला उत्तर म्हणून केलेल्या भाषणात लोकांच्या प्रेमानें सद्गदित झालेल्या टिळकांनी लोकांच्या प्रेमाविषयी कृतज्ञता व्यक्त केली. शेवटी ते म्हणाले की, "मानपत्र व आहेर यांपैकीं मानपत्राचा स्वीकार करण्यास संकोच वाटत असला तरी औपचारिक रीतीने कां होईना मी त्याचा स्वीकार करतो. पण आहेराची गोष्ट तशी नाही. आज आपण मला दिलेली रक्कम घेऊन मी काय करणार हें मला कळत नाही. मला स्वत:साठी ती नको आहे. आणि स्वत:साठी म्हणून ही रक्कम घेणें मला वाजवीही दिसत नाही. तेव्हा मी या रकमेचा ट्रस्टी या नात्यानें कायदेशीर व मला योग्य वाटेल त्या राष्ट्रीय कार्याकडे खर्च करण्या-करिता आपण ती माझ्या स्वाधीन करीत आहा अशाच भावनेने ती स्वीकारतो. ती माझी नाही. अर्थात् ती 'विश्वासाची ठेव' म्हणून माझ्या स्वाधीन केली आहे असें मी समजतो आणि मी आपणांस असें आश्वासन देतो की, वरील रकमेत माझं स्वत:चें काहीतरी तुळशीपत्र घालून तिचा विनियोग करण्याचें आपण माझ्याकडे सोपविलेलें काम माझ्याकडून होईल तितक्या कसोशीने व वर निर्दिष्ट केलेल्या प्रकारच्या कामाकडेच करीन. यासंबंधाचे कागदपत्र व नियम वगैरे पुढे करण्यात येतीलच. मी ज्या शर्तीवर ही रक्कम घेत आहे तिजमुळे आपली काहीशी निराशा होईल; पण अशा वेळी माझ्या मनाकडे लक्ष देऊन आपण मला माफी करावी अशी माझी आपणांस विनंति आहे. आपण सर्व 'राष्ट्रदेव' होऊ या.

येथे चढाओढ नाही, मत्सर नाही, मानापमान नाही व संकटाची भीति धरूनही उपयोग नाही."

वस्तुत: नेहमीच्या पद्धतीप्रमाणे दादासाहेब खापर्डे व मुंजे हे या वेळी समारंभासाठी पुण्याला यावयाचे. पण नागपूरचा उत्सव स्वतंत्रपणे ठेवणें तेथील कार्यवाढीच्या दृष्टीने आवश्यक वाटल्यामुळे ते दोघेही नागपूरलाच होते.

दि. २३-ला रविवारी नागपूरला टिळक जयंत्युत्सव व्यंकटेश थिएटरमध्ये झाला. उत्सव दोन दिवसांचा होता. व्यंकटेश थिएटर लतापल्लवांनी, कदलीवृक्षाच्या तोरणांनी, 'वंदे मातरम्' च्या कमानींनी व गुढ्यातोरणांनी शृंगारलें असून अतोनात गर्दी झाली होती. श्री. दादासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखाली उत्सव प्रारंभ झाला. वेदमूर्ति कृष्णराव भीष्म यांच्या मंगलाचरणानंतर कविवर्य ताम्हनकर यांनी लोकमान्यांवर रचिलेलें स्वकृत पद्य गाऊन दाखविलें. यानंतर भवानीशंकर नियोगी यांचें लोकमान्यांच्या गुणवर्णनपर भाषण झालें. ह. भ. प. दादाशास्त्री कायरकर यांचें गीतारहस्याच्या आधारें टिळकांनी प्रतिपादन केलेल्या सिद्धान्तावर भाषण झालें. श्री. दादासाहेब खापर्डे आपल्या भाषणात म्हणाले की, " आपल्या लोकांत कालगणना शतकांनी करीत नाहीत. ६० संवत्सरांचें एक चक्र याप्रमाणे करतात. एकदा सर्व संवत्सर जो पाहील, तो भाग्यवान्. हें भाग्य बळवंतरावजींना प्राप्त झालें आहे. याबद्दल राष्ट्रास आनंद वाटतो." टिळकांच्या जयजयकारात या दिवशीचा कार्यक्रम संपला. दुसऱ्या दिवशी प्रथम जयकृष्ण केशव उपाध्ये यांच्या काव्याचें गायन झाल्यावर ॲनी बेझंट यांचें पत्र वाचून दाखविण्यात आलें. त्यांत त्यांनी असें लिहिलें होतें की, नागपूरचें आमंत्रण उशिरा पोहोचल्यामुळे मी येऊ शकत नाही. तरी मी आपणांबरोबरच टिळकांना दीर्घायुष्य चिंतिते." या दिवशी विद्याभूषण कृष्णशास्त्री घुले यांचें 'गीतारहस्याच्या आक्षेपकांचें खंडण' या विषयावर भाषण झालें. यानंतर कविवर्य ताम्हनकर यांचें परिणामकारक काव्यगायन झालें. यानंतर दादासाहेब खापर्डे यांचें समारोपाचें भाषण झालें. या भाषणात त्यांनी प्रारंभापासूनच्या राजकीय चळवळीच्या स्थित्यंतरांचें समालोचन करून लोकमान्य टिळकांचें महत्त्व विशद करून सांगितलें. शेवटी नारायणराव वैद्य यांनी आभार प्रदर्शन केल्यावर टिळकांच्या जयजयकारात व टाळ्यांच्या गजरात हा कार्यक्रम समाप्त झाला.

नागपूरप्रमाणेच प्रांतातील खेडोपाडी व सर्व प्रमुख शहरांतून टिळक जयंत्युत्सव साजरे होऊन त्यांना दीर्घायुरारोग्य चिंतिणारे ठराव

संमत करण्यात आले. सर्वांत अभिनव प्रकार यांचाला झाला. तेथे जिल्ह्याच्या वतीने टिळकांना द्यावयाच्या मानपत्राचें प्रकट सभेत वाचन करून तें मानपत्र पोस्टाच्या द्वारें टिळकांच्याकडे पाठविण्यात आलें.

टिळकांच्या या जयजयकाराने सरकार चांगलेंच पिसाळल्यासारखें झालें. ऐन समारंभाच्या दिवशी सकाळी बेळगाव व नगर येथील भाषणां-बद्दल खटला भरून जामीन मागितल्याची नोटीस टिळकांवर, गायकवाड वाड्यात जाऊन बजाविण्यात आली. श्री. न. चिं. केळकर लिहितात :—

" वास्तविक पोलिसांनी खरें म्हटलें तर त्या दिवशी ही नोटीस बजाविण्याचें काही कारण नव्हतें. मॅजिस्ट्रेटचें बोलाविणें २८ तारखेचें होतें. ता. २४ किंवा २५ रोजी नोटीस बजाविली असती तर त्यांत काही बिघडण्यासारखें नव्हतें. नोटीस शनिवारी तरी बजवावयाची किंवा सोमवारी तरी बजवावयाची हें सरळ होतें. रविवारचा दिवस बोलून चालून सुट्टीचा. त्या दिवशी ' साबाथ ' मानून पोलिससाहेबांनी विश्रांति घेतली असती तर त्यांना कोणी नांवही ठेविलें नसतें. पण टिळ-कांच्या घरी हा एक चमत्कार लोकांनी आरंभिला व तेव्हा विरोधी बुद्धीने आपल्याही एका चमत्काराची भर त्यांत घालून रंगाचा बेरंग करण्याची मौज पाहण्याची बुद्धि पोलिसांना झाली असावी. आता खरेंच अद्‌भुतरस अवतरावयाचा तर नोटिशीऐवजी पकड वॉरंटच हवें होतें. मग खरी बहार ! इकडे परगावचे पाहुणे जमलेले आहेत. टिळक षष्ट्य-ब्दीच्या अभिषेकाला बसले आहेत, बाहेर चौघडा वाजत आहे. कचेरींत वर्गणीचे रुपये मोजून देण्या-घेण्याची गर्दी उडाली आहे, इतक्यांत पोलि-सांनी वॉरंट घेऊन यावयाचें व टिळकांना कद नेसलेले उठवून पकडून घेऊन जावयाचें ! "

—समग्र केळकर वाङ्मय, खंड २ रा. पृ. ५३८

यानंतर थोड्याच दिवसांनी टिळकांच्यावर खटला भरण्यात आला. बेळगाव व नगर येथील भाषणांबद्दल हा खटला होता. टिळकांच्या वतीने बॅ. जिना (पाकिस्तानचे निर्माते महंमदअल्ली जिना) हे काम चालवीत होते. दि. १२ ऑगस्टला खटल्याचा निर्णय झाला. मॅजिस्ट्रेट मि. हॅच यांनी टिळकांनी जामीन द्यावा असें सांगून आपल्या निर्णयपत्रकात असें म्हटलें की, " तुमच्यावर १२४ अ कलमाप्रमाणे ऐनजिनसी खटला न भरता म्हणजे प्रत्यक्ष शिक्षा देण्याचा खटला न भरता फक्त जामीन देण्याचा खटला भरला हें तुमचें भाग्य समजा ! आणि तुम्ही हल्ली-सारखी वर्तणूक ठेवू नये अशी तुम्हांला व तुमच्या स्नेह्यांना इशारत देण्याचा सरकारचा हेतु आहे. "

या निर्णयावर टिळकांच्या वतीने हायकोर्टात दि. २३ ऑगस्टला अपील करण्यात आलें. हायकोर्टात बॅ. जिना, बॅप्टिस्टा, व एरूळकर यांनी अपिलाचें काम चालविलें. सुदैवाने हायकोर्टाचा निर्णय टिळकांच्या बाजूने लागला व टिळक दोषमुक्त ठरून त्यांची जामिनकी रद्द करण्यात आली. खटला चालू असेपर्यंत स्वराज्यसंघाशी संबंध ठेवावयास लोक भीत व दुरून सहानुभूति दाखवीत. पण टिळक दोषमुक्त ठरल्यामुळे स्वराज्य संघाचें काम वैध आहे असें आपोआपच ठरलें. पहिल्या कोर्टात टिळकांना प्रतिकूल निर्णय होताच टाइम्सने त्यांच्याविरुद्ध लिहिलें. पण ते हायकोर्टातून निर्दोष सुटताच टाइम्स ऑफ इंडियाने लिहिलें की, " मॅजिस्ट्रेटचा निर्णय होताच आम्ही घाईने जी टीका केली ती आता सर्वस्वी परत घेतली. "

टिळक निर्दोष ठरताच होमरूलच्या प्रचाराला विलक्षण जोर चढला. एका बाजूने टिळक व त्यांचे अनुयायी आणि दुसऱ्या बाजूने ॲनी बेझंट व त्यांचे अनुयायी यांनी भारताचें वातावरण स्वराज्याच्या उद्घोषाने दुमदुमवून सोडलें. ॲनी बेझंट या युरोपियन असल्यामुळे त्यांच्या प्रचाराचा बाहेर फार परिणाम होई. त्यांच्या संबंधानेही सरकारने खुनशी वृत्ति प्रदर्शित केली. बाईंना भारत संरक्षण कायद्याखाली प्रथम मुंबईत येण्यास बंदी करण्यात आली. त्यानंतर १९१६-च्या नोव्हेंबर महिन्यात अमरावती येथे भरलेल्या प्रांतिक परिषदेच्याच दिवसांत थिऑसफिस्टांचें सम्मेलनही तेथे भरणार होतें. त्या सम्मेलनाला ॲनी बेझंट येणार हें प्रसिद्ध होताच मध्यप्रांत सरकारने भारत संरक्षण कायद्यान्वये त्यांना आपल्या प्रांतात पाऊल टाकण्यासही बंदी केली. सरकारच्या या अविवेकाचे पडसाद अमरावतीच्या या परिषदेत उमटलेच. परिषदेचे स्वागताध्यक्ष मोरोपंत जोशी यांनी सरकारच्या या कृत्यासंबंधी आपल्या भाषणात तीव्र नापसंती व्यक्त केली. परिषदेचे अध्यक्ष डॉ. गौर हे होते. अमरावतीची ही प्रांतिक परिषद अनेक दृष्टींनी महत्त्वाची होती. या परिषदेने प्रत्येक पांच सहस्र वस्तीच्या गांवाला एक नगरपालिका असावी व तिचा अध्यक्ष आणि तीन चतुर्थांश सभासद लोकांनी निवडलेले असावेत अशी मागणी केली. डिस्ट्रिक्ट कौन्सिलसचा कारभार सरकारी अधिकाऱ्यांऐवजी लोकप्रतिनिधींच्या द्वारे चालावा व अशा कौन्सिलसना अधिक व्यापक स्वरूपाचे अधिकार असावेत अशी या परिषदेची दुसरी मागणी होती. प्रांतात सर्वत्र ग्रामपंचायती स्थापन कराव्या व त्यांच्याकडे त्या त्या विभागातील आरोग्य, पाणीपुरवठा, रस्ते, शाळा, जंगलखातें, बाजार पेठा, या खात्यांचा कारभार सोपवावा; तसेंच

लहानसहान दिवाणी व फौजदारी प्रकरणांचे निर्णय करण्याचा त्यांना अधिकार असावा अशी एक महत्त्वाची मागणी या परिषदेने केली. या मागण्यांची पूर्तता आता स्वराज्यानंतरच होऊ शकलेली आहे.

असो. हें वर्ष डॉ. मुंजे यांच्या दृष्टीने बरेंच धामधुमीचें गेलें. रीतसर स्वराज्यसंघाची स्थापना झाल्यावर ठिकठिकाणी स्वराज्य-संघाच्या शाखा काढणें, स्वराज्यसंघाच्या तात्त्विक भूमिकेचा प्रचार करण्यासाठी व्याख्यानें व प्रचारक तयार करणें व पाठविणें आणि जिल्हा परिषदांपर्यंतच्या सर्व परिषदांवर स्वराज्यसंघाच्या विचार-प्रणालीचा प्रभाव पडेल असें वातावरण तयार करणें या गोष्टींबरोबरच या वर्षींहि प्लेग असल्यामुळे गरिबांच्या औषधोपचाराची सोय करणें, अनाथ प्रेतसंस्कारांची सोय करणें ही लहानसहान कामेंही त्यांनी लक्ष घालून संघटित केलीं. मुंजे हे पहिल्यापासून सैनिकीकरणाचे पुर-स्कर्ते होते. या सर्व परिषदांतून शस्त्रांचा कायदा शिथिल करण्यासंबंधी व हिंदी लोकांना सैन्यात सन्मानाने वागविण्यासंबंधी मागणी करण्यात आलेली आहे. ती मुंजे यांच्या विचारसरणीच्या प्रांतावर असलेल्या प्रभावाची द्योतक होय.

या संपूर्ण वर्षभर स्वराज्याच्या मागणीच्या दृष्टीने सर्वच भारतात जनमत तयार करण्यात येत होतें. अशा स्थितीत तुमच्यात आपापसात भांडणें आहेत हें निमित्त इंग्रजी सत्तेला पुढे करता येऊ नये व महायुद्धोत्तर काळात भारताकडून स्वराज्याची एकमुखी मागणी झाल्याचें दृश्य जगा-समोर असावें या दृष्टीने प्रयत्न होणें आवश्यक होतें. काँग्रेस ही स्वतःला राष्ट्रीय म्हणवीत असली तरी तिच्यात बहुसंख्य हिंदूचाच भरणा होता व मुसलमानांची प्रातिनिधिक असणारी मुस्लिम लीग ही संस्था प्रति-वर्षी स्वतंत्रपणे आपलीं अधिवेशनें भरवीत असे. स्वराज्याची मागणी काँग्रेस व मुस्लिम लीगने संयुक्तपणे व एकोप्याने केली तर ती अधिक प्रभावशाली ठरेल असें काँग्रेसच्या पुढाऱ्यांना वाटत होतें व त्या दृष्टीने मुस्लिम लीगला अनुकूल करून घ्यावयाच्या मार्गास ते लागले. त्या दृष्टीने वातावरणही अनुकूल होतें.

मुस्लिम लीग ही लॉर्ड मिंटो यांच्या प्रोत्साहनाने व सक्रिय सहानुभूतीने इ. स. १९०६-मध्ये काँग्रेसच्या चळवळीवरील कूट नीतीचा उतारा म्हणून स्थापन झाली याचा निर्देश मागे केलाच आहे. महायुद्ध सुरू होताच सरकारची आपल्याकडे पाहण्याची दृष्टि बदलली असें लीगच्या पुढाऱ्यांच्या ध्यानात आलें. विशेषतः ज्या वेळी तुर्कस्थान जर्मनीच्या बाजूने समरांगणात उतरलें त्या वेळी तर इंग्लिशांची

मनोवृत्ति आपल्यासंबंधी बदललेली आहे हें मुसलमानांच्या पुरतें ध्यानात आलें. त्याच्याही पूर्वी इटली व तुर्कस्थानचें युद्ध, इराणमधील घटना व बाल्कन युद्ध यांमुळे तुर्कस्थानविषयी मुसलमानांच्या समाजातही विशेष आस्था उत्पन्न झाली व त्याचा परिणाम म्हणून ब्रिटनविषयी मुस्लिम जनमतही संशयी बनलें. बंगालची फाळणी रद्द करणें व कानपूरच्या मशिदीच्या प्रकरणात मुस्लिम जमावावर गोळीबार करणें यांसारख्या प्रकारांमुळे त्यात भरच पडली. मुस्लिम लीगमध्ये एक असा तरुण पुढाऱ्यांचा वर्ग या वेळी निर्माण झाला की, जो जुन्या मुसलमान पुढाऱ्यांच्या सर्वस्वी सरकारधार्जिण्या वृत्तीवर टीका करून अधिक स्वाभिमानी व स्वदेशनिष्ठ दृष्टिकोन असण्याची आवश्यकता प्रतिपादन करू लागला. महंमदअल्ली जिना हे या वेळी कट्टर राष्ट्रवादी होते. ते काँग्रेसमध्ये होते. सन १९१३-मध्ये मुस्लिम लीगमध्ये नवीन ब्रिटनविरोधी नेत्यांचा अधिक प्रभाव पडून मुस्लिम लीगच्या घटनेत राष्ट्रवादी परिवर्तन घडून आलें. भारतातील जनमत तयार करून राष्ट्रीय ऐक्य घडवून आणणें व त्यासाठी भारतातील वेगवेगळ्या जमातींशी सहकार्य करणें हें मुस्लिम लीगचें धोरण ठरताच लीगला राष्ट्रीय वळण द्यावें या हेतूने जिनांनी या वेळी लीगमध्ये प्रवेश केला. लीगमध्ये प्रवेश करताना महंमदअल्ली जिना यांनी अशी अट घातली होती की, "जर मुस्लिम लीगचें धोरण काँग्रेसच्या धोरणाच्या विरुद्ध असलें अथवा भारताच्या व्यापक हिताच्या विरुद्ध असलें तर मी लीगचा सभासद राहणार नाही." याच जिनांचें उत्तरायुष्य राष्ट्रविभाजनापर्यंत मुस्लिम जातीयवाद परिपुष्ट करण्यात खर्ची पडलें हें ध्यानात घेतलें म्हणजे "दैवं चैवात्र पंचमम्" या म्हणीची आठवण झाल्याविना राहत नाही. सन १९१३-च्या मुस्लिम लीगच्या अधिवेशनात पुढीलप्रमाणे लीगचें ध्येय घोषित करण्यात आलें.

"Attainment under the aegis of the British Crown of a system of Self-Government suitable to India."

त्या वेळच्या काँग्रेसच्याच काय, पण टिळक व बेझंट यांच्या घोषवाक्यांत तरी याहून वेगळें काय होतें? तात्पर्य १९०६-च्या लीगच्या भाषेत व १९१२-नंतरच्या तिच्या भाषेत परिणामकारक अंतर उत्पन्न झालें होतें. लीगचा एक महत्त्वाचा प्रवक्ता तर त्या वेळी असें म्हणाला की, "आता अशी वेळ आलेली आहे की, तरुणांना सत्याचा प्रकाश दिसू लागलेला आहे व तें सत्य म्हणजे स्वदेशातील लोक जो सन्मान देतात तोच खरा सन्मान असून परकीय सरकार जो सन्मान करतें तो खरा सन्मान नव्हे."

याप्रमाणे लीग व काँग्रेस या वेळी परस्परांच्या जवळ येऊ लागल्या होत्या. सन १९१५-मध्ये मुस्लिम लीग व काँग्रेस या दोन्ही संस्थांची अधिवेशनें मुंबईला झालीं. लॉर्ड सिंह काँग्रेसचे अध्यक्ष होते, तर मझहर-उल्-हक हे मुस्लिम लीगचे अध्यक्ष होते. या वेळी काँग्रेसचे अध्यक्ष सिंह यांचें अध्यक्षीय भाषण अगदीच मिळमिळीत झालें, तर लीगच्या अध्यक्षांचें भाषण त्याहून कितीतरी पटीने अधिक तेजस्वी व सणसणीत झालें. हीं दोन्हीही भाषणें ऐकून महंमद अल्ली यांनी पुढीलप्रमाणे विनोदी अभिप्राय व्यक्त केला :

" By an irony of fate the League President read to an audience of Muslims the pungent oration of a Bengali, while Sinha read to the Congress delegates the cautious address of a loyal Muslim "

(दैवदुर्विलसित असें की, मुस्लिम लीगच्या अध्यक्षांनी मुसलमान श्रोत्यांना एखाद्या बंगाल्यासारखें चांगलें तिखट भाषण ऐकविलें, तर काँग्रेसच्या प्रतिनिधींपुढे सिंह यांनी वाचलेलें भाषण एखाद्या राजनिष्ठ मुसलमानाच्या भाषणाप्रमाणे मोठ्या सावधगिरीचें व मिळमिळीत होतें.)

लीगच्या या मुंबईच्या अधिवेशनाने काँग्रेस व लीग जवळ येण्याची भूमिका सिद्ध झाली. एकतेचें वातावरण या वेळी इतकें परिणामकारक होतें की, काँग्रेस व मुस्लिम लीगचे स्वयंसेवक खांद्याशी खांदा भिडवून काम करीत होते. दोन्ही संस्थांच्या पुढाऱ्यांना एकत्र मेजवानी देण्यात आली. दोहोंचेही नेते एक दुसऱ्याच्या अधिवेशनांना उपस्थित होते व त्यांचें उत्स्फूर्त स्वागत झालें.

सरकारला या गोष्टीचा राग आला. मुस्लिम लीगला इतके दिवस गोंजारूनही ती विरुद्ध जात असल्याचें पाहून सरकारने तिला धडा शिकवावयाचें ठरविलें. सरकारी प्रेरणेवरून व काही प्रतिगामी मुसलमानांच्या प्रेरणेवरून दुसऱ्या दिवशीच्या लीगच्या अधिवेशनात मुसलमान गुंडांनी घुसून एकच धमाल उडवून दिली. समोरच पोलिस कमिशनर उभा होता. महंमद अली जिना यांनी त्याला सांगितलें की, हे गुंडगिरी करणारे लोक सभ्य मुसलमान तर नाहीतच; पण प्रतिनिधिही नाहीत. इतकेंच नव्हे तर साधे मुस्लिम लीगचे सभासदही नाहीत. तरी यांना मंडपातून काढून लावावें. त्या अधिकाऱ्याने सांगितलें की, "मला त्याच्याशी कर्तव्य नाही. तुमच्या अधिवेशनामुळेच हा सगळा गोंधळ उत्पन्न झाला असल्यामुळे मी हा सगळा मंडपच मोकळा करतो." त्याप्रमाणे त्याने सगळ्यांनाच हाकून लावलें. याप्रमाणे हें

अधिवेशन उधळलें गेलें; पण त्यामुळे उलट काँग्रेस व मुस्लिम लीग जवळ येण्यास मदतच झाली.

यानंतर २१ ऑक्टोबरला अहमदाबाद येथे जी मुंबईची प्रांतिक परिषद झाली तिचे बॅ. महंमद अल्ली जिना हे अध्यक्ष झाले. सरकारला स्वराज्य मागावयाचें तरी त्याचें स्वरूप ठरणें आवश्यक होतें. होमरूल लीगचे अध्यक्ष बॅ. बॅप्टिस्टा यांनी या दृष्टीने स्वराज्याची योजना तयार केली. त्या योजनेचें स्वागत करताना केसरीने लिहिलें की, "स्वराज्याची मागणी हे लोक करतात; पण जबाबदार रीतीने विधायक घटना बनवून स्वराज्य कसें हवें तें सांगावें तें सांगत नाहीत अशी काही नेमस्त लोकांची तक्रार असते. तिला बॅ. बॅप्टिस्टा यांनी प्रत्यक्ष उत्तर दिलें." नोव्हेंबर महिन्यात काँग्रेस कमिटीने व मुस्लिम लीगनेही आपापले स्वराज्याचे मसुदे तयार केले. हे मसुदे लखनौ येथील आगामी काँग्रेसमध्ये विचारार्थ यावयाचे होते. लंडन येथे असलेल्या काँग्रेस कमेटीच्या वतीने सर कृष्णगोविंद गुप्त यांची लखनौ काँग्रेसचे प्रतिनिधि म्हणून निवड झाली. ते नोव्हेंबरमध्ये मुंबईस आले. त्यांनीही इंग्लंडमध्ये होमरूलची चवळळ खूप जोरात करणें आवश्यक आहे असें सांगितलें. तात्पर्य, स्वराज्याच्या मागणीच्या दृष्टीने देशात एकमत होऊ लागलें. अशा वातावरणात भारतीय राजकारणात एक महान् परिवर्तन घडवून आणणारी लखनौ काँग्रेस या वर्षाच्या (१९१६) डिसेंबरमध्ये झाली.

प्रत्यक्ष लखनौ काँग्रेसपूर्वी दि. १७ व १८ नोव्हेंबरला कलकत्ता येथे काँग्रेस व मुस्लिम लीगच्या नेत्यांची संयुक्त परिषद झाली. या परिषदेने स्वराज्याच्या मागणीचा उभयपक्षी मान्य असा मसुदा तयार केला. लखनौ येथील राष्ट्रीय सभेत यावयाच्या स्वराज्यविषयक प्रस्तावाचा तो पायाच होता.

लखनौ येथील राष्ट्रीय सभेला टिळकांचें येणें म्हणजे त्यांची एक प्रकारे जययात्राच होतो. या यात्रेत डॉ. मुंजे नागपूरच्या प्रतिनिधीं-सहित टिळकांच्या बरोबरच होते. श्री. तात्यासाहेब केळकर आपल्या आत्मचरित्रात लिहितात : "डॉ. साठे वगैरेंच्या खटपटीने जी.आय्.पी. रेल्वेच्या अधिकाऱ्यांकडून स्पेशल ट्रेन काढविण्यात आली होती. एक सबंध आगगाडी भरेल इतके टिळकांचे मित्र व अनुयायी सगळ्या वाटभर जयघोष करीत, जयघोष ऐकत, मेजवान्या खात चालले होते. त्या वेळच्या उत्साहाचें वर्णन करणें जवळ जवळ अशक्य आहे. टिळकांनी प्रत्यक्ष राष्ट्रीय सभेत जाऊन आपलें बहुमत करण्याचा प्रसंग अजून

दूर होता; किंबहुना तो प्रत्यक्ष आलाही नाही. टिळक काँग्रेसच्या प्रतिज्ञापत्रिकेवर सही करून राष्ट्रीय सभेला जाणार असें कळल्याबरोबर मुंबई टाईम्सने बिगुल फुंकून इषारा दिला, व नेमस्तांना हलवून जागें करून सांगितलें की, 'हां सांभाळा. टिळक राष्ट्रीय सभा काबीज करण्याला निघाले!' पण नेमस्तांना हें भविष्य आधीच कळून चुकलें होतें. प्रतिज्ञापत्रिकेवर सही करून जाऊ नये असा राष्ट्रीय पक्षाच्या छावणीत जोपर्यंत पुकारा सुरू होता तोपर्यंत आपण सुरक्षित आहो असें नेमस्तांना वाटत होतें. पण प्रतिज्ञापत्रिकेवरही सही करू, पण राष्ट्रीय सभेत घुसू असा त्या छावणीत उलटा पुकारा होऊ लागताच नेमस्तांना आपलें भवितव्य कळून चुकलें, आणि टिळकांच्या जयघोषात निघालेली ही स्पेशल ट्रेन म्हणजे, हल्ल्याचें नव्हे तर एक प्रकारे विजयाचेंच रणशिंग होय असें ते घेऊन चालले. १९०७ साली सुरत येथे राष्ट्रीय सभेच्या मंडपात उभे राहिलेले टिळक व १९१६ साली लखनौच्या राष्ट्रीय सभेच्या मंडपात उभे राहिलेले टिळक या दोहोंत केवढें अंतर पडलें होतें, हें ज्याने ते दोन्ही प्रसंग पाहिले असतील त्यालाच कळून आलें असतें."

—गत गोष्टी अर्थात् माझी जीवन यात्रा, लेखक न. चिं. केळकर, पृ. ४१९

टिळकांनी पहिल्या प्रवेशानेच राष्ट्रीय सभा जिंकली असें म्हणावयास हरकत नाही.

लखनौच्या राष्ट्रीय सभेचें हें ऐतिहासिक अधिवेशन दि. २६, २७, २८ व २९ डिसेंबर १९१६ असे चार दिवस झालें. अलाहाबादचे जगत् नारायण हे या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष होते. जनतेच्या उत्साहाला उधाण आलें होतें असें म्हटलें तरी चालेल. या अधिवेशनाचे अध्यक्ष अंबिकाचरण मुजुमदार हे होते. जगत् नारायण आपल्या भाषणात प्रतिनिधींचें स्वागत करताना म्हणाले, "आपल्या देशाच्या राजकीय विकासात हें वर्ष संस्मरणीय गणलें जाईल. सुरतेच्या दुर्दैवी बखेड्यानंतर प्रथमच आपण संयुक्त काँग्रेसचें दृश्य पाहत आहोत. संघटनेतच शक्ति आहे हें ओळखून, दोन्ही पक्षांनी आपापले मतभेद बाजूस सारले व ब्रिटिश साम्राज्यात हिंदुस्थानला त्याच्या स्वाभिमानाच्या व प्रतिष्ठेच्या दृष्टीने योग्य तें पद प्राप्त करून देण्यासाठी परस्परांच्या खांद्याला खांदा भिडवून काम करण्याचा निर्धार केला आहे. राष्ट्रमातेच्या हाकेला दोन्ही पक्ष धावून आले व आपले जुने मतभेद विसरून तिच्या आवश्यकतेच्या परिपूर्तीसाठी ते कटिबद्ध झाले. कलकत्त्याच्या संयुक्त परिषदेने तर आपण पुष्कळच प्रगति केली आहे. हिंदु व मुसलमानांचें मतैक्य त्यामुळे

आपण पुष्कळच प्रमाणात साधू शकलो." युद्धाकडे वळून जगत् नारायण म्हणाले, "प्रचलित युद्धामध्ये हिंदुस्थानने जें साह्य केलें त्यामुळे त्याची आकांक्षा उद्दीप्त झाली आहे. त्याला आपली योग्यता कळली आहे. आमच्या देशाच्या शौर्याची साक्ष युरोप, आफ्रिका व आशिया येथील रणक्षेत्रेंच देतील. भारतीयांनी तेथे आपल्या रक्ताने रोमांचकारी इतिहास लिहिला आहे." यानंतर कॅनडा, ऑस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिका या वसाहतींना स्वायत्तता देण्याने इंग्रजांचा जसा लाभच झाला तसा भारताला, तो स्वराज्याला सर्वथा पात्र असल्यामुळे, स्वायत्तता देण्याने इंग्रजांचा लाभच होईल, असें प्रतिपादन करून त्यांनी औपचारिकपणे अंबिकाचरण मुजुमदार यांचें नांव अध्यक्षपदासाठी सुचविलें. सुरेन्द्रनाथ बॅनर्जी यांनी या सूचनेला अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष स्थानापन्न झाले. अध्यक्ष मुजुमदार यांच्या भाषणातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे :

"१९०७-मध्ये सुरत येथे फ्रेंचांच्या प्राचीन बागेत ज्या काँग्रेसची दुफळी झाली ती आज नऊ वर्षांनी लखनौच्या केसर बागेत पुनः जोडली गेली ही आनंदाची गोष्ट होय.

यापुढे वृद्धांनी तरुणांना झिडकारू नये व तरुणांनी वृद्धांचा उपमर्द करू नये. दूरदृष्टि, पोक्त विचार, सावधगिरी हे गुण खरे ! पण त्यांचा अतिरेक झाला म्हणजे त्यांचें पर्यवसान भागूबाईपणात व नैतिक अधःपातात होतें. उलटपक्षी उत्साह, जोम हे गुण प्रशंसनीय आहेत खरे, पण उतावीळपणाच्या भरात संस्थेचा चुराडा होतो. म्हणून एकमेकांचे दोष काढीत न बसता ज्या पुढाऱ्यांनी आजपर्यंत विजय मिळविला नसला तरी चिकाटीने व विश्वासघात न करता झगडा चालू ठेविला त्यांच्या पाठोपाठ आपण जाऊ या. या दृष्टीने सुरतेच्या बखेड्यानंतर आज नऊ वर्षांनी आमच्यामध्ये परत आलेले माझे मित्र टिळक यांचें मी अंतःकरणपूर्वक स्वागत करतो. तेही आपल्यातलेच आहेत यास्तव त्यांचा आमचा कधीही वियोग न होवो."

राज्यव्यवस्थेतील सर्व खात्यांत नोकरशाहीने कशा चुका केल्या आहेत यांचें तपशीलवार समालोचन करून अध्यक्ष म्हणाले की, "शेवटी लोकमताचा आदर करणें व त्यावर विश्वास ठेवणेंच सरकारच्या हिताचें असतें."

यानंतर राज्यशास्त्रातील स्वराज्याच्या पात्रतेच्या सर्व कसोट्यांचें समालोचन करून हिंदुस्थान या सर्वच कसोट्यांनुसार स्वराज्याला कसा सर्वथैव पात्र आहे हें त्यांनी सिद्ध करून दाखविलें. शेवटी

हिंदुमुसलमानांच्या एकतेच्या दिसू लागलेल्या प्रसादचिह्नांचें स्वागत करून त्यांनी आपलें भाषण संपविलें.

दुसऱ्या दिवशी संयुक्त प्रांताचे गव्हर्नर सर जेम्स मेस्टन यांनी सपत्नीक कॉंग्रेसला भेट दिली. त्यांचें यथोचित स्वागत करण्यात आलें. त्यांचें भाषणही झालें. या दिवशी आणखी किरकोळ ठराव झाले. त्यांतील एका ठरावावर गांधींचेंही भाषण झालें.

प्रथम दोन दिवस विषयनियामक समितीत ऑल इंडिया कॉंग्रेस कमेटीची व मुस्लिम लीगची अशा दोन्ही योजनांची कलमवार चर्चा होऊन निष्कर्षरूप एक नवी योजना नेमस्त, जहाल व मुस्लिम लीगचे पुढारी या सर्वांच्या पूर्ण संमतीने मान्य झाली. ही योजनाच ठरावाच्या रूपाने दि. २९-ला प्रकट अधिवेशनात सुरेन्द्रनाथ बॅनर्जी यांनी मांडली. ज्याच्या-साठी लखनौच्या कॉंग्रेसने स्वराज्याचें निशाण रोवलें असें म्हणण्यात येतें व ज्याच्यासाठी टिळकांनी एवढें जिवाचें रान केलें तो राष्ट्रीय मागणीचा एकमुखी आविष्कार असलेला ठराव पुढीलप्रमाणे आहे :

( a ) That having regard to the fact that the great communities of India are inheritors of ancient civilization, and having shown great capacity for government and administration, and to the progrees of education and public spirit made by them during a century of British rule, and further having regard to the fact that the present system of Government does not satisfy the legitimate aspirations of the people and has become unsuited to the existing conditions and requirements, this Congress is of opinion that the time has come when His Majesty the King-Emperor should be pleased to issue a proclamation announcing that it is the aim and intention of British policy to confer Self-Government on India at an early date.

( b ) That this Congress demands that a definite step should be taken towards Self–Government by granting the reforms contained in the scheme prepared by the All India Congress Committee in concert with the Reform Committee appointed by the All India Muslim League.

( c ) That in the reconstruction of the Empire, India shall be lifted from the position of a Dependency to that of an equal partner in the Empire and the Self-Governing Dominions.

या ठरावावर सुरेन्द्रनाथ बॅनर्जी व मुजुमदार यांचीं हृदयस्पर्शी भाषणें झालीं. त्यानंतर हृदयनाथ कुंझरू यांनी सुधारणांची योजना

मांडली. त्या योजनेत (१) प्रांतीय विधिमंडळ (२) मध्यवर्ती विधिमंडळ (३) भारत सरकार (४) भारतमंत्री व त्याचें कार्यकारी मंडळ (५) भारत व ब्रिटिश साम्राज्य (६) सैन्य व संबद्ध खातीं इतक्या बाबींत सुधारणांची आवश्यकता प्रतिपादिली होती. यानंतर ॲनी बेझंट यांचें सणसणीत भाषण झालें.

सर्वांत हृदय हलवून सोडणारें भाषण टिळकांचें झालें. ते आपल्या भाषणात म्हणाले की,

The resolution which I wish to support is the one for which the Congress has been fighting for the last thirty years. The first note of it was heard ten years ago on the banks of the Hoogly and was sounded by the grand old man of India–Dadabhai Naoroji. Since the note was sounded differences of opinion arose. Some said that the note ought to be carried on and ought to be followed by a detailed scheme at once, that it should be taken up and made to resound all over India as soon as possible. There was another party among us that said that it could not be done so soon, that the tune of that note required to be a little lower, and that was the cause of dissention ten years ago; and I am glad to say that I have lived these ten years to see that we were reunited in this Congress and we were going to put our voices and shoulders together to push on the scheme of self–government. Not only have we lived to see these differences closed, but to see the differences of Hindus and Mahomedans closed as well. So we have now united in every way in the United Provinces and we should have found that luck in Lucknow.

The resolution is in fact a synthesis of all the Congress resolutions during the last thirty years, a synthesis that will help all to proceed to work in a definite and responsible manner. I believe that the Congress has done its work as a deliberative body. The next part is the executive and that will be placed before you afterwards. Remember what has to be done. All thorns in your way have been removed. Do not shirk but work for what has been described in this scheme. The days of wonders are gone. These are days of work and incessant labour and I hope that by the help of Providence you will find that energy and those resources which are required for carrying out the scheme within the next two years.

यानंतर बिहारचे मझर उल हक यांनी या ठरावाला पाठिंबा दिला. हा ठराव संपूर्ण एकमताने टाळ्यांच्या गजरात संमत झाला. असें ठरलें की, या ठरावाची प्रत, काँग्रेसच्या अध्यक्षांच्या सहीने, व्हॉइसरॉयांच्या द्वारा इंग्लंडमध्ये बादशहांच्या सरकारकडे पाठविण्यात यावी.

या ठरावासाठी हिंदु व मुसलमानांचें ऐक्य ज्या अटींवर झालें त्याला लखनौ पॅक्ट असें म्हणतात. लखनौ पॅक्ट ही भारताच्या इतिहासातील संस्मरणीय घटना आहे. लखनौच्या या संधीने भारताच्या इतिहासात प्रथमच हें सिद्ध करून दाखविलें की, ब्रिटिशांविरुद्ध समान मागणीसाठी हिंदु व मुसलमान एक होऊ शकतात. हा संधि घडवून आणण्यासाठी टिळकांनी सगळ्यांत अधिक परिश्रम केले. मुसलमानांचें समाधान करून त्यांना स्वराज्याच्या मागणीच्या भूमिकेवर आणणें, भारताची एकमुखी मागणी स्वराज्य ही आहे, त्यात मतभेद नाहीत हें जगासमोर सिद्ध करून दाखविणें, हें ऐतिहासिक महत्त्वाचें कार्य टिळकांच्या हातून घडलें. त्यांच्यापूर्वी तें कुणाला करता आलें नाही व त्यांच्यानंतरच्या नेतृत्वाची तर मुसलमानांनी विभाजनाचें उत्तर देऊन पुरती विटंबनाच केली. हें घडवून आणण्यासाठी टिळकांना अतिशय मोठी किंमत द्यावी लागली, (१) मुसलमानांची स्वतंत्र मतदारसंघाची मागणी टिळकांना मान्य करावी लागली. (२) मुस्लिम प्रतिनिधित्वात लोकसंख्येहून अधिक वाढ त्यांनी मान्य केली. (३) मुसलमानांना त्यांच्या हितसंबंधांच्या संरक्षणाच्या दृष्टीने हव्या होत्या त्या सवलती त्यांनी दिल्या.

लो. टिळकांच्या या अभूतपूर्व यशाने सर्वांचेच डोळे दिपले. पण या यशाने समाधान न पावलेले त्या संपूर्ण अधिवेशनात डॉ. मुंजे हे एकटेच होते. लखनौ पॅक्ट ही टिळकांची चूक आहे असें त्यांचें मत होतें. अप्रियता सहन करूनही त्यांनी तें वारंवार मांडलेलें आहे. असें त्यांना कां वाटलें असेल?



प्रकरण अठरावें

# स्वराज्यसंघाचें प्रचारकार्य

(सन १९१७ ते १९२०)

स्वराज्याची एकमुखी मागणी मान्य करण्यासाठी मुसलमानांच्या पदरात स्वतंत्र मतदारसंघाचें दान टाकण्यात कायमच्या दुहीचीं बीजें पेरलीं जातील व हिंदु-मुसलमान समाज एक दुसऱ्याशी कधीही एकात्मता पावू शकणार नाहीत असें मुंजे यांना वाटत होतें, व तेंच परिणामतः खरें ठरलें. आज लखनौच्या संधीचा निर्विकारपणे विचार केला तर या निर्णयावर यावेंच लागतें. भारतीय राजकारणातील एक थोर विचारवंत कै. डॉ. जयकर या गोष्टीच्या लाभहानीची मीमांसा करताना सांगतात:

"या एकमुखी मागणीला उद्देशून लखनौ करार असें नांव लोकांत प्रचलित झालेलें आहे. या कराराने काही काळपर्यंत हिंदुस्थानातील देशभक्तांनाच हलवून सोडलें असें नाही तर त्याच्या टीकाकारांनाही. ब्रिटिश लोक वारंवार पुकारा करीत की, हिंदुस्थानातील हिंदु व मुसलमान हे मुळातच वेगवेगळे असून त्यांच्यात एकजूट होणें कदापि शक्य नाही. ब्रिटिशांच्या या पुकाऱ्याला वरील कराराने चांगलाच धक्का दिला. हा करार घडवून आणण्यात ज्यांनी प्रमुख भाग घेतला त्यांत टिळक होते. राष्ट्रीय पक्षाच्या अनेक लोकांना याचें आश्चर्य वाटलें. गोखले यांनी १९०९-मध्येच जातवार मतदारसंघाच्या योजनेस मान्यता दिली होती. टिळकांनी ती १९१६-मध्ये दिली. ही मान्यता देताना ही एक तात्पुरती बाब आहे आणि स्वतः मुसलमानच ती आपण होऊन सोडून देतील अशी टिळकांना मनातून खात्री वाटत होती, व याच आधारावर त्यांनी स्वतंत्र-मतदारसंघास तात्पुरती म्हणून मान्यता दिली. स्वतः जिना टिळकांच्याच मताचे होते. १९१९-मध्ये पार्लमेंटरी सिलेक्ट कमिटीपुढे जिना यांची साक्ष झाली त्या वेळीही जिनांनी आपलें हें मत स्पष्टपणे मांडलें होतें. त्या वेळी झालेल्या प्रश्नोत्तरांतील काही असे होते :

मेजर आर्म्सली गोर – हिंदुस्थानच्या हिताची दृष्टि बाळगून तुम्ही बोलता, होय ना ?

जिना – होय.

मेजर गोर – म्हणजे शक्य तितक्या लौकर राजकारणातून हिंदु आणि मुसलमान असे भेद तुम्ही नाहीसे करू इच्छिता असाच तुमच्या म्हणण्याचा अर्थ ना ?

जिना – होय. असा दिवस उगवेल तो मी सुदिन मानीन.

तथापि हिंदूंनी जरी ही अपेक्षा मनात बाळगून मुसलमानांच्या स्वतंत्र मतदारसंघाला मान्यता दिली होती, तरी थोड्याच काळात त्यांच्या लक्षात येऊन चुकलें की, उभय समाजांत ऐक्यभाव निर्माण होण्या-ऐवजी त्यांच्यातील दुजाभाव वाढत गेला. नंतरच्या काळात ऐक्य-साधनाचे प्रयत्न वारंवार करण्यात आले तरी वाढत चाललेलें अंतर भरून काढणें अशक्य होऊन बसलें.

– The Story of My Life, Vol I, M. R. Jayakar P. 159 and 161 (मराठी अनुवाद)

जर यानंतर टिळकांना भरपूर आयुष्य लाभलें असतें तर त्या वेळी तरी राष्ट्रीय असलेल्या जिनांना त्यांनी शेवटपर्यंत फटकू दिलें नसतें व एका उदात्त ध्येयासाठी तात्पुरती म्हणून केलेली सैद्धांतिक चूक त्यांनी सुधारून घेतली असती असें म्हणता येईल. पण त्यांना आयुष्य कमी पडलें व या तत्त्वाचे दुष्परिणाम साऱ्या राष्ट्राच्या जीवनाच्या दृष्टीने हानिकारक ठरले.

असो. लखनौच्या राष्ट्रीय सभेत मवाळ व जहाल आणि हिंदु व मुसलमान यांची तात्पुरती कां होईना पण एकात्मता साधून, महायुद्धाच्या समाप्तीच्या ऐनतोंडी भारताची स्वराज्याची एकमुखी मागणी जगासमोर मांडून, सभ्यतेचा बुरखा पांघरलेल्या ब्रिटिश साम्राज्यवाद्यांना पेचात धरण्याच्या बाबतीत लखनौ काँग्रेसमध्ये टिळक शंभर टक्के यशस्वी ठरले. लखनौच्या राष्ट्रीय सभेनंतर दि. ३० डिसेंबरला संध्याकाळी ब्रह्मविद्या मंडपात स्वराज्य संघाची परिषद झाली. या परिषदेला सर्व भारतातून आलेले एक सहस्र स्वराज्यवादी उपस्थित होते. अध्यक्षस्थानी ॲनी बेझंट होत्या. प्रारंभी त्यांचें भाषण झालें. त्यानंतर त्यांच्या म्हणण्यावरून टिळक बोलावयास उठले. लखनौ करारात मुसलमानांना आपण ज्या सवलती दिल्या व स्वतंत्र मतदारसंघाला मान्यता दिली ते मुंजे यांच्या सारख्या आपल्या कडव्या अनुयायांना संमत नाही हें त्यांनाही डाचत असलें पाहिजे. त्यांनी या भाषणात याच प्रकरणाचा विशेष ऊहापोह केला. ते म्हणाले की, " एखाद्या भानगडीच्या मुकदम्यात पक्षकार चांगल्या वकिलाची मदत मिळविण्याकरिता दाव्याच्या मिळकतीतील बराचसा भाग वकिलाला देण्याचें कबूल करतो. त्याचप्रमाणे स्वराज्याच्या

मागणीत मुसलमान बंधु सामील व्हावे म्हणूनच त्यांना ह्या विशेष सवलती दिल्या आहेत. तें बरोबर असो, कां चूक असो."

—समग्र केळकर वाङ्मय, खंड २ रा पृ. ५९४

दि. ३१ डिसेंबर १९१६-पर्यंत टिळकांचें वास्तव्य लखनौ येथे होतें. याच दिवसात तेथे हिंदु महासभेचें अधिवेशन झालें. या अधिवेशनाला निमंत्रणावरून टिळक उपस्थित राहिले व तेथे त्यांचें भाषणही झालें. तात्यासाहेब केळकर लिहितात, " मुसलमानांना सवलती देवविल्याबद्दल हिंदुसभा टिळकांवर रागावलेली होती."

असो. लखनौ कॉंग्रेसला जोडून स्वराज्यसंघाची जी परिषद झाली तिचा मवाळांनी इतका धसका घेतला की, त्यांच्यातील बदलत्या परिस्थितीशी समरस होऊ न शकणाऱ्या मवाळाग्रणींनी पुन्हा म्हणून कॉंग्रेसचें तोंड पाहिलें नाही. गांधी या राष्ट्रीय सभेला उपस्थित होते. त्यांचें एका ठरावावर भाषणही झालें. पण त्या वेळी तें मुळीच प्रभावी नव्हतें. विषयनियामक समितीत प्रथम त्यांचें नांवही नव्हतें. पुढे कोणी तें सुचविलें पण त्याला पाठिंबा मिळेना. शेवटी राष्ट्रीय पक्षाच्या लोकांनीच टिळकांच्या सूचनेवरून त्यांना निवडून दिलें.

लखनौ कॉंग्रेसमध्ये एकमुखी स्वराज्याची मागणी ठरावरूपाने झाल्यावर सारें राष्ट्र तिला अनुकूल करून घेण्यासाठी टिळकांनी तत्काळ दौरा प्रारंभ केला. लखनौहून कानपूर व कलकत्ता येथे जाऊन ते दि. ६ जानेवारीला नागपूरला आले. नागपूरला त्यांचें स्वागत अपूर्व झालें. त्यांची मोठी मिरवणूक निघाली. स्वराज्यसंघाचे नागपूर शाखेचे चिटणीस नारायणराव वैद्य वकील यांच्याकडे त्यांचें स्नान व भोजन झालें. संध्याकाळी ते गोपाळराव बुटी यांच्याकडे राहावयास गेले. दुसऱ्या दिवशी सायंकाळी चिटणीस पार्कमध्ये जाहीर सभा होऊन टिळकांचें भाषण झालें. टिळकांच्या या सभेला सर बिपिन कृष्ण बोस, डॉ. गौर, रा. ब. पंडित, ना. दीक्षित हे अग्रगण्य नेमस्त उपस्थित होते. सर गंगाधरराव चिटनवीस आजारी असल्यामुळे येऊ शकले नाहीत. डॉ. गौर हे या सभेचे अध्यक्ष होते. आपल्या भाषणात टिळकांनी, " परमेश्वर हा प्रयत्नान्ती असतो; वाचान्ती नसतो " असें सांगून स्वराज्यसंघाच्या कार्याला सर्वांनी येऊन मिळण्याचें आवाहन केलें. दुसऱ्या दिवशी बॅ. मोरोपंत अभ्यंकर यांच्या घरी टिळकांना थाटाची मेजवानी झाली व तेथूनच ते स्टेशनवर गेले. केळकर लिहितात, " कर्मधर्मसंयोगाने टिळक जाणार त्याच गाडीला चीफ सेक्रेटरी ना. गोकॉंक आले होते. त्यांना टिळकांच्याकरिता जमलेल्या गर्दीतून स्टेशनच्या बाहेर पडणेंही मुष्किलीचें झालें आणि

टिळकांच्या सत्काराचा हा समारंभ उभें राहून डोळयांनी पाहण्याची आपत्ति त्यांच्यावर आली. ”

—समग्र केळकर वाङ्मय, खंड २ रा, पृ. ६०३

नागपूरहून यवतमाळ, कारंजा व अकोला असा दौरा करून ते परत पुण्याला गेले. टिळकांची ही नागपूर वऱ्हाडाला भेट अत्यंत परिणामकारक ठरली. या दौऱ्याविषयी नागपूरचा महाराष्ट्र लिहितो, “ टिळकांच्या शब्दाकरिता काय वाटेल तें करू असें म्हणणारे व त्याप्रमाणे खरोखर करतील असे लोक आमच्या ह्या प्रांतांत खचित सापडतील. ” दि. २८ जानेवारीला पुण्याला गायकवाड वाडयात टिळकांच्या अध्यक्षतेखाली स्वराज्यसंघाची बैठक झाली. तिला नागपूर विदर्भातून डॉ. मुंजे व बापूजी अणे गेले होते. दुसऱ्या दिवशी टिळकांच्या अध्यक्षतेखाली बापूजींचें भाषण झालें.

या बैठकीहून परत आल्यावर डॉ. मुंजे यांनी एप्रिलपर्यंत प्रांतभर फिरून स्वराज्यसंघाच्या शाखा स्थापन केल्या. जानेवारी ते एप्रिल या कालखंडापर्यंत नागपूर प्रांतात पंधराशेच्या वर स्वराज्यसंघाचे सभासद नोंदविण्यात आले. टिळक या वेळी सैन्यभरतीचा उपदेश करीत. मुंजे यांचें तर तें आवडतें कामच होतें. पण स्वराज्याच्या मागणीचा व सैन्य भरतीचा एकाच वेळी होणारा उच्चार सरकारच्या मनात सशस्त्र बंडाचा प्रेरक ठरला. सरकारने पिसाळून पुढाऱ्यांच्यावर शस्त्र धरलें. मद्रास सरकारने भारत संरक्षण कायद्याच्या तिसऱ्या कलमान्वये ॲनी बेझंट यांना व त्यांच्या दोन अनुयायांना पकडलें. टिळकांसंबंधी पंजाब सरकारने दि. १३ फेब्रुवारीला अशी आज्ञा काढली की, “ पुण्याचे चित्पावन ब्राह्मण टिळक यांचा पंजाबात येण्याचा आणि सार्वजनिक सुरक्षिततेस धोका येईल अशा रीतीने वागण्याचा इरादा आहे असें समजतें. तरी त्यांनी पंजाबात पाऊल ठेवू नये. तसें केल्यास तीन वर्षांची कैद व दंड यांना ते पात्र ठरतील. ” सरकारच्या या रीतीच्या वागण्याचा परिणाम नेमका उलटा झाला. होमरूलची चळवळ त्यामुळे अधिक लोकप्रिय होऊन फोफावू मात्र लागली. देशातील बहुतेक नामवंत पुढारी याच चळवळीत समाविष्ट झाले. मध्यप्रदेशाच्या हिंदी विभागात हें आन्दोलन पसरून डॉ. हरिसिंग गौर, पं. रविशंकर शुक्ल, डॉ. ई. राघवेन्द्रराव यांच्यासारख्या तोलाच्या नेत्यांनी तें उचलून धरलें. सुप्रसिद्ध अल्लीबंधू (महंमद अल्ली व शौकतअल्ली यांना या वेळी छिंदवाडयाला स्थानबद्ध करण्यात आलें होतें. ते तेथेच स्वराज्यसंघाचे सभासद झाले. स्वराज्यसंघाच्या चळवळीत प्रांतातील तरुण विद्यार्थिवर्ग जाणवण्याइतक्या बहुसंख्येने

भाग घेऊ लागला. शिक्षणखात्यातील अधिकाऱ्यांनी लादलेल्या कडक निर्बंधांना मुळीच भीक न घालता स्वराज्यसंघाच्या सभा व मिरवणुकींना हजारोंच्या संख्येने विद्यार्थिवर्ग उपस्थित राही. रागावलेल्या शिक्षणाधिकाऱ्यांनी शिस्तभंगाच्या नांवाखाली नागपूर, वर्धा, यवतमाळ व अमरावती येथील शेकडो विद्यार्थ्यांना शाळांतून काढून टाकलें. पण ' केला जरी पोत बळेंचि खाले ! ज्वाला तरी ते वरती उफाळे ॥ ' अशीच या आन्दोलनासंबंधात सरकारी अधिकाऱ्यांना प्रतीति आली.

एप्रिलमध्ये कलकत्ता येथे लखनौचा ठराव कार्यवाहीत आणण्याचा विचार करण्यासाठी ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची बैठक झाली. या बैठकीला कमेटीचे सदस्य या नात्याने डॉ. मुंजे हे टिळक व खापर्डे यांच्या बरोबर कलकत्त्याला गेले. खापर्डे आपल्या दि. ६–४–१७-च्या दैनंदिनीत लिहितात : – " ९ वाजता आम्ही स्टेशनवर गेलो. लोकमान्य मेल ट्रेनमध्ये होते. मी व डॉ. मुंजे यांनी तिकिटें विकत घेतलीं व आम्ही फर्स्टक्लास मध्ये बसलो. गांधी, समर्थ, देवधर आणि प्रा. काळे दुसऱ्या डब्यात होते. प्लॅटफॉर्मवरती फार मोठ्या संख्येने लोक उपस्थित होते. त्यांनी त्यांचा (लो. टिळक) जयजयकार केला आणि फळें, खाण्याचे पदार्थ आणि माळा आणून दिल्या. जेथे जेथे गाडी थांबली तेथे हाच प्रकार घडत गेला. एक गमतीची गोष्ट झाली. या सर्व निदर्शनांचें देवधरांना इतकें आश्चर्य वाटलें की, त्यांनी या लोकांना कोणी बोलविलें आहे का असें गोखल्यांना (अमरावतीचे) विचारलें. अर्थात् त्यांना नकारात्मक उत्तर मिळालें. " बाबासाहेब खापर्डे लिहितात, ह्या गाडीत गांधीजी होते ही गोष्ट गमतीची वाटते. प्रत्येक स्टेशनवर लोकमान्यांचें होणारें स्वागत पाहून कोणाशी गाठ आहे याची पूर्ण कल्पना येण्याला त्यांना मदत झाली असेल. "

–दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र, लेखक : बाबासाहेब खापर्डे पृ. ५०४

कलकत्त्याच्या या बैठकीत विलायतेत स्वराज्याच्या मागणीसाठी शिष्टमंडळ पाठवावयाचें व राष्ट्रीय सभेचें पुढचें अधिवेशन कलकत्त्याला भरवावयाचें ठरलें.

कलकत्त्याची सभा आटोपून नागपूरला आल्यावर कार्यकर्त्यांची बैठक घेऊन दि. २८-ला डॉ. मुंजे यांनी स्वराज्यसंघाचा वार्षिकोत्सव मोठ्या प्रमाणावर साजरा करण्याची योजना आखली. दादासाहेब खापर्डे या उत्सवाचे अध्यक्ष होते. या उत्सवानंतर दि. ३०-पासून डॉ. मुंजे व डॉ. ई. राघवेन्द्रराव यांच्या संमतीने प्रांताच्या दौऱ्याची योजना आखण्यात आली. तदनुसार डॉ. मुंजे यांच्यासह वर्धा व चांदा येथे खापर्डे जाऊन आले. या दौऱ्यात महाराष्ट्राचे संपादक ओगले व धुंडीराजपंत ठेंगडी

होते. या दौऱ्यात चांद्याचा कार्यक्रम अतिशय गाजला. त्याचें सर्व श्रेय श्री. बळवंतराव उपाख्य बाबासाहेब देशमुख वकील यांना आहे.

या दौऱ्याहून डॉ. मुंजे व खापर्डे नागपूरला परत आले तों लोकमान्यांचें एक पत्र मुंजे यांची वाटच पहात होतें. या पत्रात टिळकांनी डॉ. मुंजे यांना असें लिहिलें होतें की, श्री. दादासाहेब खापर्डे यांना सुप्रीम लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्ये सभासद या नात्याने पाठवावें. लोकमान्यांचें हें पत्र येताच मुंजे यांनी नीळकंठराव उधोजी यांच्या घरी कार्यकर्त्यांची एक सभा बोलाविली. या सभेला डॉ. मुंजे, अळेकर, नारायणराव वैद्य, भवाळकर, केशवराव दप्तरी, पंडित, देव, गोपाळराव ओगले इत्यादि कार्यकर्ते उपस्थित होते. बैठकीत टिळकांचें पत्र मुंजे यांनी वाचून दाखविलें. टिळकांचें पत्र म्हणजे नागपूरची मंडळी आज्ञापत्रच मानीत होती. बाबासाहेब खापर्डे लिहितात, "लोकमान्यांच्या इच्छेस मान देणें सर्वांचेंच कर्तव्य. याप्रमाणे दादासाहेबांना सुप्रीम कौन्सिलकरिता उभें करण्यात आलें. त्यांचे प्रतिस्पर्धी दादाभाई हे फार धनाढ्य असून त्यांना सरकारचा पाठिंबा होता. डॉ. गौर उभे राहिले होते; पण दादाभाईंची वाट मोकळी करून देण्याकरिता त्यांनी आपली उमेदवारी परत घेतली. दादासाहेबांच्या या उमेदवारीचें आमच्या कुटुंबावर व विशेषत: माझ्या वैयक्तिक जीवनावर दूरगामी परिणाम झाले. दादासाहेबांनी या कौन्सिलकरिता उभें रहावें हें कोणाच्या मनी मानसी नव्हतें. खुद्द दादासाहेबांची त्या दिशेने कधी वाटचाल नव्हती. लोकमान्यांनी स्वत:च्या राजकारणाचा वरच्या थरात प्रवेश व्हावा म्हणून ही कल्पना काढली आणि त्यासंबंधी दादासाहेबांची संमतिही न घेता परस्पर मुंज्यांना त्यांनी पत्र लिहिलें व योग असा आला की, हें पत्र यायला आणि दादासाहेब नागपूरला असायला एक गाठ पडली." टिळकांच्या इच्छेनुसार व डॉ. मुंजे यांच्या आग्रहावरून दादासाहेब निवडणुकीला उभे राहिले व आपले प्रतिस्पर्धी दादाभाई यांचा पराभव करून निवडून आले.

दि. १७ व १८ मेला नाशिकला ना. श्रीनिवास शास्त्री यांच्या अध्यक्षतेखाली प्रांतिक परिषद झाली. या परिषदेला लोकमान्य उपस्थित होते. या परिषदेला जोडून डॉ. जयकर यांच्या अध्यक्षतेखाली सामाजिक परिषद झाली. तिलाही टिळकांनी उपस्थित राहून तेथे भाषण केलें. प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष ना. श्रीनिवासशास्त्री यांनी आपल्या भाषणात स्वराज्यसंघाचा जोरदार पुरस्कार केला. बदलत्या काळाचें तें निदर्शक होतें. दि. १७ मेला परिषदेच्याच मंडपात स्वराज्यसंघाचें वार्षिक

अधिवेशन होऊन त्यात एकंदर व प्रांतशः स्वराज्यसंघाच्या कार्याचा आढावा घेण्यात आला. या अधिवेशनाला खापर्डे, अणे, मुंजे, चांद्याचे बळवंतराव देशमुख, वर्ध्याचे अत्रे वकील, नागपूरचे अळेकर, गोपाळराव देशमुख प्रभृति. मध्यप्रांत व वऱ्हाडातील मंडळी उपस्थित होती. स्वराज्यसंघाच्या वाढदिवशी चिटणिसांनी त्याच्या कार्याचा जो आढावा घेतला तदनुसार १४२१८ सभासद झाले होते. त्यात शे. ४२ ब्राह्मण व ४३ ब्राह्मणेतर असें प्रमाण असून ३०९ सभासद मुसलमान व ११ पारशी होते. अनेक जिल्ह्यांतून व्याख्यानमालांच्या द्वारे सतत प्रचार सुरू होता. प्रचारवाङ्मय म्हणून स्वराज्यसंघाने सहा मराठी व दोन इंग्रजी पुस्तकें प्रसिद्ध केलीं. त्यांच्या ७५ हजार प्रतींपैकी ४७ हजार प्रती खपून गेल्या होत्या. विशेष म्हणजे या अधिवेशनाच्या वेळी ॲनी बेझंट या टिळकांच्या संघाच्या सभासद झाल्या व टिळक त्यांच्या संघाचे सभासद होऊन दोन संघ वस्तुतः एकच झाले.

जों जों ही स्वराज्याची चळवळ उग्र होऊ लागली तों तों सरकारनेही ताळतंत्र सोडला. हिंदी संस्थानांचीं भुतें जागवून या चळवळीला दडपून टाकण्याचाही प्रयत्न सरकारने केला. कोल्हापूरचे महाराज त्यातच होते. इकडे भारत सरकार या कारवाया करीत असताना तिकडे इंग्लंडमध्ये मात्र मुख्य प्रधान लॉइड जॉर्ज स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा पुरस्कार करून तें तत्त्व ज्या वसाहतींना लागू करावयाचें त्यांत हिंदुस्थानचाही समावेश असल्याचें उद्घोषित होते.

या वेळी उटकमंड येथे मद्रास कौन्सिलच्या बैठकीच्या वेळी भाषण करताना गव्हर्नर लॉर्ड पेटलंड म्हणाले, "हिंदी लोकांचें साध्या सुधारणांनी समाधान न होता ते जबाबदारीचें स्वराज्य व तेंही ताबडतोबीने मागू लागले आहेत आणि हें देणें तर शक्य नाही. ज्या सुधारणा युद्धानंतर इंग्लंड देईल त्या होमरूलपेक्षा अर्थातच कमी असतील. हें माहीत असून होमरूल मागण्याची चळवळ लोकांनी चालविल्याचा परिणाम असा होईल की, सरकार व लोक यांमध्ये मतभेद, गैरसमज व कदाचित् घासाघीस आणि मारामारीही होईल. या सर्वांची जबाबदारी चळवळ करणारांवर आहे. आम्ही योग्य दिसतील ते उपाय योजू." हिंदुस्थानला ही जरब देत असतानाच आयर्लंडच्या होमरूलचा प्रश्न मात्र इंग्लंडचें प्रधानमंडळ धसाला लावीत होतें. याचें कारण अमेरिकेने इंग्लंडला "आयर्लंडचा प्रश्न लवकर न सोडविल्यास अमेरिका युद्धात साह्य करणार नाही" असें बजाविलें होतें हें होय. हिंदुस्थानचा असा पाठीराखा त्या वेळी कोणी नव्हता. मद्रासच्या गव्हर्नरच्या या धमका-

वणीला कोणी भीक घातली नाही. मद्रासचे नेमस्त पुढारी सर सुब्रह्मण्यम् अय्यर यांनी प्रकट निवेदन केलें की, "मी हायकोर्ट जज्ज होतो; पण त्याही पूर्वी मी काँग्रेसभक्त होतो. मला राजकारणातील जबाबदारी कळते. आणि मी पेटलंडसाहेबांच्या भाषणाला उत्तर म्हणून प्रसिद्ध करतो की, मी होमरूलच्या मागणीचें समर्थन करणार. त्याबद्दल त्यांनी हवी ती शिक्षा करावी." सरकारला अशा तऱ्हेचीं अनेक पत्रें येऊ लागलीं. चिडून मद्रास सरकारने अॅनी बेझंट यांना अटक केली. विद्यार्थ्यांवर निर्बंध लादण्यात येऊ लागले. प्रेस अॅक्टने वृत्तपत्रें, पोलिस अॅक्टने व्याख्यानें व डिफेन्स ऑफ इंडिया अॅक्टने पुढारी यांचे गळे आवळण्यात येऊ लागले. पण लोकांनीही, "आम्ही स्वराज्याची मागणी करणारच" अशी सत्याग्रही भाषा प्रारंभ केली. हिंदुस्थानभर सभा होऊन पेटलंड यांचा धिक्कार करण्यात आला. स्वराज्यसंघाची सभासद संख्या भराभर वाढू लागली. या चळवळीकरिता बोमनजी शेठ हे एक लक्ष रुपये द्यावयास सिद्ध झाले. सुरेन्द्रनाथ बॅनर्जी व महंमद अल्ली जिना यांनीही आपण स्वराज्यवादी असल्याचें लिहून दिलें. महाराष्ट्र स्वराज्य संघाने या वेळी एक पत्रक काढून त्याच्या प्रती सर्व जिल्ह्यांतून पाठवून दिल्या. त्या पत्रकावर हस्ताक्षर करून तीं पत्रकें लोक संघाच्या कचेरीकडे पाठवीत. तें पत्रक असें : "१९१६-च्या लखनौ येथील राष्ट्रीय सभेत झालेल्या ठरावान्वये जी स्वराज्य योजनेची मागणी निश्चित झाली व जिला आम्ही होमरूल असें म्हणतो त्या मागणीचा पुरस्कार आम्ही आजवर करीत आलो व त्याप्रमाणे पुढेही करीत राहू. लॉर्ड पेटलंड यांच्या दि. २४ मेच्या भाषणाचा आम्ही निषेध करतो. वर सांगितलेल्या प्रकाराची स्वराज्याची मागणी सरकारने बेकायदेशीर ठरविली तरी आम्ही स्वराज्यवादापासून पराङमुख होणार नाही व या कृत्याचे जे परिणाम होतील ते भोगू असें आपणांस कळवितो." सरकारला जनतेने दिलेलें हें रोखठोक उत्तर होतें. नागपूर प्रांतातून शेकड्यांनी हीं पत्रकें भरून संघाच्या मुख्य कचेरीकडे रवाना करण्यात आलीं. अलाहाबादचे नेमस्ताग्रणी व लीडर पत्राचे संपादक सी. वाय्. चिंतामणि स्वतः या वेळी स्वराज्यसंघाचे सभासद झाले व त्यांनी सर्व काँग्रेसभक्तांना पुढीलप्रमाणे आवाहन केलें. "तुम्ही असा प्रश्न कराल की, आम्ही काँग्रेसचे अनुयायी आहोत आणि काँग्रेसने स्वराज्याचा प्रश्न हाती घेतलाच आहे मग स्वराज्यसंघाचे सभासद होण्यातच अधिक लाभ कोणता? त्यावर माझें असें उत्तर आहे की, यात निश्चितपणेच अधिक लाभ आहे. सरकारचे दाखवावयाचे दात वेगळे व खावयाचे

संशयखोरी आणि त्यांचे अत्याचार यांनी भारताचा स्वाभिमान दुखावलेला होता; व निराशा आणि विलंब यामुळें सरकारवरील जनतेचा विश्वास उडाला होता. या जाहिरनाम्यानंतर दि. २६ ऑगस्टला रायपूर येथे मध्यप्रांताची विशेष प्रांतिक परिषद भरली. त्या परिषदेत भारतमंत्र्यांचा जाहिरनामा व सरकारची दमननीति यांची प्रतिक्रिया व्यक्त झाली. या परिषदेत श्री. मोरोपंत दीक्षित यांनी पुढील ठराव मांडला. "भारतसंरक्षण कायद्याखाली मद्रास सरकारने ॲनी बेझंट, अरुंडेल व वाडिया यांना जें पकडलें आहे त्यासंबंधीची आम्ही आमची तीव्र प्रतिक्रिया व्यक्त करतो. या कायद्याचा हेतु व त्यासंबंधी अधिकाऱ्यांनी वारंवार केलेलीं स्पष्टीकरणें यांवरून सरकारच्या कारभारात वैध मार्गांनी सुधारणा करण्याचा प्रयत्न करणें निश्चितपणे अपराधाचें ठरत नाही."

परिषदेचे अध्यक्ष डॉ. गौर यांनी देशाला सत्याग्रहाच्या पायरीपर्यंत आणून टाकण्यास सरकारची अत्याचारी नीतिच कारणीभूत आहे असें सांगून मवाळांतला मवाळही या सरकारी धोरणाने त्रस्त झालेला आहे असे उद्‌गार काढले. ते शेवटी म्हणाले, "आम्ही ही परिस्थिति मूग गिळून मुकाट्याने सहन करू शकत नाही. सरकारच्या अत्याचारी प्रवृत्तीला आपल्याला उत्तर द्यावेंच लागेल. सरकारला हें कळावयाला पाहिजे की, या धोरणाने जनतेत असंतोषाच्या ज्वाला निर्माण होतील व पुढे त्या आवरता वा विझविता येणार नाहीत."

या परिषदेने भारतमंत्र्यांच्या जाहिरनाम्याचें वरवर स्वागत केलें; पण सरकारने आपलें दमनाचें धोरण बदलणें अवश्य आहे हें स्पष्ट भाषेत सांगितलें.

सप्टेंबर महिन्यात भारतमंत्र्यांच्या आज्ञेने ॲनी बेझंट यांची त्यांच्या सहकाऱ्यांसह मुक्तता करण्यात आली व त्या पाठोपाठच भारत मंत्र्यांनी हिंदुस्थानातील पुढाऱ्यांशी व शिष्टमंडळाशी चर्चा करावयास्तव व त्यांचें म्हणणें ऐकून घ्यावयास्तव स्वत: हिंदुस्थानात येत असल्याची घोषणा केली. या घोषणेनुसार ९ नोव्हेंबरला मॉंटेग्यू हिंदुस्थानात आले व दि. १७ नोव्हेंबरपासून त्यांनी हिंदी शिष्टमंडळाच्या गाठीभेटी घ्यावयास प्रारंभ केला. त्यासाठी महाराष्ट्र स्वराज्यसंघाच्या वतीने जें शिष्टमंडळ गेलें त्यात नागपूर प्रांताच्या वतीने डॉ. मुंजे व नीळकंठराव उधोजी हे होते. डॉ. मुंजे प्रथम मुंबईला जाऊन तेथून टिळकांबरोबर दिल्लीला गेले. दि. २६-ला मॉंटेग्यूसाहेबांनी या शिष्टमंडळाची भेट घेतली. या भेटीहून परत आल्यावर मुंजे यांनी दि. ५ डसेंबरला नागपूरला होमरूल लीगच्या खास कार्यकर्त्यांची बैठक घेतली.

या बैठकीसाठी दादासाहेब खापर्डे उमरावतीहून आले होते. आगामी कलकत्ता काँग्रेससंबंधी या बैठकीत मुख्यत: चर्चा झाली. यानंतर दि. २६ ते २९ कलकत्ता येथे राष्ट्रीय सभेचें वार्षिक अधिवेशन झालें. या अधिवेशनाला डॉ. मुंजे गेले होते. ॲनी बेझंट यांना सरकारने जें अपमानास्पद रीतीने वागविलें त्याचें उत्तर म्हणून जनतेने त्यांनाच या वर्षीच्या काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवडलें होतें. डॉ. मुकुंदराव जयकर हे या अधिवेशनाला उपस्थित होते. भारतमंत्र्यांच्या घोषणेच्या पार्श्वभूमीवरील हें अधिवेशन असल्यामुळे त्याला विशेष महत्त्व होतें. विश्वकवि रवीन्द्रनाथ ठाकूर यांच्या कवितावाचनाने अधिवेशनाला आरंभ झाला. अध्यक्ष ॲनी बेझंट यांनी स्वराज्याची आवश्यकता व हिंदुस्थानचा त्यावरील अधिकार यावर आपल्या अध्यक्षीय भाषणात विवेचन करून असे उद्गार काढले की, उदयास येणाऱ्या नव्या जगात गौर वर्णाच्या वर्चस्वावरील विश्वास उडाला आहे ही फार चांगली गोष्ट आहे. या अधिवेशनात एकंदर पंधरा ठराव संमत करण्यात आले. त्यांतील दोन महत्त्वाचे होते. पहिल्या ठरावाने भारतमंत्री माँटेग्यू यांचें स्वागत करण्यात आलें होतें. हा ठराव अध्यक्षांनीच मांडला. दुसऱ्या ठरावात स्वराज्याची मागणी करण्यात आली होती. तो ठराव पुढीलप्रमाणे :

"साम्राज्य सरकारच्या वतीने भारतमंत्र्यांच्या जाहिरनाम्यात असें जें घोषित करण्यात आलें आहे की, हिंदुस्थानात जबाबदार राज्यपद्धतीची स्थापना करणें हें साम्राज्याचें ध्येय आहे, त्या घोषणेचें स्वागत करून ही राष्ट्रसभा त्याविषयी कृतज्ञता व समाधान व्यक्त करते. भारतात जबाबदार राज्यपद्धति निर्माण करण्यासाठी ब्रिटिश पार्लमेंटने शक्य तितक्या लवकर पाऊल उचलण्याची आवश्यकता आहे. विशिष्ट मुदतीत हिंदुस्थानला ही राज्यपद्धति देण्यात आली पाहिजे व ती मुदत प्रकट करण्यात आली पाहिजे. त्यासाठी ब्रिटिश सरकारने या मार्गातील पहिलें पाऊल म्हणून काँग्रेस लीग सुधारणा योजना तत्काळ व्यवहारात आणावी. हा ठराव सुरेन्द्रनाथ बॅनर्जींनी मांडला व त्याला लो. टिळक, चित्तरंजन दास, बिपिनचंद्र पॉल, महंमद अल्ली जिना, व जयकर यांनी पाठिंबा दिल्यावर तो एकमताने संमत झाला. कलकत्त्याच्या या ऐतिहासिक अधिवेशनानंतर लो. टिळकांना नागपूरला आणण्याचा योग डॉ. मुंजे यांनी साधला. त्यासाठी जें निमित्त घडलें तें म्हणजे कीर्तन संमेलन होय.

धर्मवीर डॉ. मुंजे यांनी प्रभावशाली कीर्तनकारांतून राष्ट्रधर्माचे प्रचारक कीर्तनकार निर्माण करावे या आकांक्षेने इ. स. १९१२-मध्ये खापर्डे यांच्या अध्यक्षतेखाली पहिलें कीर्तन संमेलन नागपूरला घडविलें होतें याचा निर्देश मागे केलाच आहे. त्या संम्मेलनातून त्यांना दादा-शास्त्री कायरकर व कृष्णशास्त्री भीष्म हे दोन राष्ट्रीय वृत्तीचे कीर्तन-कार लाभले. त्यांपैकी कायरकरांचा त्यांना पुष्कळच उपयोग झाला. प्रांतिक परिषदांतून भाग घेऊन कायरकरशास्त्री संस्कृत भाषणें करीत. गीतारहस्याचे प्रचारक म्हणूनही त्यांनी सन १९१५-पासून प्रांतभर दौरे केले. १९१७-च्या सरकारी दडपशाहीच्या परिस्थितीत धर्म-प्रचारकांचा हा वर्ग संघटित स्वरूपात तयार करण्याची कल्पना पुनश्च मुंजे यांच्या मनात घर करू लागली. नागपुरातील शास्त्री, पंडित, प्रवचनकार व कीर्तनकार यांना एकत्रित करून व काही आधुनिक लोकनेत्यांनाही त्या योजनेत ओढून महाराष्ट्रातील सर्व कीर्तनकारांचें व्यापक प्रमाणावर संमेलन भरविण्याची योजना मुंजे यांनी त्यांच्या गळी उतरविली. दि. ३०-६-१७-च्या महाराष्ट्राच्या अंकातून व केसरी आणि संदेश मधूनही त्यांनी ती योजना प्रसिद्ध केली. त्यानंतर कीर्तन या विषयावर निबंध मागविण्यासाठी त्यांनी पुढीलप्रमाणे निवेदन प्रसिद्ध केलें.

(अ) कीर्तन संप्रदायाचा पूर्व इतिहास काय? व ही परंपरा सुरू करणारा आद्य पुरुष कोण? महाराष्ट्रात कीर्तनसंप्रदाय प्रचलित व लोकप्रिय कोणी केला?

(आ) कीर्तन संप्रदाय उत्पन्न करण्याचा उद्देश काय? तोच उद्देश हल्ली प्रचलित असलेल्या कीर्तनपद्धतीने सफल होतो काय? नसल्यास हल्लीच्या कीर्तन पद्धतीस कोणतें व कशा प्रकारचें वळण द्यावें?

(इ) हल्ली चालू असलेली कीर्तनपद्धति लोकादरास पात्र होण्यास कीर्तनकाराचें शिक्षण, आचरण व राहणी कशी पाहिजे?

(ई) कीर्तनात उपयुक्त असलेल्या गायनकलेस कितपत महत्त्व द्यावें?

(उ) कीर्तनकार व श्रोते यांचा संबंध काय? आणि कीर्तन-काराचा उपदेश व्यक्तिविषयक, सामाजिक व राष्ट्रीय संसारास कसा उपयोगी पडेल?



उभे (डावीकडून) डॉ. मुंजे, श्री. नीलकंठराव उधोजी, श्री. दादाशास्त्री कायरकर
बसलेले (डावीकडून) कीर्तनाचार्य रामचंद्रबुवा चांदवडकर, लोकमान्य टिळक व
पं. कृष्णशास्त्री तैलंग

## विशेष खुलासा

(१) वरील प्रश्नांच्या उत्तरादाखल निबंध लिहून आमचेकडे पाठविल्यावर जो निबंध सर्वांत अधिक पसंत पडेल त्यास २५ रु. बक्षीस देण्यात येईल.

(२) निबंध लिहिणारा धंद्याने उपदेशक वर्गापैकी (कीर्तनकार किंवा पुराणिक असल्यास २५ रु. व इतर धंद्याचे गृहस्थास २० रु. या प्रमाणे बक्षीस मिळेल.

(३) निबंध १८ ऑगस्ट ते १६ सप्टेंबर १९१७ या मुदतीत आमचेकडे आला पाहिजे.

(४) आवश्यक असल्यास मुदतवाढीची सवलत देण्यात येईल. बक्षीस कीर्तनसंमेलनप्रसंगी दिलें जाईल.

(५) निबंध सुवाच्य, बाळबोध लिपीत लिहिलेला असून तो डेमी अष्टपत्री आकाराचीं पाठपोठ २५।३० पानें छापून होतील यापेक्षा लहान किंवा मोठा नसावा.

या निवेदनानंतर संमेलनाच्या दृष्टीने प्रांताचें वातावरण तयार होऊ लागलें. दि. २ सप्टेंबर १९१७-ला सहस्रचंडीच्या देवळात नागरिकांची एक सभा बोलावण्यात आली. या सभेचें अध्यक्षस्थान डॉ. मुंजे व कृष्णशास्त्री घुले यांच्या सूचनेवरून पं. कृष्णशास्त्री तैलंग यांना देण्यात आलें. सभेला दादासाहेब खापर्डे उपस्थित होते. या सभेत दादाशास्त्री कायरकर, दाजीशास्त्री चांदेकर, सिंदखेडकरबुवा व दादासाहेब खापर्डे यांचीं भाषणें होऊन दाजीशास्त्री कायरकर यांच्याकडे प्राथमिक कामाचे अधिकार सोपविण्यात आले. मुंजे यांच्या मनात संमेलन भरविण्याची कल्पना विशिष्ट राष्ट्रीय ध्येयपूर्तीचें साधन म्हणून असल्यामुळे त्यांनी टिळकांनाच या संमेलनाचें अध्यक्षपद स्वीकारण्याचा आग्रह केला. त्यांच्या शब्दासाठी लोकमान्य कलकत्ता कांग्रेसहून परतताना नागपुरास यावयास सिद्ध झाले. टिळकांच्या सोयीने ५, ६ व ७ जानेवारी १९१८ हे संमेलनाचे दिनांक निश्चित झाले. टिळक संमेलनाध्यक्ष म्हणून येणार हें प्रकट होताच कीर्तनसंमेलनाचें महत्त्व अतोनात वाढलें. तें एक राष्ट्रकार्य म्हणून नियतकालिकांतून लेख येऊ लागले. कधी नव्हत ते लोक संमेलनाच्या कार्यात खपू लागले व अमाप उत्साह वाढला. संमेलनकार्यालयाकडे पत्रांची रीघ लागली. दि. १६ डिसेंबर १९१७-ला डॉ. मुंजे यांच्या घरी सभा होऊन पुढीलप्रमाणे संमेलनाचें स्वागतमंडळ निवडण्यात आलें :

अध्यक्ष :– वे. शा. सं. कृष्णशास्त्री तैलंग.

उपाध्यक्ष :– ना. दादासाहेब खापर्डे.

मुख्य कार्यवाह :– डॉ. बा. शि. मुंजे.

सह कार्यवाह :– ह. भ. प. दादाशास्त्री कायरकर.

**सभासद** :– पंढरीनाथशास्त्री घाटे, कृष्णशास्त्री घुले, श्रीनिवासशास्त्री हरदास, केशवराव दप्तरी व महाराष्ट्राचे संपादक गोपाळराव ओगले. स्वागत सभासदाची वर्गणी ५ रु., प्रतिनिधीची ४ रु. व प्रेक्षकांसाठी तीन दिवसांचें एक रु. प्रवेशमूल्य ठरविण्यात आलें.

येणाऱ्या निबंधांच्या परीक्षणासाठी पुढीलप्रमाणे परीक्षक मंडळ निवडण्यात आलें :

(१) डॉ. बा. शि. मुंजे (२) कृष्णशास्त्री घुले (३) दादाशास्त्री कायरकर (४) पंढरीनाथशास्त्री घाटे व (५) श्रीनिवासशास्त्री हरदास.

या मंडळाकडे एकूण तेरा निबंध आले. त्यांत रत्नागिरी, ठाणें, कोल्हापूर, मुंबई व पूर्व खानदेश या विभागांतूनही निबंध आले होते. त्यांत साताऱ्याचे लक्ष्मीकांत यशवंत पुरोहित यांच्या निबंधाला पहिलें बक्षीस मिळालें. व संगमेश्वर (रत्नागिरी) चे विठ्ठल विष्णु जोशी यांना उत्तेजनार्थ पारितोषिक देण्यात आलें.

या वर्षी नागपूरला प्लेगचा वाढता उपद्रव असूनही संमेलनाच्या सिद्धतेत न्यूनता आली नाही. माधवराव पाध्ये यांच्या धंतोलीवरील देशसेवक मुद्रणालयाच्या समोरच्या मैदानात भव्य मंडप घातला होता. विद्याभूषण तांब्रेशास्त्री व महादेवशास्त्री दिवेकर (हिंदुत्वदीपक) आपल्या प्रवचनांनी वातावरण तयार करीत होते. बाहेरगावाहून शेकडोंच्या संख्येने प्रतिनिधि आले होते. लो. टिळक दि. ५ जानेवारीला कलकत्ता मेलने दुपारी २-ला नागपूरला आले. त्यांचें स्थानकावर देवदुर्लभ स्वागत झालें. प्लेगमुळे या वेळी टिळकांचें वास्तव्य केशवराव बुटी यांच्या टाकळी येथील बंगल्यात खापर्डे यांच्या समवेत होतें. दि. ५ जानेवारी १९१८-ला दुपारी संमेलनाला प्रारंभ झाला. प्रथम डॉ. मुंजे यांनी संदेश वाचून दाखविले. त्यांत न. चिं केळकर, शि. म. परांजपे व ब्रह्मनाळकरबुवा यांचे प्रमुख होते. नंतर स्वागताध्यक्ष कृष्णशास्त्री तैलंग यांचें संस्कृतमध्ये अतिशय अलंकारप्रचुर भाषण झालें. नंतर खापर्डे यांचें भाषण झाल्यावर अध्यक्ष लो. टिळक आपल्या भाषणात म्हणाले :

"कीर्तन संप्रदाय हा हिंदुस्थानात फार प्राचीन काळापासून आहे. 'सततं कीर्तयन्तो मां' असें कीर्तन खुद्द गीतेत आहे. हा आचार इतर धर्मांतही आहे. ख्रिस्ती धर्मात दर रविवारी कीर्तन होत असतें. त्याला सर्मन म्हणतात. त्यांना आमचा धर्म ग्राह्य वाटत नाही पण कीर्तनसंस्था ग्राह्य वाटते. मनुष्य हा सदा सर्वकाळ संसारामध्ये निमग्न असतो. पण संसारापेक्षा अधिक उच्च ध्येयाकडे त्याची प्रवृत्ति करण्याकरिता कीर्तनाचा उपयोग होतो. मनोरंजन हें कीर्तनाचें एक अंग आहे, पण तें त्याचा मुख्य विषय नव्हे. नाटक हेंही कीर्तन नव्हे व कीर्तनानेही नाटक होऊ नये. कीर्तनसंस्था पूर्वी कशी होती, नंतर तीत स्थित्यंतरें काय झालीं, तिची हल्लीची स्थिति काय आहे, तिची अवनति कां झाली या सर्वांचा विचार करा, म्हणजे आज कोणत्या सुधारणा पाहिजेत तें कळून येईल. नवविधा भक्तीमध्ये कीर्तन येतें. अर्थात् कीर्तन म्हणजे भगवत्कीर्तन. कीर्तन हें पुरुषाचें नसून परम पुरुषाचें असलें पाहिजे. जो कीर्तनकार आपली कीर्तनपद्धति नाटकी धर्तीवर नेतो त्याला कीर्तनाचें मूळच समजलें नाही असें म्हटलें पाहिजे. कीर्तन म्हणजे नुसतें मनोरंजन नव्हे, नुसतें राजकारण नव्हे, नुसतें गायनवादन नव्हे. संसारी मनुष्याच्या मनात परमेश्वराबद्दल व धर्माबद्दल उदात्त विचार जागृत करणें हें कीर्तनाचें ध्येय होय. जनसमाजाला हें शिक्षण सामोपचाराने – माराकुटीने नव्हे – द्यावयाचें असतें. संसाररोगावरील कडू औषध मनोरंजनाची जोड देऊन गोड करून देणें हें कीर्तनकाराचें कर्तव्य होय. कीर्तनकार हे समाजाचे गुरु असल्यामुळे त्यांचा अधिकार मोठा आहे. त्यांच्यापुढे शुक-नारदांचें ध्येय पाहिजे. वैराग्य, निःस्पृहता, लोककल्याणाची प्रबळ इच्छा हे कीर्तनकारांचे मुख्य गुण होत. मनोरंजन काय, गवई करू शकतो, खुषमस्कऱ्या करू शकतो, सर्कस करू शकते. मनोरंजना-मनोरंजनात भेद आहे व तो ओळखून कीर्तनकाराने या अंगाचा स्वीकार करावा. कीर्तनाला गायन-वादनाची जोड ही जेवणाच्या वेळी उदबत्त्या लावण्यासारखी आहे. डोळे, कान वगैरे इंद्रियांना उच्छृंखल न होऊ देता मनाला बोध करण्याचें काम कीर्तनकाराचें असतें. पहिलें कीर्तन अभंगी, पण पुढे पेशवाईत त्याला दरबारी थाट आला. पीनल कोड हा मारका मास्तर होय; पण कीर्तनकार हे सामोपचाराने शिक्षण देणारे गुरु होत. राजाश्रय पेशवाईबरोबरच गेला, पण आता आपण दर एकादशीला गावामध्ये कीर्तन व्हावें असा तरी निदानचा परिपाठ ठेवला पाहिजे. कीर्तनाचें इंग्लंडात स्वतंत्र खातें असतें व त्याला राजाश्रय असतो. समाजामध्ये सर्व दर्जाचे

व अधिकाराचे लोक असतात. त्या सर्वांना कीर्तनकाराला बोध करावा लागतो. समाज पालटला तर कीर्तनकारालाही त्याप्रमाणे पालटलें पाहिजे, तरच त्याचा समाजावर परिणाम होईल. हल्ली समाजात इंग्रजी संस्कृति जाणणारे लोक आहेत. त्यांच्या परिस्थितीला पटेल असें आता कीर्तनकारांचें विवेचन पाहिजे. पूर्वी असे फरक झाले आहेत. हल्ली-सुद्धा कीर्तनात दोहरे व फारशी भाषेतील म्हणी येतात. त्या कशा येतात? आपण अमुक फरक करा असें सांगण्याचा अधिकार मला नाही. कारण मी कीर्तनकार नाही. फरक कोणत्या दिशेने व्हावा येवढेंच मी सांगतो. अंतःस्वरूप जी हरिकथा ती कायमच राहणार; बदलणार तें बाह्य स्वरूप! ज्याप्रमाणे आपला अंगरखा जाऊन हल्ली कोट आला त्याप्रमाणे जुनीं सुभाषितें व कोटद्या जाऊन त्याऐवजी काही नवीन सुभाषितें घालावीं लागतील. हा फक्त बाह्य स्वरूपाचा बदल होय. बदल काय तो अनुपानात करावयाचा आहे. पूर्वी आल्यालिंबाचें अनुपान असलें तर आता मधाचें अनुपान योजा. युरोपियन वाङमयाने समाजाच्या श्रद्धेमध्ये जी चलबिचल झाली त्याचाही कीर्तनकाराने उल्लेख करावा. इंग्रजी शाळा झाल्यापासून श्रोतृसमाज श्रद्धाविहीन झाला आहे. त्या समाजाच्या शंकांचें निरसन कीर्तनकाराला करता येणार नाही तर त्याची छाप समाजावर पडणें अशक्य आहे. ज्या विद्येत समाज पारंगत असेल त्या विद्येमध्ये कीर्तनकारही निष्णात असला पाहिजे. कीर्तनकारांचें वर्तनही शुद्ध असावें. दारूबाज जर मद्यपाननिषेधाचा उपदेश करील तर त्याचा काहीच परिणाम समाजावर होणार नाही. कीर्तनकाराला फार मोठे अधिकार समाजाने दिले आहेत. त्याने टाळ्या वाजवायला सांगितल्या तर वाजवावयाच्या. त्याने सीताकान्तस्मरण करा म्हटलें तर 'जयजयराम' म्हणावयाचें. हे इतके अधिकार कीर्तनकाराला कां दिले? त्याचा अधिकार मोठा म्हणून. तुम्ही नाटकाच्या सुधारणा करता, सिनेमाच्या सुधारणा करता, नाटकांचीं संमेलनें होतात—उद्या तमाशांचींही होतील! पण आजपर्यंत कीर्तनकारांचें संमेलन कां झालें नाही? नाटकापेक्षा ही संस्था जास्त उपयुक्त व महत्त्वाची आहे असें मला वाटतें."

दुसऱ्या दिवशी सकाळी विषयनियामक मंडळाची बैठक व दुपारी प्रकट अधिवेशन झालें. टिळकांची प्रकृति बिघडल्यामुळे त्या दिवशीचे अध्यक्ष दादासाहेब खापर्डे होते. प्रकट अधिवेशनात विद्याभूषण तांबेशास्त्री, चौंडेमहाराज, सिंदखेडकर बुवा, धुंडिराजपंत ठेंगठी, डॉ. नाईक, डॉ. मुंजे, काळे वकील, दिवेकर शास्त्री, यावलकर, गोपाळराव ओगले या वक्त्यांचीं वेगवेगळ्या ठरावांवर भाषणें होऊन ते संमत करण्यात आले.

दि. ७-ला लोकमान्यांचें समारोपाचें भाषण झालें. त्यातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे :

" कीर्तन हा एक प्रकारचा धंदा आहे हें प्रथमतः लक्षात ठेविलें पाहिजे. पण तो अशा प्रकारचा धंदा आहे की त्यात स्वार्थ आणि परार्थ किंवा परमार्थ हे दोन्हीही एकदम साधता येतात. अर्थात् या धंद्याची योग्यता निव्वळ स्वार्थपरायण धंद्यापेक्षा अधिक आहे हें सांगावयास नकोच. स्वतःचा उदरनिर्वाह होऊन त्याबरोबरच लोकांची प्रवृत्ति सदाचाराकडे, धर्माकडे किंवा स्वकर्तव्याकडे वळविणें हें कीर्तनकाराचें ध्येय आहे. "

" आमच्या हातची राजसत्ता मुसलमानांच्या हाती गेली होती खरी; पण आमचे उदात्त धर्मविचार या कीर्तनसंस्थांच्या द्वारे साधुसंतांनी कायम ठेवले असल्यामुळे अकबरासारख्या बादशहावरही हिंदु धर्माची छाप बसून कबिरासारखे साधुपुरुषही त्या काळी निर्माण झाले. "

" आता केवळ जुन्या कोटया व जुने सम्प्रदायच पुढे चालवून काम भागावयाचें नाही. धर्मदृष्टया विचार केला तर आता आपल्याला जुन्या नास्तिकवर्गाशी किंवा जुन्या प्रकारच्या इतर धर्मोपदेशकांशी भांडावयाचें नाही. आज धर्मदृष्टया ज्या ख्रिस्ती धर्मोपदेशकांचें निरसन करावयाचें आहे ते पूर्वीच्या धर्मोपदेशकांपेक्षा अधिक बहुश्रुत व अधिक चाणाक्ष असून शिवाय शाळांतून सुरू असलेल्या अलीकडील पाश्चात्य शिक्षणामुळे समाजातील सुशिक्षित लोकांच्या मनोवृत्तिही धर्माविषयी संशयित किंवा चंचल झालेल्या आहेत. अशा लोकांपुढे जें कीर्तन व्हावयाचें तें अर्थातच त्यांच्या मनातील शंका, त्यांच्या मनातील आक्षेप ज्यामुळे दूर होतील अशा तऱ्हेचें असलें पाहिजे हें उघड आहे. हल्लीच्या काळी तुकारामादि साधुपुरुषांचीं चरित्रें नाटकरूपाने रंगभूमीवर आणून तद्द्वारा नाटकात धर्मोपदेश करण्याचा प्रयत्न झालेला आहे. पण माझ्या मते हा उद्देश तडीस नेण्यास नाटकापेक्षा कीर्तनच अधिक समर्पक होय. कारण तुकारामाची भूमिका घेणारा नट एक प्रकारे त्या साधुपुरुषाची थट्टाच करीत असतो असें म्हटलें तरी चालेल. तो पडद्यामागे गेल्यावर काय करीत असतो हें प्रेक्षक वर्गातील बहुतेक लोकांस माहीत असतें. अर्थात् त्याच्या मुखातून उत्तम प्रकारचें जरी धर्मविवेचन झालें तरी हें केवळ नाटक आहे ही भावना प्रेक्षक लोकांच्या मनात उत्पन्न झाल्याखेरीज रहात नाही. आणि यासाठीच धार्मिक आणि नैतिक दृष्टयाही नाटकापेक्षा कीर्तनास मी अधिक महत्त्व देतो. "

" समाजशिक्षणाचें काम उत्तम रीतीने चालविण्यास संस्कृत, इंग्रजी व हिंदी या भाषांचें ज्ञान, परधर्म व स्वधर्म यांच्या खंडन-मंडनपर ग्रंथांचा परिचय आणि प्रचलित गोष्टींचें ज्ञान होण्याइतकें वर्तमानपत्राचें वाचन इतका तरी अभ्यास झालेला भावी नमुनेदार हरिदास असावा. पण येवढ्यानेही खऱ्या हरिदासाचें काम भागत नाही. इतके सर्व गुण अंगी असूनही कीर्तनद्वारा समाजाला उपदेश करणाऱ्या हरिदासाचें स्वतःचें वर्तनही शुद्ध, साधें, निर्मत्सर, निर्लोभ, प्रेमळ आणि समाजास अनुकरणीय असलें पाहिजे. "

" कीर्तनसंस्था काही सामान्य संस्था नव्हे. शाळांतील शिक्षक किंवा वर्तमानपत्रकर्ते यांच्यापेक्षाही कीर्तनकाराचा अधिकार फार मोठा आहे हें विशेषतः कीर्तनकारांनी पूर्णपणे ओळखलें पाहिजे. समाजास वळण लावून देणें हें काही लहान-सहान काम नव्हे. जी संस्था आज हयगयीमुळें खालावत चालली आहे तिचें खरें महत्त्व जुन्या कीर्तनकारांच्याच नव्हे तर नव्या सुशिक्षित लोकांच्याही लक्षात आणून द्यावें हा आमचा मुख्य हेतु आहे. नव्या शिक्षणाने विद्वान् झालेल्या ग्रज्युएटांचेंही लक्ष जर या कीर्तनसंस्थेकडे जाईल तर इष्ट सुधारणा फार लवकर घडून येतील. कित्येकांस अशी शंका आहे की, अशा प्रकारचे कीर्तनकार पुढें येऊं लागल्यास सी. आय्. डी. चें झेंगट त्यांच्या पाठीमागे लागल्याखेरीज राहणार नाही. पण विचार करा की, हें झेंगट सुटलें आहे कोणाला ? आपल्याला जर मनापासून देशकार्य करावयाचें असेल तर असल्या संकटास आपण जुमानता कामा नये. डॉ. मुंजे यांनी हें संमेलन भरवून त्याची आजच्या सुमुहूर्तावर मुंज लावली आहे. आता पुढे विवाह होईल कीं नाही याबद्दल शंका बाळगण्याचें कारण नाही. आज ही संस्था देशोन्नतीच्या दृष्टीने किती उपयुक्त, पवित्र आणि स्वार्थाबरोबरच किती परार्थसाधक आहे याचा निर्णय आम्ही केला आहे. आणि हा निर्णय एकदा लोकांपुढे मांडला गेला म्हणजे या संस्थेच्या पुनरुज्जीवनाकडे किंवा सुधारणेकडे समाजातील सुशिक्षित व पुढारी वर्गाचें लक्ष लागल्याखेरीज राहणार नाही अशी मला पूर्ण आशा आहे. "

आभार प्रदर्शनानंतर हें संमेलन संपलें. ज्यासाठी डॉ. मुंजे यांनी एवढा आटापिटा केला तो धर्मप्रचारकांचा सुबुद्ध वर्ग मात्र या प्रयत्नातून निर्माण होऊ शकला नाही. श्री. बाबासाहेब खापर्डे लिहितात, " जानेवारीच्या पहिल्या आठवड्यात नागपूरला हरिदासांचें संमेलन झालें. त्याचे अध्यक्ष म्हणून लोकमान्य नागपूरला आले होते. दादासाहेब या संमेलनाला उपस्थित होते. डॉ. मुंजे यांची ही कल्पना होती. 'हरि-

दास' संस्थेस उत्तेजन देऊन खरा वैदिक धर्म प्रसृत करावा, धर्मावर आलेली ग्लानि दूर करावी, धर्माच्या देवळात साठलेला कचरा स्वच्छ करावा आणि त्या व्यवसायामार्फत देवभक्तीला देशभक्तीची जोड देऊन राजकारण जनतेच्या खालच्या थरापर्यंत पोचवावें असा या उपक्रमात हेतु होता. परंतु अनेक कारणांमुळे ही गोष्ट साध्य झाली नाही. डॉ. मुंजे यांच्याशी पुढे अनेकदा यासंबंधी बोलणें झालें. ही योजना यशस्वी न झाल्यामुळे त्यांना मनापासून वाईट वाटत असे. ह. भ. प. कायरकर-शास्त्री व इतर काही हरिदास या धोरणाने कीर्तनें करीत, व छत्रपति शिवाजीमहाराज व राणी लक्ष्मीबाई यांचीं सुरस आख्यानें या काळी जीं रचलीं गेलीं तीं डॉ. मुंजे यांच्या प्रयत्नाचेंच फळ होतें. ही योजना सिद्धीस गेली असती तर महाराष्ट्रात तरी गांधीयुगाला बसला, त्याहून अधिक परिणामकारक पायबंद बसला असता. पण तसें होणार नव्हतें एवढेंच खरें !

"हें संमेलन त्या काळी बरेंच गाजलें. पुढे त्याच्या सालोसाल एक-दोन बैठकीही झाल्या पण ती विझत्या दिव्याची मावळती प्रभा होती."

—दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र, लेखक बाबासाहेब खापर्डे, पृ. ५२०

या संमेलनाला जोडूनच लोकमान्य टिळकांचा नागपूर प्रांतात दौरा व्हावयाचा होता. पण योगायोगाने त्यांच्या पायाला जखम झाली. आधीच मधुमेह, त्यात त्यांच्या या वेळी नागपूरला निघालेल्या मिरवणुकीत पायाला धक्का लागून जखम चिघळली. शेवटी या वेळी नागपूरला असलेले मुंबईचे विख्यात सर्जन गोपाळराव देशमुख यांच्या सल्ल्यावरून दौरा स्थगित करून लोकमान्य पुण्यास परत गेले.

यानंतर दि. ५ फेब्रुवारी ते २० फेब्रुवारीपर्यंत लोकमान्यांचा स्वराज्य संघाच्या उद्दिष्टांच्या प्रचारासाठी व स्वराज्यसंघाच्या कार्याला आर्थिक साह्य मिळवून द्यावें म्हणून मध्यप्रांत व वऱ्हाडाचा दौरा झाला. टिळकांचें हें आगमन प्रांताच्या राजकीय जागृतीच्या दृष्टीने मोठी पर्वणीच होती. बाबासाहेब खापर्डे या दौऱ्यात प्रथमपासून शेवटपर्यंत लोकमान्यांसमवेत होते. लोकमान्यांच्या लोकप्रिय नेतृत्वाची साक्ष पटविणारें या दौऱ्याचे बाबासाहेबांनी अतिशय हृदयंगम वर्णन केलें असून तें टिळक चरित्राच्या (केळकर कृत) तृतीय खंडातून वाचकांनी अवश्य वाचावें. कारण ग्रंथविस्तारभयास्तव येथे तें आम्ही उद्धृत करीत नाही. या दौऱ्यात टिळकांनी आपल्या गावी यावें अशी सर्वांनाच इतकी उत्कट इच्छा होती की, एका गावच्या पुढाऱ्याने त्यांना लिहिलें, "या दौऱ्यात आमचा गांव गाळला तर तो जाळला असें आम्ही म्हणू."

खंडवा, बऱ्हाणपूर, भुसावळ, मलकापूर, बुलढाणा, चिखली, खामगाव, नांदुरा, जळगाव जामोद, शेगाव, तेल्हारा, आकोट, अकोला, वाशीम, पुसद, कारंजा, मूर्तिजापूर, पुलगांव, आर्वी, वर्धा, वरोडा, चांदा, वणी, पांढरकवडा, शिंदी, नागपूर, उमरेड, काटोल, मोहोपा, भंडारा, धामणगाव व वरणगांव इतक्या स्थानांना टिळकांनी पंधरा दिवसांत भेटी दिल्या. मध्यप्रांत विदर्भाने टिळकांना एकंदर १,१०,००० रुपयांचा निधि समर्पण केला.

या वेळी इंग्लंडमधील जनमत स्वराज्याच्या मागणीला अनुकूल करून घेण्याच्या प्रयत्नासाठी एक शिष्टमंडळ विलायतेस पाठविण्याची योजना चालू होती. या योजनेच्या चर्चेसाठी फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यात डॉ. मुंजे नागपूरहून लोणावळ्यास गेले. कारण लोकमान्य लोणावळ्यास होते. या शिष्टमंडळात खापर्डे यांना घेण्याच्या महंमद अल्ली जिना विरुद्ध आहेत असें टिळकांनी मुंजे यांना सांगितलें. मुंजे यांनी तें खापर्ड्यांना सांगितलें. खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात, " शिष्ट मंडळाबरोबर मी जाण्याच्या जिना अत्यंत विरुद्ध आहेत हें ऐकून मला फार आश्चर्य वाटलें. मी कसा दिसतो त्याला, माझ्या पोषाखाला आणि माझ्या संबंधीच्या सर्वच गोष्टींना त्यांचा विरोध आहे. त्यांच्या मनात हें शत्रुत्व उत्पन्न होण्याला मीं काय केलें याचें मला आश्चर्य वाटतें. " शिष्टमंडळावर टिळक, खापर्डे, केळकर, बिपिनचंद्र पाल हे सदस्य होते. या मंडळींना प्रथम पासपोर्ट मिळाला. तदनुसार दि. ५ एप्रिलला शिष्टमंडळ कोलंबोला एकत्र झालें. पण आयत्या वेळी इंग्लंडमधील वॉर कौन्सिलने या शिष्टमंडळाला परवाना नाकारला व त्यांना परत फिरावें लागलें. मँटेग्यू यांच्या भारतभेटीने निर्माण झालेल्या चांगल्या वातावरणात हा मिठाचा खडा पडला.

यानंतर दि. २७ एप्रिलला युद्धाला साहाय्य करण्याच्या मार्गासंबंधी विचारविनिमय करावयास्तव व्हॉइसरॉयने दिल्लीला सर्वपक्षीय पुढाऱ्यांची एक सभा बोलाविली. या सभेला लो. टिळक व बेझंट यांना निमंत्रण नव्हतें पण खापर्डे व मुंजे यांना होतें. युद्ध संपताच हिंदुस्थानला होमरूल देण्याचें इंग्लंडने कबूल केल्याशिवाय साहाय्य करता येत नाही असें स्पष्ट शब्दांत व्हाइसरॉयांना सांगावें, असें धोरण खापर्डे व मुंजे यांना लोकमान्यांनी सांगितलेलें होतें. दि. २५-ला मुंजे दिल्लीला पोहोचले. दि. २६-ला दुसऱ्या दिवसाची रंगीत तालीम म्हणून सर क्लॉडहिल यांच्या अध्यक्षतेखाली एक अनौपचारिक सभा झाली. मुंजे तिला उपस्थित राहिले. खापर्डे गेले नव्हते. खापर्डे आपल्या दैनंदिनीत लिहितात,

"डॉ. मुंजे यांनी मला सांगितलें की, होमरूल संबंधाने त्यांनी जो प्रस्ताव सभेपुढे ठेवला त्याला दुजोरा देणारा दुसरा एकही कोणी सापडला नाही. जिना, रॅ. परांजपे आणि इतर काहींनी थोडा आधार दिला. सर क्लॉड-हिलशी मुंजे यांचें खाजगी भाषण झालें. त्यांनी मुंजे यांना सांगितलें की, सरकारला खरोखरी आमच्या मदतीची गरजच नाही. ब्रिटिश साम्राज्याची लोकांना व जगाला भक्कम एकी दाखविण्याकरिता हा डोळ्यांत धूळ फेकण्याचा एक प्रकार होता. सरकारला पाहिजे तो पैसा आणि मनुष्यबळ राजे-महाराजे यांच्याकडून मिळण्याची त्यांना खात्री होती."

दि. २७-ला सकाळी गांधी खापर्डे यांच्या भेटीला गेले. त्या दिवशी व्हाइसरॉयांच्या अध्यक्षतेखाली सभा झाली. संध्याकाळी ५-पर्यंत खापर्डे व मुंजे यांना स्वराज्याची मागणी उच्चारावयास अवसर मिळाला नाही. संध्याकाळी पांचला खापर्डे यांनी उठून अध्यक्षांना (सरसेनापति) सांगितलें की, "दिल्लीला एक मोठी सार्वजनिक सभा युद्धासंबंधी झाली. तिचें वृत्त या सभेत मांडण्यासाठी तारेने माझ्याकडे आलें आहे." खापर्डे यांचा डाव कोणाच्या लक्षात न आल्यामुळे सर सेनापतींनी अनुज्ञा दिली. तत्काळ खापर्डे यांनी तार मोठ्याने वाचली. तिच्यात होमरूलची स्पष्ट मागणी होती. या तारेमुळे एकदम वातावरण बदलून चांगलीच खळबळ माजली.

दुसऱ्या दिवशी सब-कमिटीपुढे असलेल्या ठरावाला खापर्डे यांनी होमरूलची मागणी असलेली दुरुस्ती सुचविली. तिच्यावर चक्रवर्ती, डॉ. मुंजे, चंदा, शर्मा, जिना अशा एकंदर तेरा लोकांच्या सह्या होत्या. जिना यांनी मागाहून आपली सही काढून घेतली. त्या वेळी नेमस्त असलेले पं. मालवीय व विनाअट युद्धाला साहाय्य करावें असें म्हणणारे गांधी यांनी ही उपसूचना मागे घेण्याच्या दृष्टीने पुष्कळ प्रयत्न केले. पण खापर्डे, मुंजे व बंगालचे चक्रवर्ती यांच्या पक्केपणामुळे तें साधलें नाही. मागाहून मे महिन्यात सिमल्याला मालवीयांनी खापर्डे यांना भेटून स्वराज्याचा प्रश्न व्हॉइसरॉयांच्या तोंडावर काढल्याबद्दल धन्यवाद दिले व आपली सर भूपेन्द्रनाथ बसू यांच्या एका गुप्त तारेने फसवणूक झाल्यामुळे आपण चुकीचें वर्तन केल्याचें सांगितलें.

दिल्लीप्रमाणेच दि. ४ मेला, नवीन बांधलेल्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या इमारतीत व्हॉइसरॉयांनी युद्धासाठी सर्वपक्षीय बैठक घेतली. या बैठकीत होमरूलचा शब्दही ऐकू येऊ नये अशी काळजी घेतल्यामुळे राष्ट्रीय पक्षाचे कोणी उपस्थित नव्हते. याच्या थोडेच दिवस पूर्वी मध्यप्रांत विदर्भाच्या शिष्टमंडळाची भारतमंत्री मॅंटेग्यू यांनी भेट

घेतली होती. नागपूरच्या सभेत जरी होमरूलचा शब्द उच्चारू दिला नाही तरी छिंदवाडा, बालाघाट, अमरावती, चांदा, दमोह, सागर इत्यादि स्थानांवरील सभांतून व परिषदांतून उमटलेल्या सर्वपक्षीय स्वराज्यघोषणांनी सरकारचें माथें ठणकल्याविना राहिलें नाही. त्याचा परिणाम म्हणून जे खटले उभारण्यात आले त्यांत नागपूरच्या होमरूलच्या शाखेचे कार्यवाह श्री. नारायणराव वैद्य यांच्यावरील खटला विशेष गाजला. श्री. वैद्य यांनी आपल्या एका भाषणात शेतसाऱ्याच्या वसुलीच्या पद्धतीवर व सैन्यभरतीच्या प्रकरणात हिंदी लोकांना सैन्यात लढण्याऐवजी मजुराचें जें काम देण्यात येई त्यावर खरपूस टीका करून असें वाक्य उच्चारलें की, "आम्ही युद्ध करून मरावयास सिद्ध आहो; पण कुली व्हावयास सिद्ध नाही." तेवढेंच निमित्त पुरून भारत संरक्षण निर्बंधाच्या २३ व २९-व्या छेदकाप्रमाणे त्यांच्यावर खटला भरण्यात आला. खटल्याचें काम सागरला चालणार होतें. मुंजे यांनी खापर्डे यांना तार केली व सिमल्याहून खापर्डे यांनी सागरला येऊन नारायणरावांसाठी जामिनकीचा अर्ज केला. पण तो फेटाळून लावण्यात आला. दि. १ ऑगस्ट १९१८-ला खटला सुरू झाला व त्यात वैद्यांना खालच्या कोर्टात अठरा महिन्यांची सश्रम कारावासाची शिक्षा झाली. वैद्यांनी हायकोर्टात अपील केलें. तें चालवावयास मुंजे यांनी स्वत: कलकत्त्याला जाऊन चित्तरंजन दास यांना आणलें. नोव्हेंबर महिन्यात दासबाबूंनी हें अपील चालविलें. तीन दिवस ते केस मांडीत होते. व दि. १९ नोव्हेंबरला निर्दोष म्हणून वैद्य यांची मुक्तता झाली. दासांनी हा खटला एक कपर्दिकही न घेता चालविला. त्यांच्या सन्मानार्थ नागपूरला सार्वजनिक सभा घेण्यात आली होती.

भारतमंत्री माँटेग्यू नोव्हेंबर १९१७ ते मे १९१८-पर्यंत भारतात सहा महिने राहिले. त्यांनी एका बाजूला चेम्सफर्ड व नोकरशाही आणि दुसऱ्या बाजूला इंग्लंडमधील युद्धकालीन मंत्रिमंडळ यांना मान्य होईल असा अहवाल तयार केला. त्यात पुष्कळ छाटाछाट व बदल झाल्यावर तो अहवाल चेम्सफर्ड व माँटेग्यू या दोघांच्याही सह्यांनिशी जुलै महिन्यात ब्रिटिश पार्लमेंटला सादर करण्यात आला. सर्वांना प्रसन्न करून घेण्याच्या प्रयत्नात कोणीच खरा प्रसन्न होत नाही. हीच अवस्था या अहवालाचीही झाली. या अहवालावरील भारतीयांची पहिली प्रतिक्रिया दि. ११ ऑगस्टला बी. जी. हॉर्निमन यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या मध्यप्रांत विदर्भाच्या अकोला येथे झालेल्या प्रांतिक परिषदेत व्यक्त झाली. या परिषदेने असें घोषित केलें की, (१) ही परिषद

काँग्रेस व मुस्लिम लीगने संयुक्तपणे सुचविलेल्या सुधारणांच्या मसुद्यांच्या संबंधात माघार घ्यावयास सिद्ध नाही. (२) हा अहवाल भारत-मंत्र्यांच्या जाहिरनाम्याशी सुसंगत नाही व त्यात भारतीयांच्या स्वराज्यासंबंधीच्या पात्रतेविषयी जो संशय व्यक्त करण्यात आला आहे तो परिषदेला अमान्य आहे. (३) जरी या प्रतिवृत्तानुसार सुधारणा म्हणून केन्द्रीय विधिमंडळ व वरिष्ठ विधिमंडळ प्रस्थापित होणार असलें तरी केन्द्र सरकारच्याच पूर्ण नियंत्रणाखाली तें राहणार असून प्रांतिक सरकारांना स्वातंत्र्य नाही. (४) जरी शासनयंत्रणेतील काही विभाग लोकप्रतिनिधींच्याकडे भावी सुधारणांत सोपविण्यात येत असले तरी ते पुनश्च त्यांच्या हातातून काढून घेण्याचा मार्ग सरकारला मोकळा ठेवण्यात आला आहे. याचा अर्थ असा आहे की, शासनावर संपूर्ण नियंत्रण सरकारचेंच राहणार असून लोकप्रतिनिधींच्या हाती कोणतीही सत्ता न राहण्याची दक्षता या सुधारणांत घेण्यात आली आहे. भारतीयांना समाधान वाटावें असें त्यात काही नाही. त्यामुळे स्वराज्याचा पहिला हप्ता म्हणून या सुधारणांचें जें वर्णन करण्यात येतें तें चुकीचें आहे. 'सुराज्य' 'योग्य शासन' व 'संरक्षण' या गोंडस नांवाखाली सरकारने भारताच्या अर्थव्यवहाराचें संपूर्ण नियंत्रण जें स्वतःच्या हाती राखून ठेवलें आहे तें भयावह आहे.

या परिषदेने मँटेग्यू चेम्सफर्ड सुधारणा स्वीकारार्ह व्हावयास्तव त्यात कोणते बदल व्हावयास पाहिजेत याचें सुस्पष्ट दिग्दर्शन केलें.

या सुधारणांचा विचार करण्यासाठी काँग्रेसचें खास अधिवेशन हसन इमाम यांच्या अध्यक्षतेखाली २९ ऑगस्टला मुंबईला झालें. विठ्ठलभाई पटेल त्याचे स्वागताध्यक्ष होते. या अधिवेशनाला स्वतः टिळक उपस्थित होते. या अधिवेशनावर अकोला परिषदेचीच छाया उमटली. परिषदेने मँटेग्यु चेम्सफर्ड सुधारणा निराशाजनक आहेत असें उद्घोषून त्यांच्यात काही आवश्यक परिवर्तनें सुचविलीं व सिलेक्ट कमिटीसमोर आपला दृष्टिकोन मांडण्यासाठी काँग्रेसच्या वतीने एक शिष्टमंडळ इंग्लंडमध्ये पाठवावें असा ठराव संमत करण्यात आला.

या वेळी नेमस्तांची स्थिति अतिशय नाजूक होती. राष्ट्रीयांना मँटेग्यू चेम्सफर्ड सुधारणा ही फसवणूक वाटत होती तर नोकरशाहीला या सुधारणांच्या द्वारे भारताला अवास्तव दान दिलें आहे असें वाटत होतें. अशा स्थितीत सगळेंच मुसळ केरात जाऊ नये म्हणून आपण आपलें स्वतंत्र शिष्टमंडळ विलायतेत पाठवावें व पार्लमेंटरी कमिटीची समजूत घालावी असें त्यांनी ठरविलें. या दृष्टीने अलिप्तता राखण्या-

साठी त्यांनी कॉंग्रेसच्या या खास अधिवेशनात मुळीच भाग घेतला नाही. त्यांनी यानंतर नोव्हेंबरमध्ये स्वतःच्या लोकांची एक स्वतंत्र परिषद भरवून इंडियन नॅशनल लिबरल फेडरेशन नांवाची संस्था काढली, व कॉंग्रेसचा नाद सदासाठी सोडला.

कॉंग्रेसच्या या खास अधिवेशनानंतर चिरोल केसच्या निमित्ताने दि. १९ सप्टेंबर १९१८-ला लो. टिळक, दादासाहेब करंदीकर, वासुकाका जोशी, व गणपतराव नामजोशी यांच्यासह इंग्लंडला जावयास निघाले. सर व्हॅलेंटाइन चिरोल यांनी आपल्या ग्रंथात केलेल्या विधानांबद्दल त्यांच्यावर टिळकांनी अब्रुनुकसानीची फिर्याद केली होती. त्याबरोबरच होमरूलची योजना विलायत सरकारसमोर व इंग्लंडमधील महत्त्वाच्या पुढाऱ्यांसमोर मांडावी हाही त्यांचा हेतु होता.

सन १९१८-ची राष्ट्रीय सभा डिसेंबरमध्ये दिल्ली येथे झाली. या कॉंग्रेसच्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून प्रथम टिळकांची निवड करण्यात आली. स्वागत मंडळाने इंग्लंडमध्ये टिळकांना तसें कळविलें. पण विलायतेतील काम अधिक महत्त्वाचें असल्यामुळे टिळकांनी साभार नकार कळविला. पण या निवडीचा त्यांना विलायतेतील कामाच्या दृष्टीने अप्रत्यक्ष लाभ झाला. तात्यासाहेब केळकर लिहितात :—"प्रत्यक्ष नसलें तरी नियोजित अध्यक्ष म्हणून त्यांना राष्ट्रीय सभेतर्फे बोलण्याचालण्याला एक प्रकारची सवड होऊन राहिली."

दि. २५ डिसेंबरला कॉंग्रेसचें अधिवेशन दिल्ली येथे भरलें. टिळकांचा नकार आल्यामुळे या अधिवेशनाचें अध्यक्षपद पं. मदनमोहन मालवीय यांना देण्यात आलें. 'रौलेट' बिलाच्या प्रश्नावर मालवीय यांनी इंपीरियल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या सदस्यत्वाचें त्यागपत्र दिलेलें असल्यामुळे त्यांच्या नांवाला महत्त्वही होतें. मालवीय यांचें अध्यक्षीय भाषण चार तास झालें. या राष्ट्रीय सभेतही सुधारणासंबंधी मुंबईच्या खास अधिवेशनातीलच ठराव संमत करण्यात आला. मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांवर या अधिवेशनात असमाधानकारक व निराशाजनक असा शिक्का मारण्यात आला. या अधिवेशनाला नामदार श्रीनिवासशास्त्री उपस्थित होते. त्यांनी मुख्य ठरावातील असमाधानकारक व निराशाजनक हे शब्द गाळण्यात यावे अशी उपसूचना मांडली पण ती फेटाळली जाऊन मूळ ठरावच संमत झाला. दुसऱ्या एका ठरावाने दडपशाहीचें नवें शस्त्र तयार करीत असलेल्या रौलेट कमिटीचा धिक्कार करण्यात आला.

या वेळी दोस्त राष्ट्रांचा विजय होऊन महायुद्ध थांबलें होतें व व्हर्साय येथे संधीचें स्वरूप ठरविण्यासाठी जागतिक स्वरूपाची शांतता-

परिषद भरावयाची होती. या परिषदेत असा एक महत्त्वाचा ठराव करण्यात आला की, ज्याअर्थी शांतता परिषद, युद्धात दोस्त राष्ट्रांच्या वतीने भाग घेणाऱ्या सर्व राष्ट्रांची आहे, त्याअर्थी त्या परिषदेत इंग्लंडच्या बरोबरीने हिंदुस्थानला स्वतंत्र प्रतिनिधित्व मिळावें व भारताचे भारतीय लोकांनी निवडलेले प्रतिनिधि या मंडळावर असावे. या ठरावाने लो. टिळक, गांधी व हसन इमाम यांचीं नांवें शांतिपरिषदेचे प्रतिनिधि म्हणून निवडलीं. हिंदुस्थानचें म्हणणें मांडण्यासाठी इंग्लंडला एक शिष्ट-मंडळही पाठवावयाचें निश्चित करण्यात आलें.

इंग्लंडच्या राजासंबंधीचा निष्ठाप्रदर्शक एकही शब्द या अधिवेशनात उच्चारण्यात आला नाही, हें त्याचें वैशिष्टय होय. टिळक व त्यांच्या सर्व प्रांतातील सहकाऱ्यांनी जनमताचें व राष्ट्रीय सभेचें स्वरूप दीर्घ प्रयत्नांनी कसें आमूलाग्र बदलविलें याचें हें निदर्शनच होय.

या दिल्ली काँग्रेसवर जहालपणाचा आरोप करून नेमस्त पक्ष रुष्ट झाला. काँग्रेसने आपली राजनिष्ठेची परंपरा सोडून दिली व ती केवळ राष्ट्रनिष्ठ बनली याचा त्यांना राग आला. पण सरकारने या वेळी रौलेट बिलाचें हत्यार पाजळल्यामुळे मवाळांना पुनश्च जहालांशी हातमिळवणी करणें भाग पडलें. भारताच्या इतिहासातील या नव्या पर्वाकडे पुढील प्रकरणात वळू.

✦ ✦ ✦

प्रकरण एकोणिसावें

# अमृतसरची काँग्रेस

भारतात नेमस्त व राष्ट्रीय अशा दोन प्रकारच्या राजकीय पक्षांबरोबरच तिसरा महत्त्वाचा व वस्तुतः ज्याला इंग्रज मनातून भीत असा जो राजकीय पक्ष होता तो म्हणजे क्रांतिकारकांचा होय. संपूर्ण स्वातंत्र्य हें भारताचें ध्येय व सशस्त्र क्रांतियुद्ध हेंच त्याचें साधन हें सत्य या पक्षाने केवळ उद्घोषिलेंच नाही तर त्या क्रांतियुद्धाचा वणवा देशभर पेटविण्यासाठी पिस्तुलें व बॉम्ब्स् यांच्या साहाय्याने वृक युद्धाला आरंभही केला. नेमस्त या पक्षाच्या विरुद्ध होते. पण जहाल पक्ष क्रांतिकारकांना संपूर्ण अप्रत्यक्ष साहाय्य करीत होता. टिळक, खापर्डे, मुंजे, अरविंद, चित्तरंजनदास, लजपतराय हे वस्तुतः क्रांतिकारकच होते. पण देशाची क्रांतीची सिद्धता नसल्यामुळे व जागतिक परिस्थिति अनुकूल नसल्यामुळे एका बाजूला क्रांतिकारक पक्षाचें पोषण करणें व दुसऱ्या बाजूला क्रांतीला आवश्यक अशी जनमानसाची सिद्धता करण्यासाठी असंतोष निर्माण करणाऱ्या अनेक दिसायला वैध पण वस्तुतः क्रांतिप्रवण चळवळी सतत करीत राहणें ही राजकारणाची द्विदल कार्यपद्धति त्यांनी अंगीकारिली. त्यामुळे परकीय सरकार या राष्ट्रीयांचा सदैव राग करी. क्रांतिकारक पक्षाचे महान् नेते स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर हे अंदमानच्या विजनवासात गेल्यावर त्यांच्या हरदयाल प्रभृति अनुयायांनी व डॉ. खानखोजे प्रभृति क्रांतिनेत्यांनी महायुद्धाच्या संधीचा लाभ घेऊन अमेरिकेत 'गदर'चें आंदोलन उभारलें. जर्मनीशी तुल्यारिमित्र संधि करून त्यांनी हिंदुस्थानात तारवेंचीं तारवें भरून पैसा व शस्त्रास्त्रांसहित अमेरिकेत स्थिरावलेले पंजाबचे देशभक्त पाठविले. हिंदुस्थानात उत्तरेस रासबिहारी बसू व बंगालमध्ये अनुशीलन समिति यांच्या नेतृत्वाखाली सशस्त्र क्रांतियुद्धाचा वणवा पेटविण्यासाठी विशाल सिद्धता चालू होती व बाहेरच्या हरदयाल प्रभृतींच्या प्रयत्नांचा व या आतील प्रयत्नांचा अर्थातच संबंध होता. आतील प्रयत्नांचे हात मध्यप्रांत. विदर्भ व मद्रासपर्यंत पोहोचलेले होते. जबलपूरला विनायकराव कपले, शैलेन्द्र घोष, शिवप्रसाद वर्मा, प्रफुल्लकुमार चक्रवर्ती, देवीचरण चक्रवर्ती हे कार्यकर्ते क्रांतिपक्षाचें काम करीत होते. नागपूरला

भाऊजी कावरे व डॉ. केशवराव हेडगेवार (राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे संस्थापक) यांच्या नेतृत्वाखाली सशस्त्र क्रांतियुद्धाच्या या महान् उत्थानाचें कार्य चालू होतें. डॉ. मुंजे यांचें पत्र व त्यांच्याकडून दाजी-साहेब बुटी यांच्याद्वारा आर्थिक साहाय्य घेऊन मुख्यतः क्रांतिपक्षाचें कार्य करण्यासाठी व वरून डॉक्टरीचा अभ्यास करण्यासाठी डॉ. हेडगेवार कलकत्त्याला कसे गेले याचा निर्देश मागे केलाच आहे. हेडगेवार डॉक्टर होऊन १९१४-मध्ये परत आले. नागपूरला त्यांनी आपल्या सहकाऱ्यांच्या साहाय्याने गुप्त संघटन, शस्त्रसंग्रह आणि भारतातील उठावणीच्या योजनेशी संपर्क या तीन प्रकारे क्रांतिपक्षाचें कार्य चालविलें. हेडगेवारांचे सहकारी व मुंजे यांचे अनुयायी अण्णासाहेब खोत यांची नागपूर व्यायामशाळा हा या क्रांतिप्रयत्नाचाच एक भाग होता.

वर्ध्याचे गंगाप्रसाद पांडे यांच्या द्वारे उत्तर भारतातील क्रांतिकार-कांशी केशवरावांनी संपर्क साधला. या काळात डॉ. मुंजे यांचें पत्र घेऊन केशवराव हेडगेवार पुण्याला टिळकांना भेटले व त्यांना आपल्या प्रांतातील क्रांतीच्या हालचालींची कल्पना दिली. केशवरावांच्या क्रांति-गटाने एकदा नागपूर स्टेशनवरून जाणाऱ्या सरकारी दारुगोळ्याच्या पेट्याही पळविल्या होत्या. भारतातील क्रांतिपक्षाच्या या सर्व इति-हासाचें वृत्त आम्ही आमच्या भारतीय स्वातंत्र्यसमर या ग्रंथात केलेलें असल्यामुळे येथे त्याचा अधिक विस्तार करीत नाही. महायुद्धाच्या कालखंडात चाललेल्या व टिळकांचा राष्ट्रीय पक्ष परिपुष्ट करीत असलेल्या या सशस्त्र क्रांतियुद्धाच्या उठावणीच्या आंदोलनाकडे सावध ब्रिटिश सरकारचें पूर्ण लक्ष होतें. या आंदोलनाचा समग्र वृत्तान्त संकलित करण्यासाठी न्यायमूर्ति सर सिडने रौलेट यांच्या अध्यक्षते-खाली सिडिशस इन्क्वायरी कमिटी १० डिसेंबर १९१७-ला ब्रिटिश सरकारने नियुक्त केली. या समितीने केवळ प्रतिवृत्त सादर करावयाचें नसून प्रक्षोभक परिस्थितीवर उपाययोजनाही सुचवावयाची होती. या रौलेट समितीने मॉंटेग्यू चेम्सफर्ड सुधारणेच्या घोषणेच्या कालखंडातच म्हणजे एप्रिल १९१८-मध्ये आपलें प्रतिवृत्त प्रकाशित केलें. या प्रति-वृत्तावर आधारलेले कायदे करण्यासाठी दिल्लीच्या वरिष्ठ विधिमंडळा-कडे रौलेट बिलें आलीं. या बिलाला क्रिमिनल लॉ अॅमेन्डमेन्ट बिल भाग १ व २ अशीं नांवें होतीं. पहिल्या भागाने राजद्रोही मजकुराचीं पत्रकें आपल्याजवळ बाळगणें हा गुन्हा ठरविला. विशिष्ट आरोपावरून पकडण्यासाठी चौकशीची व पुराव्याची फारशी यातायात उरू दिली नाही. तसेंच शिक्षा भोगून झाल्यावरही बंधमुक्त कैद्यांनी कोठे रहावें,

काय करावें इत्यादि बाबतींत दोन वर्षेपर्यंत जामीन घेण्याचा अधिकार कोर्टांना असावा अशी तरतूद होती. दुसऱ्या बिलात विशिष्ट गुन्ह्याची चौकशी विशिष्ट पद्धतीने व्हावी आणि या चौकशीत आरोपीच्या नेहमीच्या सवलती काढून घेण्यात याव्या हा विषय होता. तात्पर्य, केवळ आरोप ठेवून चौकशी केल्याशिवाय कोणाला तुरुंगात टाकलें असें वरकरणी तर म्हणता येऊ नये, पण अपील नाही, वकील नाही, व साक्षीपुरावाही नाही अशी स्थिति निर्माण करून वाटेल त्याला संशय येताच तुरुंगात टाकावें, मोठी शिक्षा करावी व सुटल्यावरही जायबंदी करावा अशी सोय या बिलात होती. हीं बिलें पुढे येताच नेमस्त व जहाल यांच्यातील सुधारणांचा वाद बाजूला पडला व या बिलांना तोंड देण्यासाठी दोघेही एकत्र येऊन विचार करू लागले. दि. ५ फेब्रुवारी १९१९-ला दिल्लीला इंपीरियल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलची बैठक भरली व त्या बैठकीत व्हॉइसरॉयांच्या भाषणानंतर सर विल्यम् व्हिन्सेन्ट यांनी हीं दोन्ही बिलें मांडलीं. त्याला लोकनियुक्त सभासदांनी पुष्कळ विरोध केला तरी त्याचा उपयोग न होता तीं बिलें सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्यात आलीं. या बिलांविरुद्ध सर्व देशभर आंदोलन होऊन मवाळ व जहाल यांनी सारखाच तीव्र विरोध चालविला. मध्यप्रांत व वऱ्हाडातील सर्व महत्त्वाच्या भागांत निषेधाच्या प्रचंड सभा भरल्या. दि. १० फेब्रुवारी १९१९-ला चित्तरंजनदास यांचें नागपूरच्या प्रकट सभेत या बिलाविरुद्ध अत्यंत जळजळीत भाषण झालें. दि. १८ मार्चला पुनश्च कौन्सिलची बैठक प्रारंभ झाली. एका बाजूला लोकनियुक्त सभासदांचा कडवा विरोध, तर दुसऱ्या बाजूला हुकमी बहुमताच्या भरंवशावर बिलांचें कायद्यांत रूपांतर करण्याचा सरकारचा कृतनिश्चय, यामुळे वाग्युद्ध बरेंच रंगलें. पं. मालवीय, विठ्ठलभाई पटेल, तेजबहादुर सप्रू, श्रीनिवास शास्त्री, असफअली, महंमद शफी, दादासाहेब खापर्डे, सर गंगाधरराव चिटनवीस, विष्णुदत्त शुक्ल प्रभृतींनी एकमुखाने विरोध केला. तरीही रौलेट बिलाचें कायद्यांत रूपांतर झालेंच. मार्च महिन्यात रौलेट ॲक्ट झाला व त्यानंतर डिसेंबर महिन्यात मॅंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांचा कायदा झाला. या दोन कायद्यांच्या मधील मुदतीत भारतात विलक्षण स्वरूपाचे अत्याचार करून, व्हर्सायच्या शांतता परिषदेत बसण्यापूर्वी सरकारने आपले हात रक्ताने बरबटून घेतले. या बिलांच्या संपर्कातील सरकारचे आग्रही व अत्याचारी धोरण पाहून गांधीजींनी दि. २४ फेब्रुवारीला असें घोषित केलें की, "जर या बिलांचे कायद्यात रूपांतर झालें तर या कायद्याने स्वातंत्र्य, न्याय व तदनुषंगिक जन्मसिद्ध

अधिकारांना बाध येत असल्यामुळे त्याच्या विरुद्ध मी सत्याग्रह करीन. मात्र या सत्याग्रहात मी सत्याला सोडणार नाही व कोणाच्या जीविताला व वित्ताला धक्का लागेल अशी गोष्ट होऊ देणार नाही.

रौलेट ॲक्ट पास होताच गांधीजींच्या आदेशाप्रमाणे २० मार्चला भारतभर हरताळ झाला. मध्यप्रांत-वऱ्हाडांत २० मार्चलाच हा हरताळ झाला. दिल्लीला ३० मार्चला हा हरताळ पाळण्यात आला. लोकांनी शांततेचा कोणताही भंग केला नसता पोलिसांनी त्यांच्यावर अकारण गोळीबार केला, त्यामुळे मोठी दंगल झाली. त्या दिवशी एके ठिकाणची जाहीर सभा आटोपून स्वामी श्रद्धानंद परत येत होते, तों पोलिसांनी रोखलेले रस्ते त्यांनी पाहिले. त्याचीं कारणें विचारण्यासाठी ते पुढे जातात तोंच शिपायांनी त्यांच्यावर बंदुका रोखल्या. स्वामीजींनी आपली छाती उघडी केली व तुम्हांला गोळी घालावयाची असेल तर खुशाल घाला असें सांगितलें. स्वामी श्रद्धानंदांवर गोळी घालण्याचा अविवेक जरी पोलिसांनी केला नसला तरी दंग्यात अनेक लोक मारले गेले. दिल्लीची वार्ता ऐकून गांधींनी मुंबईला शिळाछापावर सत्याग्रह या नांवाचें वृत्तपत्र काढून प्रेस ॲक्ट मोडला व ते स्वतः दिल्लीला जावयास निघाले. वाटेत कोसीकलन स्टेशनवर त्यांना पंजाबात शिरण्यास बंदी करणारी सरकारी आज्ञा सांगण्यात आली. मी ती मानीत नाही असें म्हणताच त्यांना अटक करण्यात येऊन दुसऱ्या गाडीने मुंबईला आणून सोडण्यात आलें. या अटकेमागोमाग पंजाब, दिल्ली, मुंबई इत्यादि ठिकाणी हिंसात्मक दंगली उसळल्या. गांधीजींनी अहिंसेचा उपदेश सतत सुरू ठेवला, पण ऐकतो कोण!

रौलेट ॲक्टच्या विरुद्ध देशभर चाललेल्या या चळवळीमुळे विष्णुदत्त शुक्ल यांनी राजीनामा दिला. त्यांचा कौन्सिलच्या जागेचा राजीनामा पाहिल्यावर नागपूरच्या राष्ट्रीय मंडळातील काही भावनाप्रधान लोकांनी खापर्डे यांनी आपल्या जागेचा राजीनामा द्यावा अशी खटपट सुरू केली. त्यांनी डॉ. मुंजे यांच्याकडून खापर्डे यांना तसें पत्र पाठविलें. दादासाहेब खापर्डे यांनी आपल्या दि. ३ एप्रिल १९१९-च्या दैनंदिनीत असें लिहिलें आहे की, "डॉ. मुंजे यांचा मुलगा बादल आला आणि त्याने मला डॉ. मुंजे यांचें पत्र दिलें. त्यांत त्यांनी लिहिलें होतें की, काल रात्री उधोजींच्या घरून मी निघाल्यानंतर तेथे जमलेल्या आमच्या मित्रमंडळीत मी माझ्या जागेचा राजीनामा द्यावा कीं नाही याबद्दल खल झाला. त्यासंबंधी दुमत होतें, आणि असें ठरलें की, ही गोष्ट टिळकांच्या निर्णयावर

सोपवावी. मी माझा राजीनामा मुंज्यांच्या हाती द्यावा व टिळक निर्णय देतील त्याप्रमाणे तो व्हॉइसरॉयकडे पाठवावा अगर पाठवू नये. मी बादलला तोंडी सांगितलें की, उत्तर लिहायला वेळ नाही. आणि मी एकतर कलकत्त्याहून पत्र लिहीन किंवा येत्या दि. १८-ला खंडव्यास या गोष्टीची चर्चा करू."

खापर्डे हे राजकारणाचे पावसाळे अधिकात अधिक पाहिलेले व भावनेत येणारे नव्हते. त्यांनी मुंज्यांना स्वच्छपणे पत्रद्वारा कळविलें की, "माझें मत असें आहे की राजीनामा देणें अयोग्य आहे. तें धोरणीपणाचें ठरणार नाही." यानंतर खंडव्याला दि. १८-ला झालेल्या राजकीय परिषदेचे अध्यक्ष म्हणून खापर्डे यांना निवडण्यात आलें. तेथे डॉ. ई. राघवेन्द्रराव यांनी खापर्डे यांजवर राजीनामा देण्यासंबंधी दबाव आणून पाहिला. पण दादासाहेबांनी तें टिळकांवर सोपविलेलें होतें व टिळक असल्या निष्फळ असहकाराविरुद्ध होते. कौन्सिलमध्ये राहून सरकारला विरोध तरी करता येत होता. पण राजीनामा देऊन काय होणार होतें!

रौलेट ॲक्टविरुद्ध चाललेल्या चळवळीने पंजाबमध्ये अत्यंत उग्र स्वरूप धारण केलें. गदरच्या क्रांतिकारक चळवळीची भूमि पंजाबच होती. १९१४-पासून १८-पर्यंत क्रांतीचा ज्वालामुखी पंजाबमध्ये तप्त लाव्हा रस फेकीत होता. पंजाबचे गव्हर्नर सर मायकेल ओडवायर होते. त्यांनी सतत पंजाबचें दमन चालविलेलेंच होतें. सन १९१९-च्या एप्रिल महिन्यात त्या दमननीतीने उच्चांक गाठला. दि. ९ एप्रिल या दिवशी गव्हर्नर ओडवायरने क्षोभ उत्पन्न करणारें भाषण केलें. त्या भाषणात ओडवायरने अशी धमकी दिली की, "जर्मनीसारख्या शत्रूला धुळीस मिळवू शकणाऱ्या ब्रिटिश सरकारला हिंदुस्थानातील उपद्रवी लोकांना धुळीस मिळविणें कठीण नाही." यानंतरही शांततामय निदर्शनें पंजाबात चालू होतीं. अशा स्थितीत किचलू व सत्यपाल या दोन लोकप्रिय नेत्यांना पकडण्यात आलें. त्यांना सोडण्याची मागणी करण्यासाठी एक प्रचंड मिरवणूक निघाली. ती डेप्युटी कमिशनरच्या बंगल्याजवळ येताबरोबर गोऱ्या सैनिकांनी त्यांच्यावर गोळीबार केला. त्यांत कित्येक लोक मेले. सरकारी अत्याचार वाढू लागले; पंजाबात लष्करी कायदा जारी झाला. अशा स्थितीत अमृतसरच्या जालियनवाला बागेत एक मोठी शांततामय सभा भरली. या बागेला एकच प्रवेशद्वार होतें, या सभेवर जनरल डायरने निऱ्घृण गोळीबार केला. दहा मिनिटें हा गोळीबार चालू होता. या गोळीबारात एक सहस्र माणसें मेलीं असावीत. अधिक माणसें मेलीं नाहीत याचें कारण डायर याचा मायाळूपणा नसून त्याच्या जवळच्या

गोळ्या संपल्या हें आहे. सरकारच्या वतीने नियुक्त झालेल्या हंटर कमिटीसमोर डायरने दिलेल्या साक्षीत त्याच्या अंतःकरणाचा नीचपणा आणि निर्घृणपणा व्यक्त झालेला आहे. जालियनवाला बागेच्या या प्रकरणाने संपूर्ण देशभर संतापाची लाट उसळली. महात्मा गांधींनी एकवीस जुलैला आपला सत्याग्रह स्थगित केला. त्या वेळी जरी या प्रकरणाचा सूड घेता आला नाही तरी द्वितीय महायुद्धाच्या प्रारंभी राक्षसी अंतःकरणाच्या ओडवायरला ठार करून पंजाबच्या या अपमानाचा सूड सरदार उधमसिंग यांनी घेतला. अमृतसरच्या या प्रकरणाची चौकशी सरकारी स्तरावरून वेगळी व काँग्रेसच्या समितीकडून वेगळी अशी चालू होती. जालियनवाला बागेचें हें प्रकरण झाल्यावर इतर अनेक ठिकाणांप्रमाणेच नागपूरलाही पंजाब रिलीफ फंड गोळा करण्याची खटपट सुरू झाली. दि. १४ सप्टेंबर १९१९-ला नागपूरच्या नगर भवनात जाहीर सभा भरून हा फंड गोळा करण्यासाठी एक समिति स्थापन करण्यात आली. चिटणीस, गौर, डॉ. मुंजे, डॉ. परांजपे प्रभृतींनी थोड्याच दिवसांत तीन सहस्र रुपयांची मदत पहिला हप्ता म्हणून पंजाबला पाठविली. डॉ. मुंजे यांनीच मुख्यतः हा निधि उत्पन्न केला होता. यासाठी जी पंजाब रिलीफ कमिटी नागपूरला स्थापन करण्यात आली होती तिचे आश्रयदाते सर विपिनकृष्ण बोस व गंगाधरराव चिटनवीस होते. अध्यक्ष डॉ. गौर हे होते. मोरोपंत जोशी, नीळकंठराव उधोजी वासुदेवराव पुराणिक, महंमद यूसफ शरीफ, के. बी. परेख व डॉ. चोळकर हे उपाध्यक्ष होते. डॉ. मुंजे हे त्याचे मुख्य कार्यवाह असून नामदार दीक्षित, भवानीशंकर नियोगी हे त्याचे कार्यवाह होते.

भारतात हे प्रकार चालू असता लोकमान्य टिळक विलायतेतच होते. या वेळी विलायतेत नेमस्तांचें, काँग्रेसचें व होमरूल लीगचें अशी शिष्टमंडळें काम करीत होतीं. या शिष्टमंडळांच्या शिष्टाईचा प्रत्यक्ष सरकारवर काही परिणाम झाला नसला तरी ब्रिटिश मजूरपक्षीय पुढाऱ्यांचें आनुकूल्य त्यामुळे संपादिता आलें. ज्या चिरोल केससाठी लो. टिळक विलायतेत गेले होते ती केस टिळक हरले. टिळक खटला हरल्यावर आर्थिक दृष्ट्या त्यांचा सर्वनाश तर झालाच होता पण वर त्यांच्यावर कर्जाचा डोंगरही बसणार होता. टिळकांच्यावरील तें संकट निवारण करावें म्हणून दि. ११ मार्चच्या केसरीत पुढीलप्रमाणे पत्रक प्रसिद्ध करण्यात आलें. "हा खटला बुडाल्याने सांपत्तिक दृष्ट्या टिळकांचा सर्वनाश होणार आहे. आजवर या खटल्याच्या पायी टिळकांना दोन सव्वादोन लक्ष रुपये खर्च आला असावा असा अंदाज आहे. शिवाय चिरोल यांना

देण्याचा खर्च किती बसेल, अपील झाल्यास त्याला खर्च किती लागेल या गोष्टी अद्यापि नक्की कळत नाहीत. तथापि टिळकांवर ऐन बोजा तीन लक्षांचा असावा असा अंदाज आहे. टिळकांनी हा दावा सकृत्‌दर्शनी व्यक्तीचा म्हणून मांडला असला, तरी त्याला सर्वस्वी राष्ट्रीय पक्षापुरतें तरी सार्वजनिक महत्त्व आहे. कार्याचें महत्त्व व राष्ट्रीय पक्षाच्या परीक्षेची ही वेळ लक्षात आणून सर्वांनी या निधीला साह्य करावें." या पत्रकावर मध्यप्रांत विदर्भाच्या वतीने खापर्डे, मुंजे, व अणे, कर्नाटकच्या वतीने बेळवी व देशपांडे आणि महाराष्ट्राच्या वतीने केळकर, खाडिलकर, शिवरामपंत परांजपे, देशमुख, नेने, वैद्य व साठे यांच्या सह्या होत्या. दि. ३० मेला महात्मा गांधींच्या अध्यक्षतेखाली मुंबईला टिळकांविषयी कृतज्ञता व्यक्त करण्यास्तव सभा झाली. अध्यक्ष गांधीजी आपल्या भाषणात म्हणाले की, "टिळकांचे व माझे मार्ग वेगळे आहेत. तथापि त्यांच्या स्वार्थत्यागाविषयी व विद्वत्तेविषयी गुणग्रहणाचा जो प्रसंग असेल त्यात मी समाविष्ट होणारच. विलायतेतील खटला टिळकांच्या विरुद्ध गेला म्हणून त्यांच्याविषयी लोकांची आदरबुद्धि कमी न होता उलट वाढलीच आहे. ज्याच्या पिशवीचें तोंड मोठें त्याची फत्ते असा न्यायच आहे. न्यायकोर्टांना मी कंटाळून गेल्यामुळे मला असें वाटतें की, टिळक हे केवळ सत्याग्रही असते तर काय बहार झाली असती! तथापि या अपयशाने निराश न होता टिळकांनी विलायतेतील आपली कामगिरी खंबीरपणाने चालविली आहे हें पाहून कौतुक वाटतें. तरी इकडे आपण प्रयत्न करून त्यांच्यावरील खर्चाचा बोजा उठविला पाहिजे." याच सभेत भाषण करताना शिवरामपंत परांजपे गांधीजींकडे मिस्किलपणाने पहात म्हणाले, "टिळक हे सत्याग्रही आहेत म्हणूनच त्यांनी हा खटला विलायतेपर्यंत नेला. सत्याचा आग्रह गेल्या एप्रिलातच सुरू झाला असें नाही तर तो फार पुरातन कालापासूनचा आहे." असो.

विलायतेतील आपली कामगिरी संपवून दि.२६ नोव्हें. १९१९-ला टिळक हिंदुस्थानात आले. त्यांचें मुंबईला फार मोठें स्वागत होऊन त्यांना मानपत्र समर्पण करण्यात आलें. उत्तरादाखल केलेल्या भाषणात त्यांनी असें सांगितलें की, "अपुऱ्या असल्या तरी सुधारणा राबवा. मिळेल तें घ्या पण चळवळ सोडू नका. रौलेट बिलाविरुद्ध गांधींनी सत्याग्रह सुरू केला त्या वेळी त्यात भाग घेण्यासाठी मी येथे नव्हतो याचें मला वाईट वाटतें." दि. १ डिसेंबरला टिळक पुण्यास आले. तेथे त्यांना नगरपालिका व नागरिकांच्या वतीने मानपत्र समर्पण करण्यात आलें. या वर्षाच्या डिसेंबर महिन्याच्या १६ ते १९ या दिनांकांना महायुद्धाचा

विजयदिन साजरा करण्याचें हिंदुस्थान सरकारने ठरविलें. मध्यप्रांताच्या काँग्रेस कमिटीने त्याविरुद्ध एक पत्रक प्रसिद्ध केलें होतें. त्या पत्रकात सरकारच्या भारतविषयक कृतघ्नतेचा संपूर्ण आढावा घेऊन शेवटी असें म्हटलें होतें की, "जोपर्यंत पंजाबच्या करुण किंकाळ्यांनी आमच्या कानांत ठाणें दिलें आहे व तेथील अत्याचारी अधिकाऱ्यांच्या संबंधात सरकार कोणतेंही पाऊल उचलावयास तयार नाही तोवर आम्ही या विजयोत्सवात भाग घेणें म्हणजे देव व सदसद्विवेक बुद्धि यांच्याशी विश्वासघात करणें आहे."

या वेळी नागपूरच्या राष्ट्रीय मंडळाच्या कार्यकर्त्यांपैकी तरुण गटाने 'नागपूर नॅशनल युनियन' या नांवाने आपली वेगळी पण अधिक जहाल विचारांची संस्था निर्माण केली होती. महायुद्धानंतर प्रत्यक्ष क्रांतीचा मार्ग अशक्य म्हणून तो सोडून जनजागृतीच्या कार्याकडे वळलेले डॉ. हेडगेवार हे या नव्या गटाचे नेते होते. मनोहरपंत बोबडे, विश्वनाथराव केळकर, बळवंतराव मंडलेकर प्रभृति तरुण कार्यकर्ते या नव्या मंडळात असत. या मंडळाने सरकारी विजयदिनाच्या अथवा शांततादिनाच्या दिवशी सरकारचा निषेधदिन पाळावा असा आदेश देणारें पत्रक काढलें. Can We Celebrate Peace ? या शीर्षकाखाली असलेल्या या पत्रकावरील सह्यांत हेडगेवार यांची सही होती.

अशा या संघर्षाच्या व असंतोषाच्या वातावरणात १९१९-च्या डिसेंबरच्या शेवटी अमृतसरला राष्ट्रीय सभेचें अधिवेशन झालें. या महिन्यातच सरकारला माँटफोर्ड सुधारणा लागू करावयाच्या असल्यामुळे त्यांना आवश्यक असें वातावरण निर्माण व्हावें म्हणून सर्व राजकीय कैद्यांची मुक्तता करण्यात आली. अर्थातच सावरकर बंधूंसारखे जे खरे राजकीय कैदी होते त्यांना मुक्त करण्यात आलें नव्हतेंच. याच वेळी अल्लीबंधूंची मुक्तता करण्यात आली होती. महायुद्धानंतर कॉन्स्टॅन्टिनोपल येथे आपलें सैन्य घुसवून तुर्कस्थानचा सुलतान मुस्लिम जगताचा खलिफा याची ब्रिटिशांनी गठडी वळली होती. त्यामुळे भारतातील मुसलमानांच्या धर्मभावना दुखविल्या गेल्याच्या सबबीवर त्यांनी भारतात चळवळ करण्याचें ठरविलें. खलिफासाठी हें आन्दोलन असल्यामुळे त्याला खिलाफत आन्दोलन असें म्हणतात. या आन्दोलनाला हिंदूंचें साह्य असावें म्हणून शौकत व महंमद अल्लींनी गांधींची प्रार्थना केली व गांधींनी हिंदु-मुस्लिम एकता अधिक दृढ करण्याच्या भावनेने त्या प्रार्थनेला साद दिली. अकारण बाहेरचें व एका साम्प्रदायिक दृष्टिकोनातून चालविलेलें हें आन्दोलन गळ्यात अडकविण्यापूर्वी त्यांनी

शतवार विचार करणें अवश्य होतें. पण तो न करता, परिणामत: ज्यात मुस्लिम जातीयवाद परिपुष्ट झाला त्या या आन्दोलनाचें नेतृत्व त्यांनी स्वीकारलें. दि. २४ नोव्हेंबर १९१९-ला दिल्ली येथे गांधींच्या नेतृत्वाखाली खिलाफत परिषद झाली. या परिषदेत असहकाराचें तत्त्व गांधींनी प्रथम उच्चारलें.

अशा या पार्श्वभूमीवर अमृतसर काँग्रेसचें अधिवेशन झालें. या अधिवेशनाला विशेष महत्त्व होतें. नुकत्याच निरपराध्यांच्या रक्ताने भिजलेल्या अमृतसरच्या भूमीवर हें अधिवेशन होतें. पं. मोतीलाल नेहरू त्याचे अध्यक्ष होते. स्वागताध्यक्ष स्वामी श्रद्धानंद होते. टिळक या अधिवेशनाला आपल्या अनुयायांसह खास गाडीने गेले. दि. २७-ला काँग्रेसचें अधिवेशन होतें. त्याच्या दोनच दिवस पूर्वी दि. २४-ला मॉंटफर्ड सुधारणासंबंधी बादशहांचें घोषणापत्रक प्रसिद्ध झालें. गांधींनी ज्याला नवयुगाचें प्रवर्तन मानलें त्या या घोषणापत्रकात बादशहांनी भारतात सुधारणा कायद्याचें स्वागत, जबाबदार राज्यपद्धतीचा परिचय होण्याच्या दृष्टीने करावयाचें आवाहन करून आपल्या सद्भावनेचा परिचय करून दिला होता. या राजपत्रकांतील सर्वांना स्वागतार्ह वाटलेला भाग पुढीलप्रमाणे होता :—

It is my earnest desire at this time that so far as possible, any trace of bitterness between my people and those who are responsible for my Government should be deleterious. Let those who on their eagerness for political progress have broken the Law in the past, respect it in the future, A new era is opening. Let it begin with a common determination among my people. I, therefore, direct my Viceroy to exercise, in my name and on my behalf, my Royal clemency to political offenders in the fullest measure which in his judgment is compatible with publie safety. I pray to Almighty God that by his wisdom and under his guidance, India may be led to greater prosperity and contentment and may grow to the fullness of political freedom.

टिळक अमृतसर काँग्रेसला खास गाडीने जात असता वाटेत त्यांना हें राजपत्रक मिळालें. त्यांच्या पक्षाचे बहुतेक महत्त्वाचे लोक त्यांच्या समवेत गाडीतच होते, त्यांच्याशी विचारविनिमय करून टिळकांनी भारतमंत्री व व्हॉइसरॉय यांच्या द्वारे बादशहांना पुढील तार केली :

Please convey to His Majesty grateful and loyal thanks of Indian Home Rule League and the people of India for proclamation and amnesty and assure him of responsive cooperation.

स्वतः टिळकांनीच या तारेचा केलेला अनुवाद पुढीलप्रमाणे: "बादशहांस मेहेरबानीने असें कळवा की, जाहीरनामा आणि माफी यांबद्दल इंडियन होमरूल लीग आणि हिंदुस्थानचे लोक त्यांचे कृतज्ञपणे आणि राजनिष्ठपणे आभारी आहेत. आणि या बाबतीत प्रतियोगी सहकारिता (लोकांकडून) मिळेल असें बादशहांस कळवा." टिळकांच्या या तारेवर तर्कटें रचून ते मॅंटेग्यूसाहेबांसमोर नमल्याची व नेमस्तांच्या भूमिकेशी समरस झाल्याची हाकाटी काही तथाकथित जहालांनी सुरू केली. टिळकांनी त्यांना पुढीलप्रमाणे उत्तर दिलें:

" टिळकांनी तारेत मानलेले आभार हे बादशहांचे आहेत. मॅंटेग्यू साहेबांचे नव्हत अगर व्हॉइसरॉयांचेही नव्हत. बादशहांस काहीही मजकूर कळवावयाचा असला तरी तो त्यांचे मंत्री, चिटणीस किंवा व्हॉइसरॉय यांचे मार्फतच कळवावा लागतो. म्हणून बादशहांस उद्देशून केलेल्या तारा मॅंटेग्यू व व्हाइसरॉय यांच्या द्वारे पाठविण्यात आल्या असल्या तरी त्यांतील मजकूर त्या दोघासही उद्देशून नव्हता. तारेंत आभार बादशहांचे आहेत आणि तेही त्यांचा जाहीरनामा व सर्वसाधारण माफीबद्दल असून सहकारित्वाचे वचनही प्रतियोगी स्वरूपाचें आहे. Responsive (प्रतियोगी) हा शब्द सहकारितेला प्रायः लावीत नाहीत, हें खरें; पण त्याच कारणामुळे प्रस्तुतच्या तारेतील या शब्दाकडे टीकाकारांचें विशेष लक्ष जावयास पाहिजे होतें." बादशहांच्या जाहिरनाम्यात सहकारित्वाचा उपदेश नोकरशाही आणि प्रजा या दोघांसही केलेला होता. टिळकांच्या मते प्रजेस हा उपदेश करणें जरूर नव्हतें. कारण प्रजेच्या कल्याणाच्या गोष्टीत प्रजेने आपण होऊन कधी अडथळा आणला नाही, किंबहुना आणणेंही शक्य नाही. आजपर्यंत जो अडथळा आणि विरोध झाला तो सर्व नोकरशाहीचा. ही नोकरशाही जर सहकारिता करावयास कबूल असेल व करील तर त्याला प्रतियोगित्वाच्या नात्याने म्हणजे जबाबाला प्रतिजबाब म्हणून लोकही सहकारिता दाखविण्यास तयार आहेत, असें बादशहास आश्वासन द्या असा टिळकांच्या या तारेचा अर्थ होता. पण येवढ्या खोल पाण्यात शिरावें कोणी ? कित्येक बेजबाबदार व व्यवहारशून्य जहालांचें असें म्हणणें आहे की, माफी देताना बादशहांनी जी भाषा वापरली आहे ती आम्हांस मान्य नसल्यामुळे आभार मानण्यास आम्ही तयार नाही. पण हे खरे जहाल किंवा नेमस्तही नव्हत असें त्यांस मोठ्या दुःखाने कळविणें प्राप्त आहे. तुम्हांला माफी नको तर खुशाल रहा तुरुंगात! नको कोणी म्हटलें आहे ? नोकरशाहीच्या जुलमाने राजकीय कैदेत गेलेले लोक तुरुंगाबाहेर काढणें हें प्रत्येक

देशहितचिंतकाचें पहिलें कर्तव्य होय व यासाठीच बादशहांस लोकांनी व काँग्रेसने अनेक वेळा विनंती केलेली होती. ही विनंती आता बादशहांनी मान्य केली आणि स्वराज्याचें स्पष्ट अभिवचन दिलें, इतकेंच नव्हे तर सर्व राजकीय कैद्यांस माफीही देण्यास फर्माविलें. आता या त्यांच्या जाहिरनाम्यातील शब्दांबद्दल तक्रार करणें नुसत्या फाजीलपणाचें लक्षण होय."

टिळकांबरोबर या वेळी डॉ. मुंजे होते. अधिवेशनाचे अध्यक्ष पं. मोतीलाल नेहरू यांनी बादशहाच्या घोषणापत्राला "दु:खांधकारातील सूर्यकिरण" म्हटलें. पंजाबच्या घटनांचें त्यांनी हृदयद्रावक वर्णन करून असे उद्गार काढले की, "एकशे आठ इसमांना फाशीची शिक्षा सांगण्यात आली व सर्व कैद्यांच्या शिक्षेची बेरीज केली तर ती सात-हजार तीनशे एकाहत्तर वर्षांहून अधिक भरेल." सुधारणांच्या कायद्याला उद्देशून अध्यक्षांनी सांगितलें की, "काँग्रेसच्या म्हणण्यानुसार हा कायदा झालेला नसला तरी त्याने जें मिळालें आहे त्यासंबंधी तुच्छता दर्शविणें योग्य नाही. या कायद्याने काही सत्ता आम्हांस दिली आहे हें आम्ही कबूल केलें पाहिजे. आम्हांस मिळालें आहे त्याचा आम्ही उपयोग करून घेतला पाहिजे. तसेंच आम्हांला जे हक्क मिळाले पाहिजेत त्याबद्दल चळवळही सुरू ठेवली पाहिजे." या अधिवेशनात जे अनेक ठराव संमत झाले त्यात एका ठरावाने ओडवायर यांना काढून टाकावें अशी मागणी करण्यात आली होती. मुख्य ठराव सुधारणावादासंबंधी होता. देशबंधु चित्तरंजन दास यांनी तो मांडला. तो पुढीलप्रमाणे :

(१) ही राष्ट्रीय सभा हिंदुस्थान पूर्ण जबाबदारीचें सरकार चालवावयास सर्वथा योग्य आहे या आपल्या गेल्या वर्षीच्या मतांवर स्थिर आहे. याविरुद्धच्या सर्व गृहीत कृत्यांना व विधानांनाही राष्ट्रीय सभा उपहासास्पद समजते.

(२) प्रस्तुत घटनात्मक सुधारणासंबंधी ही राष्ट्रसभा, दिल्ली येथील राष्ट्रसभेने जे ठराव मान्य केले आहेत त्यांना मान्यता दर्शविते. या राष्ट्रसभेचें असें मत आहे की, सुधारणा कायदा अपुरा, असमाधानकारक व निराशाजनक आहे.

(३) ही राष्ट्रसभा अशी मागणी करते की, स्वयंनिर्णयाच्या तत्त्वांनुसार संपूर्ण दायित्वपूर्ण सरकार भारतात प्रस्थापित होण्याच्या दृष्टीने ब्रिटिश पार्लमेंटने लवकर पाऊल उचलावें."

लोकमान्य टिळकांनी या ठरावाला पाठिंबा देताना प्रतियोगी सहकाराची आपली भूमिका विशद केली. यानंतर गांधींनी या ठरा-

वाला 'मॉंटेग्यूंचे आभार मानावे ' अशी उपसूचना आणली व निराशा-जनक आणि असमाधानकारक हे शब्द गाळावे असें सुचविलें. बेझंटबाई-चाही तोच हट्ट होता. टिळकांचा प्रभाव मोठा असल्यामुळे व पूर्वीच्या राष्ट्रीय सभांच्या अधिवेशनांतून हे शब्द वापरल्याचा परंपरेचा दाखला त्यांच्याच बाजूला असल्यामुळे गांधी, बेझंट व त्यांचे साहाय्यक जिना प्रभृति लोक यांचें काही न चालून 'अपुऱ्या, असमाधानकारक व निराशा-जनक ' या शब्दांना मूळ ठरावात तसेंच ठेवावें लागलें. बेझंटबाईंची मात्र केविलवाणी अवस्था झाली. कारण त्यांनीच पूर्वी मॉंटेग्यू सुधार-णांना हीं विशेषणें वापरलीं होतीं. यानंतर ठराव एक मताने व्हावा म्हणून सुधारणांचा उपयोग करून घ्यावा व मॉंटेग्यूंचे त्यांच्या कष्टा-बद्दल, सुधारणांच्या स्वरूपाबद्दल नव्हे, औपचारिक आभार मानावे हा भाग मूळ ठरावाला अधिक जोडण्यात आला, व ठराव एकमताने संमत झाला. याप्रमाणे अमृतसर कॉंग्रेसमध्ये प्रतियोगी सहकाराच्या टिळकांच्या तत्त्वांचा संपूर्ण विजय झाला.

यानंतर डॉ. मुंजे यांनी नागपूरच्या वतीने पुढच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचें निमंत्रण दिलें व तें मान्य झाल्यावर अमृतसर कॉंग्रेसहून मंडळी परतली.

अमृतसरला पुढच्या राष्ट्रीय सभेचें निमंत्रण देताना डॉ. मुंजे यांच्या मनात नागपूरच्या राष्ट्रसभेचे टिळकांनाच अध्यक्ष करावयाचें हा पक्का निश्चय होता. सन १९०७-मध्ये जे पुरेशा राजकीय जागृतीच्या अभावी होऊ शकलें नाही व मध्यंतरी राष्ट्राने टिळकांची अध्यक्ष म्हणून निवड केली तरी जें त्यांच्या इंग्लंडातील वास्तव्यामुळे साधू शकलें नाही तें या वेळी घडवावयाचा त्यांचा दृढ निश्चय होता. त्या दृष्टीने नागपूरला राष्ट्रीय मंडळ व तरुणांची नागपूर नॅशनल युनियन या दोन संस्थांना हाताशी धरून त्यांनी पूर्वसिद्धता चालविली. प्रचाराच्या दृष्टीने मराठी मध्यप्रांत व वऱ्हाडसाठी ' महाराष्ट्र ' पत्र नागपूरच्या राष्ट्रीय मंडळाने काढलेलेंच होतें. हिंदी मध्यप्रांतासाठी त्यांनी 'संकल्प' या नांवाचें हिंदी साप्ताहिक काढण्याचा प्रयत्न सन १९१९-च्या प्रारंभा-पासूनच चालविला होता. 'संकल्प' पत्राची योजना डॉ. मुंजे यांचीच होती हें सिद्ध करणारा अस्सल पत्रांचा निर्विवाद पुरावा येथे देता येण्यासारखा आहे. दि. ५ ऑगस्ट १९१९-ला जबलपूरचे तालुकदार, व्हॉइसरॉयांच्या कौन्सिलचे रौलेट बिलाच्या प्रश्नावर त्यागपत्र दिलेले सदस्य विष्णुदत्त शुक्ल हे डॉ. मुंजे यांना लिहितात :

" एका हिंदी साप्ताहिकाची रायपूर, जबलपूर व हुशंगाबाद या तीन विभागांसाठी फारच आवश्यकता आहे हें तुम्हांस माहीतच आहे. आपण तिच्याकडे दुर्लक्ष केलेलें नाही आणि 'संकल्प' या नांवाचें वृत्तपत्र लौकरच काढण्याच्या उद्योगात तुम्ही आहात याचा मला आनंद वाटतो. सार्वजनिक जीवनात लक्ष घालणाऱ्या प्रत्येक माणसाने या कार्याबद्दल सहानुभूति बाळगली पाहिजे व प्रत्यक्ष साहाय्य केलें पाहिजे. "

डॉ. हेडगेवार व नागपूरच्या व्यायामशाळेचे संस्थापक श्री. अण्णासाहेब खोत यांच्याकडे या पत्राचें काम सोपविण्यात आलें. पण विष्णुदत्त शुक्ल प्रभृति हिंदी विभागातील लोकांना हें पत्र जबलपूरला हवें होतें. त्यासाठी त्यांनी ५० सहस्र रुपयांचे शेअर्स खपविण्याची एक योजनाही आखली. श्री. माधवराव सप्रे नागपूरला हिंदी पत्र काढण्याच्या विरुद्धच होते. अण्णासाहेब खोत यांनी संकल्प प्रेस थाटला व पत्र सुरूही केलें. पण तें लवकरच बंद करावें लागलें. दि. ३-९-२०-च्या डॉ. मुंजे यांना लिहिलेल्या पत्रात अण्णासाहेब खोत लिहितात, " डॉ. बाबासाहेब परांजपे मला नागपूर स्टेशनवर भेटले असता त्यांनी पत्रासंबंधी विचारलें. संकल्प पत्र कायमचें बंद करावयाचा निर्णय ऐकून त्यांना आश्चर्य वाटलें. त्यांनी जर तुम्हांला पत्र बंद करावयाच्या निर्णयाचीं कारणें विचारलीं तर त्याचें मला आश्चर्य वाटणार नाही. "

असो. १९२०-च्या जानेवारीत डॉ. मुंजे यांचे मित्र व सहकारी डॉ. ल. वा. परांजपे व त्यांना पुत्रवत् असणारे व प्रांताच्या सार्वजनिक जीवनात नुकतेच तळपू लागलेले डॉ. केशवराव हेडगेवार यांच्या नेतृत्वाखाली भारत स्वयंसेवक मंडळ स्थापन करण्यात आलें. सार्वजनिक कामांना हुकमी स्वयंसेवकांचा पुरवठा होऊन कार्यकर्त्यांच्या अभावी काम अडू नये हें या संस्थेचें उद्दिष्ट होतें. यानंतर लवकरच प्रांतभर आगामी अधिवेशनाच्या सिद्धतेसाठी श्री. दादासाहेब खापर्डे व डॉ. मुंजे यांचा संयुक्त दौरा प्रारंभ झाला. यापूर्वी सुधारणा कायद्यानुसार इंडियन लेजिस्लेटिव्ह कौन्सिलची निर्मिति होऊन तेथे खापर्डे व विष्णुदत्त शुक्ल सभासद म्हणून निवडून गेलेले होते. या कौन्सिलसमोर ना. पटेल यांचें हिंदु मॅरेज बिल आलें होतें. या बिलात मिश्र विवाहाच्या मान्यतेचा प्रश्न असल्यामुळे सनातनी समाजात तो चर्चेचा विषय झालेला होता. या बिलासंबंधी हिंदु धर्मशास्त्रदृष्टचा आपापले विचार व्यक्त करावयास्तव नागपूरला डॉ. मुंजे यांनी एक प्रकट सभा घेतली. यानंतर धनतरी, रायपूर इत्यादि हिंदी विभागाचा दौरा झाल्यावर दि. १३ एप्रिलला नागपूरला एक प्रचंड सभा झाली. त्यानंतर दि. २५ एप्रिलला

स्वागत समितीच्या कार्यकारिणीची सभा झाली. या सभेला डॉ. मुंजे, डॉ. ल. वा. परांजपे, बॅ. गोविंदराव देशमुख व दादासाहेब खापर्डे उपस्थित होते. प्राथमिक खर्चासाठी निधि गोळा करण्याच्या प्रश्नाची चर्चा झाली. यानंतर दि. २८-ला डॉ. मुंजे यांच्या अध्यक्षतेखाली यवतमाळला होमरूल लीगचा वार्षिकोत्सव साजरा झाला. त्याला पांच सहस्त्र लोकांची उपस्थिति होती. खापर्डे या वार्षिकोत्सवाला उपस्थित होते. दि. ३० एप्रिलला खापर्डे यांच्या अध्यक्षतेखाली नागपूरला टाऊन हॉलमध्ये प्रकट सभा होऊन काँग्रेसच्या अधिवेशनाच्या कामासाठी निधी-संबंधाने लोकांना आवाहन करण्यात आलें. सभेत केळकर, भवानीशंकर नियोगी, श्री. ठेंगडी व डॉ. चोळकर यांचीं भाषणें झालीं. या प्रसंगी अध्यक्ष दादासाहेब खापर्डे यांनी स्वतः निधीसाठी पांचशे रुपयांची देणगी देऊन कार्याला शुभारंभ केला.

यानंतर दि. १८, १९ व २० मेला सागरला डॉ. मुंजे यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा परिषद झाली. या परिषदेला दादासाहेब खापर्डे उपस्थित होते. या परिषदेच्या शेवटी या प्रांतात काँग्रेस घ्यावयाची ती नागपूरला की जबलपूरला असा एक नवा वाद उपस्थित झाला. या परिषदेनंतर डॉ. मुंजे हे काँग्रेसच्या सिद्धतेच्या कामासाठी नागपूरला परतले व दादासाहेब खापर्डे दि. २२ मेला होणाऱ्या टिळकांच्या सत्कारासाठी पुण्याला गेले. डॉ. मुंजे यांनी मे महिन्याच्या ऐन उन्हाळ्यात डॉ. हेडगेवार यांच्यासह मराठी मध्यप्रांताचा दौरा केला. जनतेतील उत्साह वाढू लागला होता.

चिरोल केसमध्ये अपजय झाल्यामुळे लो. टिळकांवर जें आर्थिक संकट आलें त्याच्या निवारणासाठी राष्ट्रीय पक्षाच्या वतीने तीन लक्ष रुपयांचा निधि जमविण्यात आला याचा निर्देश मागे केलाच आहे. हा निधि लोकमान्यांना समर्पण करण्याचा समारंभ दि. २२ मे १९२०-ला गायकवाड वाड्यात डॉ. नानासाहेब देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली झाला. सत्काराला उत्तर देताना टिळक गहिवरले व "लोकांनी आज मला विकत घेतलें," असे उद्‌गार काढले. पुढे टिळकांचे राजकीय वारस कै. तात्यासाहेब केळकर यांनी आपल्या गुरूचे हे शब्द ध्यानात ठेवून केसरीच्या उत्पन्नातून तीन लक्ष रुपये सार्वजनिक कार्यासाठी बाजूला काढले. आजही या निधीतून सार्वजनिक कार्यांना साहाय्य मिळतें. तात्यासाहेब यांनी आपल्या गुरूने मानलेलें लोकऋण ज्या प्रकारें फेडलें तो प्रकार अलौकिक होय !

असो. या निधीच्या संग्राहकांपैकी एक संग्राहक श्री. अच्युतराव कोल्हटकर होते. निधि जमविताना त्यांनी त्यातील काही पैशांचा आपल्या 'संदेश' पत्राच्या कामासाठी अपहार केला, व श्री. तात्यासाहेब केळकर यांनी त्यासंबंधी रक्कम मिळाल्याची खोटी पावती द्यावी असे प्रयत्न सुरू केले. तात्यासाहेब तें मान्य करीनात. दुर्बुद्धि सुचून अच्युतरावांनी आपल्या संदेशमधून तात्यासाहेबांना हव्या त्या शिव्या दिल्या. लबाडी स्वत:ची व शिव्यांची लाखोली एका प्रामाणिक माणसाला या गोष्टीचा लोकमान्य टिळकांना अतिशय राग आला व त्यांनी सत्कार-सभेत अच्युतरावांचा खरपूस समाचार घेऊन त्यांच्या चारित्र्याचें पितळ उघडें पाडलें. तेवढ्याने अच्युतरावांनी शहाणें होणें आवश्यक होतें; पण आपल्या शिवराळ लेखणीची भलतीच घमेंड बाळगणाऱ्या अच्युतरावांनी केळकरांऐवजी स्वत: टिळकांनाच अपशब्दांची लाखोली वाहून संदेश-मधून त्यांच्यावर हल्ला चढविला. त्यांना या कार्यासाठी कोल्हापूरचे महाराज व इंग्रजांचे गुप्तचरखातें यांनी पैसे चारले होते असें म्हणतात. पण हा डाव अच्युतरावांच्या अंगाशी आला. खांद्याच्या धक्क्याने हिमाचलाचें काय होणार? धक्का देणाऱ्याचा खांदा मोडेल व हाडें तुटतील! अच्युतरावांचें तेंच झालें. त्यांचें राजकीय व सार्वजनिक जीवन यानंतर सदाचें समाप्त झालें. इतकें की, टिळकांच्या मृत्यूनंतर मुंबईला दुखवट्याच्या सभेत ते बोलावयास आले असता लोकांनी त्यांना दगड मारून घालवून दिलें.

अच्युतरावांच्या या अध:पाताचा टिळकांना वृद्धपणी जाणवण्या-सारखा धक्का बसला. श्री. दादासाहेब खापर्डे अच्युतरावांच्यासंबंधी आपल्या दैनंदिनीत लिहितात," अच्युतराव कोल्हटकर हा भाडोत्री मनुष्य झाला आहे. असें म्हणतात की, सी. आय् डी. खात्याने व कोल्हापूरच्या महाराजांनी त्याला लाच देऊन विकत घेतला आहे. तो 'संदेश' वर्तमान-पत्रामध्ये सर्वश: आमच्या पार्टीविरुद्ध आणि विशेषत: टिळकांच्या विरुद्ध लिहितो. त्याच्या या वर्तनाकडे लक्ष पुरवावें कीं नाही असा प्रश्न होता. आर्. पी. करंदीकर, मी, बखले, गंगाधरराव कौजलगी आणि काही इतर यांचीं मतें अशीं पडलीं की, यात कटुता उत्पन्न होणें अपरिहार्य असलें तरी तें टाळता येत नाही आणि कोल्हटकरांच्या या खोड्या उघड करून दाखविल्या पाहिजेत. गायकवाडवाड्यात फार मोठी सभा झाली. नाना-साहेब देशमुख अध्यक्ष होते. औपचारिक रीत्या लोकमान्यांना थैली अर्पण करण्यात आली. माझा मुलगा बाबा आणि वामनराव यांनी सार्वजनिक रीत्या कोल्हटकरांच्या वर्तनाविषयी उघड चर्चा केली. लो. टिळकांनीही

कोल्हटकरांची तार आणि पत्रें दाखविलीं. आणि त्यावरून कोल्हटकरांची बेइमानी आणि लबाडी उघडकीस आली. सभा रात्री अकरा वाजता संपली."
–दि. २२ मे १९२०

"अच्युतराव कोल्हटकरांनी आमच्या नॅशनॅलिस्ट पार्टीविरुद्ध आणि टिळकांविरुद्ध बदनामीची मोहीम उघडली आहे. वार्ता अशी आहे की, गुप्त पोलिस खात्याकडून त्यांनी पैसे घेतले आहेत. कोल्हापूरकर महाराजांचाही यात हात आहे असें म्हणतात. काय खरें असेल तें देव जाणें. हिंदुस्थान देश हा अभागी आहे."
—दि. १७ जून १९२०

बाबासाहेब खापर्डे या प्रकरणाविषयी लिहितात : "संदेश पत्र काढायला कोल्हटकरांना दादासाहेबांनी स्वहस्ते व वऱ्हाडातून परहस्ते द्रव्यसाहाय्य फार केलें. लोकमान्यांनी कोल्हटकरांना स्वतःचे समजून सर्व प्रकारचें साहाय्य केलें. हें येथे नमूद केलें म्हणजे कोल्हटकरांच्या अधोगतीची कल्पना येते. लोकमान्यांच्या शेवटच्या आजाराला जीं कारणें झालीं त्यात त्यांच्या मनःसंतापाची प्रामुख्याने गणना केली पाहिजे. त्या मनःसंतापाचें श्रेय (?) कोल्हटकरांना दिलें पाहिजे हें मी स्वतःच्या माहितीने व अनुभवाने सांगतो. निधिसमर्पणाच्या समारंभास मी गेलो होतो तेव्हा लोकमान्य यासंबंधाने किती उद्वेगाने व तळमळून बोलले तें मी ऐकलें आहे. कारण ते माझ्याशीच बोलत होते. प्रसंगविशेषी लोकमान्य अत्यंत प्रक्षुब्ध होत. प्रसंगी शांतही रहात हें खरें आहे. पण तो त्यांचा मूळ स्वभाव नव्हता. त्याकरिता त्यांनी पूर्ण प्रयत्न केलेला असे. त्यांचा मूळ स्वभाव तापट होता व त्याची त्यांना जाणीव होती. स्वतःच्या इभ्रतीवर व सचोटीवर कोल्हटकरांनी केलेले आरोप व तेही अत्यंत हीन भाषेत म्हणून त्यांच्या मनाला फार झोंबले. मतभिन्नता कितीही कडक शब्दांत व्यक्त करणें निराळें व चारित्र्यावर आक्षेप घेणें निराळें. कोल्हटकरांनी त्यांच्या चारित्र्यावर आघात केले. ते टिळकांसारख्या सचोटीच्या मनुष्याला दुस्सह झाले. असो. हा देश अभागी आहे हेंच मनाला खरें वाटतें."
–दादासाहेब खापर्डे यांचें चरित्र. लेखक बाबासाहेब खापर्डे, पृ. ५८७, ५८९

दि. २८ मे १९२०-ला सरकारने पंजाब, बंगाल व मुंबई येथील दुर्घटनांच्या चौकशीसाठी नियुक्त केलेल्या हंटर कमिटीचें इतिवृत्त प्रसिद्ध झालें. दि. १४ ऑक्टोबर १९१९-ला सरकारने ही समिति

नियुक्त केली होती. लॉर्ड हंटर तिचे अध्यक्ष होते. युरोपियन सभासदांबरोबरच सर चिमणलाल सेटलवाड, जगत् नारायणलाल, सुलतान अहमदखान हे हिंदी सभासदही त्या समितीवर होते. समितीचे अध्यक्ष लॉर्ड हंटर हे इतक्या एककल्लीपणाने वागत होते की, हिंदी सभासदांनी त्यांच्याशी बोलणेंही सोडलें. काँग्रेसला तिच्याशी सहकार्य करणें अशक्य असल्यामुळे तिने स्वतःची स्वतंत्र समिति नियुक्त केली होती. हंटर समितीच्या हंटर यांनी लिहिलेल्या प्रतिवृत्ताशी हिंदी सदस्यांचा मतभेद झाल्यामुळे सेटलवाड यांनी हिंदी सभासदांच्या वतीने स्वतःचें स्वतंत्र प्रतिवृत्त तयार केलें. ठरल्याप्रमाणे पार्लमेंटने त्याला केराची टोपली दाखवून हंटर साहेबांचाच रिपोर्ट उचलून धरला. काँग्रेस कमिटीनेही आपला स्वतंत्र रिपोर्ट प्रसिद्ध केला होता. लॉर्ड हंटर यांचा रिपोर्ट प्रसिद्ध होताच त्यातील विधानांनी लोकांच्या बुजत आलेल्या जखमा पुन्हा वाहू लागल्या; आणि या जखमांवर आग भडकविणारें तेजाब ओतणारी घटना अशी घडली की, ज्या सर मायकेल ओडवायरने पशुतुल्य अत्याचार करून पंजाबचें हत्याकांड घडविलें होतें त्याचा उदो उदो करून, जालियनवाला बागेत शेकडो निरपराध लोकांना कंठस्नान घालणाऱ्या जनरल डायरला सन्माननिधि समर्पण करण्यासाठी इंग्लंडमध्ये निधि जमा करण्यात येऊ लागला व ब्रिटिश जनतेने त्याला मुक्तहस्ताने साह्य केलें. या इंग्रज जनतेला व या अत्याचारी सरकारला नैतिक म्हणता येईल काय? व अशा पशुतुल्य वर्तनाच्या अनैतिक सरकारशी कोणत्याही पद्धतीने सहकार्य करणें पापमय असल्यामुळे या सरकारशी संपूर्ण असहकार (Non-co-operation) करावा असें मत गांधीजींनी प्रकटपणे घोषित केलें. अमृतसर काँग्रेसमध्ये टिळकांच्या प्रतियोगी सहकार्यालासुद्धा विरोध करून संपूर्ण सहकाराची घोषणा करणारे गांधीजी एक वर्षाच्या आत किती बदलले होते! टिळक मात्र प्रतियोगी सहकाराच्या तत्त्वावरच स्थिर होते. केवळ पंजाबच्या हत्याकांडामुळे सरकार नव्याने अनैतिक ठरत नसून हिंदुस्थानच्या लोकांच्या इच्छेविरुद्ध इंग्रजांनी हिंदुस्थानात अगदी सुराज्य केलें तरी तें अनैतिक आहे असें टिळकांचें मत होतें. अशा स्थितीत केवळ बहिष्काराच्या अथवा फुसक्या असहकाराच्या रुसव्याने काम भागणार नसून एका बाजूला प्रचंड चळवळ व दुसऱ्या बाजूला मिळतील ते अधिकार राबवून सरकारची शासनाच्या प्रत्येक विभागात अडवणूक करणें या स्वरूपाच्या प्रतियोगी सहकाराचाच अवलंब राजकीय दूरदृष्टीचा व योग्य आहे असें टिळकांचें मत होतें. हंटर कमिटीच्या प्रतिवृत्तावरील आपली

प्रतिक्रिया व्यक्त करण्यासाठी व पुढचें धोरण ठरविण्यासाठी दि. ३० मेला वाराणशीला ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची बैठक झाली. या बैठकीला गांधीजी व लोकमान्य टिळक दोघेही उपस्थित होते. या बैठकीत या प्रतिवृत्तासंबंधीचा विरोध नोंदवून चळवळीची दिशा ठरविण्यासाठी सप्टेंबरमध्ये काँग्रेसचें खास अधिवेशन भरविण्याचें ठरलें.

हें अधिवेशन होण्याच्या आधीच दुर्दैवाने देशावर मोठा वज्राघात झाला. तो वज्राघात म्हणजे लोकमान्य टिळकांचा मृत्यु होय.

दि. २०-जुलैला लोकमान्य टिळक जगन्नाथ महाराज पंडितांच्या कोर्टाच्या कामासाठी मुंबईला असताना त्यांना ताप आला व त्यांचा आजार वाढतच गेला. टिळकांच्या या भयावह आजाराचें वृत्त कळताच डॉ. मुंजे तातडीने मुंबईला गेले. ते शेवटपर्यंत तेथेच होते. दि. ३० जुलैला दादासाहेब खापर्डे मुंबईला आले. टिळकांच्या संबंधात डॉक्टरांनी उपायांची पराकाष्ठा केली. पण ईश्वरी इच्छेसमोर कोणाचेंच काही न चालून दि. १ ऑगस्टला उजाडत्या रविवारी टिळक कालवश झाले.

टिळकांच्या आजारात जिना व गांधी त्यांना भेटावयास आले होते. त्यांच्या मृत्यूचा धक्का साऱ्या देशाला जाणवला. ते वांचावे म्हणून साऱ्या देशात प्रार्थना चालू होत्या. जें वज्रहृदय कोणालाही जिंकता व नमविता आलें नाही तें १ ऑगस्टला मृत्यूने बंद पाडलें. संपूर्ण देशभर हरताळ व शोकसभा झाल्या. नागपूरला दुखवटयाची फार मोठी सभा झाली.

टिळकांच्या मृत्यूनंतरच्या शोकसंवेदना सहनीय झाल्यावर डॉ. मुंजे यांच्यासमोर महत्त्वाचा प्रश्न उपस्थित झाला. ज्यांच्या निर्विवाद नेतृत्वाच्या आशेने त्यांनी नागपूरला काँग्रेसचें अधिवेशन भरविण्याचें निश्चित केलें होतें तेच निघून गेल्यावर ते दिङमूढ होऊन गेले. टिळकांच्या मृत्यूनंतर उत्पन्न झालेला प्रश्न राष्ट्राच्या राजकीय नेतृत्वाचा होता.

व्यक्ति कितीही मोठी असली व तिच्या मृत्यूचा केवढाही धक्का बसला तरी राष्ट्रीय आन्दोलन कोणाच्याही मृत्यूसाठी थांबविता येत नाही. कर्मयोगशास्त्राचे महान् भाष्यकार असणाऱ्या टिळकांच्या जीवनाचा तर तो संदेश नव्हताच. त्यामुळे त्यांच्याविषयीच्या दुःखाच्या छायेतच कलकत्ता येथे सप्टेंबर महिन्यात काँग्रेसचें खास अधिवेशन झालें.

काँग्रेसचें हें खास अधिवेशन बेझवाडयाला व्हावयाचें होतें. पण त्या ऐवजी तें कलकत्त्याला झालें. दि. ४ सप्टेंबर ते ८ सप्टेंबर १९२०-असें पांच दिवस हें अधिवेशन झालें. अधिवेशनाचे अध्यक्ष लाला लजपतराय होते. अधिवेशनात लो. टिळकांच्या निधनाविषयी ठराव होऊन राष्ट्राने

त्यांना श्रद्धांजलि समर्पण केली. या अधिवेशनात लखनौ काँग्रेसनंतर पुनश्च काँग्रेसने क्रांतिकारक वळण घेतलें. काँग्रेसने असहकाराचा गांधींचा ठराव बहुमताने संमत केला. तो ठराव असा :

"खिलाफतीच्या प्रश्नासंबंधात, भारतीय मुसलमानांच्या संबंधीचें आपलें कर्तव्य भारत सरकार व साम्राज्य सरकार या दोघांनीही पार पाडलेलें नाही. या संबंधात पंतप्रधानांनी दिलेलें वचन हेतुपुरस्सर मोडलेलें आहे. मुसलमानांनी त्यांच्यावरील धार्मिक संकटाच्या निवारणार्थ जे जे वैध प्रयत्न चालविले असतील त्यांत त्यांना सहकार्य देणें प्रत्येक मुसलमानेतराचें कर्तव्य आहे.

"सन १९१९-च्या एप्रिल महिन्यात ज्या घटना घडल्या त्या वेळी हिंदुस्थान सरकार व साम्राज्य सरकार या दोघांनीही पंजाबच्या निरपराध लोकांना संरक्षण देण्याच्या आपल्या कर्तव्याकडे पूर्ण दुर्लक्ष केलें अथवा त्या संबंधात ते चुकले. ज्या अधिकाऱ्यांनी सैनिकाला न शोभेसें व रानटीपणाचें वर्तन लोकांशी केलें त्यांना योग्य ती शिक्षा देण्याचें कर्तव्य दोन्ही सरकारांनी पार पाडलें नाही. अधिकाऱ्यांच्या दुष्कृत्याला प्रत्यक्ष उत्तरदायी असणाऱ्या व निरपराध लोकांच्या छळाचें साक्षात् कारण असलेल्या सर मायकेल ओडवायरच्या संबंधातील कर्तव्य उभय सरकारांनी पार पाडलेलें नाही. यासंबंधात हाऊस ऑफ लॉर्ड्स्-मध्ये जो वादविवाद झाला त्यातून हिंदुस्थानच्या लोकांविषयी इंग्रजांना कोणतीही सहानुभूति नाही व लोकांची फसवणूक करण्याची त्यांची भूमिका आहे हें स्पष्ट झालें आहे. पंजाबच्या बाबतीत पद्धतशीरपणे अत्याचाराच्या मार्गाचा अवलंब करण्यात आलेला आहे. व्हॉइसरॉयांची ताजी घोषणा हें खिलाफत व पंजाब यासंबंधात सरकारला काहीही पश्चात्ताप होत नाही याचें निदर्शनच होय.

"या सर्व गोष्टी लक्षात घेता या काँग्रेसचें असें मत आहे की, खिलाफत व पंजाबच्या संबंधात झालेल्या चुका नीट केल्यावाचून हिंदुस्थानात शांतता प्रस्थापित होणें शक्य नाही. राष्ट्रीय सन्मानाच्या संरक्षणाचा व भविष्यात या गोष्टींची पुनरावृत्ति न होण्याचा एकच मार्ग आहे व तो म्हणजे भारतात स्वराज्याची प्रतिष्ठापना करणें हा होय. या काँग्रेसचें पुढें असें मत आहे की, या दोन चुकांची दुरुस्ती होईपर्यंत व स्वराज्याची प्रतिष्ठापना होईपर्यंत हिंदुस्थानच्या लोकांना महात्मा गांधींच्या प्रगतिशील, अहिंसक असहकाराला मान्यता देऊन तो स्वीकारण्याविना दुसरा कोणताही मार्ग उरलेला नाही.

"या संबंधातील प्रारंभ ज्यांनी आजवर लोकमताला वळण दिलें व त्यांचें प्रतिनिधित्व केलें त्या पुढारीवर्गाकडूनच होणें आवश्यक आहे. सरकार आपली शक्ति पुढील काही गोष्टींच्या द्वारे केन्द्रित करते.

(१) लोकांना सन्मान व पदव्या देणें. (२) आपल्या नियंत्रणाखाली शाळा चालविणें. (३) न्यायमंदिरें व (४) विधिमंडळें.

चळवळीमध्ये कमीत कमी जबाबदारी घेणें व कमीत कमी त्याग करणें यासाठी लोकांना आवाहन करणें शक्य व्हावें आणि ईप्सितही साधावें म्हणून ही राष्ट्रसभा पुढील गोष्टी सुचविते :

(अ) पदव्या व सन्माननीय पदांचा परित्याग करावा. स्थानिक सरकारी संस्थांतून ज्यांच्या नेमणुका झाल्या असतील त्यांनी आपल्या जागांचें त्यागपत्र द्यावें.

(ब) लेव्ही, दरबार व याच तऱ्हेचे सरकारी अधिकारी यांनी घडविलेले अथवा त्यांच्या सन्मानार्थ घडविलेले जे सरकारी अथवा निमसरकारी समारंभ असतील त्यांवर बहिष्कार घालावा.

(क) हळूहळू सरकारने चालविलेल्या अथवा सरकारी साहाय्यावर चालणाऱ्या शाळा व कॉलिजांतून आपल्या मुलांना काढून घ्यावें व निरनिराळ्या प्रांतांतून राष्ट्रीय शाळा, प्रशाला व महाविद्यालयें स्थापावीं.

(ड) ब्रिटिशांच्या न्यायमंदिरावर वकिलांनी व फिर्यादींनी क्रमशः बहिष्कार घालावा. त्या जागी स्वतःचीं लवादमंडळें स्थापन करावीं व त्यांच्याद्वारा आपल्या मतभेदांचा निर्णय करण्यास शिकावें.

(ई) मेसापोटेमियात चालू असलेल्या युद्धासंबंधात सैनिक, कारकून अथवा श्रमजीवी अशा कोणत्याही नात्याने भारतीयांनी भाग घेऊ नये.

(फ) काँग्रेसचा हा असहकाराचा सल्ला न मानता जे कोणी नवीन सुधारणांनुसार प्रस्थापित झालेल्या कौन्सिलमध्ये निवडून येण्यासाठी उभे राहतील त्यांनी तसें उभें राहू नये व ते तसे राहिल्यास मतदारांनी मतें देऊ नयेत.

(ग) परकीय मालावर संपूर्ण बहिष्कार घालावा.

असहकार हा शिस्त व त्याग यांवर आधारलेला आहे. शिस्त व त्यागाशिवाय कोणतेंही राष्ट्र खऱ्या अर्थाने प्रगत होऊ शकत नाही. असहकाराच्या या पहिल्या अवस्थेत प्रत्येक स्त्रीपुरुष व मुलाला शिस्तीचें व त्यागाचें वळण लागणें आवश्यक आहे. त्यामुळे स्वदेशी कपडेच वापरीन असा पहिला निश्चय करावा. आजच्या कापडगिरण्या संपूर्ण राष्ट्राला लागेल इतकें कापड व ताग आज निर्माण करीत नाहीत व पुष्कळ दिवसपर्यंत त्या तसें करण्याचा संभवही नाही. म्हणून ही राष्ट्रीय

सभा असें सुचविते की, प्रत्येकाने आपल्या घरी चरख्यावर सूत कातून व हातविणाईचा धंदा करणाऱ्यांना उत्तेजन देऊन आपली गरज भागवावी. सहस्त्रावधि विणकर आपल्या या प्राचीन व सन्माननीय व्यवसायाला जे मुकले होते त्यांना यासाठी उत्तेजन द्यावें.

गांधींचा हा ठराव अमृतसर काँग्रेसच्या विचारपूर्वक ठरविलेल्या धोरणाच्याविरुद्ध असल्यामुळे, व्यवहार्य राजकारणाच्या दृष्टीने तो अप-क्रांतिकारक असल्यामुळे व त्यातील कौन्सिल व न्यायकोर्टांवरील बहिष्काराचा भाग तर केवळ अव्यवहार्यच नव्हे तर परिणामत: भयावह असल्यामुळे काहीतरी विशेष लढाऊ कार्यक्रम म्हणून भावनाप्रधान जनतेला तो आकर्षक वाटला असला तरी, बुद्धिमान् नेतृवर्ग या कार्य-क्रमाच्या विरुद्ध होता. हंटर समितीच्या प्रतिवृत्तामुळे उत्पन्न झालेल्या वातावरणाचा फायदा घेऊन गांधींनी असहकार देशावर लादण्यासाठी झंझावाती प्रचाराचे भगीरथ प्रयत्न सुरू केले होते. त्यांना खरी भीति केवळ टिळकांची वाटत होती. कारण टिळक संपूर्ण असहकाराच्या पूर्ण-पणे विरुद्ध होते. मे महिन्यात पुण्याला दि. २३-मेला होमरूल लीगची वार्षिक बैठक भरली असता तेथे केलेल्या भाषणात त्यांनी आपल्या अनुयायांना जें पुढच्या धोरणाचें मार्गदर्शन केलें त्यात टिळक म्हणतात, "सुधारणांचा शक्य तितका उपयोग करून घ्यावयाचा कीं नाही हा प्रश्न आता उरलेला नाही. शक्य तितका उपयोग करून घ्यावयाचा व तो करून घेता घेता पूर्ण स्वराज्य मिळविण्याची खटपट करावयाची असें आपलें धोरण निश्चित झालें आहे. तरी प्रत्येक जिल्ह्यात उमेदवार निश्चित केले पाहिजेत." टिळकांचा त्याग व त्यांची लोकप्रियता अमाप होती. त्यांच्या राजकीय शहाणपणावर लोकांचा विश्वास होता. गांधींनी पराजयाच्या जाणिवेने अमृतसरला त्यांच्या समोर पडतें घेऊन संधि केला. वाराणशीच्या जूनच्या बैठकीतही तेंच झालें. पण दि. १ ऑगस्टला टिळक वारले आणि गांधींच्या संपूर्ण अहिंसक असहकाराच्या कार्यक्रमाचा समर्थ विरोधक त्यांच्या मृत्यूने गेला. बोलाफुलाला गाठ तरी पहा! दि. १ ऑगस्टला टिळक वारले व त्याच दिवशी गांधींनी आपला असहकाराचा कार्यक्रम अलीबंधूंच्या साहाय्याने तयार केला. बेझवाडयाऐवजी कलकत्ता विचारपूर्वकच निवडण्यात आलें. दक्षिणेत गांधींना बहुमत मिळण्यासारखें नव्हतें. यास्तव त्यांनी कलकत्ता निवडलें. खिलाफतीच्या प्रचारामुळे कलकत्ता येथे मुसलमानांचें त्यांना संपूर्ण साहाय्य मिळणारें होतें व तसें तें मिळालें. ज्याला ते भीत होते तें नेतृत्व कालवश झालें होतें व अन्य पुढाऱ्यांना पराभूत करण्याइतकी शक्ति,

सरकारविरुद्ध संतप्त झालेल्या जनतेच्या मनोवृत्तीचा आपल्या दिखाऊ क्रांतिमय कार्यक्रमाने उपयोग करून घेऊन त्यांनी संपादन केली होती.

दि. ७ सप्टेंबरला विषयनियामक समितीच्या बैठकीत प्रथम हा ठराव आला. या समितीचे ३०० सभासद उपस्थित असून सहा तास खडाजंगीची चर्चा झाली. या मूळ ठरावाला दासबाबू, बिपिनचंद्र पॉल वगैरे अनेकांनी उपसूचना आणल्या. पण स्वतःच्या ठरावावर गांधी एखाद्या खडकाप्रमाणे स्थिर राहिले. मित्रत्वाचें आवाहन, अनुनय व धमक्या या कशाचाही त्यांच्यावर परिणाम झाला नाही. या समितीत ठराव मतास टाकल्यानंतर तो बहुमताने संमत झाला खरा; पण ठरावाच्या बाजूने मत देणाऱ्या प्रतिनिधींत बंगालचे प्रतिनिधि अधिक होते.

दि. ८ सप्टेंबरला खुल्या अधिवेशनात गांधींनी हा ठराव मांडला. लाला लजपतराय, बिपिनचंद्र पॉल, जिना, बॅप्टिस्टा, चित्तरंजन दास, जयकर, सत्यमूर्ति, मालवीय, ॲनी बेझंट या अतिरथी महारथींनी त्याला विरोध केला. शेवटी ठराव मतास टाकण्यात आल्यावर १८२६ विरुद्ध ८८४ मतांनी तो संमत झाला. पंजाब, मुंबई, बंगाल, संयुक्तप्रांत व बिहार येथील बहुसंख्य प्रतिनिधींनी गांधींच्या बाजूने मतें दिलीं. खापर्डे व मुंजे यांच्या मध्यप्रांत विदर्भाने मात्र गांधींच्या ठरावाला विरोध केला. कौन्सिल बहिष्काराचा ठराव या प्रांताला मुळीच मान्य नव्हता. बॅप्टिस्टा व केळकर यांनी आपल्याकडून कौन्सिल बहिष्काराच्या कार्यक्रमाचें वैयर्थ्य पटवून देण्याचा कसोशीने प्रयत्न केला पण सरकारी नीतीने संतप्त झालेल्या लोकांना दुसरा जोडीचा क्रांतिकारक कार्यक्रम देऊ शकणारा मनुष्यच या वेळी गांधींना पराभूत करू शकला असता.

असो. कलकत्त्याच्या या खास अधिवेशनानंतर काही दिवस नागपूर की जबलपूर हा वाद चालू होता. शेवटी काँग्रेस नागपूरला घ्यावयाचें निश्चित झालें; आणि काँग्रेसच्या या परिवर्तनाच्या विरोधी असलेल्या मुंजे यांच्यासमोर आपल्या प्रभावाने काँग्रेसला टिळकांच्या क्रांतिप्रवण राजकारणावर स्थिर करू शकेल असें नवें नेतृत्व शोधण्याची आवश्यकता वाटू लागली. त्या दृष्टीने मुंजे यांनी केलेले प्रयत्न व नागपूरची युगप्रवर्तक राष्ट्रसभा यांच्याकडे पुढील प्रकरणात वळू.

✦ ✦ ✦

प्रकरण विसावें

# १९२०-ची नागपूर कॉंग्रेस

ज्या उद्दिष्टाने प्रेरित होऊन डॉ. मुंजे यांनी नागपूरला राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचें निमंत्रण दिलें, त्या उद्दिष्टाचा टिळकांच्या मृत्यूसरशी विध्वंस झाला. टिळकांच्या पार्थिव देहाच्या दहनापूर्वी खापर्डे यांच्या नेतृत्वाखाली टिळकांच्या अनुयायांची एक बैठक होऊन टिळकांचें राजकारण पुढे चालविण्यासाठी पांच लोकांची एक समिति नियुक्त करण्यात आली. केळकर सोडून टिळकांचे सर्व अनुयायी या बैठकीला हजर होते. केळकरांना केसरीच्या अंकासाठी तातडीने पुण्याला जावें लागलें होतें. दि. २-ला पुन्हा एक बैठक झाली. डॉ. मुंजे नागपूरला परत आल्यावर टिळकांचें सिंहासन विभूषित करू शकेल असा प्रभावशाली अध्यक्ष शोधण्याचा त्यांनी प्रयत्न आरंभ केला. त्यांच्या डोळ्यांसमोर एका काळचे जहाल राष्ट्रवादी, बंगालच्या क्रांतिकारक पक्षाचे जन्मदाते अरविंद घोष यांचें नांव उभें राहिलें. अरविंदांचा प्रभाव अलिपूर बॉंबकेसपर्यंत भारतीय मनावर विलक्षण होता. सन १९११-मध्ये ते पांदेचरीला गेल्यावर त्यांच्याविषयीचें कुतूहल वाढलें होतें. ऑगस्टमध्येच डॉक्टरांनी अरविंद घोषांच्याशी पत्रव्यवहार प्रारंभ केला. पण अरविंदांनी अध्यक्ष होण्याचें नाकारलें. दि. ३० ऑगस्ट १९२०-ला पांदेचरीहून डॉ. मुंजे यांना पाठविलेल्या पत्रात अरविंद लिहितात :

Pondicherry
Aug. 30, 1920

Dear Dr. Moonje,

As I have already wired to you, I find myself unable to accept your offer of the presidentship of the Nagpur Congress. There are reasons even within the political field itself which in any case would have stood in my way. In the first place I have never signed and would never care to sign, as a personal declaration of faith in the Congress creed, as my own is of a different character. In the next place since my retirement from British India I have developed an outlook and views which have diverged a great deal from those I held at that time and as they are

remote from present actualities, and do not follow the present stream of political action, I should find myself very much embarrassed what to say to the Congress. I am entirely in sympathy with all that is being done so far as its object is to secure liberty for India, but I should be unable to identify myself with the programme of any of the parties. The President of the Congress is really a mouthpiece of the Congress and to make from the presidential chair a purely personal pronouncement, miles away from what the Congress is thinking and doing, would be grotesquely out of place. Not only so, but nowadays the President has a responsibility in connection with the All India Congress Committee and the policy of the Congress during the year and other emergencies that may arise which, apart from my constitutional objection and probably, incapacity to discharge official duties of any kind or to put on any kind of harness I should be unable to fulfil, since it is impossible for me to throw over suddenly my fixed programme and settle at once in British India. These reasons would in any case have come in the way of my accepting your offer.

The central reason however is this that I am no longer first and foremost a politician, but have definitely commenced another kind of work with a spiritual basis, a work of spiritual, social, cultural and economic reconstruction of an almost revolutionary kind, and am ever making or at least supervising a sort of practical or laboratory experiment in that sense which needs all the attention and energy that I can have to spare. It is impossible for me to combine political work of the current kind and this at the beginning. I should practically have to leave it aside, and this I cannot do, as I have taken it up as my mission for the rest of my life. This is the true reason of my inability to respond to your call.

I may say that in any case I think you would be making a wrong choice in asking me to take Tilak's place as your head. No one now alive in India, or at least no one yet known, is capable of taking that place, but myself least of all. I am an idealist to the morrow, and could only be useful when there is something drastic to be done, a radical or revolutionary line to be taken, ( I do not mean revolutionary by violence, ) a movement with an ideal aim and direct method to be inspired and

organized. Tilak's policy of " responsive cooperation, " contained agitation and obstruction whenever needed and that would be oftener than not in the present circumstances no doubt, the only alternative to some form of non-cooperation or passive resistance. But it would need at its head a man of his combined suppleness, skill and determination to make it effective. I have not the suppleness and skill – at least of the kind needed – and could only bring the determination, supposing I accepted the policy, which I could not do practically, as, for any reasons of my own, nothing could induce me to set my foot in the new Councils. On the other hand a gigantic movement of non-cooperation merely to get some Punjab officials punished or to set up again the Turkish Empire which is dead and gone, shocks my ideas both of proportion and of common sense. I could only understand it as a means of " embarrasing the Government " and seizing hold of immediate grievances in order to launch an acute struggle for autonomy after the manner of Egypt and Ireland, though no doubt without the element of violence. All the same, it could be only on a programme involving an entire change of the creed, function and organisation and policy of the Congress, making it a centre of national reconstruction and not merely of political agitation that I could– if I had not the other reason I have spoken of– under the political field. Unfortunately the political mind and habits created by the past methods of the Congress do not make that practicable at the moment. I think you will see that, holding these ideas, it is not possible for me to intervene and least of all in the chair of the President.

Might I suggest that the success of the Congress hardly depends on the presence of a single person and one who has long been in obscurity? The friends who call on me are surely wrong in thinking that the Nagpur Congress will be uninspiring without me. The national movement is surely strong enough now to be inspired with its own idea especially at a time of stress like the present. I am sorry to disappoint but I have given the reasons that compel me and I cannot see how it is avoidable.

Yours Sincerely
**Arobindo Ghose**

(प्रिय डॉ. मुंजे, तुम्हांला मी यापूर्वी तारेने कळविल्याप्रमाणे नागपूरच्या राष्ट्रीय सभेचें अध्यक्षपद स्वीकारावयास मी असमर्थ आहे. राजकीय क्षेत्रात अशीं अनेक कारणें आहेत की, जीं माझ्या मार्गात अडचण उपस्थित करतात. पहिली गोष्ट अशी आहे की, प्रतिज्ञा म्हणून काँग्रेसच्या उद्दिष्टपत्रिकेवर मी कधीही हस्ताक्षरी केलेली नाही. व करण्याचा संभवही नाही. कारण माझें ध्येय वेगळें आहे. दुसरी गोष्ट अशी की, मी ब्रिटिश हिंदुस्थान सोडल्यापासून जो दृष्टिकोन व जीं मतें अंगीकारलेलीं आहेत तीं त्यापूर्वीच्या दृष्टिकोनाहून पुष्कळ वेगळीं आहेत; व आजच्या वस्तुस्थितीहूनही वेगळीं आहेत. आजच्या राजकीय व्यवहाराच्या प्रवाहाशी तीं सुसंगत नाहीत. त्यामुळे फायदा न होता काँग्रेसला माझा उपद्रवच अधिक होईल. स्वातंत्र्य मिळविण्याच्या दृष्टीने जे जे प्रयत्न होत आहेत त्यांना माझी पूर्ण सहानुभूति असली तरी कोणत्याही पक्षाच्या कार्यक्रमाशी एकरूप व्हावयास मी पूर्ण असमर्थ आहे. काँग्रेसचा अध्यक्ष हा वस्तुतः काँग्रेसचें मुख असतो आणि काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून काँग्रेसच्या विचारांच्या व कार्याच्या स्वरूपाहून पूर्ण दूर असणारें व्यक्तिगत घोषवाक्य उच्चारणें विसंगत आहे; येवढेंच नव्हे तर आजकाल अध्यक्षाला अखिल भारतीय काँग्रेस समितीशी संबद्ध अशा जबाबदाऱ्या, त्या वर्षातील काँग्रेसचें धोरण व वेळोवेळी उत्पन्न होणाऱ्या आवश्यकता पार पाडाव्या लागतात. या गोष्टीला माझा असणारा घटनात्मक आक्षेप सोडला तरी हें सगळें पार पाडावयास मी असमर्थ आहे. कारण की, माझा ठरलेला कार्यक्रम एकदम सोडून मी ब्रिटिश इंडियात रहावयास येणें अशक्य आहे. तुमची सूचना मान्य करावयाच्या मार्गात कोणत्याही परिस्थितीत या अडचणी आल्याच असत्या.

सर्वांत मुख्य गोष्ट अशी की, मी यापुढे प्रथम श्रेणीचा राजकीय मनुष्य राहिलेलो नाही. आध्यात्मिक पाया असलेलें, दुसऱ्या स्वरूपाचें काम मी निश्चयपूर्वक पत्करलें आहे. आध्यात्मिक, सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक क्षेत्रांतील मूलभूत क्रांतिकारक नवरचनेचें हें काम असून त्यासाठी प्रत्यक्ष प्रायोगिक प्रक्रियेच्या (योग) क्षेत्रात मी उतरलो आहे. माझ्याजवळ असलेली सर्व शक्ति आणि लक्ष याच विषयावर केन्द्रित करणें आवश्यक आहे. माझ्या नव्या कार्याचा हा प्रारंभ असल्यामुळे आजच्या स्वरूपाचें राजकीय कार्य व मी करीत असलेलें कार्य संयुक्तपणे करण्याची शक्यता नाही. तुम्ही म्हणता तें राजकीय कार्य करावयाचें म्हणजे मला माझें अंगीकारलेलें काम सोडणें भाग आहे. पण उर्वरित

आयुष्य जीवितकार्य म्हणून स्वीकारलेल्या या आध्यात्मिक कार्यात व्यतीत करावयाचा माझा निश्चय असल्यामुळे मला राजकारणासाठी तें सोडणें शक्य नाही. तुमच्या म्हणण्याला संमति न देण्याचें मुख्य कारण हें असें आहे.

तुम्ही मला असें लिहिलें आहे की, मी टिळकांची जागा घेऊन तुमचें नेतृत्व स्वीकारावें. माझें असें मत आहे की, हल्ली असलेल्या पुढाऱ्यांत कोणीही असा नाही—निदान मला तरी माहीत नाही की, जो टिळकांच्या स्थानावर बसू शकेल. मी तर त्या योग्यतेचा नाहीच. मी भविष्याकडे पाहणारा व ध्येयवादाच्या विचारसृष्टीत दंग राहणारा मनुष्य आहे. काहीतरी मूलभूत अथवा क्रांतिकारक घडवून आणावयाचें असेल (याचा अर्थ हिंसाचार नव्हे) व त्यासाठी सरळ प्रक्रियेचा अवलंब करावयाचा असेल तरच माझा उपयोग होऊ शकतो. टिळकांचे प्रतियोगी सहकारितेचें धोरण आजच्या राजकीय परिस्थितीत सुयोग्य आहे. त्यात आवश्यकतेनुरूप सहकार्य, चळवळ व अडथळा आणणें या तिन्ही गोष्टींचा अवलंब आहे. पण टिळकांची प्रतियोगी सहकारिता प्रभावीपणाने यशस्वी व्हावयास टिळकांसारखाच दृढ निश्चयाचा चतुर व परिस्थित्यनुसार वळण घेणारा पुरुष हवा. या कार्यासाठी लागणारी चतुराई व लवचीकपणा माझ्या ठिकाणी नाही. जें मी करू शकत नाही तें धोरण मी स्वीकारावें कसें? आजच्या कौन्सिलसमध्ये कोणत्याही कारणास्तव मी पाऊल टाकू शकत नाही. तसेंच केवळ पंजाबमधील काही अधिकाऱ्यांना शिक्षा व्हाव्या व मेलेलें आणि कायमचें नष्ट झालेलें तुर्की साम्राज्याचें मढें पुन्हा सजीव करावें यास्तव असहकाराची जी प्रचंड चळवळ करण्याच्या योजना चालू आहेत त्याही माझ्या औचित्याच्या व शहाणपणाच्या कल्पनांना चांगलाच धक्का देणाऱ्या आहेत. केवळ सरकारला त्रस्त करून व तात्पुरत्या आपत्तींचा उपयोग करून घेऊन इजिप्त व आयर्लंडच्या पद्धतीची स्वायत्तता अनत्याचारी मार्गाने प्राप्त करून घेणें एवढेंच या चळवळीचें उद्दिष्ट दिसतें. मला जर अन्य कारणांमुळे अशक्य नसतें तर मी काँग्रेसच्या धोरणात, कार्यपद्धतीत व संघटनेत असें परिवर्तन सुचविलें असतें की, ज्यामुळे काँग्रेस ही केवळ राजकीय आंदोलनाची संस्था न राहता सर्वांगीण राष्ट्रपुनर्निर्मितीचें केंद्र व्हावें. दुर्दैवाने सध्याचें राजकारणाचें क्षेत्र व काँग्रेसने आजवरच्या पद्धतीने तयार केलेलें राजकीय जनमानस यांचा विचार करता माझें हें मत व्यवहार्य ठरू शकत नाही. माझ्या या कल्पनांचा पूर्ण विचार केल्यावर मला राजकीय क्षेत्रात हस्तक्षेप करणें व अध्यक्षपद स्वीकारणें कां अशक्य आहे हें आपल्या ध्यानात येईल.

मला असें सुचवावयाचें आहे की, पुष्कळ दिवसांपासून राजकीय क्षेत्र सोडलेल्या अशा एका व्यक्तीच्या उपस्थितीवर काँग्रेसचें यश अवलंबून नाही. मला निमंत्रण देणारे माझे मित्र माझ्याशिवाय नागपूर काँग्रेस स्फूर्तिदायक ठरणार नाही असें जें समजतात तें मला चुकीचें वाटतें. राष्ट्रीय चळवळीचें सामर्थ्य आता पुरेसें वाढलेलें असून तें स्वयंसिद्ध, व स्फूर्तिपूर्ण आहे. तुम्हांला निराश करताना मला दुःख होतें पण अध्यक्षपद नाकारण्याचीं माझीं कारणें मी दिलीं आहेत, आणि तीं दूर सारणें मला असंभवनीय वाटतें.

आपला

**अरविंद घोष)**

डॉ. मुंजे यांनी यानंतर अरविंदांना आणण्यासंबंधात अनेक प्रयत्न केले. अरविंदांचे धाकटे बंधु बारीन्द्रकुमार घोष यांनाही त्यांनी मध्यस्थी घालण्याचा प्रयत्न केला. शेवटी ते स्वतः कलकत्ता काँग्रेसच्या खास अधिवेशनानंतर पांदेचरीला जाऊन आले. या प्रवासात डॉ. हेडगेवार त्यांच्याबरोबर होते. दुर्दैवाने अरविंदांना वळविण्यात त्यांना यश आलें नाही व 'स्थितस्य गतिश्चिन्तनीया' या न्यायानुसार बोलावलेंच आहे तर नागपूरचें अधिवेशन पार पाडलेंच पाहिजे या भूमिकेवरून डॉक्टरांनी अधिवेशनाच्या कार्यावर आपलें मन केन्द्रित केलें.

कलकत्त्याच्या अधिवेशनात संमत झालेला गांधींचा ठराव महाराष्ट्र व विदर्भात कोणालाच संमत नव्हता, पण काँग्रेसची आज्ञा म्हणजे राष्ट्राची आज्ञा म्हणून तूर्त तो पाळावा; शेवटी तो अपेशी ठरून आपल्या मार्गावर राष्ट्रसभा येईल अशा मताचे बहुतेक लोक होते. इंग्रजांच्या विरुद्ध सामुदायिक परिणामकारक चळवळ म्हणूनही लोक या असहकाराकडे सहानुभूतीने पहात होते. लोकमत सध्या असहकाराकडे झुकत असल्यामुळे त्याला विरोध करून भागणार नाही; पण पुढे त्याला वळण लावावयास्तवच पण आज त्याला मान तुकवावी असें त्या वेळी शामरावदादा देशपांडे, बाबासाहेब खापर्डे इत्यादींचें मत होतें. त्याच वेळी कौन्सिलच्या निवडणुका आल्या. लोकमताचा विचार करून दादासाहेब खापर्डे यांनी निवडणुकीला उभें राहू नये असा त्यांना टिळकांचे शिष्योत्तम म्हणविणाऱ्या लोकांनीही सल्ला दिला. डॉ. मुंजे यांनी लोकमताचा कौल पाहून दादासाहेबांचा बोज रहावा म्हणून त्यांनी कौन्सिलला उभें राहू नये अशी त्यांना तार केली. पण खोट्या प्रतिष्ठेसाठी तत्त्वच्युत होणारे दादासाहेब नव्हते. त्यांनी सर्वांचा सल्ला

झिडकारला व ते निवडणुकीला उभे राहिले. दादासाहेब खापर्डे दि. १०-१०-२० च्या दैनंदिनीत लिहितात :– "बापूजी अणे म्हणाले की, आमच्या पक्षातील लोकांशी त्यांचें बरेंच बोलणें झालें. ते सर्व कबूल करतात की, असहकार बरोबर नाही; परंतु उघडपणे त्याच्या विरुद्ध बोलण्याचें त्यांना धैर्य नाही. बापूजींना फार निराशा वाटली." या वर्णनावरून तत्कालीन लोकस्थितीवर प्रकाश पडतो. दादासाहेब निवडणुकीला उभे राहिले व दि. ३० नोव्हेंबरला वरिष्ठ विधिमंडळात निवडून आले. दुसरें धैर्य रामराव देशमुख यांनी दाखविलें व ते प्रांतिक कौन्सिलला उभे राहून निवडून आले.

नागपूरचे काँग्रेसचें ऐतिहासिक महत्त्वाचें अधिवेशन दि. २६ डिसेंबरला प्रारंभ झालें. त्यापूर्वी असहकाराच्या वावटळीतून राष्ट्रीय सभेचें तारू सुरक्षित नेण्याचा प्रयत्न म्हणून देशबंधु चित्तरंजन दास, न. चिं. केळकर, गंगाधरराव देशपांडे प्रभृति पुढारी दि. २-डिसेंबरला नागपूरला एकत्रित झाले. या बैठकीला उपस्थित राहण्यास्तव मुंजे यांनी खापर्डे यांना तातडीची तार केल्यामुळे तेही आले. दि. २ डिसेंबरच्या दैनंदिनीत दादासाहेब लिहितात, "डॉ. मुंजे आले आणि माझ्या नांवाचें एक पत्र ठेवून गेले. उधोजींच्या बंगल्यावर तीन वाजता दुपारी मी, सी. आर्. दास, केळकर आणि इतर लोकांना भेटावयास यावें असा त्यात मजकूर होता. त्याप्रमाणे मी तेथे गेलो. ठरल्याप्रमाणे सी. आर्. दास, केळकर, गंगाधरराव देशपांडे, बॅ. जी. व्ही. देशमुख, जमनालाल बजाज, चोळकर, वैद्य, बाबासाहेब देशमुख (चांदा) आणि इतर पुष्कळ लोक आले. कलकत्त्याच्या खास काँग्रेसमध्ये असहकाराचा जो ठराव झाला त्याचा पुनर्विचार व्हावा अशा अर्थाच्या जाहिरनाम्याचा आराखडा सी. आर्. दास यांनी तयार केला आहे. माझ्या मते तो जितका दूरगामी असावा तितका नाही. मी तसें बोलूनही दाखविलें. केळकर अनिश्चित दिसतात. जमनालाल बजाज हे अशा जाहिरनाम्याच्या विरुद्ध आहेत आणि आमच्या नागपूरच्या मित्रमंडळींना काय करावें तें समजत नाही. डॉ. मुंजे यांचें मत माझ्यासारखें दिसतें." यानंतर दि. १० डिसेंबरला खापर्डे यांनी स्वतःच्या सहीने एक पत्रक काढलें व सर्व पुढाऱ्यांना पाठविलें. या पत्रकात काँग्रेसमध्ये राहून स्वतःच्या तत्त्वांनुसार म्हणजे प्रतियोगी सहकाराच्या तत्त्वांनुसार काम करता येणें अशक्य ठरल्यास नवा पक्ष काढणें इष्ट ठरेल काय अशी विचारणा केली होती. अणे यांनी या वेळी असहकाराविरुद्ध नागपूरलाच आघाडी उघडली होती असें दिसतें. दि. १४-१२-२०-च्या दैनंदिनीत खापर्डे लिहितात,

"बापूजी अणे नागपुराहून आले ते नागपूरला नॉन्-को-ऑपरेशन्च्या विरुद्ध व्याख्यानें देत होते. आणि त्यांनी तेथे आपल्या मताला अनुकूल असें वातावरण निर्माण केलें आहे. मी तयार केलेला मेमोरँडम त्यांनी पाहिला, आणि त्यांना तो पसंत पडला आहे असें दिसलें.

अरविंद घोषांचा नकार आल्यावर मद्रासचे विजयराघवाचार्य यांची नागपूर काँग्रेसच्या अध्यक्षपदी निवड झाली. या काँग्रेसचे स्वागताध्यक्ष स्वत: डॉ. मुंजे हेच व्हावयाचे, पण नागपूर की जबलपूर या वादात नागपूरची निवड झाल्यामुळे रुष्ट असलेल्या हिंदी भाषिकांचें अंशतः समाधान व्हावें म्हणून व पैशाच्याही सोयीच्या दृष्टीने वर्ध्याचे जमनालाल बजाज यांची स्वागताध्यक्ष म्हणून नियुक्ति करण्यात आली. डॉ. मुंजे हे या काँग्रेसच्या स्वागतकारिणीचे प्रधान मंत्री होते. स्वयंसेवक विभागाचे अध्यक्ष डॉ. ल. वा. परांजपे हे असून डॉ. हेडगेवार हे त्यांचे साहाय्यक होते. निधिविभागाचे बॅ. मोरोपंत अभ्यंकर हे मुख्य असून आरोग्यविभागाचे अध्यक्ष डॉ. ना. भा. खरे व त्यांना साहाय्यक डॉ. हेडगेवार हे होते.

दि. २६, २८, ३० व ३१ डिसेंबर असे चार दिवस हें अधिवेशन नागपूरला झालें. अधिवेशन ज्या विभागात उभारलेल्या भव्य मंडपात झालें त्या विभागाला अजूनही 'काँग्रेसनगर' हेंच नांव आहे. नागपूरच्या या अधिवेशनाइतकें भव्य असें अधिवेशन यापूर्वी झालेलें नव्हतें.

अहिंसक असहकाराच्या गांधीप्रणीत धोरणावर राष्ट्रसभेच्या मान्यतेची अंतिम मुद्रा नागपूरच्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनात उमटली. अधिवेशनाचे अध्यक्ष सी. विजयराघवाचार्य यांची मिरवणूक भव्य होती. अध्यक्षांबरोबर महात्मा गांधी, मोतीलाल नेहरू, पं. मालवीय, लजपतराय, देशबंधु दास, महंमद अल्ली जिना, शौकत अल्ली, महंमद अल्ली व मौलाना आझाद हे व्यासपीठावर विराजमान झालेले होते. लोकमान्य टिळकांचें मोठें भव्य तैलचित्र अध्यक्षीय सिंहासनाच्या समोरच उभारण्यात आलें होतें. अध्यक्षीय भाषणात विजय राघवाचार्य यांनी देशातील राजकीय परिस्थितीचा उत्कृष्ट आढावा घेतला. ते असहकाराच्या विरुद्ध आहेत असें गांधीजींनी आधीच सांगितल्यामुळे प्रारंभी थोडा गलका झाला. पण बिपिनचंद्र पाल यांनी आपल्या खड्या आवाजात त्यांचें भाषण वाचून दाखवावयास प्रारंभ करताच वातावरण शांत झालें. अधिवेशनाला बावीस सहस्रांवर समुदाय उपस्थित होता. यावरून त्याची भव्यता जशी ध्यानात येते तसेंच ध्वनिवर्धक नसलेल्या त्या काळात बिपिनचंद्र पाल आपल्या भाषणाने त्या सर्व समाजाला शांत करू शकले यावरून त्यांच्या आवाजाच्या बुलन्दपणाचीही कल्पना येते.

नागपूरच्या अधिवेशनाने काँग्रेसच्या घटनेत महत्त्वाचें परिवर्तन केलें. काँग्रेसच्या उद्दिष्टात ब्रिटिश साम्राज्यांतर्गत स्वराज्य" असे शब्द असत त्याऐवजी "जर शक्य असेल तर ब्रिटिश साम्राज्यांतर्गत व आवश्यक असेल तर "ब्रिटिश साम्राज्यविरहित स्वराज्य" असे शब्द घालण्यात आले. स्वराज्यप्राप्तीच्या मार्गासंबंधी पूर्वी घटनात्मक अथवा कायदेशीर असे शब्द असत. त्या स्थानी "वैध व शांततामय मार्ग" असे शब्द आले. गांधीजींनी हें परिवर्तन केलें तें नव्या वैचारिक विकासाचें द्योतक होतें. त्यांनीच हा ठराव मांडला. या ठरावावर पुष्कळ वादविवाद झाला. ठरावाला खरा विरोध महंमद अल्ली जिना यांनी केला. आपल्या भाषणात जिना यांनी गांधीजींचा निर्देश मि. गांधी व महंमद अल्लींचा निर्देश मि. महंमद अल्ली असा केला. त्यासरशी लोकांनी 'महात्मा' व 'मौलाना' या शब्दांचा आग्रह करून गोंधळ माजविला. पण जिनांनी त्यांना मुळीच धूप घातला नाही. हा प्रस्ताव बहुमताने संमत करण्यात आला. यानंतर अस्पृश्यतानिवारण, एक कोटीचा टिळक स्वराज्य फंड इत्यादि प्रस्तावांनंतर सर्वांत महत्त्वाचा प्रस्ताव असहकाराचा होता. विषयनियामक समितीत या प्रस्तावावर कडाक्याची चर्चा झाली. प्रस्तावाचे महान् विरोधक वस्तुत: चित्तरंजन दास होते. त्यांनी कलकत्ता अधिवेशनात तर विरोध केलाच होता पण नागपूरला हा विरोध प्रभावी करण्यासाठी त्यांनी आपल्या समवेत २५० प्रतिनिधि आणले होते. गांधीजींच्या व त्यांच्या काय कानगोष्टी झाल्या तें फक्त ईश्वरालाच माहीत; पण विरोधासाठी आलेले दास स्वत: या ठरावाच्या बाजूचे झाले. इतकेंच नव्हे तर त्यांनी तो ठराव स्वत:च मांडला. तो ठराव असा : "काँग्रेसचें असें मत आहे की, सरकारने देशाचा विश्वास गमाविला आहे. भारतीय लोकांनी स्वराज्यस्थापनेचा निश्चय केलेला आहे. कलकत्ता येथील खास अधिवेशनाच्या पूर्वीपर्यंत हिंदुस्थानच्या लोकांनी चोखाळलेलें सर्व मार्ग त्यांच्या अधिकारांना मान्यता मिळवून देण्यास असमर्थ ठरले आहेत. खिलाफत, पंजाब व इतर अनेक बाबतीत झालेले अन्याय या मार्गांनी दूर होऊ शकले नाहीत.

"ही राष्ट्रसभा कलकत्त्याला झालेल्या अहिंसक असहकाराच्या ठरावावरील आपला विश्वास व्यक्त करते व असें घोषित करते की, तो संपूर्ण ठराव अथवा त्याचा भाग, प्रस्तुत सरकारशी करावयाच्या सामान्य सहकार्याच्या परित्यागापासून तर कर देणें बंद करण्यापर्यंतच्या कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष व्यवहारात आणावा. त्याची योग्य वेळ राष्ट्रीय सभा अथवा तिची कार्यकारिणी ठरवील तोवर देशाला या

गोष्टीसाठी सिद्ध करावयास्तव परिणामकारक मार्ग म्हणून पुढील गोष्टी कराव्या.

(अ) १६ वर्षांच्या खालील मुलांच्या आईवडिलांना अथवा पालकांना (त्या मुलांना नव्हे) या गोष्टीसाठी प्रवृत्त करावें की, त्यांनी आपलीं मुलें सरकारी, निमसरकारी व सरकारच्या साहाय्याने चालणाऱ्या शाळांतून काढून राष्ट्रीय शाळांत पाठवावी. जेथे राष्ट्रीय शाळा नसतील तेथें शिक्षणाची स्वतंत्र सोय करावी.

(ब) १६ व त्यापेक्षा अधिक वयाच्या मुलांनी अशीं सरकारसंबद्ध विद्यालयें व महाविद्यालयें सोडावीं. त्यांनी एकतर असहकाराच्या चळवळीला स्वतःला वाहून घ्यावें किंवा राष्ट्रीय शिक्षणसंस्थातून शिक्षण घ्यावें.

(क) नगरपालिका शिक्षणमंडळें, निमसरकारी व सरकामान्य शिक्षणसंस्थातील विश्वस्त, व्यवस्थापक व शिक्षक यांनी आपापल्या संस्थांचें राष्ट्रीयीकरण करावें.

(ड) वकिलांनी वकिलीचा व्यवसाय बंद करावा. कोर्टावर बहिष्कार घालून खाजगी लवादांमार्फत भांडणें तोडावीं व स्वतःला राष्ट्रकार्यास वाहून घ्यावें.

(ई) हिंदुस्थान आर्थिक दृष्टचा स्वयंपूर्ण व्हावा म्हणून व्यापाऱ्यांनी क्रमशः परकीयांशी व्यापारी संबंध तोडावे, सूत कातणें व हातमाग यांना उत्तेजन द्यावें. अ. भा. काँग्रेस समिति लवकरच तज्ज्ञांची समिति नेमणार आहे. ती परकीय वस्तूंवरील बहिष्काराच्या योजनेची पद्धतशीर आखणी करील.

(फ) असहकार यशस्वी व्हावयास स्वार्थत्यागाची गरज असते. प्रत्येकाने ही चळवळ यशस्वी व्हावयास्तव शक्य तितका स्वार्थत्याग करावा.

(ग) प्रत्येक ठिकाणी वरच्या केन्द्राशी संबद्ध अशा ही चळवळ चालविणाऱ्या समित्या स्थापन कराव्या.

(ह) राष्ट्रकार्यकर्त्यांची संघटना निर्माण करावी.

(इ) अखिल भारतीय टिळक स्वराज्यनिधि गोळा करावा. त्याचें उद्दिष्ट सामान्यतः राष्ट्रकार्य व विशेषतः असहकाराच्या चळवळीला आर्थिक साहाय्य हें राहील.

कौन्सिल बहिष्काराचा कार्यक्रम बराचसा यशस्वी केल्याबद्दल ही राष्ट्रसभा सर्वांना धन्यवाद देते. नवीं कौन्सिलें देशाचें प्रतिनिधित्व करीत नाहीत. तरीही जे लोक उभे राहून निवडून आले आहेत त्यांनी

आपल्या जागांचें त्यागपत्र द्यावें. ते देणार नाहीत तर लोकांनी तशी मागणी करावी. तरीही ते ऐकणार नाहीत तर त्यांना तेथे कोणतेही राजकीय काम करण्यासाठी मतदारांनी सांगू नये.

आरक्षक, सैनिक व जनता यांच्यातील वाढत्या स्नेहपूर्ण संबंधांची राष्ट्रसभेला जाणीव आहे. त्यांनी अधिकाऱ्यांच्या आज्ञा पाळताना आपल्या देशविषयक कर्तव्याला कमी लेखू नये.

सरकारी नोकरांनी त्यागपत्र देणें शक्य नसेल तर लोकांशी वागताना स्नेहपूर्णतेने व प्रामाणिकपणाने वागावें, प्रत्यक्ष भाग न घेतला तरी उघडपणे व निर्भयपणे राष्ट्रीय समारंभांना जावें व राष्ट्रीय चळवळीला उघड आर्थिक साहाय्य करावें.

अनत्याचार हा असहकाराचा आत्मा असल्यामुळे सर्वांनी मन, वाणी व कर्माने पूर्ण अनत्याचारी असावें. हिंसा लोकतंत्राच्या विकासालाच अपायकारक असून असहकाराच्या पुढच्या पायऱ्यांना बाधक आहे.

खिलाफत व पंजाबमधील अन्याय दूर होऊन एक वर्षात स्वराज्य मिळावें म्हणून ही राष्ट्रसभा काँग्रेसशी संबद्ध वा असंबद्ध अशा सर्व सार्वजनिक संस्थांना एकाग्र चित्ताने याच चळवळीत संपूर्ण सहकार्य करण्याचें आवाहन करते."

देशबंधु दास यांनी वरीलप्रमाणे ठराव मांडल्यानंतर गांधीजींनी त्याला दुजोरा देताना 'एक वर्षात स्वराज्य' मिळवून देण्याची अभिनव घोषणा केली. पाल व लजपतराय यांच्या भाषणानंतर मोतीलाल नेहरू यांनी तात्पुरते अध्यक्षपद स्वीकारून ठरावाच्या विरुद्ध कोणाला बोलावयाचें असल्यास समोर येण्याचें आवाहन केलें. कोण येणार ? एकमताने, टाळ्यांच्या कडकडाटात व गर्जनांच्या प्रतिध्वनीत प्रस्ताव संमत झाला. गांधीजींच्यावर पुष्पवृष्टि झाली. त्यांचा जयजयकार झाला. देशाने टिळकांनंतरचा आपला नेता निवडला व नागपूर काँग्रेसचें हें क्रांतिकारक अधिवेशन समाप्त झालें.

गांधीजींच्या या अनत्याचारी असहकाराचें, व हिंदु मुस्लिम एकतेसाठी केलेल्या खिलाफतीच्या पुरस्काराचे दुष्परिणाम साऱ्या देशाला भोगावे लागले. त्यांचा अनत्याचारी असहकाराचा कार्यक्रम फसला. त्यात पुढे अनत्याचार उरला नाही. असहकार सोडून त्यांनी स्वतःच सहकाराला मान्यता दिली. एक वर्षात स्वराज्याची घोषणा फसवी व केवळ प्रचारकी ठरली. शेवटी टिळकांच्या प्रतियोगी सहकारितेवरच त्यांना स्थिर व्हावें लागलें. पण त्यासाठी देशाला पुष्कळ हानि सोसावी लागली.

या ठरावाला कोणी विरोधक नव्हते काय ? एक होते मालवीय-जी व दुसरे दादासाहेब खापर्डे. पं. मालवीयजी आजारी असल्यामुळे त्यांनी आपला विरोध पत्रद्वारें गांधीजींना कळविला व गांधीजींनी तें पत्र उघडचा अधिवेशनात वाचून दाखविलें. दादासाहेब खापर्डे विरोधाला उभे राहिले. पण मुंजे यांनी त्यांना तसें करू दिलें नाही. दादासाहेब खापर्डे आपल्या दि. २८–१२–२०-च्या दैनंदिनीत लिहितात :

" माझी बोलण्याची इच्छा होती. मुंजे यांनी न बोलण्याविषयी मला विनंती केली आणि वर सांगितलें की, मी गांधींनी आणलेल्या ठरावाविरुद्ध मतही देऊ नये. मी नमतें घेतलें नाही आणि व्यासपीठा-जवळ गेलो. तेव्हा शेवटी मुंजे म्हणाले की, मी तुम्हांला बळजबरीने धरून ठेवीन. "

स्वतः मुंजे या ठरावाच्या विरुद्ध होते. मग त्यांनी स्वतःही विरोध केला नाही व खापर्ड्यांनाही करू दिला नाही याचें कारण काय ? १९२०-च्या काँग्रेसच्या प्रतिवृत्ताला लिहिलेल्या प्रस्तावनेत डॉ. मुंजे लिहितात : " आणखी एक घटना अशी घडली की जी पूर्णपणे हृदय भंगून टाकणारी होती. तिने आम्हांला राजकीय दृष्टीने अनाथ केलें. ती घटना म्हणजे दि. १ ऑगस्ट १९२०-ला झालेलें लोकमान्य टिळकांचें महानिर्याण होय. या अनपेक्षित व आकस्मिक घटनेने आमच्यावर वज्राघात झाला व आम्ही स्तंभित झालो. पण एक कार्य आम्ही घेतलें होते, त्या दृष्टीने काही सिद्धता झाली होती. म्हणून एखाद्या निर्जीव यंत्राप्रमाणे आम्ही या काँग्रेसचें काम रेटलें. या घटनेने आमची उत्साह-शक्तिच नष्ट झाली. हें अधिवेशन संपेपर्यंत आम्ही टिळकांचे अनुयायी याच अवस्थेत होतो. " मुंजे यांच्या या निवेदनात सर्व स्पष्टीकरण आलें आहे.

कै. धर्मवीर डॉ. मुंजे यांच्या सार्वजनिक जीवनाचे दोन भाग पडतात. एक सन १९०० ते १९२० पर्यंतचा टिळकयुगाचा व दुसरा १९२१ ते त्यांच्या निधनापर्यंतचा. आम्ही त्यांच्या चरित्राचा हा प्रथम खंड येथे समाप्त करतो. यानंतरचा महाराणा प्रतापाप्रमाणे सर्वस्वाचा होम करून हिंदुत्वाच्या आघाडीवर त्यांनी जी आजीवन अखंड झुंज दिली तिचें यथार्थ वर्णन करणारा त्यांच्या जीवनाचा रोमहर्षक विभाग हा दुसऱ्या खंडात वर्णन करण्यात येईल.

डॉ. मुंजे हे राष्ट्राच्या सैनिकीकरणाचे व तें समर्थ करण्यासाठी आवश्यक त्या शक्तीच्या उपासनेच्या पुरस्काराचे परतंत्र भारतातील आद्य प्रवर्तक होत. आज राष्ट्र त्यांच्या सिद्धान्तावर स्थिरावत आहे. त्यांनी या दृष्टीने केलेल्या चळवळींचा व प्रयत्नांचा व तदनुषंगाने भारतीय राजकारणाचाही अस्सल कागदपत्रांच्या पुराव्यासह इतिहास या चरित्राच्या दुसऱ्या खंडातच देण्याचें आश्वासन देऊन आम्ही वाचकांचा तूर्त निरोप घेतो.

✦ ✦ ✦

# परिशिष्ट

डॉ. मुंजे यांचा पत्रव्यवहारसंग्रह मोठा असून त्यांत महत्त्वाचीं अशीं पत्रें पुष्कळच आहेत. त्यांवरून वरून चाललेल्या अनेक चळवळींचे अंतर्गत सूत्रधार कोण कसे असत याचें स्वरूप लक्षात येतें. येथे विशिष्ट संदर्भगत अशा काही पत्रांचा परिशिष्टात समावेश करण्यात येत आहे. आपलें राजकीय धोरण निश्चित करण्यापूर्वी सर्वांचा विचार घेण्याची व त्यासाठी पत्रव्यवहाराने वा समक्ष भेटून विचारविनिमय करण्याची लो. टिळक प्रभृतींची पद्धति त्यावरून दिसून येते. मंडालेहून टिळक सुटून आल्यानंतर जहाल-मवाळ प्रकरणी त्यांनी डॉ. मुंजे यांना पाठविलेलीं काही पत्रें पुढें दिलीं आहेत. तसेंच पुन्हा काँग्रेसमध्ये प्रवेश करणें त्यांना कां अवश्य वाटत होतें व त्यासाठी स्वराज्यसंघाच्या संघटनेचा व प्रांतिक परिषदांचा कसा उपयोग झाला हें या पत्रव्यवहारावरून दिसून येतें.

## लो. टिळकांचीं व्यक्तिगत मार्गदर्शक पत्रें

### १. श्री. दादासाहेब खापर्डे यांना पत्र दि. ३०-११-१९१५

Poona City
30th Nov. 1915.

My dear Dadasaheb,

It is proposed here that we the nationalists should not remain inactive in the coming Xmas, and Mr. Kelkar goes from here to discuss with you these proposals. He starts from here on the day after tomorrow and will see you at Amaraoti on Saturday. You and he may then go to Nagpur. From Nagpur Mr. Kelkar will go to Calcutta to consult Babu Motilal. There will be mainly two subjects — Compromise and Home Rule. You are of course posted up of the course of events up to date. Our view will be explained by Mr. Kelkar.

You must have learnt from the papers that the Bombay High Court has removed the stay of execution it put on the Privy Council decree which will now be shortly executed. Kamat's appeal is postponed to January.

With best respects,

Yours Sincerely
**B. G. Tilak**

---

## २. डॉ. मुंजे यांना पत्र दि. ३०।११।१९१५

Poona City
30th Nov. 1915

My dear Dr. Munje,

I have got your last and urgent letter after I returned from Bombay today afternoon. I could not, therefore write, anything in today's Kesari, which was out before I returned. I shall however take the earliest opportunity to take up the subjects and points mentioned in your letter.

It will be well if Dr. Gour writes to the Congress Committee. Do persuade him to do so.

We are thinking here as to what we should do in the coming Xmas. Mr. Kelkar leaves Poona day after tomorrow and will go first to Amaraoti and with Dadasaheb see you on Sunday next. He will explain to you fully what we mean to do. The matter is to be settled after consulting all including Motilal Babu and other Calcutta friends.

I have nothing to add further. This letter is by way of advice to you.

Yours Sincerely
**B. G. Tilak**

---

## ३. डॉ. मुंजे यांना पत्र दि. २।१२।१९१५

Poona City
2–12–1915

My dear Dr. Munje,

I have got your letter dated yesterday and have read Dr. Gour's draft. I think it is enough as an introductory letter, further discussion taking place in the meeting of the Committee. I have suggested the addition of the words " or automatic affiliation " after " popular election ". But they may be dropped if Dr. Gour thinks that they are unnecessary.

In the next issue of the Kesari I shall write on the lessons to be learnt from your joint Conference.

Mr. Kelkar left Poona today and after visiting Dadasaheb at Amaraoti will see you if possible with Dadasaheb on Sunday next. He will then explain to you our scheme for Xmas. He is to go to Calcutta to see Motibabu and if you have time, please do go with him to Calcutta.

My health is better, but not yet completely restored.
I return Dr. Gour's draft herewith.

I am,
Yours Sincerely
**B. G. Tilak**

P. S. Your endeavour now should be that the C. P. and Berar delegates who attend the Bombay Congress should represent the Conference view in the Subjects Committee of the Congress. Will Dr. Gour attend ? If so, well and good.

Reply by wire after
consulting friends.

४. डॉ. मुंजे यांना पत्र दि. १०।१२।१९१५

Poona City
10th December 1915

My dear Dr. Munje,

I have to communicate to you a proposal for compromise just now brought in by Mr. Dajisaheb Khare.

You know that last year we told Mrs. Besant that if public meetings be held to elect delegates the nationalists would not object to their being elected at such meetings. But the Bombay Provincial Congress Committee refused to hold any public meeting and therefore the Bombay nationalists were not elected. Upon this Bengal nationalists refused to go to Madras.

Now Mr. Khare ( after consulting Mr. Wacha—this is private by the by ) says that Bombay Provincial Committee as well as all Conventionists' District Committees are prepared to hold public meetings at public places throughout Deccan with non-party presidents and elect all nationalists we name. Even Poona Committee is prepared to do this. When so elected we can go into the Congress after accepting Art. I and press any amendments we like. Last year the Bombay Provincial Committee was unwilling to do this on account of Gokhale and Mehta. But there is no such reason this year and we here think that if we accept the proposal we shall be able to force our amendments in the Congress. They also tell us that C. P. Provincial Congress Committee will also act accordingly. I have written to Motibabu for his opinion; as if we go, we must go all in a body.

After your joint conference, I do not think your Provincial Congress Committee would refuse to act as suggested by the Bombay Committee. In fact if the Bombay Committee elects us in public meetings convened by them, your Committee will, I am sure, follow suit. Bengal Committee has already done so last year. So Bengal, Nagpur and Deccan nationalists can in a body go this year into the Congress and in my opinion have a good chance of having their amendments carried out. What do you think ? In this way we shall not also be excluded from a share in the settlement of the Home Rule question. More in my next.

Yours Sincerely
**B. G. Tilak**

---

### ५. डॉ. मुंजे यांना पत्र दि. ४।१।१९१६

Poona City
4–1–1916

My dear Dr. Munje,

Copy of the letter to Mr. Dixit by Mr. Chintamani is returned under a separate cover. Mr. Kelkar has got angry with you for supposing that he and his Satara friends are at the bottom of the compromise movement. I must tell you that the truth is otherwise. Frankly speaking, I myself think that we the nationalists must make the best of opportunity. I have already written to you that it would be impolitic not to take full advantage of this concession. If we go we are sure to win, if not we should have to stand out and perhaps incur the odium of being ourselves obstinate. I, however, do not wish to force my views on the party. I am, as you will see from the printed proceedings of the last meeting sent to you, prepared to wait till next September or October when the matter may again be reconsidered as Mr. Motibabu advises. I think, therefore that you will better not allude to Mr. Kelkar and Satara friends in your letters hereafter, as according to your wishes I have to show these letters to them.

I regret to say that I am not improving in health and will have to take complete rest for some time.

Yours Sincerely
**B. G. Tilak**

---

### ६. डॉ. मुंजे यांना पत्र दि. ८।१।१९१६

Poona City
8th Jan. 1916

My dear Munje,

I have read your long letter very carefully; and I agree with you that the compromise is not what we want. It is not only half and half; but in some respects it smells of suspicion.

